# चंद्रगुप्त

अथवा

# दोन अडीच हजार वर्षांपूर्वीचें हिंदुस्थान.

( एक ऐतिहासिक कादंबरी )

---


## हरि नारायण आपटे,

संपादक— करमणूक.



हें पुस्तक पुणें येथें " आर्यभूषण " छापखान्यांत
नरेश अप्पाजी द्रविड यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

---

आवृत्ती दुसरी.

---

सन १९१४

---

किंमत १ रुपया.

# आधींचे दोन शब्द.

काहीं पुराणांतून **चंद्रगुप्त** व त्याच्या पूर्वींचे राजे **नंद** यांच्या वंशाचे व नांवाचे उल्लेख आहेत. **चंद्रगुप्त** हा ग्रीक राजा **अलेक्झांडर** याशीं समकालीन होता यामुळें एक दोन ग्रीक ग्रंथकारांच्या ग्रंथांतून **पाटलिपुत्राचीं**, **चंद्रगुप्ताचीं** व त्याच्या राज्याचीं वर्णनें आलीं आहेत. **चंद्रगुप्त** हा, बुद्धधर्माभिमानी चक्रवर्ती राजा **अशोक** अथवा **प्रियदर्शी** याचा आजा यामुळें बौद्ध ग्रंथांतून त्याची कथा आलेली आहे. **मुद्राराक्षस** नाटकांत **चाणक्य** व **चंद्रगुप्त** यांचीं कारस्थानें आलीं आहेत.

ह्या सर्व ग्रंथांतून मिळणारी माहिती घेऊन तींत कादंबरीस योग्य असे वाटले फेरबदल करून ही कादबरी रचली आहे. **अलेक्झाडरानें** हिंदुस्थानावर स्वारी करून '**पोरस**,' राजाचा पराभव केला आणि पुढें आपला मांडलिक अशा पेशानें त्यास राज्य करूं दिलें, स्कृत ग्रंथांत कोठेंही **पोरसाचा** उल्लेख नाहीं; परंतु **मुद्राराक्षसांत** व बौद्धग्रंथ **महावंश** यांत उल्लेखिलेला **पर्वतेश** हा **पोरसच** असावा अशी कादंबरी रचणाराची कल्पना झाली आहे.

---

# चंद्रगुप्त

## अथवा

# दोन अडीच हजार वर्षांपूर्वीचें हिंदुस्थान.

## उपोद्घात–पूर्वार्ध.

### वत्सलाभ.

हिमालय पर्वत म्हणजे सर्व पृथ्वीवरील पर्वतांचा केवळ राजा अशी सार्वत्रिक समजूत आहे, आणि शिखरांच्या उंचीमुळें त्यावरील वनस्पतींच्या अनंतत्वामुळें, भव्य वनशोभेमुळें, महानद व महानद्या यांच्या उगमामुळें, विस्तृतशा दऱ्याखोऱ्यांमुळें, तेथें असणाऱ्या हिंस्र श्वापदांमुळें आणि वृक्षांच्या गगनचुंबी विशालत्वामुळें या गिरिश्रेष्ठास ती पदवी पूर्णपणें शोभतेही. यावरील वनें अत्यंत गहन आणि फार भयंकर; नेहमीं अत्यंत शीत असल्याकारणानें येथील हिंस्र व इतर जनावरेंही स्वभावसिद्ध ऊर्णावस्त्रांनीं आच्छादित; आणि जे मानवी प्राणी याधर राहतात ते आपल्या शरीराच्या रक्षणाकरितां या पशूंस मारून त्यांच्या नैसर्गिक वस्त्रांचाच आपल्या शीतनिवारणार्थ उपयोग करितात.

भयंकर पर्वत असो, कीं अगदीं रखरखीत असें वालुकारण्य असो, मनुष्यप्राण्यानें आपल्या राहण्याची सोय तेथें केली नाहीं असें कधीं झालेंच नाहीं. जेथें म्हणून आपला जीव अनायासानें तगवतां येईल, तेथें हा प्राणी जाऊन तेथील झाडांझुडुपांचा व इतर प्राण्यांचा फन्ना पाडून आपली राहण्याची तजवीज करून टाकावयाचाच. याच न्यायानें या पर्वताच्याही भागांवर जेथें जेथें म्हणून जाऊन राहणें शक्य, तेथें तेथें येथील रानटी खासिआ वगैरे लोक आहेतच. अमुक ठिकाणीं म्हणजे मनुष्य राहणें शक्य असून तेथें मनुष्य नाहीं असें कोठेंच स्थान सांपडावयाचें नाहीं. यांपैकीं काश्मीरच्या लगत्याला जे या पर्वताचे भाग आहेत, त्यांवरील व पूर्वेच्या सर्व पठारांवरून फार प्राचीनकाळीं धनगरांचा व गवळ्यांचा धंदा करणारे लोक फार असत. त्यांनीं आपलीं मेंढरें व खिल्लारें आपल्या राहण्याच्या खोऱ्यांतून रोज पर्वतावर चारणीसाठीं हांकून न्यावीं. तेथें एखाद्या पटारावर गेलें, म्हणजे गुरांस मोकळें हिंडूं द्यावें आणि आपण आपलें वेणुवाद्य काढून वाजवीत बसावें, किंवा वनपुष्पें सांपडतील त्यांच्या माळा करून आपल्या स्वतःच्या, आपल्या मातापितरांच्या अथवा तरुण मित्र-

मंडळीच्या व आपल्या गुरांमेंढरांच्या गळ्यांत घालाव्या. मध्यान्हींच्या सुमारास भाकरतुकडा खाण्याची वेळ झाली कीं, आपली शिधोरी सोडावी, ती सर्व मित्रमंडळींनीं एकत्र बसून मौजेनें खावी, असा क्रम चाले.

मगध देश आणि गंगानटाक यांच्या सरहद्दीपासून किंचित् उत्तरेच्या बाजूस असणाऱ्या एका खोऱ्यांतील गुराखी वरच्या एका पठारावर गेले होते. दिवस ग्रीष्मऋतूचे होते. भगवान् सूर्यनारायण या दिवसांत जरा सगळीकडेच अधिक काळपर्यंत आपल्या प्रकाशाचा लाभ देत असतो. त्यांतून पर्वतशिखरावर तर सपाटीपेक्षां किती वेळ तरी त्याच्या सायंकाळच्या किरणांनीं भिन्नभिन्न स्थानीं रंगांनीं आकाश रंजित केलेलें दिसतें. सदोदित थंडी असली तरी या दिवसांत ती थंडी त्रासदायक वाटत नाहीं. थोडेंसें त्या थंडीपासून तेथील लोकांस सुखच होतें. अशा ऋतूंत एके दिवशीं सायंकाळीं वर सांगितलेल्या प्रांताच्या उत्तरभागीं असलेल्या हिमाचलाच्या वरील पठारावरून गुरें, मेंढरें व त्यांचे पालक उतरून खालीं खोऱ्यांत येत होते. खालीं खोऱ्यांत उतरण्यावरोबर ज्याचीं त्याचीं गुरेंमेंढरें ज्याच्या त्याच्या खोपीकडे गेलीं. एक कळप एका खोपीच्या बाजूस गेला. त्या खोपजवळ एक वृद्ध गुराखी उभा होता. तो मोठ्या प्रेमानें आपल्या त्या कळपाचें स्वागत करण्यासाठीं पुढें झाला. सर्व गुरें त्याच्या जवळून गेलीं तीं त्याला पाहून जणूं काय आनंदल्याप्रमाणें झालीं. तोही त्यांजकडे फार प्रेमानें पाहून हंसत होता. पाहतां पाहतां त्याच्या नजरेखालून सर्व गुरें गेलीं. तीं ज्या आवारांत बांधलीं जात तेथें बांधलीं गेलीं—बांधलीं गेलीं म्हणण्यापेक्षां कोंडलीं गेलीं असें म्हटलें तर विशेष शोभेल. सर्व गुराख्यांचीं व इतर लोकांचीं गुरें वगैरे बांधल्यानंतर तो गुराखी आंत जाणार, तों दुसरा एक त्याच्याच वयाचा वृद्ध माणूस त्याचेजवळ आला, आणि ते दोघे एकमेकांशीं बोलत बसले. इतक्यांत तिसरा एक तसाच वृद्ध गृहस्थ आला. चवथा आला. असें होतां होतां त्याच्या खोपीपुढें आठदहा म्हातारी म्हातारी मंडळी जमली. या वेळीं सूर्यास्त होऊन पुनः थंडी चांगली चमकूं लागली होती. त्यांत पौर्णिमेची रात्र होती, यामुळें सुंदर चांदणें पडलें होतें. तीं सर्व म्हातारीं माणसें—त्यांनीं तितक्यांत एक शेकोटी केली, आणि त्या शेकोटीच्या सभोंवार सर्व मंडळी बसली. म्हातारी मंडळी एकत्र जमल्यावर काय चालावयाचें ? आपल्या तरुणपणच्या ऐन उमेदींतल्या कांहीं तरी गोष्टी चालावयाच्या; परंतु आज तसल्या गोष्टी निघाल्या नाहींत. मौर्यांचा राजा गूहपति हा यवनांच्या त्रासानें त्यांच्याशीं लढत असतां रणांगणीं पडला, आणि त्याची पत्नी मगध देशाकडे पळून जातांना आपण पाहिली असें एका वृद्ध मनुष्यानें मंडळीस सांगितलें. तेव्हां सर्वांस अतोनात दुःख होऊन यवनांच्या गोष्टी निघाल्या. यवनांनीं पंचजनांवर हल्ला करून तेथें फार कहर गुदरविला आहे. पोरस ( पर्वतेश ! ) राजाचा पूर्ण पराभव करून त्याचें राज्य पादाक्रांत करून गंगातटाकापर्यंतचा सर्व प्रदेश जिंकून टाकण्याचा त्यांचा घनघोर प्रयत्न चालला आहे, अशीही गोष्ट त्यांत निघाली. ज्या गुराख्याच्या खोपीपुढें हा जमाव जमला होता, त्याचें मन त्या सर्व बातम्या ऐकून अतिशय उद्विग्न व संतप्त झालें. आणि एकदम इतरांस उद्देशून तो गुराखी म्हणतो, " जो काळ गेला तो फार उत्कृष्ट गेला. आतां दिवसानुदिवस आपल्यासारख्यांनीं जगण्यांत मौज नाहीं. हा आपला देश कधीं तरी यवनांच्या तडाक्यांत सांपडेल असें भविष्य जर कोणीं यापूर्वी केलें असतें,

तर मीं त्याला उभें चिरून टाकलें असतें. पण आज तोच प्रसंग प्रत्यक्ष घडला असून आपण त्याच्याबद्दल नुसत्या गोष्टी सांगत बसलों आहों. पर्वतेशाच्या अवाढव्य राज्याची धूळधाण व्हावी, आणि ती आमच्या हयातींत ! त्यापेक्षां आम्हांला मृत्यु आलेला काय वाईट ? ”

म्हातारा हें बोलत असतां त्याचें सर्वांग थरथर कांपत होतें. प्रत्येक शब्द बाहेर येत होता तो जणूं काय त्याचें अंतःकरण पिळवटून, किंबहुना तें भेदून, बाहेर पडत होता, असें स्पष्ट दिसलें.

त्याच्या त्या बोलण्याचा कांहीं परिणाम इतरांच्या मनावरही झाला.वस्तुतः पाहतां ते सर्व गुराखी पेशाचेच लोक होते. त्यांस कोण राजा कोठें आला व कोण कोठें गेला याची माहिती असण्याचा संभव अगदीं कमी; आणि हिमाचलाच्या अगदीं पूर्वभागीं जर ते असते तर त्यांस इकडे पश्चिम देशांत काय चाललें आहे हें कधींही समजतेंना. परंतु शिकंदरानें आक्रांत केलेला पंजाब व मगध देशाची पश्चिमेकडील मर्यादा, यांच्या दरम्यान असणाऱ्या उत्तरभागाच्या खोऱ्यांत रहाणाऱ्या या गरीब लोकांस ह्या महत्त्वाकांक्षी यवनांपासून त्रास होऊं लागला होता. शिकंदर बादशहा हिंदुस्थानांत आल्यापासून परत सरहद्दीच्या बाहेर जाईपर्यंत वीसच महिने होता. परंतु पंजाबच्या राजाचा पूर्ण पराभव केल्यामुळें त्याची भूतृष्णा अधिकच तीक्ष्ण होऊन गंगेचें तटाक ओलांडून खुद्द मगध देश जिंकावा अशी महत्त्वाकांक्षा त्यानें धरिली. या महत्त्वाकांक्षेमुळेंच वर सांगितलेल्या मध्यप्रांतांतील लोकांस त्याच्या स्वाऱ्यांनीं फार त्रास होत असे. त्यांनीं स्वाऱ्या करून गुरें मारून न्यावीं, किंवा क्वचित् क्वचित् स्त्रियाही पळवून न्याव्या, असा त्यांचा दुष्ट क्रम चालला होता. अगदीं पायथ्याशीं जे लोक रहात ते तर यांच्या या लुटारू स्वाऱ्यांना इतके कंटाळले होते कीं, आपआपल्या खोपी व गुरांचीं आवारें उठवून, हिमालयाच्या अंतर्भागांत, गहन अशा अरण्यांत जाऊन रहाणें त्यांस बरें वाटलें. श्वापदांनीं चार गुरें मेंढरें खाल्लीं तरी तीं पत्करलीं, परंतु या दुष्टांचा त्रास नको, हा ज्याचा त्याचा विचार. असा एकंदर त्या गरीब लोकांचा अनुभव असल्यामुळें, यवनांचें नांव निघालें कीं, त्यांच्या अंगाचा संताप व्हावा हें अगदीं साहजिक होय. आणि ही एकंदर हकीकत वाचली म्हणजे वर सांगितलेल्या त्या गुराख्यांच्या उद्गारांचें वाचकांस आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. गोष्टींवरून गोष्टी निघतां निघतां प्रत्येकानें ग्रीक लोकांनीं म्हणजे यवनांनीं मांडलेल्या उच्छादाच्या कर्णोपकर्णीं ऐकिलेल्या किंवा प्रत्यक्ष अनुभविलेल्या गोष्टी सांगितल्या. ग्रीक लोकांत गवालंभाची—बैलाचा यज्ञ करण्याची—स्थंडिलावर बळी देण्याची चाल असे, आणि ग्रीक लोकांचा जय झाला त्या वेळीं त्यांनीं आनंदोत्सवार्थ या गरीबगुरीब लोकांचे चांगले धष्टपुष्ट बैल धरून आणून कित्येक वेळां तरी त्यांचे यज्ञ केले. या सर्व त्रासाबद्दल त्या लोकांस अतिशय वाईट वाटत होतें. व यांचें कोणी शासन करणारा पुरुष जन्मास येत नाहीं का ? असें वारंवार म्हणून ते जणूं काय परमेश्वराचा धांवा करीत असत. परंतु तो धांवा परमेश्वर कधीं ऐकेल असें वाटण्यास त्यांस अजून तरी कांहीं कारण दिसत नव्हतें.

वर सांगितल्याप्रमाणें त्यांच्या गोष्टी चालल्या असतां आमच्या म्हाताऱ्या गुराख्याची एक कन्या धांवत धांवत येऊन आपल्या बापास म्हणाली, “ बाबा, त्या आपल्या कपिलेच्या नव्या झालेल्या वासराचा पत्ता लागत नाहीं. आजच तें पहिल्या प्रथम तिच्या पाठोपाठ गेलें होतें; आतां दूध काढण्याच्या वेळीं त्याला शोधूं लागलें तों तें

कुठेंही दिसेना. तें किती तरी सुलक्षण आणि गोजिरवाणें होतें!"

हे तिचे शेवटचे शब्द अतिशय सद्गदित अशा कंठानें उच्चारलेले होते आणि तिचे डोळेही अश्रुपूर्ण दिसले. त्याचें खिल्लार लहानसान होतें असें नाहीं; तें फार मोठें होतें. परंतु त्यांतलि एकही वासरूं किंवा मेंढरूं नाहींसें झालें असें समजतांक्षणीं त्याची मोठी त्रेधा उडत असे. त्यांत ज्या विवक्षित गाईचें वासरूं आज नाहींसें झालें होतें, त्या गाईवर व त्या वासरावर त्याचें अतिशय प्रेम असे. त्या काळीं मोठमोठीं खिल्लारें म्हणजेच मोठें थोरलें धन असे व त्यांतही पशुसामुद्रिकाप्रमाणें सर्वसुलक्षणसंपन्न असें एखादें वासरूं किंवा गाय ज्याजवळ असेल तो मोठा भाग्यशाली समजला जात असे. जें वासरूं आतां हरवलें होतें तें असेंच सुलक्षण असल्याकारणानें तें कोठें तरी गेलें असें ऐकण्याबरोबर त्या गुराख्याचें मन एकदम उद्विग्न होऊन तो त्या मंडळींतून उठला. ग्रीक यवन लोक गरीबगुरिबांचीं गुरेंवासरें कशीं चोरतात याबद्दल भाषण चाललें असतां आपलें एक वासरूं नाहींसें झाल्याबद्दलची बातमी यावी, हें त्या गुराख्यास मोठें दुश्चिन्ह वाटलें. आणि त्याच्या मनानें असें पक्कें घेतलें कीं, आज गुरें चारणीस जात असतांना हें वासरूं मागें राहून कोणा तरी यवनानें लांबविलें असावें. लागलीच त्यानें त्या वासराबद्दल शोध चालविला. आपलें खिल्लार कोठपर्यंत गेलें होतें, गुरेंराख्या पोरांची दृष्टि त्या वासरावर कोठपर्यंत होती, त्याला आणखी कोणीं कोणीं कोठपर्यंत पाहिलें होतें, शेवटीं कोणीं कोठें पाहिलें होतें, अशी नानाप्रकारांनीं त्यानें चौकशी केली, तों त्यास असें कळलें कीं, पठारावर जाईपर्यंत वासरूं खास होतें. पठारावरून गुरें खालीं आणलीं तेव्हांपासून मात्र त्यास पाहिल्याचें कोणी सांगेना. तेव्हां अर्थातच वासरूं वरच कोठें तरी अडकून बसलें असावें किंवा एखाद्या वाघराबिघरानें त्याला धरलें असावें, असा सर्वांचा तर्क झाला. परंतु असा नुसता तर्क करून निराश होऊन बसणारांपैकीं तो म्हातारा गुराखी नव्हता. त्या वासराचा पक्का पत्ता लागेपर्यंत मी अन्न घेणार नाहीं असें तोंडानें म्हणून, त्यानें लागलीच वर जाण्यासाठीं कंबर बांधली. आपला तीरकमटा बरोबर घेतला आणि आपल्याबरोबर जे कोणी वर जाण्यास तयार असतील त्यांनीं चलावें, असें म्हणून तो पर्वत चढूं लागला.

वर सांगितलेंच आहे कीं, ती रात्र पौर्णिमेची होती. ग्रीष्मऋतु असल्याकारणानें आकाश अगदीं निरभ्र होतें. चंद्रापासून द्रवणाऱ्या तेजोरसानें व्याप्त झाल्याप्रमाणें सर्व आकाश दिसत होतें. दूरवरचीं हिमालयाचीं अत्युच्च शिखरें आधींच हिमाच्छादित आणि त्यांत त्या पौर्णिमेच्या चंद्राची सोज्ज्वल कांति त्यांचेवर पडलेली, यामुळें असा भास होत होता कीं, जणूं काय ती कांति आकाशगंगेच्या ओघानें धो धो धो वहात भूलोकीं येऊन सर्वत्र पसरत होती. हिमाचलावरील अरण्यें हिंस्र व अन्य पशुपक्ष्यांनीं अगदीं गजबजलेलीं, परंतु त्या रात्रीं सर्व स्थळें व्यापून राहिलेल्या त्या चंद्रकांतीमुळें जणूं काय प्राणिमात्र मोहित होऊन स्तब्ध झाले होते.

ही इतकी दिव्य शोभा दिसत होती खरी, परंतु एका ब्रह्माचे ठायीं मात्र चित्ताचा लय लागलेल्या साधूप्रमाणें त्या वृद्ध गोपालाचें चित्त त्याच्या त्या सुलक्षण गोवत्साकडे लागून राहिलें होतें. त्याचे नेत्र त्या वेळीं तें वत्स कोठें दिसेल काय, हें पाहण्यासाठींच होते व त्याचे कर्ण त्या वत्साचा आर्त स्वर कोठून ऐकूं येईल काय, हें ऐकण्यासाठींच होते. त्याचे बरोबर आलेल्या इतर मंडळींत कांहीं

तरुणही होते; परंतु याच्या त्या वत्सशोधनाच्या आतुरतेमुळें याच्या पायांत इतर सर्वांपेक्षां कितीपट तरी शक्ति आली होती! पठाराच्या जवळ जवळ येण्याबरोबर त्यानें निरनिराळ्या माणसांस निरनिराळ्या मार्गानें जाऊन सर्व अरण्यांत त्या वत्साचा शोध करण्यास सांगितलें आणि आपण स्वतः एका मार्गानें चालला. त्या मार्गानें जातां जातां ज्या कांहीं जाळ्या लागल्या किंवा लहानसहान गुहा दिसल्या, त्यांच्या त्यांच्या जवळ जाऊन त्यानें आपल्याकडून पुष्कळ शोध केला. परंतु व्यर्थ. वासराचा कोठेंही पत्ता लागेना. शेवटीं निराश होऊन नेहमीं ज्या मार्गानें गुरें खालीं येत, त्या मार्गाहून दुसरा एक विकट असा खालीं उतरण्याचा मार्ग होता, त्या मार्गास कदाचित् तें वासरूं लागलें असेल, असें मनांत येऊन, आपणास रात्रीं त्या मार्गानें उतरणें अधिक कठीण जाईल कीं काय, याचा विचार न करतां, त्यानें एकदम तो मार्ग धरिला. अशा मार्गांतून अनेक वेळां जाण्यायेण्यास सरावलेला तो गडी, परंतु हा मार्ग इतका कठीण होता कीं, त्या मार्गानें खालीं उतरून जाण्यास त्यास अनेक वेळां अडचण पडूं लागली. होतां होतां ती वाट जवळ जवळ पाऊण हिस्सा सरली. आतां फक्त पाव हिस्साच राहिली. परंतु तेथें समोर पूर्वेस मगध देशाकडे जाण्याला तेथून तशाच प्रकारचा एक बिकट फांटा फुटला होता. तेव्हां आपण आपल्या खालीं जाण्याच्या वाटेनेंच खालीं जावें, कीं समोर या मगध देशाकडे जाणाऱ्या वाटेनें थोडेंसें पुढें जावें याबद्दल तो घुचकळ्यांत पडला. बराच वेळ समतोल कांट्याप्रमाणें एकदां एका बाजूस व एकदां एका बाजूस त्याचें मन कलूं लागलें. एक नक्की विचार होईना. शेवटीं आपल्या खालच्या वाटेस लागावें असा निश्चय करून तो पाऊल टाकणार तों जवळच कोठें तरी अगदीं तान्हें मूल रडल्याप्रमाणें आवाज होत आहे असा त्यास भास झाला. परंतु असल्या विलक्षण ठिकाणीं एवढ्या रात्रीं तान्हें मूल कोठून ओरडणार? एखादें चमत्कारिक श्वापद ओरडलें असेल अशी मनाची समजूत करून तो पुनः खालीं उतरूं लागणार, तों आणखी एकवार आणि अगदीं स्पष्टपणें तान्ह्या मुलाचा कंठशोष करून रडण्याचा आवाज त्याचे कानीं पडला. हा काय चमत्कार आहे. तें जरूर पहावेंच असा निश्चय करून तो त्या मगध देशाच्या वाटेकडे वळला; कारण तो रडण्याचा आवाज त्या बाजूनें येत होता.

त्या आवाजाच्या धोरणाधोरणानें तो सुमारें पांचसातशें पावलें पुढें जातो, तों एका मोठ्या थोरल्या वटवृक्षाच्या छायेखालून तें रडणें निघत आहे असें त्याच्या लक्ष्यांत आलें, आणि तो लागलीच त्या वृक्षाखालीं जेथून आवाज येत होता तेथें धांवत गेला. तों पांढऱ्या स्वच्छ अशा कपड्यांत गुंडाळलेलें एक अर्भक पुष्कळशा पाचोळ्यावर ठेविलेलें असून चळवळ करतें आहे व मोठमोठ्यानें रडतेंही आहे असें त्यानें पाहिलें. म्हाताऱ्याचें अंतःकरण त्या अर्भकाच्या आक्रंदनानें अतोनात कळवळलें. लागलीच त्यानें त्यास उचलून घेऊन छायेंतून बाहेर चांदण्यांत आणलें व त्याच्याकडे एकवार पाहून व लागलीच त्याला उगी उगी करीत पोटाशीं धरून, त्यानें मोठ्यानें उद्गार काढला, "शिव शंभो कैलासनाथ, अशा सुंदर अर्भकाला अशा गहन अरण्यांत टाकून जाणारे नरपशु कोण असतील ते असोत, किंवा बिचाऱ्यावर काय प्रसंग आला असेल तोही असो; मी आपल्या गोवत्साचा शोध करीत असतांना, कैलासनाथा, तूं हें अर्भक मला दिलेंस, यावरून तुझी इच्छाच मला अशी दिसते कीं, माझ्या

हातून त्याचें पाळणपोषण व्हावें. मी गरीब खरा, पण मोठ्या प्रेमानें याला वाढवीन."

काय असेल तें असो, म्हाताऱ्यानें पोटाशीं धरण्याबरोबर तें दीन बालक एकदम गप्प राहिलें व त्या म्हाताऱ्याच्या अंगाशीं जास्ती जास्तीच बिलगूं लागलें. आपल्या गोवत्साचा शोध करण्याकरितां म्हणून परमेश्वरानें अपरात्रीं आपल्यास येथें आणलें आणि आपल्या स्वाधीन हें बालक केलें. यांत त्याचा कांहीं तरी हेतु आहे असें मनांत म्हणत म्हणत त्यानें आपल्या खोऱ्याकडील वाट धरली. खोऱ्याजवळ जातो तों त्याचें वासरूंही सांपडल्याची आनंदवार्ता त्यास समजली. मग काय विचारतां ? तो ज्यास त्यास असेंच म्हणूं लागला कीं, "भगवान् कैलासनाथाच्या मनांतून मला हें बालक द्यायचें होतें, माझ्या हातून त्याचे प्राण वांचायचे होते, म्हणूनच केवळ त्यानें माझें वासरूं चुकविलें." ज्याला त्याला त्यानें तें बालक दाखविलें. तें बालक पाहून सर्वांच्या मनाची अशी खात्री झाली कीं, हें कोणा तरी थोरामोठ्यानें असावें. परंतु त्या बालकाचे अंगावर खूण पाहिली तर एका रत्नखचित रक्षाबंधनाखेरीज कांहींही नव्हती.

---

# उपोद्घात-उत्तरार्ध.

## दरिद्री ब्राह्मण.

पोद्घाताच्या पूर्वार्धांत सांगितलेल्या प्रसंगास सुमारें १५।१६ वर्षे झालीं. आतां यवनांनीं पंजाबांत आपला अंमल पूर्णपणें बसवून टाकिला होता. शिकंदर बादशहानें तिकडला बराचसा प्रांत काबीज करून व त्याच्या बंदोबस्ताकरितां आपले आप्तइष्ट ठेवून स्वदेशीं प्रयाण केलें होतें. पर्वतेश नांवाच्या बलाढ्य राजाचा पराभव करून शिकंदरानें त्यास आपला मांडलिक बनविलें आणि त्याचें राज्य त्याच्याच स्वाधीन केलें. तेवढ्यानेंच तो राजा आनंदित होऊन आपणास यवनांचा मांडलिक म्हणवून घेण्यांत धन्यता मानूं लागला. जे एकदां आपलें स्वातंत्र्य गमावून पारतंत्र्य पतकरतात, ते त्या पारतंत्र्याचाच पुढें अभिमान बाळगूं लागतात. व आपल्याप्रमाणेंच इतरही केव्हां होतील याची वाट पाहूं लागतात. हीच स्थिति पर्वतेश्वराची झाली. ग्रीक यवनांचा आपण मांडलिक असें म्हणवून घेऊन तो इतर आर्य राज्यें पादाक्रांत करण्यास अर्थात् पर्यायानें यावनी अंमलाखालीं नेण्यास धडपड करूं लागला. त्यानें आपले सैन्यांत पुष्कळ ग्रीक शिपाई ठेविले व त्यामुळें स्वतः आर्य असून म्लेच्छाधिपति हें टोपण नांव मिळविलें. शिकंदरानें आपले कित्येक अधिकारी आपल्यामागें ठेविले होते, ते पर्वतेश्वराच्या हाताखालीं ठेविले होते, हा काय तो त्यास मोठेपणा दिला होता. अशा प्रकारें ठिकठिकाणीं यवनी अंमल सुरू झाल्यावर सहजच यवनी विद्येचा प्रसार सुरू होऊं लागला व संस्कृत विद्येचा मान राहीनासा

झाला, आणि संस्कृत पंडितांना त्याबद्दल अतोनात वैषम्य वाटूं लागलें, हें सांगावयास नकोच. शिकंदर बादशहानें स्वतः व त्याच्या बरोबरीच्या सरदारांनींही आर्यस्त्रियांशीं विवाह केले. अर्थातच हे विवाह जुलुमानें झाले. यामुळें पंजाबांत बऱ्याच आर्य लोकांचा त्या ग्रीक यवनांशीं संबंध जुळून त्यांचें व यांचें तादात्म्य झालें होतें. परंतु साधारण लोकांना त्या यवनांबद्दल अत्यंत तिट्कारा होता; इतका कीं, पंजाबचा प्रांत सोडून कित्येक लोक पलीकडे गंगा प्रांतांत किंवा मगध देशांत जात असत.

मगध देशावर त्या वेळीं नंदराजे राज्य करीत होते. तो देश फार सुसंपन्न होता. त्याची राजधानी पाटलिपुत्र (सध्यां त्यास पाटणा म्हणतात, त्या वेळीं या शहराजवळच हें प्राचीन शहर होतें). हें त्या वेळीं उत्तर हिंदुस्थानांत आर्यविद्येचें, आर्यबलाचें व आर्यबुद्धीचें अगदीं माहेरघर बनून राहिलें होतें. परंतु आपणास मगध देशास जाण्यास थोडा अवकाश आहे. तेथें जाऊं तेव्हां पाटलिपुत्राचें वैभव आपणास सहजच पाहण्यास सांपडेल.

सध्यां आपणास पंजाबच्या उत्तरेस गांधार देशाची राजधानी तक्षशिला नगरी होती, ती पहावयाची आहे. सांप्रतकाळीं ज्यास "कंदाहार" म्हणतात त्याच प्रांतास प्राचीनकाळीं 'गांधार' असें नांव होतें. हा गांधारदेश प्राचीनकाळीं फार प्रसिद्धीस आलेला देश होता. महाभारतांत व इतर पुराणांत याचें नांव अनेक प्रसंगीं व अनेक कारणांनीं आलें आहे. कौरवांची माता धृतराष्ट्रपत्नी गांधारी ही या देशाचीच राजकन्या. हा गांधारदेश शिकंदरानें पादाक्रांत करून तेथें आपलें राज्य स्थापिलें होतें, आणि त्या वेळीं तक्षशिला नगरी ही यवनी अंमलाचें केंद्र बनून राहिली होती. त्यामुळें आर्यपंडितांना फारच वैषम्य वाटून ते अगदीं असंतुष्ट होऊं लागले होते. अशा पंडितांपैकींच एकाच्या आश्रमांत आज आपण जाणार आहों.

आश्रम हा शब्द वर योजिला आहे, परंतु आर्य विष्णुशर्मा याच्या त्या निवासस्थलाला तो शब्द लावणें म्हणजे त्या शब्दाची विटंबना करणें होय. बिचाऱ्या ब्राह्मणाची ती पर्णकुटी जेमतेम त्याला व त्याच्या अत्यंत वृद्ध मातुश्रीला यथेच्छ वावरण्यापुरतीसुद्धां नव्हती. दारिद्र्य म्हणजे मूर्तिमंत तेथें वास करीत होतें. श्री आणि सरस्वती या दोघींचें अतोनात वैमनस्य असें म्हणतात, त्याचा पूर्ण अनुभव कोणास घ्यावयाचा असल्यास त्या पर्णकुटींत त्यास तो उत्कृष्टपणें सांपडे. आर्य विष्णुशर्मा अत्यंत विद्वान्, वेदत्रयी त्यास मुखोद्गत असे; कर्मकांड अगदीं मूर्तिमंत त्याच्याच रूपानें पृथ्वीवर अवतरलें आहे कीं काय असें वाटे; नीतिशास्त्र तर त्या ब्राह्मणाइतकें कोणासच येत नसेल; धनुर्वेदांत तो ब्राह्मण प्रति द्रोणाचार्यच होता. त्यानें आपले शिष्य पढविण्याकरितां नानाप्रकारच्या शास्त्रांवर सुलभ ग्रंथ करून भूर्जपत्रांचे व ताडपत्रांचे भारेचेभारे त्या आपल्या पर्णकुटींतच अडचणींत अडचण करून ठेवून दिले होते. त्याचा पिता त्याच्याचप्रमाणें अत्यंत विद्वान् परंतु असाच दरिद्री होता. तो परलोकीं जाऊन सुमारें सात आठ वर्षें झालीं होतीं. आणि त्याच्या शोकानें अतिशय विव्हल होऊन त्याच्या जननीनें अंथरूण धरिलें, तें अद्यापि सोडलें नव्हतें आणि आतां ती तें सोडून पुनः घरांत संसार करूं लागेल अशी आशा करण्यास मुळींच जागा नव्हती. तिची सर्व शुश्रूषा या मातृभक्त पुत्रासच करावी लागत असे, आणि तीही पण अगदीं अणूभरसुद्धां आळस न करतां तिची सेवा अगदीं मनोभावानें करीत असे. अलीकडे

अलीकडे ती फारच अस्वस्थ होत चालल्या-कारणानें त्याला तिच्या फार खस्ता खाव्या लागत; परंतु त्यानें कधींही कंटाळा केला नाहीं. यामुळें ती त्याला क्षणोक्षणीं आशी-र्वाद देई, त्यांतच त्याचा संतोष होता. तेंच आपल्या श्रमाचें अत्यंत मोठें फळ, असें तो म्हणे, आणि दिवस कंठी; परंतु आला दिवस कंठण्यास काय सायास पडत असत, याची कल्पना, तसल्याच दारिद्र्यांत ज्याचे दिवस गेले असतील किंवा आपली अशी म्हणण्यास एक कवडीसुद्धां जवळ नाहीं असे चार दिवस तरी ज्याच्या आयुःक्रमांत गेले असतील त्यांसच होइल. ज्यांस वेळच्या वेळीं अन्नवस्त्र मिळतें आहे, कोणत्याही प्रकारें कांहीं कमी नाहीं, तथापि बोलण्याची वेळ आली, म्हणजे आपण गरीब म्हणून आपल्या गरिबीचें वर्णन करण्यास ज्यांस कांहींसुद्धां दिक्कत वाटत नाहीं, असल्या ढोंगी गरिबांस आमच्या या दरिद्री ब्राह्मणाच्या दारिद्र्याची कल्पनासुद्धां होणें शक्य नाहीं. ब्राह्मणाची बुद्धि फार तेजस्वी व अध्ययनचातुर्य फार मोठें असल्यामुळें कांहीं विद्यार्थी त्याच्याजवळ येऊन शिकत; परंतु यवनी अंमल सुरू झाल्यापासून एक . तर त्या विद्येला तसें उत्तेजन नाहींसें झालें आणि दुसरें, या ब्राह्मणाची वृद्ध मातुश्री फार आजारी असल्यामुळें तिच्या शुश्रूषेकडेच त्याचा सर्वकाळ जात असे अर्थातच विद्यार्थ्यांस पढविण्यास त्यास वेळच मिळत नसे. कांहींही कारण असो, हा ब्राह्मण अगदीं दरिद्री—अठराविश्वे दरिद्री—होता. सकाळीं पुरेल इतकेच अन्न सकाळीं घरांत असावयाचें. संध्याकाळची काळजी परमेश्व-राला, असा प्रकार चालला होता. होतां होतां एके दिवशी त्याच्या वृद्ध जननीची प्रकृति फार बिघडली. वृद्धापकाळची प्रकृति, त्यांत आज कित्येक वर्षें ती खंगत चाल-लीच होती. त्यांत आज एकाएकीं दम्याचा जोर होऊन ऊर्ध्व लागला. त्यास पुत्रानें जे काय नेहमींचे उपचार करावयाचे, ते सर्व केले; परंतु व्यर्थ. त्या रात्रीं चार घटकांच्या सुमारास आपल्या मुलास "तुझा भाग्योदय लवकरच होईल, माझी सेवा केलीस ती व्यर्थ जाणार नाहीं," असा आशीर्वाद दिला व त्या वृद्ध माउलीनें देह टेविला.

पुत्रास अतोनात वाईट वाटलें, हें सांगाव-यास नकोच. त्यानें अत्यंत शोक केला, परंतु त्याची समजूत करण्याससुद्धां त्या वेळीं त्या-च्याजवळ कोणी राहिलें नव्हतें. बिचाऱ्यास आपला आपणच शोक आंवरून आपल्या वृद्ध जननीची उत्तरक्रिया वगैरे सर्व कांहीं उरकून घ्यावें लागलें. तें त्या निष्कांचन ब्राह्मणानें कसें केलें असेल, आणि त्याची त्यावेळीं काय स्थिति झाली असेल, तें त्याचें त्यालाच ठाऊक. उत्तरक्रिया झाल्यानंतर तक्षशिलेंतच डांबून रहाण्यास त्या तेजस्वी ब्राह्मणास कांहींच कारण नव्हतें. उलट या यवनी अंमलांतून कोठें तरी अन्यत्र जावें, जेथें आर्यराजाचें राज्य असेल व आपल्या विद्वत्तेचें चीज होईल, अशी राजसभा गांठावी आणि जमल्यास त्या राजास आपल्या धनुर्विद्यापारंगतत्वाचा व नीतिशास्त्रज्ञतेचा उपयोग करून देऊन त्याचे-कडून यवनराजांचा व त्यांनीं आपले झटल्या-मुळें कुशारून गेलेल्या आर्यराजांचा चांगला खरपूस समाचार घेववावा. त्या दोघांसही घालवून देऊन पूर्ववत् सर्व आर्यमय करावें ही महत्त्वाकांक्षाही त्याचे मनांत साहजिकच आली. मनस्वी जे असतात, त्यांना स्वदेश असा कोणता आहे? ज्या देशांत ते जातील तो देश त्यांना स्वदेशाप्रमाणेंच, आणि जेथें आपला जन्म झाला, बाल्य व थोडेसें तारुण्य गेलें, त्यास स्वदेश ह्मणावें, तर तो देश यवनांच्या—अर्थात् अनार्यांच्या ताब्यांत

जाऊन अनार्य आचारच तेथें सुरू झालेले. अशा स्थितींत त्या देशास तो केवळ आपली जन्मभूमि ह्मणून चिकटून राहणें म्हणजे कुजलेल्या पदार्थातल्या आळीप्रमाणें आपणही त्यांतच कुजवून घेण्याप्रमाणें होय. त्यापेक्षां अन्यत्र कोठें जाऊन आपल्या मूळ देशाच्या उद्धारार्थ कांहीं यत्न झाला तर तो करणें सर्वथा श्रेयस्कर होय, असें त्याच्या मनानें घेतलें. भिक्षा मागून करें तरी पोट भरावयाचें, तर परदेशांत जाऊन कां भरूं नये? तेथें आपल्या विद्वत्तेचें चीज होण्याचा तरी संभव आहे, असा विचार करून आर्य विष्णुशर्मा यानें आपल्या त्या दरिद्री पर्णकुटिकेचा निरोप घेतला. त्या पर्णकुटिकेचा निरोप घेणें त्यास मुळींच कठिण नव्हतें. परंतु आपल्या भूर्जपत्रांवर लिहिलेल्या व ताडपत्रांवर कोरलेल्या पोथ्यांची काय वाट? आपण त्या तेथेंच ठेवाव्या, हें तर त्याच्या मनांत मुळींही आलें नाहीं. पण बरोबर नेणार तरी कशा? त्याची ती वृद्ध मातुश्री जिवंत असतां त्यास कोणी तूं आपल्या आईस येथेंच टाकून जा ह्मणून ह्मटलें असतें, तर त्याला जितकें वाईट वाटलें असतें, तितकेंच आज आपणांस पोथ्या टाकून जाण्याची पाळी येणार ह्मणून त्यास अतोनात वाईट वाटलें; पण नुसतें वाईट वाटून काय उपयोग? कांहीं तरी तोड तर काढलीच पाहिजे. अशा विवंचनेंत तो बिचारा होता. भयंकर दुष्काळ पडला असतां आपल्या पोरांना टाकण्याची पाळी ज्यांच्यावर आली आहे, अशा दरिद्री आईबापांना जसें मरणप्राय दुःख होतें, आणि नाइलाज म्हणून केवळ दुसऱ्या कोणाला मुलें देऊन टाकावीं लागतात, निदान तीं आपलीं आपल्याला परत मिळतील अशा आशेनें कोणा तरी सुखवस्तु गृहस्थाच्या स्वाधीन करावीं लागतात, त्याचप्रमाणें बिचाऱ्या विष्णुशर्म्याची अवस्था झाली. पोथ्यापुस्तकांचा भारा पाठीवर वाहून नेणें त्यास केवळ अशक्य होतें. कारण, एक तर तो दरिद्री, एखादें वाहन विकत घ्यावें, तर एक दीनारसुद्धां जवळ नाहीं, आणि यदाकदाचित् कोणीं एखादें दिलें, तरी त्याला नदीनाल्यांतून हांकून न्यावयाचें तरी कसें? पण तसें नेतां आलें तरी तें देतो कोण? तेव्हां बिचाऱ्यानें आपल्या एका मित्राच्या घरीं, ती आपली सर्व भूर्जपत्री व ताडपत्री संपत्ति नेऊन ठेवण्याची व्यवस्था करून तक्षशिला नगरी सोडून मगध देशाकडे तोंड केलें.

वर सांगितलें आहेच कीं, त्या काळीं पाटलिपुत्र अथवा पुष्पपुरी हें शहर फारच भरभराटीस आलेलें होतें. उत्तर हिंदुस्थानांत आर्यांचें असें तेवढेंच मोठें थोरलें राज्य होतें. अर्थातच यवनी अमलाखालीं राहूं नये, असें वाटून जे देशत्याग करीत, ते सर्व या पाटलिपुत्र नगरास जाऊन आपल्या कार्यकर्तृत्वाची व दैवाची परीक्षा पहात असत. मगध देशाचें राज्य त्या वेळीं फार विस्तृत होतें. शिकंदराच्या लोकांनीं गंगा उतरून त्यावर स्वारी करण्याचाही एक दोन वेळां प्रयत्न केला होता, परंतु त्या प्रयत्नांत त्यास मुळींच यश आलें नाहीं. पौरस (पर्वतेश) राजाचा पराभव करून पंजाब आपल्या स्वाधीन करून घेतला, म्हणून चढून गेलेल्या शिकंदरास तेथें एकदां चांगली थप्पड बसली, आणि पुढें त्याचे लोकही त्याच्या अनन्वित आचरणास कंटाळून त्याच्याबरोबर पुढें जाण्यास धजेनात; इतकेंच नव्हे, तर 'आम्ही आतां पुढें आणखी आपला नाश करून घेण्यास येत नाहीं,' असेंच त्यांनीं उत्तर दिलें. तेव्हां नाइलाजास्तव त्यास परत जावें लागलें होतें. मगध देशाच्या शूर वीरांपुढें शिकंदराचें व त्याच्या लोकांचें कांहीं चालेना. कारण, 'पुढच्यास ठेंच, मागचा शहाणा', या न्यायानें त्यांनीं

आधींपासून शिकंदराचें कांहीं चालूं नये म्हणून कडेकोट तयारी केली होती. शत्रु येतां-क्षणींच त्याची अगदीं त्रेधा तिरपीट करून द्यावयाची, असा त्यांचा कृतनिश्चय दिसला. अशा निश्चयी व प्रवीण लोकांच्या नादीं लागण्यांत तात्पर्य नाहीं, हें जाणून शिकंदरानें तो नाद सोडून स्वदेशाचा मार्ग सुधारला असावा.

आज कित्येक वर्षें पाटलिपुत्रांत महाप्रतापी असे नंदराजे राज्य करीत होते. विष्णुशर्मा पाटलिपुत्रांत आला तेव्हां धनानंद नांवाचा राजा राज्य करीत होता. यवनी अमलांतील विद्वान् लोक राजसभेंत येऊं लागले व मानमान्यता मिळवूं लागले, यामुळें राजसभेंतील आश्रित पंडितांस अतोनात मत्सर उत्पन्न झाला. विष्णुशर्मा पंडिताच्या आधीं असे अनेक विद्वज्जन त्या सभेंत येऊन राहिले होते. प्रथम ही गोष्ट राजास व त्याच्या सभापंडितांसही मोठी कौतुकास्पद वाटली; परंतु जसजशी राजाच्या दातृत्वाची व संग्राहकत्वाची कीर्ति सर्व भारतवर्षभर पसरत चालली, तसतसे विद्वान् याचक अधिकाधिक येऊं लागले व त्यांत राजसभापंडितांपेक्षांही फार मोठे पंडित विद्वान् लोक आल्याकारणानें कित्येक वेळां भरदरबारांत राजाच्या समक्ष वाद होत; त्या वेळीं त्याच्या सभापंडितांचा पराजय होऊन त्यांस खालीं मान घालून बसावें लागे. विष्णुशर्मा राजसभेंत येण्याचे आधीं बरेच दिवस राजसभेंतील आश्रितपंडितांचा मत्सराग्नि बराच धुमसत होता आणि विष्णुशर्मा येण्याला व त्या मत्सराग्नीचा भडका उडण्याला एकच गांठ पडली. विष्णुशर्म्यानें आधीं कोणाची शिफारस वगैरे न लावितां तडक राजसभा गांठली. आतांपर्यंत आलेले इतर पंडित कोणा तरी सभापंडिताच्या द्वारें राजसभेंत प्रवेश करून घेत; परंतु या जमदग्निगोत्री ब्राह्मणाला असला प्रकार मुळींच नको होता. माझ्या अंगीं जर कांहीं गुण असेल, तर महाराजाला तो दिसेल, नाहीं तर नाहीं, असें म्हणून दरबार भरला असतां दुर्वास ऋषीप्रमाणें एकदम त्यानें दरबारांत प्रवेश केला व राजास आशीर्वचन दिलें. आशीर्वचनपर श्लोक त्यानें स्वतःच रचले होते व धीर, गंभीर आणि अस्खलित अशा वाणीनें ते उच्चारल्याबरोबर सर्व सभा चकित होऊन तटस्थपणें त्याजकडे पाहूं लागली. त्याच्या एकंदर उद्धत पद्धतीवरून सभापंडितांनीं सहज ताडलें कीं, हा कोणी तरी असामान्य बुद्धिवान्, तेजस्वी व विद्वान् ब्राह्मण आहे, इतकेंच नव्हे, तर या राजदरबारीं जर का एकदां हा चिकटला तर आपल्या डोक्यावर बसल्याखेरीज कधींच राहणार नाहीं. तेव्हां यास क्षणभरसुद्धां येथें राहूं देतां उपयोगी नाहीं. असा विचार पांचचार पुढाऱ्यांच्या मनांत येऊन ते आपआपसांत कुजबुजूं लागले.

इकडे त्या अतिथि म्हणून आलेल्या ब्राह्मणाच्या धीरगंभीर वाणीनें राजा धनानंदाच्या मनावरही मोठी विलक्षण छाप बसली व त्यानें अगदीं सहजगत्या त्या ब्राह्मणास उत्थापन देऊन आपल्याजवळ आसन दिलें. हें तर सभापंडितांस फारच वैषम्य वाटलें. आजपर्यंत असा कोणाच पंडिताचा आदर राजानें आपण होऊन कधीं केला नव्हता. प्रथमतः कोणा तरी राजपंडितानें अतिथि पंडितास आदरानें आणावयाचें व राजाला त्याचें नांवगांव वगैरे सांगितल्यावर त्यानें उत्थापन देऊन पंडितसभेंत त्यास आसन दाखवावयाचें. तें एकीकडेच राहून राजानें या आकस्मिक पंडितास आपण होऊन उत्थापन देऊन आपल्या उजवे–बाजूस–अर्थात् सर्व पंडितांच्या शिरावर आसन दिलें, तें त्यांस कसें खपावें ? या प्रसंगीं जितका या आगंतुकाचा सन्मान झाला आहे, तितका

एकदम अपमान झाला पाहिजे, असें सभापंडितांस वाटून तें साधण्याकरितां ते युक्ति शोधीत होते.

इकडे राजा धनानंद त्या अतिथींस 'आपण कोठून आलां' वगैरे प्रश्न विचारीत असतां त्यानें 'आपण तक्षशिला नगरीहून आलों' वगैरे सर्व हकीकत सांगितली. ती हकीकत ऐकतांच राजाश्रित पंडितांपैकीं एकजण मोठ्या गंभीरपणानें उठून उभा राहून म्हणाला, "राजन्, आल्या अतिथींचें आपण स्वागत करून त्यांचा आदर करतां हें दानशूरत्वाला योग्यच आहे. परंतु आदर काय किंवा दान काय पात्रीं होतो आहे कीं अपात्रीं होतो आहे, याचा विचार करून काय तें करावें, एवढीच आमची आपल्या आश्रितजनांची विनंति आहे. यवन राजे आजकाल आर्यराजांच्या राज्यांवर तिळांजलि घेऊन बसले आहेत. केव्हां एकदां आपण हीं राज्यें गिळंकृत करूं, असें त्यांस होऊन गेलें आहे. तेव्हां ते कोणत्या मिषानें कोणास येथें पाठवितील आणि कोणास नाहीं याचा नेम नाहीं. पंचजनांचा संहार अशा विश्वासघातकी लोकांच्याच घातक कृत्यांनीं झाला. नाहीं तर यवन राजे भारतवर्षांत येऊन आर्यांना पराभूत करतील हें संभवनीय तरी होतें काय? तक्षशिलाही हल्लीं यवनांच्या ताब्यांत आहे आणि त्याच नगरींतून हे येथें आले आहेत. कालच त्या नगरींतून आणखी एक गृहस्थ यवनराजांच्या जुलुमास कंटाळून येथें आले, त्यांच्या सांगण्यांत असें आलें कीं, यवन राजा कोणा एका विद्वान्‌ ब्राह्मणास इकडे पाठवून येथील भेद काढण्याच्या विचारांत आहे. या गोष्टीचा विचार करून आदरातिथ्य करावयाचें तें करावें. हे कोणाच्या ओळखीचे नाहींत, यांना कोणी ओळखीत नाहीं. तेव्हां यवन राजानें पाठविलेले हेर हे नव्हेत म्हणून तरी कशावरून? आहेतच, असें आमचें कोणाचें म्हणणें नाहीं. पण यदाकदाचित् असले, तर सर्पास दुग्धदान केल्याप्रमाणें पश्चात्ताप होण्याचा प्रसंग न यावा म्हणून इतक्या निर्भीडपणें विनंति केली आहे." हिरण्यगुप्त ऊर्फ धनानंद हा कीर्तिलोलुप व दानशूर खरा, पण थोडा चंचल व संशयी होता. त्यांतून शिकंदर बादशहानें पंचजनांत जो प्रळय मांडला होता, त्याच्यामुळें त्यास वरील भाषणांत फार तथ्य आहे असें वाटलें. हा ब्राह्मण अद्वितीय विद्वान् असल्यामुळें त्यानें झोंकांत उद्धतपणानें आपल्या सभेंत प्रवेश केला; विद्वत्तेच्या बरोबर नम्रपणा असावा तो मुळींच दिसला नाहीं. यावरून याचें लक्षण ठीक दिसत नाहीं, असें त्याच्या मनांत एकदम आलें व तो एकदम त्या ब्राह्मणास म्हणतोः— माझ्या सभापंडितांनीं आतां सुचविलें, तें अगदीं अक्षरशः मला खरें वाटतें. आपण आंत येण्याबरोबर मीं आपला आदर केला. परंतु आपली येथें कोणाची ओळख आहे, असें दाखविल्याखेरीज आपण त्या स्थानीं बसून रहावें हें आपल्यालाही उचित वाटणार नाहीं. हें राजनीतीला सोडून होणार आहे. तरी कृपा करून या पाटलिपुत्रांत आपली खात्री देईल, असा कोणीही असल्यास सांगा ......"

तें भाषण ऐकतांच या कोपिष्ट ब्राह्मणाच्या सर्वांगाची अगदीं लाहीलाही झाली आणि तो एकदम राजा हिरण्यगुप्तास म्हणाला, "राजा, हें काय भाषण करतो आहेस? यवनांच्या अंमलांत राहण्याला त्रासून, कोणत्या तरी आर्यराजाच्या राज्यांत जायचें इतकेंच नव्हे, तर आपल्या नीतिज्ञानाचा व धनुर्वेदाचा पूर्ण उपयोग करून घेईल असा राजा भेटला तर त्यास तो उपयोग होईल असें करून त्याचेकडून यवनांचा आणि पर्वतेशासारख्या लुबऱ्यांचा नाश करवावयाचा; जिकडे तिकडे

पुनः आर्यराज्याचा विस्तार करावयाचा, असा उद्देश धरून व मार्गांत तुझी कीर्ति ऐकून येथें आलों. यवनांचा द्वेष हें तर माझें ब्रीद आणि त्यांचाच मी हेर होऊन येईन ? ...... ”

हें त्याचें भाषण इतक्या उद्धटपणानें झालें व त्याचा कोप सर्वांस इतका खरा भासला कीं, राजा आतां उलट त्याची क्षमा मागून त्यास आपल्या सभेंत ठेवतो असें सभापंडितांस वाटलें. परंतु हें अगदीं इष्ट नाहीं असें मनांत येऊन त्यांचा अग्रेसर मध्येंच म्हणतो, “ महाराज, जो हेर म्हणून येईल, तो काय आपण यवनांचा हेर आहों, आपलें त्यांच्याविषयीं प्रेम आहे,असें सांगतां येईल ? यवनांच्या विषयीं मला मोठा तिटकारा, त्यांचा द्वेष हेंच माझें ब्रीद असेंच म्हणेल, आणि कोणी तो हेर आहे असा उगीच संशय बोलून दाखविला तर संतापानें अकांडतांडव करील, हें उघडच आहे. परंतु दूरदर्शी जनांनीं त्यामुळें फसतां कामा नये. आतां यांचा अपमान झाला व त्यामुळें यांना वाईट वाटलें, तरी पतकरलें; पण राज्य नष्ट झालें म्हणजे मग होणारा पश्चात्ताप किती भयंकर ! महाराज, आपलें अन्न आम्ही खातों आहोंत, तर आपल्यावर संकट येतें आहे असें दिसतांच आपणास जागृत करणें हें आमचें कर्तव्य आहे. मग त्या संकटापासून आपण आपलें स्वतःचें व आम्हांसारख्या प्रजाजनांचें संरक्षण करण्याला सर्वथा समर्थ आहांतच. ”

या शेवटल्या बोलण्यानें राजा हिरण्यगुप्त विशेष खुलला, आणि त्याचा त्या ब्राह्मणाविषयींचा संशय विशेषच वाढून तो त्या ब्राह्मणास म्हणतोः– “ ब्रह्मन्, दूरदर्शीपणा हा कांहीं कधींही अस्थानीं नसतो. तर आपण अमुक अमुक अशी खात्री मला पटेपर्यंत सभेंतून जावें हें चांगलें, तशी खात्री पटली म्हणजे आपल्या विद्वत्तेप्रमाणें आपला आदर व संभावना होईल; पण तोंपर्यंत आपण हें आसन सोडावें. ” तें ऐकतांच त्या दुर्वास ऋषीप्रमाणें कोपिष्ट ब्राह्मणाच्या तळपायाची आग मस्तकाला गेली व त्यानें तटकन् उठून जातां जातां अशी प्रतिज्ञा केलीः—“ मी खरा ब्राह्मण असेन, तर हा नंदवंश समूळ नष्ट करून टाकून त्यांच्या जागीं, ज्यास मी आपल्या हातीं धरीन त्यास बसवीन, व त्याच्याच हातून यवनांचें पारिपत्य करवीन. ” इतकें बोलून त्यानें आपली शेंडी मोकळी सोडली, व केलेली प्रतिज्ञा पूर्ण करीपर्यंत केंसांस म्हणून हात लावणार नाहीं, असाही त्यानें निश्चय केला. मनाजोगी दक्षणा मिळाली नाहीं, व राजसभेंत जें प्रस्थ माजेल असें वाटत होतें तें माजण्याची आशा नाहीं, म्हणून निराश होऊन संतापाच्या भरांत कांहीं तरी बडबड करीत निघून गेलेल्या ब्राह्मणाच्या बडबडीकडे काय लक्ष्य द्यावयाचें आहे, असें म्हणून राजदरबारीं त्याच्या बोलण्याकडे कोणींही लक्ष्य दिलें नाहीं. त्याच्या वल्गनांचें सर्वांस हंसूं मात्र आलें.

इकडे तो तेजस्वी ब्राह्मण आतां याउप्पर या पाटलिपुत्रांत पाणी पिण्यास सुद्धां रहावयाचें नाहीं, असा निश्चय करून नगराच्या बाहेर पडला. तो बऱ्याच अंतरावर गेला तों सूर्य अस्तास जाण्याच्या बेतांत होता. पलीकडे कांहीं गवळ्यांचीं मुलें आपापसांत खेळत होतीं.

गुराख्यांच्या मुलांचा खेळ चालला होता, तोही मोठा कौतुक वाटण्याजोगाच होता. सर्व मुलें एकत्र होऊन त्यांनीं असा बहाणा चालविला होता कीं, आपल्या प्रांतावर यवन चालून येत असून आपण त्यांचा अगदीं फन्ना उडविणार आहों. पंचजन देशावर शिकंदरानें स्वारी करून तेथील लोकांस पादाक्रांत केलें व त्याचे अधिकारी पुढें पुढें येऊन आणखीही देश काबीज करीत आहेत. कांहीं मुलें यवन

झालीं होतीं व कांहीं आर्य झालीं होतीं. त्यांत तो पंधरा वर्षांचा सुंदर मुलगा आर्यांचा राजा झाला असून आपल्याकडून मोठमोठ्यानें आज्ञा करीत होता व आपल्या सैनिकांस त्याप्रमाणें वागण्यास लावीत होता. त्याचें तें एकंदर चारित्र्य पाहून या ब्राह्मणाचें चित्त अतिशय गहिंवरलें. ज्या मुलाचें एवढ्या लहान वयापासून असें लोकोत्तर चारित्र्य, तो मुलगा गुराख्याचा खचित नव्हे, असा त्यानें आपल्या मनाशीं पक्का निर्धार केला; आणि कसेंही करून या मुलाची पूर्वपीठिका शोधून काढावयाची असा त्यानें निश्चय केला.

मुलांचा खेळ पुष्कळ वेळ चालला होता. तो चालला असतां ब्राह्मणास त्या मुलाची पुष्कळ प्रकारें परीक्षा करितां आली. शेवटीं मुलें दमून एकत्र झालीं, तेव्हां हा ब्राह्मण त्यांचेजवळ गेला व त्या मुलास म्हणतो, " मुला, मला तुझा हात एकवार पहावा अशी इच्छा आहे. तो मला पाहूं दे. " मुलानें ब्राह्मणास अगदीं नम्रपणें नमस्कार करून आपला उजवा हात त्याचे पुढें केला. तो हात पहातांक्षणींच ब्राह्मणास अत्यंत आनंद झाला. त्यावर चक्रवर्ती राजाचीं सर्व लक्षणें अगदीं स्पष्ट दिसत होतीं. अशा सुलक्षणांनीं युक्त मुलगा गुराख्याच्या पोटीं यावा, किंवा निदान गुराख्याकडून पाळला जावा, हें तरी मोठें विलक्षणच, असें त्यास वाटलें व त्याचा हात व मुख हीं त्यानें सामुद्रिक दृष्टीनें नीट परीक्षून पाहिलीं. जों जों तीं सुलक्षणें त्याच्या दृष्टीस पडूं लागलीं, तों तों याला अशी दृढ इच्छा होऊं लागली कीं, आपण या मुलाच्या आईबापांकडे जाऊन त्यांच्यापाशीं याच्या जन्मासंबंधाची चौकशी करावी, आणि त्यांच्यापासून या मुलास मागून घ्यावें. त्या दृष्टीनें मुलासही त्यानें विचारिलें कीं, " तूं मजबरोबर येतोस का? तूं आलास तर तुला मी सर्व विद्या शिकवीन. शस्त्रास्त्रविद्या व धनुर्वेद यांचा सुद्धां मीं अभ्यास केला आहे, तें सर्व तुला शिकवीन. " शस्त्रास्त्रांचें व धनुष्याचें नांव निघतांच मुलास पराकाष्ठेचा आनंद झाला आणि त्यानें त्यास म्हटलें, "महाराज, मला आपण या विद्या शिकवाल, तर मी आपला दासानुदास होईन." इतकें बोलणें झाल्यावर थोड्या वेळानें मुलांनीं आपापलीं गुरें एकत्र जमा केलीं व सायंकाळ झाला म्हणून तीं घरोघर जाऊं लागलीं. ब्राह्मणही त्या गुराख्याचे मुलाबरोबर त्याचे घरीं गेला. त्या मुलाचा बाप मोठा सज्जन होता, व मुलाविषयीं तर त्यास अतोनात अभिमान असे. आपल्या मुलाची विलक्षण बुद्धि पाहून ब्राह्मण मुद्दाम त्याची चौकशी करण्याकरितां त्यांजबरोबर आला, हें पाहून तर त्यास विशेषच आनंद झाला. रात्रीं तेथेंच वस्ती करण्याविषयीं त्यानें त्यास विनंति केली. गाईंच्या धारा वगैरे काढल्यानंतर ब्राह्मणास त्यानें दुग्धप्राशन करण्याबद्दल आग्रह केला व ब्राह्मणानेंही त्याच्या त्या आतिथ्याचा स्वीकार करून रात्रौ तेथेंच राहण्याचा विचार केला.

दुग्धप्राशन वगैरे झाल्यानंतर त्या गुराख्यास आपले जवळ बसवून घेऊन ब्राह्मण मोठ्या युक्तीनें म्हणतो, " हे वृद्ध गोपा, हा तुझा मुलगा विलक्षण बुद्धिवान् व तेजस्वी आहे. याच्यासंबंधानें तुला कांहीं विचारावें असें मला वाटतें आहे. तुझी जर कांहीं हरकत नसली आणि तुला राग येणार नसला, तर विचारतों. " ब्राह्मण आपल्यास काय प्रश्न विचारणार हें जणूं काय समजूनच गुराखी हंसला व त्यास म्हणतो, "महाराज, आपण ब्राह्मण, आपण एखादा प्रश्न विचारला, तर त्याचा राग काय म्हणून मानावा! जें काय आपल्यास विचारावेंसें वाटत असेल, तें अगदीं मोकळ्या मनानें विचारा. मीही आपणास उत्तर देईन. "

तें उत्तर ऐकून ब्राह्मणास बरें वाटलें व तो लागलीच म्हणतो, " इतकें आश्वासन तूं देतोस तर ठीक आहे. मीही तुला अगदीं निर्भीडपणें विचारतों. हा मुलगा तूं आपला म्हणतोस, पण हा तुझ्या वंशांतला दिसत नाहीं. जर याची आणखी कांहीं निराळी हकीकत असली तर मला सांग. माझ्या तर्का-प्रमाणें जर याची कांहीं निराळी हकीकत असली, तर तूं पक्कें समज कीं, हा मुलगा पुढें मोठा भाग्यशाली निघणार आहे; हा सार्वभौम राजा होईल. "

ब्राह्मणाचें हें बोलणें ऐकतांच गुराखी थोडा सचिंत झाला. नंतर लागलीच ब्राह्म-णास म्हणतो, " महाराज, आपल्या पायापाशीं खोटें बोलावयाचें नाहीं, असा माझा कृत-निश्चय, म्हणूनच मी आतां खरें काय आहे तें सांगतों. हा मुलगा माझा नव्हे. आम्हां गुराख्यांच्या पोटीं असलें रत्न कोठून निप-जावें ? हा मुलगा अगदीं तान्हेपणीं मला एके चांदण्या रात्रीं रानांत झाडाखालीं टाकलेला असा सांपडला. तो रडत होता. त्याच्याजवळ कोणी म्हटल्या कोणीसुद्धां नव्हतें. त्यास एखाद्या मांसाहारी श्वापदानें खाऊन कसें टाकलें नाहीं, याचेंच आम्हांला आश्चर्य वाटलें. आकाशांत भगवान् चंद्रमा जणूं काय त्यास धीर देऊन अगदीं निर्भयपणें राहण्यास सांगत होता. त्या मुलाला मीं लागलीच उचललें व आपल्या घरीं आणलें. त्याच्या मातापितरां-चा शोध लागावा म्हणून मीं पुष्कळ यत्न केला, परंतु कांहीं तपास लागला नाहीं. या मुलाच्या अंगावर वस्त्रें विशेष नव्हतीं, आणि अंगावर बाळलेणें होतें, तें एक रक्षाबंधन मात्र. तें मीं नीट जपून ठेविलें आहे. मुलगा कोणाचा, काय, याची कांहींसुद्धां माहिती लागली नाहीं. मी आपलाच म्हणून बाळगून त्याचें संवर्धन चालविलें आहे. "

हें ऐकून ब्राह्मण कांहीं वेळ स्वस्थ बसला व नंतर म्हणतो, " तें रक्षाबंधन कोठें आहे तें आण पाहूं. " गुराख्यानें तें रक्षाबंधन सातां चिंध्यांत पुरचुंड्या करून सातां डेऱ्यांत लपवून ठेविलें होतें, तें मोठ्या सायासानें काढून ब्राह्मणास दाखविलें. पलीकडे दिवा होता त्या दिव्याजवळ जाऊन ब्राह्मणानें तें रक्षाबंधन नीट न्याहाळून पाहिलें, तों त्यावरील ठसा पाहून त्यास मोठें आश्चर्य वाटलें; व एकदम तो त्या गुराख्यास म्हणतो, " बाबारे, हा मुलगा तूं माझ्या स्वाधीन कर. निदान कांहीं काळ-पर्यंत तरी माझ्या स्वाधीन कर. तो पुढें मोठें भाग्य काढील, यांत शंका नाहीं. मात्र त्याला कोणी तरी हाताशीं धरलें पाहिजे. मला सर्व विद्या येतात. आणखी माझें मन या मुलावर बसलें आहे, तर तूं याला माझ्या स्वाधीन कर. " तें ब्राह्मणाचें बोलणें ऐकून गोप फार सचिंत दिसला. तेव्हां ब्राह्मण त्यास पुढें म्हणतो, " बाबारे, दशरथ राजानें राम-चंद्राला विश्वामित्राच्या स्वाधीन केलें, आणि विश्वामित्रानें त्या रामास सर्व विद्यांचें शिक्षण दिलें, त्याप्रमाणें तुझ्या पुत्रास मी शिक्षण देऊन तयार करतों. तुला काळजी नको. हें राजबीज आहे. " तें मागणें ऐकतांच गुरा-ख्यास अतोनात वाईट वाटलें व आपण इतके दिवस अत्यंत प्रेमानें वाढविलेला हा मुलगा ब्राह्मण मागतो, याला कसा द्यावा, अशा विवंचनेंत तो पडला. ब्राह्मणास काय उत्तर द्यावें, तें त्यास सुचेना. परंतु त्याचें उत्तर त्या मुलानेंच त्यास दिलें. या ब्राह्मणाचें व त्याच्या बापाचें भाषण प्रथम सुरू झालें तेव्हां तो मुलगा ऐकत नव्हता, परंतु ब्राह्मणानें त्याज-पाशीं या मुलाला माझ्या स्वाधीन कर असे म्हटलें, तेव्हां तें त्यास आवडून तो धांवत धांवत येऊन त्या आपल्या गरीब बापास म्हणतो, " बाबा, मला तुम्ही यांच्या स्वाधीन

करा. मुलींसुद्धां काळजी करूं नका. तुम्ही नेहमीं म्हणत असतां कीं, या यवनांचा कोणी उच्छेद करील तर पाहिजे; मग बाबा मीच तो उच्छेद करूं लागलों तर काय वाईट? तुम्ही त्या त्यांच्या राजाला पाहिलं होतंना म्हणतां? नेहमीं नेहमीं त्याच्या गोष्टी सांगतां, तो असा होता, त्याचा पोषाख असा होता, त्याचा घोडा असा होता. बाबा, तुमच्या आशीर्वादानं आणखी या ऋषिमहाराजांच्या कृपेनं मी खरोखर पराक्रमी होईन. त्या यवनांनीं घेतलेला सगळा मुलूख त्यांच्यापासून परत घेईन आणि एक मोठं थोरलं स्वतंत्र राज्य स्थापीन. मग बाबा, तुमच्या नशिबाचीं हीं गुरं जाऊन तुम्ही स्वस्थ बसत जाल. खरोखर मी या यवनांना मारून मगध देशाच्या भूपतीच्या राज्यासारखं इकडे स्वतंत्र राज्य स्थापीन."

मगध देशाचें व त्याच्या राजाचें नांव निघतांच ब्राह्मणाचा इतका वेळ अगदीं गुप्त असलेला संताप एकदम उद्दीप्त झाला व त्यास तो म्हणतो, "अरे मुला, मगध देशाच्या राज्यासारखं राज्य कां म्हणतोस? तुला त्याही राज्याच्या गादीवर बसवून चक्रवर्ती करीन."

---

# प्रकरण १ लें.

## प्रयाण.

गहन अरण्य—हिमालयांतलें गहन अरण्य—अक्षरशः गगनाचें चुंबन घेऊं जाणारे वृक्ष त्या अरण्यांत होते. आणि वृक्ष तरी किती प्रकारचे! त्यांच्या प्रकारांना कांहीं गणतीच नाहीं. हिमालयाला सर्व औषधिवनस्पतींचें माहेरघर असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. सर्व वनस्पति, सर्व लता, सर्व जातींचे लहानमोठे वृक्ष त्या पर्वतावर आहेत असें वाटणें अगदीं साहजिक आहे. त्यावरील अरण्यें अत्यंत गहन असतील यांत नवल काय? या अशा अरण्याच्या एका भागांत एक लहानसा आश्रम असून, त्याची व्यवस्था फारच उत्तम होती. या आश्रमास चाणक्याश्रम म्हणत असत. ब्रह्मपुत्रेला जाऊन मिळणाऱ्या एका लहानशा, परंतु फारच रमणीय अशा नदीच्या तटाकीं हा आश्रम होता. या नदीचा ओघ सपाट्यानें सुटलेल्या वाऱ्याप्रमाणें वाहत असे, यामुळेंच कीं काय हिचें नांव मरुद्वती असें पडलेलें होतें. ज्या ठिकाणीं चाणक्याश्रम असे, तेवढाच थोडासा भाग थोडा शांत असे. या आश्रमाचा कुलपति चाणक्य नांवाचा एक ब्राह्मण—महातेजस्वी, महाविद्वान् व महाकोपिष्ट असा ब्राह्मण—होता. त्याचें तेज गोत्रपतीप्रमाणेंच अग्नीसारखें प्रज्वलित होतें. त्याच्या आश्रमांत अनेक ब्राह्मण व विद्याध्ययनेच्छु ब्राह्मणपुत्र येऊन राहिलेले होते. शिवाय हिमालयांतले भिल्लाधिपति त्यास फार नमून असत. चाणक्याचें अध्ययन चारही वेद, त्यांच्या शाखा व त्यांच्या उपशाखा, त्याचप्रमाणें त्यांचीं षडंगें आणि उपांगें आणि इतर सर्व

शास्त्रें इत्यादिकांना आकळून राहिलें होतें. कुलपति या नांवास त्या कालीं जर कोणी योग्य स्थान असेल, तर तो चाणक्य होता, हें अगदीं निर्विवाद होय. शेंदोनशें विद्यार्थी त्याचेजवळ पढत असत. शिवाय त्या विद्यार्थ्यांना आणखी पडविद्यार्थी असत ते निराळेच. या विद्यार्थ्यांत सर्व ब्रह्मविद्या शिकणारेच असत असें नाहीं; तर अस्त्रविद्या व धनुर्वेद, त्याचप्रमाणें आयुर्वेद, काश्यपसंहिता इत्यादिकांचें शिक्षण घेणारे ब्राह्मण व क्षत्रिय शिष्य त्या आश्रमांत होते. सारांश, पुराणांतरीं वसिष्ठ, वाल्मीकि, विश्वामित्र इत्यादिक महर्षींच्या आश्रमांचें जें वर्णन आपल्यास आढळतें त्याप्रमाणें हुबेहूब या चाणक्याश्रमांत सर्व व्यवस्था होती. प्राचीन काळच्या वसिष्ठवामदेवांप्रमाणेंच आपली योग्यता आहे अशी चाणक्याच्या मनाची पक्की खात्री असावी असें दिसलें. इतकेंच नव्हे, तर ' विश्वामित्राप्रमाणेंच एखाद्या क्षत्रिय वीराला हातीं धरून त्याच्याकडून रामायणांत वर्णिल्याप्रमाणें पराक्रम करवीन, एक मोठें थोरलें साम्राज्य स्थापवीन, पृथ्वीविजय करण्यासाठीं अश्वमेध करवीन आणि असंख्य मांडलिकांच्या प्रणतीनें त्यांच्या मुकुटांवरील रत्नांच्या प्रकाशानें त्याच्या चरणाचीं नखें रंगवीन. रामराजा ईश्वरी अवतार अयोध्येसारख्या नगरीचा मूळचा राजा, तेव्हां त्याच्या हातून विश्वामित्रानें सर्व विद्यांचें ग्रहण करवून त्यास अनेक पराक्रम करण्यास समर्थ केलें यांत नवल नाहीं. परंतु मी ज्याला मूळचें राज्य नाहीं, दुसरें कोणतेंही साधन नाहीं, अशा क्षत्रिय पुत्राला हातीं धरून त्याचेकडून सर्व आर्यावर्तावरच एकच मोठें थोरलें प्रचंड राज्य वसवून त्यास सार्वभौम करीन. ज्या मगध देशाच्या राजानें विनाकारण माझा उपमर्द केला, ज्यानें माझी योग्यता जाणली नाहीं, ज्यानें मत्सरानें भरलेल्या क्षुद्र ब्राह्मणांची दुष्ट वाणी ऐकून माझी अवमानना केली, त्या मगधाधिपतीच्या कुळाचें पूर्णपणें समूलच्छेदन करून त्याच्या सिंहासनावर मी आपला हा क्षत्रिय किशोर बसवीन. ' अशा प्रकारचे उद्गार त्या आश्रमाच्या कुलपतीच्या तोंडून वारंवार निघत असत.' आणि त्याच बुद्धीनें तो खरोखरी एका अल्पवयी परंतु तेजस्वी अशा क्षत्रिय कुमाराला व त्याच्याबरोबर हिमालयांतील बारीकसारीक मांडलिक राज्यांतील कित्येक क्षत्रिय व भिल्ल कुमारांना आपल्या आश्रमांत आणून त्यांस धनुर्वेदाचें व शस्त्रविद्येचें शिक्षण देत असे, त्यांत समाधानाची गोष्ट ही कीं, ते सर्व कुमार मोठ्या आनंदानें व उत्साहानें आपल्या गुरूपासून त्या त्या शास्त्राचे प्रायोगिक व शास्त्रीय पाठ घेत असत, दररोज त्यांची विद्याप्रगति पाहून त्यांच्या गुरूस अतिशय आनंद होत असे. दिवसानुदिवस आपला उद्दिष्ट हेतु सिद्ध होण्याच्या जवळ जवळ येऊं लागला, हें पाहून ह्या गुरूस जें समाधान होऊं लागलें, त्यास पारावारच नाहींसा झाला, आतां पुढला कार्यक्रम कसा काय करावयाचा इकडे त्याचें लक्ष्य वेधलें, रणांगणांत शत्रूसमोर उभें ठाकून याचा पराभव करणें, आपल्या शिष्यांस अशक्य आहे असें तर त्याच्या मनास पक्कें वाटलेंच. त्या शिष्यांच्या अंगीं तेवढें शौर्य, वीर्य व कौशल्य नव्हतें असें नाहीं; तें पूर्णपणें होतें. परंतु संख्येच्या मानानें पाहतां लागणारें सेनाबल कोठून आणावें, याची त्यास मोठी काळजी लागली. मगध देशचा राजा मोठा सम्राट्. आर्यावर्ताचा पूर्वोत्तर भाग त्यानें सर्व व्यापलेला असून पश्चिमेकडेस त्याचे मांडलिक अनेक होते. तेव्हां युद्ध करण्याचाच प्रसंग आला, तर त्यास सेनाबल जितकें असणें जरूर तितकें आपल्या या

वीरपुत्रास कसें मिळावें? हा विचार आतांशा त्या ब्राह्मणाच्या डोक्यांत एकसारखा घोळूं लागला. या विचारांतच एके दिवशीं मध्यान्हसमयीं तो माध्यान्हस्नानासाठीं अगदीं एकटाच मरुद्वती नदीच्या आपल्या नियमित जागीं चालला होता. आश्रमांत इतकी गर्दी असे, परंतु गुरूंनीं आपल्या नित्यकृत्याकरितां नदीचा विवक्षित भाग अगदीं आपल्यासाठीं निराळा राखून ठेविल्याप्रमाणें केलेलें होतें. त्या भागीं गुरु असतां त्यांचेजवळ जाऊन भाषण करणें कोणासही शक्य नव्हतें. एक त्यांचा आवडता शिष्य चंद्रगुप्त मात्र वाटेल त्या वेळीं वाटेल तेथें जाऊन गुरूच्या समाधीचासुद्धां भंग करूं शकत असे. ज्याप्रमाणें आईबापांस दहा मुलें असलीं, तरी एकावरच त्यांचें विशेष प्रेम असतें, त्यानें कांहींही दोष केले तरी ते दोष असे त्यांस वाटत नाहींत, किंवा दोष वाटले तरी त्यांजबद्दल अगदीं त्यास सहज क्षमा होते, त्याप्रमाणेंच चाणक्य व चंद्रगुप्त यांची स्थिति होती. गुरूच्याजवळ अनेक शिष्य अनेक प्रकारच्या विद्यांचें अध्ययन करण्यास राहिलेले होते हें वर सांगितलेलेंच आहे; परंतु त्या सर्वांत चंद्रगुप्त हा आद्य व अत्यंत प्रेमांतला शिष्य होय.

वाचकांनीं ताडलेंच असेल कीं, उपोद्घातांत सांगितलेला दरिद्री ब्राह्मण व हिमालयावरील गोपास सांपडलेला क्षत्रिय वत्स तेच या चाणक्याश्रमांतील चाणक्य व चंद्रगुप्त होत. त्या गोपास चांदण्या रात्रीं झाडाच्याखालीं अचानक तो बालक सांपडला. तेव्हां तो चंद्रानेंच आपल्या वंशांतील एक महावीर पुरुष—त्याच्या हातून पुढें मोठें थोरलें कार्य घडणार म्हणून रक्षिला, असें मनांत आणून त्या दरिद्री ब्राह्मणानें त्याचें चंद्रगुप्त हें नांव ठेविलें. व ज्या नांवानें आपण राजसभेंत गेलों असतां आपला मानभंग झाला तें नांव त्या मानभंगाचें पूर्णपणें परिमार्जन होईपर्यंत आपण सोडून द्यावयाचें, तोंपर्यंत निरालेंच नांव घ्यावयाचें; व जे दिवशीं हिरण्यगुप्त ऊर्फ धनानंद यास मगधदेशाच्या सिंहासनावरून खालीं ओढून काढूं, त्याच दिवशीं आपल्या पहिल्या नांवाचा उच्चार आपण करूं किंवा कोणीं केलेला कानांनीं ऐकूं, अशी प्रतिज्ञा त्या ब्राह्मणानें केली. ब्राह्मण मोठा कार्यकर्ता व निश्चयी. त्या गोपापासून मुलास मागून घेतल्यानंतर तो पुनः तक्षशिला नगरीस परत गेला नाहीं, तर तेथून बऱ्याच अंतरावर हिमालयाच्या उंच व अंतर्भागांत जाऊन वर सांगितलेल्या मरुद्वती नदीच्या तटाकावर त्यानें एक लहानशी पर्णकुटिका बांधिली व तेथें त्या आपल्या बालकास घेऊन त्यास शस्त्रास्त्रविद्येचें शिक्षण देण्यास सुरवात केली. या एकाकी बालकास कितीही शिक्षण दिलें तरी याचे एकट्याचे हातून आपलें इष्ट कार्य साध्य कसें होणार, हा विचार ब्राह्मणाच्या मनांत आलाच. परंतु उत्साह मोठा, निश्चय दृढ, स्वतःच्या कार्यकर्तृत्वाविषयीं विश्वास फार, तेव्हां अशा मनस्वी माणसास निराशा कधीं तरी शिवूं शकेल काय? ज्याप्रमाणें भगवान् रामचंद्रानें दक्षिणेंतील वानरांचें सहाय घेऊन रावणासारख्या वैऱ्यास जिंकिलें, त्याचप्रमाणें आपणही या आपल्या क्षत्रियवीराला हिमाचलांतील भिल्ल, मातंग, चांडाल वगैरे हीन समजले जाणाऱ्या लोकांचें सहाय देऊन त्या चांडालांपेक्षांही नीच अशा मगधदेशाच्या राजकुलाचा निःपात त्याच्याकडून करवूं, अशी विलक्षण उमेद त्यानें मनांत धरली; व भिल्ल, मातंग, चांडाल वगैरे लोकांचें हीनत्व मनांत न आणतां आपल्या आशीर्वादानें जणूं काय त्यांस पुनीत करून घेऊन शस्त्रास्त्रविद्येचा उपदेश चालविला. शिवाय लौकरच त्याच्या विद्वत्तेचीही ख्याति सर्वत्र पसरल्याकारणानें

जिकडून तिकडून ब्राह्मणपुत्रही त्याचेजवळ अध्ययन करण्यास येऊं लागले. अशा तऱ्हेनें पहिली लहानशी पर्णकुटिका घालून सुमारें वर्ष झालें न झालें, तों चाणक्याश्रमाची व तेथील कुलपतीची सर्व हिमाचल प्रदेशांत कीर्ति पसरली.

असो. वर सांगितल्याप्रमाणें आतां पुढला उपक्रम कसा काय करावा, या विचारानें चित्त व्यापलें आहे, अशा स्थितींत मध्यान्हीच्या सुमारास चाणक्य आपल्या स्नानस्थानाकडे चालला होता, हें वर सांगितलेंच आहे. विचार करीत बसण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं, प्रतिज्ञा व कार्य सिद्ध करावयाचें तर आपण आतां ताबडतोब कांहींना कांहीं तरी प्रारंभ केला पाहिजे, असें त्याच्या मनांत ते दिवशीं विशेष प्रकारें घोळूं लागलें होतें. अर्थातच काय करावें ? कसा प्रारंभ करावा ? हा विचार विशेषतः त्याच्या मनास त्रास देत होता. चंद्रगुप्त सुप्रभातींच उठून शिकारीच्या नादानें कोणीकडे गेला होता; वेळ अतिशय शांत, परंतु प्रखर होती. सूर्य आकाशाच्या अगदीं मध्यभागीं आरूढ झाला होता. अशा वेळीं पशुपक्षी जणूं काय विश्रांति घेण्यासाठीं आपापल्या गुहांत व घरट्यांत जाऊन बसले होते. ब्राह्मणाच्या सभोंवतालीं अगदीं शांत होतें खरें, परंतु त्याच्या अंतरंगीं शांतीचें नांवही नव्हतें. इष्टकार्य सिद्ध होईपर्यंत त्यास शांति ती कोठून मिळणार ? चाणक्य याप्रमाणें आपल्या मनाशीं विचार करीत असतां एकदम त्यास कांहीं तरी विलक्षण अशी कल्पना सुचली असावी. कारण त्याचा चेहरा एकदम प्रफुल्लित झाल्याप्रमाणें झाला. त्यानें त्या उल्हासांत दोन्ही हातांनीं एकवार टाळी वाजविली. आणि आपल्याशींच तो कांहीं तरी पुटपुटला. व एकदोन वार मान हालवून आपल्याशींच म्हणाला, " बरोबर, असें केल्याखेरीज दुसरा आतां मार्गच नाहीं. आपण गेल्याखेरीज ती व्यवस्था होणेंच शक्य नाहीं, आणि तशी व्यवस्था झाल्याखेरीज आपल्याला आपल्या पुढल्या कार्यक्रमाचा उपक्रम करणेंही शक्य नाहीं. नुसतेंच येथें बसून काय होणार आहे ? व्हायचें तें तेथें जाऊन होणें शक्य आहे. एक वर्षांत चंद्रगुप्तानें विद्याग्रहण थोडेंथोडकें केलें असें नाहीं. आणि पाटलिपुत्रांत आपण गेलों होतों त्या वेळीं जी स्थिति पाहिली तीच कायम असली, तर आपलें कार्य आपणाला कठीणही जाणार नाहीं. एक वर्षाच्या आंतच आपण तेथें जाणार, ही गोष्ट कदाचित् अडचणीची वाटते; पण त्यांत अडचण तरी कसली ? जे आपण एवढा थोरला व्यूह रचण्याची हांव धरितों, तेच आपण प्रारंभींच अशा तऱ्हेच्या शंका घेऊं लागलों, तर कसें चालणार ? आपल्या राजनीतींत सर्व गोष्टी चालतील. आपण जें मनांत धरतों तें जर केलें नाहीं, तर कधींच आपल्याला सिद्धि प्राप्त होणार नाहीं."

याप्रमाणें मनाशीं कांहीं विवंचना, कांहीं निश्चय व कांहीं विचार करीत करीत चाणक्य स्नानासाठीं नदींत शिरला; मुखानें त्या कालीं योग्य असे मंत्र एकामागून एक सहजगत्या निघतच होते; परंतु त्या मंत्रोच्चारांत त्याचें मन नव्हतें हें उघडच आहे; त्याचें सर्व मन आपल्या पुढल्या कार्यक्रमाकडे गुंतलेलें होतें, हें उघडच आहे; तसें तें गुंतलेलें असतां नित्यकर्माचे वेळीं अगदीं साहजिक तऱ्हेनें उच्चारल्या जाणाऱ्या मंत्रांत मन कसें असूं शकणार ! स्नान वगैरे होऊन स्वारी माध्यान्हसंध्येकरितां कांठावर हरिणाजिन टाकून त्यावर बसली आणि आचमन करून आतां प्राणायाम करणार, तोंच त्यांचा लाडका वत्स चंद्रगुप्त धांवत धांवत तेथें आलेला त्यांनीं पाहिला, आल्यावरोबर पुढें येऊन गुरूस नम्रपणें नमन

करून त्यानें आज आपण वनांत काय काय पराक्रम केले ते त्यांस निवेदन केले. विशेषतः एक मोठा थोरला रानडुकर व फारच सुंदर असा कृष्णमृग मारल्याबद्दलची हकीकत तो सांगूं लागला असतां त्याच्या बरोबरीचा दुसरा एक राजपुत्र मध्येंच ह्मणतो, " आणि गुरुजी, हा एकटा त्या रानडुकराच्या मागें धांवत सुटला, तेव्हां आह्मांला खरोखर अर्जुनाची आठवण झाली. अर्जुनाचें बल पाहण्यासाठीं भगवान् शंकरानें किरातांचें रूप घेऊन अर्जुनास चिडविलें, त्या वेळीं अर्जुन खरोखर याच्याप्रमाणेंच शोभला असावा. " इतक्यांत दुसरा एक भिल्ल तितक्याच उत्सुकतेनें ह्मणतो, " गुरुजी, तो डुकर तुह्मीं पाहिला तर याला चांगली शाबासकीच द्याल. एवढा डुकर आजपर्यंत या अरण्यांत कधीं कोणीं पाहिला नसेल. पण हा त्याला यत्किंचित्सुद्धां न डगमगतां जणूं काय कुत्र्यामांजराला हाणायला काठी घेऊन धांवावें, त्याप्रमाणेंच यानें केलें. आणि शेवटीं त्याला ठारही मारलें. तुम्ही तो डुकर पहाण्याला चलाच. "

आपल्या एकुलत्या एक व परमप्रिय पुत्रानें एखादा पराक्रम केला असतां ज्याप्रमाणें त्याच्या मातापितरांस अतिशय आनंद होतो, त्याप्रमाणेंच, किंबहुना त्याच्याहीपेक्षां विलक्षण असा आनंद चाणक्यास त्या वेळीं झाला. ज्यास हातीं धरलें त्याची येथपर्यंत तयारी तर अत्युत्कृष्ट झाली. परंतु जें काम व्हावयाचें आहे. तें सर्व पुढेंच आहे, झालें हें कांहींच नाहीं, हेंही मनांत येऊन त्यास लागलींच थोडेसें वाईट वाटलें; परंतु तें अगदीं क्षणमात्रच होतें. तो क्षण उलटतांच चंद्रगुप्ताकडे वळून ते त्यास म्हणतात, " वा चंद्रगुप्ता, हा तुझा पराक्रम ऐकून मला खरोखर फार आनंद झाला आहे. दिवसानुदिवस असेच पराक्रम करीत जा. पण आतां मला दुसऱ्याच कांहीं गोष्टींबद्दल तुला सांगायचें आहे. मुलांनो, तुम्ही जरा दूर जा. हाका मारीन तेव्हां जवळ या. " मुलें गुरूच्या अगदीं आज्ञेंत असत. त्यांस गुरूंनीं वरील आज्ञा करतांच तावडतोब तीं दूर गेलीं, व चाणक्य चंद्रगुप्तास म्हणाला, " वत्सा चंद्रगुप्ता, मी कांहीं वेळ तुला सोडून जाणार आहें. तुझें वय अजून अगदीं लहान आहे; परंतु तुझ्या हातून जें कार्य मला घडवावयाचें आहे, त्याचा उपक्रम आतांच आरंभला पाहिजे; दिवसगतीवर टाकतां कामा नये. शिवाय तुझ्या अंगावर एक चातुर्मास्यपर्यंत तरी येथली व्यवस्था टाकिलीच पाहिजे. ज्याला पुढें मोठ्या थोरल्या देशाचें राज्य करावयाचें, त्याला थोडा तरी असल्या कारभाराचा अनुभव आला पाहिजे. म्हणून तूं इतका लहान तरी तुजवर हा आश्रम टाकून एक चातुर्मास्यपर्यंत मी जाणार. तुला ठाऊकच आहे कीं, मी एकदां एखादी गोष्ट करीन म्हणलें म्हटजे तें कधींही फिरावायचें नाहीं, आणि जर आपल्याला आपला हेतु सिद्धीस न्यायचा आहे, तर जरूर जरूर मी म्हणतों त्याप्रमाणें वागलेंच पाहिजे. तूं तोंड गोरेंमोरें करूं नकोस. गोरेंमोरें तोंड करण्याची मुळींच जरूरी नाहीं. कारण मी जो जातों आहें, तो केवळ पुढचा आपला कार्यक्रम नीट बसविण्यासाठींच जातों आहें. दुसरा कांहींही माझा हेतु नाहीं. काय काय करावयाचें तें आतांच तुला सांगून उपयोग नाहीं. वत्सा, मगध देशच्या राजाच्या सिंहासनावर तुला बसलेला पाहीन, तेव्हांच माझ्या नेत्रांचें पारणें फिटेल; मध्यंतरीं फिटणार नाहीं, ही पक्की मनांत खूणगांठ बांधून ठेव. दुसरें कांहीं मला तुला सांगायचें नाहीं. इतर सर्व मंडळीला मी सर्व कांहीं सांगून ठेवितों, परंतु त्या सर्वांवर नजर तुझी. तूं या आश्रमाचा मालक. तूंच येथला राजा. पुढचें

राज्य कसें काय हांकणार तें तुझ्या या चार महिन्यांतल्या वागणुकीवरून मला चांगलें दिसून येईल. ”

बिचारा चंद्रगुप्त खरोखरीच अगदीं गोरें-मोरें तोंड करून चाणक्याचें भाषण ऐकत होता. त्यास आपला गुरु आपल्यास टाकून जाणार हें ऐकतांक्षणींच अतिशय वाईट वाटलें. अगदीं तान्हेपणापासून ज्यानें त्याचें संगोपन केलें, त्या गोपापेक्षांही चाणक्यानें इतक्या थोड्या दिवसांत त्याचें चित्त आपलेंसें करून घेतलें होतें. तो एकदम गहिंवरून आपल्या गुरुस म्हणतो, “चाणक्यमहाराज, माझें अजून शिक्षण पुरें झालें नाहीं तोंच आपण मला सोडून जाणार म्हणतां ? तर मलाच बरोबर कां नेत नाहीं ? जेथें आपण तेथें मी, कांहीं संकट आलें तर मी भिईन, असें मुळींच आपण समजूं नका. आपण जवळ असतां, काळाला सुद्धां मी भिणार नाहीं. मग आणखी तर काय ? पण आपण मला सोडून गेलां, तर मात्र माझ्या मनाची स्थिति धड राहणार नाहीं. बरोबर येऊन वाटेल तें झालें तरी हरकत नाहीं. ”

चाणक्य त्यास त्यावर म्हणतो, “तूं संकटाला भिशील म्हणून मी तुला नेत नाहीं असें मुळींच नाहीं. सध्यांच्या प्रसंगीं मला एकट्यालाच गेलें पाहिजे. आतां त्याबद्दल अधिक कांहींएक बोलूं नको. मी सांगतों त्याप्रमाणें वाग. तुझ्या कल्याणाखेरीज माझ्या मनांत दुसरें कांहींही नाहीं, हें मी तुला सांगायला पाहिजे असें नाहीं. यांत काय तें तूं समज. ” इतकें बोलल्यानंतर चंद्रगुप्त अधिक काय बोलणार ? परंतु त्यास अतोनात दुःख होत असावें, असें आर्य चाणक्यास स्पष्ट दिसलें. परंतु चाणक्य जितका मनोविकारवश तितकाच निश्चयीही असे. त्यानें आपला निश्चय अणुमात्र ढळूं दिला नाहीं. त्याच्या मनानें असें पक्कें घेतलें कीं;- आतां आपल्या मनांत आल्याप्रमाणें कार्यास आरंभ केलाच पाहिजे. कार्याची उपेक्षा करतां कामा नये. हें कार्य असें आहे कीं, तें घडून येण्यास किती दिवस लागतील आणि किती नाहीं, त्यापेक्षां जितकें लवकर प्रारंभ करून कार्य सिद्ध करावें, तितकें हवेंच आहे.

निश्चयी पुरुष निश्चित कार्यास कधींही विलंब करीत नाहींत. त्याच दिवशीं रात्रीं चातुर्मास्यापुरती करावयाची तेवढी निरवानिरव करून दुसरे दिवशीं मोठ्या पहांटेस कुलपति चाणक्य आपल्या प्रिय शिष्यांचा निरोप घेऊन आश्रम सोडून गेला.

---

# प्रकरण २ रें.

## पाटलिपुत्र.

मागल्या प्रकरणांतून प्रसंगोपात्त वाचकांस मगधदेशाची राजधनी जें पाटलिपुत्र नगर त्याची थोडीशी माहिती आली आहे. परंतु या प्रकरणांत त्या नगराचा व वाचकांचा बराच परिचय करून देण्याचा विचार आहे. आर्य चाणक्य आपल्या आश्रमांतून निघून पाटलिपुत्रास येऊन पोहोंचण्या पूर्वी वाचकांस त्या श्रीविशाल नगरीची माहिती झाली असतां व तेथील नंदनृपतींचाही परिचय झाला असतां एकंदर कथानक समजण्यास मदत होणार आहे.

पाटलिपुत्रास पुष्पपुर असेंही नांव होतें. परंतु आपण ज्या काळची कथा लिहीत आहों, त्या काळीं त्या मगध देशास शेखरीभूत अशा नगरीचें पाटलिपुत्र हेंच नांव सर्वतोमुखीं होतें. कित्येकांची अशी समजूत आहे कीं, रामायणकालीं हीच नगरी कौशांबी या नांवानें किंवा कुसुमपुर या नांवानें सुप्रसिद्ध होती. कसेंही असलें तरी एवढी गोष्ट खरी कीं, आमच्या कथानकाच्या कालापूर्वीपासूनही ही नगरी पुराणप्रसिद्ध होती, व ज्या कालीं आपण तिचा इतिहास पाहूं म्हणतों, त्या कालीं तर सर्व आर्यावर्तांत पाटलिपुत्रासारखें सर्व दृष्टीनें फार मोठें असें दुसरें नगर नव्हतेंच. येथील नंदराजे अतिशय समर्थ असून त्यांची कीर्ति जिकडे तिकडे पसरलेली होती. वस्तुतः पाहतां ती खरोखर तशी होती कीं साधारणतः राजा म्हटला म्हणजे त्याची कीर्ति वाढावयाची त्याप्रमाणें वाढलेली होती, हें पाहणें आहे. राजे कसेही असले तरी एवढी गोष्ट खास कीं, पाटलिपुत्र नगर मात्र सर्वथा दिगंतविश्रुतकीर्ति या विशेषणास योग्य होतें. हें नगर सुमारें पांच कोस लांब व तीन कोस रुंद असें होतें. त्या वेळच्या ग्रीक लोकांनीं या शहराचें वर्णन दिलें आहे त्यावरून या शहराच्या सभोंवतालीं एक मला जंगी खंदक असून, खंदकाचे आंतले बाजूस एक फार भक्कम अशी सर्व शहराला वेढून टाकणारी लांकडी भिंत घातलेली होती. या लांकडी भिंतीच्या आंतल्या बाजूस एक मोठा थोरला सर्व शहरास वेढून असलेला आणखी एक तट होता. त्या वेळीं हें शहर गंगा व शोण या दोन नद्यांच्या संगमानें बनलेल्या दुबेळक्यांत लांबलचक पसरलेलें होतें. यांतील लोकांस प्राच्य म्हणत असत. गंगा व शोण या नद्यांच्या संगमस्थानीं असल्याकारणानें त्या सर्व प्रांतांतील उदीमव्यापाराचें तें एक आदिस्थानच होऊन बसलें होतें. शिवाय राजधानी असल्याकारणानें सर्व प्रकारचे कलाकुशल व

गुणी लोकही तेथें येत असत हें उघडच आहे. ज्या कोणास आपल्या अंगची करामत दाखवून राजाश्रय मिळविण्याची महत्त्वाकांक्षा असेल त्यानें पाटलिपुत्राकडे आपले पाय वळविलेच असें समजावें. पाटलिपुत्र वैदिक धर्माचें अग्रस्थान होतें. नानाप्रकारचे यज्ञ व इतर हव्यकव्यें नेहमीं तेथें होत असत. यज्ञधर्माचा आत्यंतिक प्रसार झाल्यामुळें यांत मारल्या जाणाऱ्या पशूंचे हाल पाहून सघृणहृदय बुद्धदेवानें प्रचलित केलेल्या अहिंसा धर्माचे प्रसारकही पाटलिपुत्रांत कोठें कोठें आपलें धर्मप्रसाराचें कार्य चालवूं लागलेच होते, व त्यांस थोडेंबहुत यशही मिळत चाललें होतें; परंतु हें त्यांचें अहिंसाधर्मप्रसारकार्य थोड्याबहुत अंशानें गुप्तपणेंच चालत असे. वैदिक धर्मास राजाश्रय जबरदस्त असल्यामुळें या बिचाऱ्या जतींस आपलें धर्मकार्य पुढें सरसावण्यास पाहिजेत तितक्या सवलती नसत. उलट क्वचित् क्वचित् त्यांच्या खटपटी राजाश्रित पुरोहितादिकांस कळल्या असतां त्यांचा छळही होत असावा असें दिसतें. सध्यां पाटलिपुत्राचें अन्य प्रकारानें वर्णन देण्याचाच माझा विचार आहे.

पाटलिपुत्रावर अर्थात् सर्व मगध साम्राज्यावर या वेळीं नंदराजांपैकीं धननंद ऊर्फ हिरण्यगुप्त हा राजा राज्य करीत होता हें वाचकांस कळलें आहेच. हा राजा दूरदूरच्या लोकांस जरी मोठा दाता, शूर, वीर व मोठा गुणग्राही असा वाटत असे, तरी वस्तुतः तो तसाच होता असें म्हणण्यास कारण नाहीं. तो मनाचा मोठा क्षीण, कोणत्याही गोष्टींत निश्चय कधीं व्हावयाचा नाहीं असा व व्यसनीही होता. दूरवर त्याची कीर्ति कितीही पसरली असली तरी त्याच्या सभोंवतालच्या लोकांस तो मुळींच आवडत नव्हता. प्राचीन काळीं काय किंवा अद्यापिही काय, राजा म्हटला म्हणजे प्रत्यक्ष देवाचा अवतार अशी सार्वत्रिक समजूत आहे. त्या काळीं तर ती समजूत लोकांचे मनांत फारच दृढ बसली असल्यामुळें लोक कशाही राजास शिरसावंद्य मानण्यास कधीं कमी करीत नसत. याप्रमाणेंच धननंदाची स्थिति होती. राजा सर्व गोष्टींत आपल्या नजीकच्या लोकांचें ऐकून काय करावयाचें तें करी. क्षीण मनाच्या राजाजवळ कशा प्रकारचे लोक असतात हें वाचकांस प्रत्यक्ष नाहीं, तरी ऐकून ठाऊक असेलच. सर्व प्रकारचे व्यसनी लोक अशा राजाच्या आसपास असल्याकारणानें व राजाची मर्जी संपादण्यासाठीं वाटेल तें कृत्य करण्यास ते मुळींच मागेंपुढें पहात नसल्याकारणानें वस्तुतः राजा एके अंगासच राहून हे लोकच राजा बनतात. कोणत्याही गोष्टींत आपला मतलब साधावयाचा असल्यास राजास त्याप्रमाणें उपदेश करून त्याचेकडून ती गोष्ट आपणास पाहिजे तशी ते करून घेतात. आपलें वजन राजावर आहे असें राजास मुळींच भासूं न देतां ते वाटेल तसें वजन व दाब त्याच्या मनावर ठेवीत असतात. राजा मात्र मनांत समजत असतो कीं, मी वाटेल तें सुष्ट किंवा दुष्ट कृत्य करण्यास मुखत्यार आहें. बिचाऱ्यास खरे मुखत्यार कोण आहेत व ते आपली मुखत्यारी कशी चालवितात, याची कल्पना सुद्धां होत नाहीं. धननंदाची स्थिति यासारखीच होती. त्याचे सभोंवार जे त्याचे परिचारक होते, ते आपल्या मनास वाटेल त्याप्रमाणें वाटेल तीं कृत्यें राजाकडून करवून घेत असत; परंतु राजा मात्र आपल्या मनास वाटेल त्याप्रमाणें आपण सर्व गोष्टी करितों असें आपल्या मनास सांगून त्यांतच अभिमान बाळगीत असे.

धननंदाची अशी स्थिति असल्याकारणानें राज्य हांकण्यास अमात्यादिकांस फार

अडचण पडत असे. परंतु कित्येक अमात्य राजकुलावरील निष्ठेमुळें आपआपलीं कामें एकनिष्ठेनें करून दिवस कंठीत असत. या सर्वांत राजकुलाविषयीं फार निष्ठा व अभिमान बाळगणारा असा राक्षस नांवाचा, आपल्या नांवाहून अगदीं भिन्न स्वभावाचा असा मुख्य अमात्य होता. त्याचें राजावर वजनही फार होतें. इतर कोणत्याही बाबतींत धनानंद कसाही वागला तरी राक्षसाचे बाबतींत धनानंदानें कधींही वेडेंवांकडें वर्तन केलें नाहीं. बाकी कोणीं जरी त्यास कांहीं एक सांगितलें आणि राक्षसाचें मत निराळें पडलें, तरी कोणाचें त्या बाबतींत कांहीं एक न ऐकतां तो राक्षसाच्या मताप्रमाणेंच काय करावयाचें तें करी. धनानंदाच्या मांडलिक राजांत अनेकांस धनानंदाचें जोखड उडवून देऊन प्रसंगीं आपणच धनानंदाचें राज्य घेऊं अशी महत्वाकांक्षा वाटत असे. परंतु जोंपर्यंत राक्षस मगध देशाचें राज्य चालवीत आहे, तोंपर्यंत आपली महत्वाकांक्षा मनांतल्या मनांतच ठेविली पाहिजे; ती सिद्ध करूं गेल्यास आपलें आहे तें राज्य आपल्या हातून जाऊन भिक्षा मागण्याची पाळी येईल हें ते पूर्णपणें जाणून असत. व म्हणूनच कधींही डोकें वर करण्याचें साहस त्यांनीं केलें नाहीं. मगध देशांत त्या वेळीं राक्षस नसता, तर धनानंदाचें राज्य केव्हांच अस्त पावून त्याचे जागीं वंग किंवा कलिंग देशाचा नृपति राज्य करूं लागला असता. धनानंदाची अशी स्थिति असल्याकारणानें त्याची प्रजा त्याचेविषयीं कितपत आदरबुद्धि मनांत वागवीत असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. खरोखर परचक्रप्रसंग आला असता, तर लोक धनानंदावर उलटून शत्रूकडे जाऊन मिळाले असते कीं काय हा प्रश्न निराळा. ते मिळाले नसतेही. स्वराज्य व स्वराज्याधिपति यांचें संरक्षण करण्यासाठीं त्यांनीं कायावाचामनेंकरून प्रयत्न केले असते, परंतु वस्तुतः सर्व प्रजेचें प्रेम असावें तसें धनानंदाच्या ठिकाणीं कांहींही नव्हतें असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं.

एवढें धनानंदाविषयीं झालें. राजा अशाप्रकारचा क्षीणचित्त व व्यसनी असल्यानंतर राजपुत्र कसे असतील याचें साधारणतः अनुमान वाचकांस सहज करितां येणार आहे. ते ‘ बापसे बेटा सवाई ’ या न्यायानें धनानंदापेक्षांही कित्येक बाबतींत वरचढ असत. राक्षसाच्या वजनामुळें एक मंत्रिमंडळ मात्र अगदीं निष्कलंक होतें व त्यामुळेंच मगध देशाच्या राजाची व राजसभेची कीर्ति दूरवर पसरलेली होती. परंतु राजसभेंतील पंडित वगैरे राजाचें मन आपण म्हणूं त्याप्रमाणेंच वळविण्यासाठीं काय खटपटी करीत असत, व त्यांस त्या खटपटींत कसें यश येत असे, याचा थोडासा मासला वाचकांस उपोद्घाताच्या पूर्वार्धांत मिळालाच आहे.

कसेंही असलें तरी, पाटलिपुत्र हें नगर दिगंतविख्यात होतें आणि तें तसें असण्यास योग्य कारणेंही होतीं, एवढी गोष्ट खरी. पाटलिपुत्र फार विस्तीर्ण व तेथील लोकवस्तीही संख्येनें अतिशय मोठी होती. लोक तर असंख्यात होतेच, परंतु त्याखेरीज भगवान् सिद्धार्थानें प्रचलित केलेल्या अहिंसाधर्माचे अनुयायीही थोडेबहुत होतेच; शिवाय यवन, म्लेछ, बर्बर, हूण, किरात, शाक, चीन, गांधार, खास, पारसीक व कांबोज इत्यादि लोकही त्या नगरींत व्यापारादिक मिषांनीं येऊन राहिलेले होते. ही मगध नगरी संपत्तीनेंही अतिशय विशाल होती, त्याचप्रमाणें सुंदर सुंदर प्रासाद, उपवनें व अनेकविध शाला यांनीं उत्तम प्रकारें सुशोभित केलेली होती. सर्व रस्ते अशा विविध प्रासादांनीं शृंगारलेले

असल्याकारणानें जिकडे तिकडे मनाला वेधून टाकणारें असेंच त्या नगरीचें स्वरूप दिसत असे. धनानंदाचा प्रासाद तर सर्व ऐश्वर्याचें व सौंदर्याचें आगरच होता, असें म्हटलें तर मुळींच अतिशयोक्ति वाटण्याचें कारण नाहीं. सर्व आर्यावर्तांत जेवढी म्हणून सुंदर वस्तु उपलब्ध होती, तेवढी जणूं काय त्या प्रासादांत आणून तिचा संग्रह केलेला होता आणि आर्यावर्तांत उत्तम कारागीर म्हणून नांवाजलेला प्रत्येक पुरुष तेथें आणून त्याच्या कारागिरीनें जें काय उत्तम असें बनेल तें त्याचेकडून करून घेतलें असावें. सारांश, त्या वेळीं जी काय अत्युच्च कला मानली जात असे, ती सर्व धनानंदानें व त्याच्या पूर्वजांनीं कामास लावून तो श्रीविहार नांवाचा आपला राजवाडा बांधला असावा. दरबार कसाही जरी असला, तरी नगरीचें एकंदर बाह्यस्वरूप अतिशय सुंदर झालें होतें यांत मुळींच शंका नाहीं.

ज्याप्रमाणें नगराची व्यवस्था होती, त्याचप्रमाणें राजाच्या सैन्याचीही व्यवस्था होती. राजा इतर बाबतींत कसाही जरी वागला, तरी त्यानें सेनाधिपतीच्या अधिकारांत कधींही ढवळाढवळ करण्याचा यत्न केला नाहीं. राज्यकारभारांत ज्याप्रमाणें राक्षसास, त्याचप्रमाणें सैन्यव्यवस्थेच्या कामांत आपल्या सेनापतीस जणूं काय त्यानें पूर्ण अधिकार दिलेला होता. या दोन गोष्टी नसत्या तर धनानंद इतकीं वर्षें पाटलिपुत्राच्या सिंहासनावर बसलाच नसता, असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं.

येथवर पाटलिपुत्राचें अंतर्बाह्य वर्णन झालें. आतां त्याच्या सौंदर्याचें किंवा सौंदर्य आणणाऱ्या अनेक वनोपवनांचें वर्णन करीत बसण्यापेक्षां आपल्या कथानकांत विशेषतः येणाऱ्या एका पात्राची व वाचकांची गांठ घालून द्यावी, हेंच बरें दिसतें.

अगदीं तिन्हीसांजची वेळ. पुष्पपुरीसारख्या विशाल नगरांतून ही वेळ म्हणजे अतिशय धांदलीची असावयाची. त्यांतून शहरांतील मोठमोठ्या पेठा तर या वेळीं नुसत्या गजबजून गेलेल्या असावयाच्या. जिकडे तिकडे दीपोत्सव करून आपापलीं दुकानें सुशोभित करण्याकडे व दीपोज्वलन झाल्याबरोबर कायावाचामनानें दीपदेवतेस नमस्कार करण्यांत गुंतलेले असावयाचे. संध्याकाळच्या वेळींच विशेषतः खपणारा ऐषआरामी माल खपवणारे दुकानदार तर फारच धांदलींत असावयाचे. परंतु पाटलिपुत्रांत त्या संध्याकाळीं पुष्पवीथिका नांवाच्या रस्त्यावर मालाकारांच्या दुकानांतून पुष्पविक्रयासाठीं अतोनातच गर्दी उडून गेली होती. जिकडे तिकडे मंडळी फुलें घेऊन जात आहेत असें दिसत होतें. प्रत्येक दुकानावर फुलें घेणाऱ्या गिऱ्हाइकांची फारच गर्दी असून आणि दीपावलीच्या दिवसांत दीपोत्सव करितात, त्याप्रमाणें सर्व नगरभर दीपोत्सव चालला आहे, असें स्पष्ट दिसत होतें. एक पुष्पवीथिकेवांचून दुसऱ्या कोणत्याही पण्यवीथिकांतून देवघेवीचा व्यवहार चाललेला नव्हता. प्रत्येक प्रासादाच्या तळमजल्यापासून सौधापर्यंत दीपोत्सव केलेला असून वातायनांतून स्त्रीपुरुषांची गर्दी दिसत होती, अर्थात् कांहीं तरी मंगल समारंभ नगरींतील निरनिराळ्या वीथिकांतून जाणार असावा असें स्पष्ट दिसलें. हा समारंभ पाहण्यासाठीं प्रत्येक व्यक्ति अत्यंत उत्सुक दिसली. व प्रत्येक वातायनांतील युवयुवतींची आणि वीथींत हारीनें उभ्या राहिलेल्या जनांचीही दृष्टि एकाच दिशेकडे वळलेली दिसली. हा एकंदर प्रकार काय आहे याविषयीं वाचकांस जिज्ञासा झाली असेल. ती जिज्ञासा

थोड्याच वेळांत तृप्त होईल. पाटलिपुत्रांतील अत्युत्सुक प्रेक्षकांप्रमाणें वाचकांनीं धीर धरला पाहिजे. समारंभाचे वेळीं अनेकविध लोकांचे अनेकविध तर्क निघून व खोट्या कंड्या उठून प्रेक्षकांचें प्रेक्षणकौतुक केव्हां अत्यंत वाढून, लागलीच त्या हुलींचा खोटेपणा दिसून आ-ल्याबरोबर आशाभंग होत असतो, त्याप्रमाणेंच याही समारंभप्रेक्षणोत्सुक लोकसमुदायांत प्र-कार चालला होता. मधेंच कांहीं तरी हूल उठे, लोक कौतुकानें एका दिशेला धांवत, आपल्या माना लांबवून लांबवून दूरवर दृष्टि देण्याचा यत्न करीत, व कोठें कांहीं अजून दिसत नाहीं असें दिसलें म्हणजे निराश हो-ऊन, हूल उठविणाऱ्या अज्ञात व्यक्तीस मन-सोक्त शिव्या देत, असा प्रकार चालला होता. होतां होतां सर्व शहर नखशिखांत दी-पोत्सवानें प्रज्वलित दिसूं लागलें. वर सांगि-तलेंच आहे कीं, हें नगर त्या वेळीं शोण व गंगा या दोन नद्यांच्या संगमाच्या दुबेळक्यांत वसलेलें होतें. दोन्ही बाजूंस प्रचंड असे जल-प्रवाह असल्याकारणानें त्या दीपोत्सवाचा प्र-तिबिंबप्रकाश त्या नदीप्रवाहांत दिसूं लागल्या-मुळें जणूं काय नगराची प्रभाच नगरांत मावेनाशी होऊन ती तप्त सुवर्णाप्रमाणें प्रवाही-रूपानें सर्व नगरास वेढून राहिली आहे असें दिसे. असो. होतां होतां नगरापासून दूर अनेकविध वाद्यांचा ध्वनि ऐकूं येऊं लागला, त्याबरोबर नगरीच्या परिधीवर असणाऱ्या लोकांचें कौतुक अतोनात वाढून ते त्या ध्वनी-च्या दिशेकडे एखाद्या प्रचंड जलप्रवाहाप्रमाणें जाऊं लागले. ज्याला त्याला उत्सुकता ही कीं, तो समारंभ आपल्या आधीं दृष्टीस पडावा. क्षणोक्षणीं वाद्यध्वनि अधिकाधिक मोठ्यानें ऐकूं येऊं लागला, तों तों जणूं काय प्रेक्षकांचे हृदयांतही कौतुक वाढत जाऊन आनंदोद्गार बाहेर पडूं लागले. वाद्यध्वनि अगदीं जवळ ऐकूं येऊं लागला. सरते शेवटीं मगध देशाचा एका मोठ्या गजावर असलेला विजयध्वज लोकांच्या दृष्टीस पडूं लागला. पाठीमागून अनेक तऱ्हेचीं वाद्यें, कांहीं हत्तीं-वर, कांहीं उंटांवर, कांहीं घोड्यांवर व कि-त्येक पादातींच्या हातीं असून त्या सर्वांचा एकसमयावच्छेदानें घोष होत आहे, असें दि-सलें. नुसतीं वाद्येंच याप्रमाणें शेंसव्वाशें प्र-कारचीं असून त्यांचेपलीकडे पादाती म्हणजे पायदळ सैन्य, त्याच्या पाठीमागें अश्वारूढ सैन्य; त्याच्यापलीकडे कांहीं गजारूढ सैन्य असें चाललें होतें. गजारूढ सैन्य संपल्यानंतर एक मोठा थोरला गजपति असून त्याचे पाठी-वर हिऱ्यामाणकांनीं खचित केलेल्या सोन्या-च्या अंबारींत युवराज बसलेला दिसला. त्याचे समोरच एक अवगुंठनवती कन्यका होती. युवराजाच्या अंगावर आपण खालून फेंकलेलीं पुष्पें पडावीं या हेतूनें पुष्पें फेंकणा-ऱ्या प्रेक्षकजनांची पण इतकी धांदल उडाली कीं, आपलीं पुष्पें वर जाणार तरी कशीं, हा विचारसुद्धां त्यांचे मनास त्या वेळीं शिवला नसावा, असें दिसलें. येथून पुढें तो समारंभ इतक्या सावकाशीनें चालला कीं, पाटलि-पुत्राच्या आंत येऊन राजमार्गास लागण्यास त्यास पक्का प्रहर लागला.

---

# प्रकरण ३ रें.

## मुरादेवी.

मागील प्रकरणांत सांगितलेला समारंभ फार मोठ्या थाटानें पाटलिपुत्राच्या जवळ येण्यावरोबर लोकांचे आनंदोद्गार इतके मोठमोठ्यानें निघूं लागले कीं, सर्व नगरीभर एकच आनंदघोष दुमदुमून राहिला. राजाविषयीं प्रजेचें मन त्याच्या कित्येक कृत्यांमुळें कितीही कलुषित झालें असलें, तरी मोठमोठाले उत्सवप्रसंग आले असतां जनता राजाविषयीं आपले दुराग्रह अजीबात विसरून जाऊन त्या उत्सवानंदांत तल्लीन होऊन जाते. मनुष्यमात्र उत्सवप्रिय असतो, त्यांत प्रस्तुतच्यासारखा महोत्सव असला म्हणजे तर विचारूंच नये. धनानंदाच्या सेनापतीनें पादाक्रांत केलेल्या अशा एका दूरस्थ राजाच्या रूपगुणसंपन्न कन्येशीं विवाह करून त्या आपल्या वधूस बरोबर घेऊन नगरप्रवेश करणाऱ्या आपल्या युवराजाच्या स्वागतार्थ्यर्थ होणाऱ्या महोत्सवापेक्षां साधारण जनतेस आनंद देणारा असा दुसरा महोत्सव कोणता असणार? राजाविषयींचा आपला दुराग्रह तर काय, परंतु व्यक्तिमात्र आपल्या शत्रूबद्दलचा दुराग्रहसुद्धां त्या वेळीं अगदीं विसरून गेला असावा, असें स्पष्ट दिसत होतें. व्यक्तिमात्राचे नेत्र आणि कर्ण केवळ युवराजाच्या स्वागतसमारंभाकडे लागून राहिले होते. रस्त्यांतून गर्दी इतकी झाली होती कीं, आणखी एखादें माणूस तर काय, परंतु मुंगीसुद्धां त्यांत शिरूं शकेल किंवा नाहीं, याबद्दल मोठीच शंका वाटण्याजोगी स्थिति झाली होती. त्या राज्यांत—निदान त्या नगरींत—तरी त्या वेळीं असा एकही माणूस नसेल कीं, ज्यास त्या सर्व महोत्सवानें आनंद झाला नाहीं. ज्या ज्या रस्त्यानें तो युवराजसमारंभानें जावयाचा होता, त्या त्या रस्त्यांवर दुतर्फा प्रेक्षकांची अतोनात गर्दी तर झाली होतीच, परंतु गर्दीमध्यें न येतां आपआपल्या सौधांवरून व गवाक्षांतून पाटलिपुत्रांतले सर्व सुंदर नेत्र व सुंदर हस्तांजली युवराजाच्या अंगावर कटाक्षांची व पुष्पांची वृष्टि करण्यांत अत्यंत उत्सुक होऊन राहिले होते. मधून मधून त्या हातांतील एखादुसरें पुष्प खालीं जमलेल्या लोकांपैकीं कोणाच्या अंगावर पडल्यावरोबर तो अत्यंत हर्षित होऊन वर पाहत असे व त्याचे जवळ असणारे त्याचे मित्र विनोदानें त्यास युवराज पदवी देऊन धन्य धन्य म्हणत आणि ज्या सुंदरीच्या अंजलींतून तें पुष्प पडलें असेल तिच्याकडे पहात. अर्थातच ती लज्जित होऊन लगबगीनें मागें सरे. असे कित्येक मौजेचे प्रकार सर्व रस्त्यांतून चाललेच होते. एकंदरींत कोठेंही दृष्टि गेली तरी एका हर्षाखेरीज दुसरा कोणताही मनो-

विकार त्या प्रसंगीं पाटलिपुत्रांत जागृत नव्हता, असेंच पाहणारास स्पष्ट दिसून आलें असतें.

समारंभ पाटलिपुत्राच्या सीमेवर आला. तेथें येतांच सर्व वाद्यांचा विशेषच घोष सुरू झाला. अमुक एक प्रकारचें वाद्य म्हणजे त्या वेळीं वाजून त्या सर्व आनंदघोषास मदत करीत नव्हतें असें नाहीं. यशोदुंदुभि व भेरी यांनीं तर त्या समारंभाचा मुखभाग दुमदुमून टाकिला होता. कोणाचाही शब्द दुसऱ्या कोणास ऐकूं जाणेंच अशक्य झालें होतें. सीमेवर येण्याबरोबर युवराजानें व नववधूनें नगरप्रवेश करण्यापूर्वी वाद्यांचा जो जयघोष झाला, त्या घोषांतच खलदृष्टीपासून वधूवरांचें रक्षण होण्यासाठीं कित्येक महिषादि पशु बळी दिले गेले, व त्यांच्या रक्तप्रवाहाचे लोट नगरद्वाराजवळ वाहत आले. नगरप्रवेश झाल्यानंतर तो समारंभ राजमार्गावरून एकसारखा परंतु अतिशय सावकाश असा राजगृहाकडे जाऊं लागला. तेव्हां दोनही बाजूंच्या सौधांवरून सुंदर नेत्रकटाक्षांची व पुष्पांची आणि लाजांची त्या नववधूवरांवर एकसारखी वृष्टि चालली होती. त्याचप्रमाणें यांतील कित्येक पुष्पें पुष्पांजली टाकणाऱ्या युवतिजनांच्या आनंदाश्रूंनीं भिजलेलीं अशींही त्यांचे अंगावर पडत होतीं, यांत संशय नाहीं. पुष्पांजलीबरोबर कित्येक तरुणींच्या मुखांतून धन्योद्गार व प्रौढांच्या मुखांतून आशीर्वचनें निघून तींही त्या वधूवरांच्या कानीं पडत असत. अशा मोठ्या थाटानें समारंभ राजद्वारापर्यंत येऊन ठेपला. तेथें तर आनंदप्रदर्शनाचे जितके म्हणून कांहीं मार्ग, तितके सर्व जणूं काय एकत्र होऊन राजपुत्राचें अभिनंदन सुरू झालें.

हा सर्व आनंदोत्सव चालला होता खरा, आणि वर सांगितल्याप्रमाणें लहानापासून थोरांपर्यंत सर्व मंडळी अनन्यचित्तानें राजपुत्राचें स्वागत करीत होती हेंही पण खरें; परंतु प्रत्येक नियमाला अपवाद असतो, त्याप्रमाणें याही नियमास एक अपवाद होता. राजमंदिरांतील एक व्यक्ति मात्र आनंदाश्रूंच्या ऐवजीं त्या समयीं दुःखाश्रू गाळीत होती. न जाणों, क्वचित् असेंही म्हणण्यास हरकत नाहीं कीं, त्या दुःखाश्रूंत थोडाबहुत क्रोधाचाही अंश होता. अंतःपुरांतील लहानमोठ्या सर्व व्यक्ति उत्सव करण्यासाठीं अंतःपुराच्या सौधावर येऊन उभ्या राहून तेथून सर्व समारंभ पाहून आनंद करीत होत्या. ती एक व्यक्ति मात्र अंतःपुरांतील आपल्या महालांत एकीकडे बसून स्फुंदस्फुंदून शोक करीत होती. तिचें समाधान करण्यास तिचेजवळ एक प्रौढ वयाची दासी मात्र होती. ती तिचें समाधान करण्याचा प्रयत्न करीत होती व हिचा शोक एकसारखा चाललाच होता. हा शोक काय म्हणून चालला होता ? सगळ्या पुष्पपुरींतील मनुष्यमात्र युवराजाच्या विवाहाबद्दल आनंदोत्सव करीत असतां, एवढीच एक स्त्री इतका विलक्षण शोक कां करीत होती, अशी जिज्ञासा आपणास होणें साहजिकच आहे. सगळा गांव एकीकडे आणि एक व्यक्ति मात्र एकीकडे, अशी स्थिति होण्यास खरोखर तसेंच कांहीं तरी जबरदस्त कारण असलें पाहिजे हें उघडच आहे. त्या सुंदर स्त्रीचे या वेळचे शोकोद्गार व तिचें समाधान करणाऱ्या त्या दुसऱ्या स्त्रीचें भाषण हीं ऐकिलीं असतां आपणास तें कारण सहज समजून येणार आहे. शोक करणारी सुंदर स्त्री सुमारें तीसपस्तीस वर्षांची असावी. ती अत्यंत लावण्यवती होती हें तर स्पष्ट दिसत होतें. सर्वांनीं महोत्सवप्रसंगाला उचित अशीं वस्त्रें परिधान केलेलीं होतीं, परंतु ही श्वेतवस्त्रें नेसलेली असून केवळ एकवस्त्रीच होती. तिचे केश अगदीं मुक्त झालेले असून कांहीं तिच्या

कपोलप्रदेशावर, कांहीं नेत्रांवर व कांहीं स्कंधांवर आणि बाकीचे सर्व पाठीवर, असे अस्ताव्यस्त स्थितींत पडलेले होते. शोकाकुलतेच्या भरांत अनेकवेळां भूमीवर मस्तक ताडन केल्याकारणानें कपालप्रदेश धूलिकेनें लिप्त झालेला दिसला, ती दुसरी स्त्री तीस कांहीं समाधानपर शब्द बोलण्याबरोबर ती सुंदरी तिला म्हणते, "वृंदमाले, तूं करतेस तें समाधान ठीक आहे; पण जो महोत्सव माझ्या पुत्राकरितां व्हावयाचा तो दुसरीच्या पुत्राकरितां झालेला पाहून माझ्या अंतःकरणाची काय स्थिति होत असेल याची कल्पना तुला काय येणार? मी राजकन्या असून दासीच्याही दासीप्रमाणें माझी या अंतःपुरांत स्थिति करून टाकिली. किरात राजाची कन्या मी, माझ्या बापावर स्वारी करून सेनापतीनें माझें हरण केलें, आणि मला राजास अर्पण केलें. राजानें माझ्याशीं गांधर्व विवाह केला, माझ्या पोटीं पुत्रसंतान झालें. इतका सर्व प्रकार झाल्यावर केवळ असूयेनें इतर राजपत्न्यांनीं माझ्यावर कुभांड रचून मला वृषली ठरविलें. आणि माझ्या मुलाला युवराज पदवी मिळण्यासाठीं मी प्रयत्न करीन म्हणून त्याच्या जन्माविषयींच भलभलत्या शंका घेऊन त्याचा घात करविला. या गोष्टी आज इतक्या वर्षांत मीं विसरलें नाहीं. आपला वैराग्नि तसाच जागृत ठेविला, तो आज या घटकेला भडकून बाहेर पडल्याखेरीज कसा राहील? मला वृषली ठरविणारांनीं आपल्या पुत्राला युवराज पदवी देऊन आज महोत्सव करावा आणि मीं मात्र या ठिकाणीं धुळींत अशीच लोळत पडावें, याखेरीज मला दुसरें काय करणें शक्य आहे? मौर्यवंशांतील किरात राजा माझा बाप, तिकडून यवनांनीं आणि इकडून हिरण्यगुप्तानें छळल्याकारणानें सेनापतीस शरण आला, त्याचा फायदा घेऊन माझें हरण करून शेवटीं मला वृषली आणि माझ्या पोराला वृषलीपुत्र असें नांव दिलें; इतकेंच नाहीं तर त्याच्या जन्मासंबंधानें वृथा शंका घेऊन माझ्या नांवाला व कुळाला कलंक लाविला. त्या अर्भकाची व माझी ताटातूट करून त्याचा घात केला. या सगळ्या गोष्टी, बाई वृंदमाले, माझ्या चित्तांतून कधींतरी नाहींशा होतील काय? माझें काळीजच तोडून काढून जाळून टाकून त्याची राखरांगोळी केली, तर मात्र त्याचा विसर पडला तर सांगवत नाहीं. बाकी तसा विसर कधीं पडणार नाहीं!"

अशा तऱ्हेनें बोलल्यावर ती स्त्री अधिक अधिकच शोक करूं लागली, व क्रोधानें राजास व युवराजास शिव्या देऊं लागली. तेव्हां ती दुसरी स्त्री तिचें समाधान करून तीस म्हणते, "देवी, तूं म्हणतेस ती सर्व गोष्ट खरी. परंतु थोडा विचार कर. आज जर राजाच्या कानावर हा तुझा सर्व प्रकार कोणीं घातला तर काय प्रसंग ओढवेल? तुझ्यावर केवढा कहर गुदरेल? कांहीं विचार कर. राजानें मनांत आणलें तर तुला एकदम पूर्वींप्रमाणें बंदिखान्यांत टाकून तुझा अनन्वित छळ होईल. सध्यांच्या महोत्सवप्रसंगीं जर तूं आपल्या मनाला आळा घातला नाहींस, आणि राजाच्या कानावर हा प्रकार गेला, तर खरोखर राजा तुला क्षणमात्र क्षमा करणार नाहीं. राजांची कृपा आणि अवकृपा हीं अगदीं यःकिंश्चित् कारणावर अवलंबून असतात. कृपा होण्याला जसें कांहींही कारण पुरतें, तशीच अवकृपा होण्यालाही यःकिंश्चित् कारण पुरत असतें त्यांत आणखी तुझ्या वाईटावर किती तरी मंडळी आहेत! या घटकेला तुझ्याबद्दल चुगल्या चालल्या असतील. या घटकेला राजाची तुझ्यावर इतराजी व्हावी म्हणून तूं

महोत्सवास नाहींस, एकीकडे बसून या मंगल कालीं अमंगल असें रोदन करिते आहेस असें त्याच्या कानांत सांगून तुझ्यावर कांहीं तरी दुर्धर प्रसंग आणण्याचा प्रयत्न चालला असेल; तर तूं असें करूं नको. जी गोष्ट होऊन गेली, तिच्याबद्दल वृथा शोक करण्यांत काय अर्थ आहे ? त्यापासून हित तर कांहींही न होतां विनाकारण तुझ्यावर कांहीं तरी भयंकर संकट मात्र येईल. ऐक. तूं असें करूं नको, माझ्याबरोबर चल. इतर सर्वजणी बसल्या आहेत तेथें जाऊन बस. या शुभकालीं आपण एकटया मात्र विनाकारण सर्वांच्या आनंदांत माती कालवितों, असा विनाकारण आपल्यावर आरोप ओढून घेऊं नको. ''

परंतु वृंदमालेचें तें भाषण मुरादेवीस मुळींच मानवलें नाहीं, ती उलट संतापून वृंदमालेस म्हणते, '' तूं काय म्हणतेस ? माझ्यावर आतां दुर्धर प्रसंग तो काय येणार ? अगदीं सगळ्यांत दुर्धर मरणाचा प्रसंग तो जरी आला, तरी मी भीत नाहीं. मागला प्रसंग येऊन माझ्या मुलाचा घात झाल्या दिवसापासून आजमितीपर्यंत असा दिवस गेला नाहीं कीं, ज्या दिवशीं तो प्रसंग आठवून माझें अंतःकरण करपून गेलें नाहीं. आणि आतां, त्याहून आणखी दुर्धर प्रसंग तो काय येणार ? तो आला तरी मी बरा म्हणतें, म्हणजे एकदां मी पूर्णपणें सुटून जाईन. पुनः पुनः तेंच तेंच माझ्या मनाला खायला नको, आणि तीनतीनदां मला तो बाऊ वाटायला नको. एकदांच काय व्हायचें तें होऊन जाऊं दे. त्यांना म्हणावें, माझा वध करा. मला सुळीं द्या. जा, दुसऱ्या कोणी राजाला ही माझी अवस्था सांगितली नसली, तर तूं जाऊन सांग, जा. मला त्याच्याबद्दल कांहीं सुद्धां वाटणार नाहीं. मी मरणाला हांकाच मारीत आहें; पण मेलें तें कधीं कुठें येतच नाहीं. मला भिऊन दूर दूर पळतें. ''

वृंदमाला हें ऐकून अगदीं गोंधळून गेली. काय बोलावें हें तिला समजेना. मुरादेवीचें शिव्याशाप देणें, रागावणें आणि संतापणें एकसारखें चालूच होतें. आपल्या पोराचा आपल्या शत्रूंनीं घात केला, तसा जर केला नसता, तर आजमितीला तो इतक्या वर्षांचा झाला असता. आपल्यावर विनाकारण आरोप आणला नसता, तर आजमितीला आपण पट्टराणी झालें असतों व आपलाच मुलगा युवराज झाला असता. तें सर्व जाऊन आपण आज काय स्थितींत पडलों आहोंत, इत्यादि अनेक विचार तिच्या मनांत येऊन त्यासंबंधाचे उद्गारही तिच्या तोंडून एकसारखे निघत होते. अशा स्थितींत तिच्या मनाचें समाधान कोण काय करणार ? तिला मुकाट्यानें शोक करीत बसूं देणें हेंच मोठें थोरलें समाधान होय. असाच शेवटीं विचार करून वृंदमाला आपल्या स्वामिनीपुढें स्वस्थ बसली.

शोक करतां करतां मुरादेवी वृंदमालेकडे वळून एकदम म्हणते, '' वृंदमाले, झाली गोष्ट ती झाली. मी आतांपर्यंत स्वस्थ बसलें यासारखा मूर्खपणा कोणताच नाहीं. पण यापुढें मी स्वस्थ बसायचीं नाहीं. ज्याला आज एवढ्या महोत्सवानें युवराज पदवी देताहेत, त्याला या पाटलिपुत्राच्या राज्याचा उपभोग कधींही घेऊं देणार नाहीं, ही गोष्ट ठरली. मी जर खरी राजपुत्री असेन, तर आजपासून पुढें आकाशपाताळ एक करून हजारों विघ्नें आणीन; आणि वेळ पडली तर या राजपुत्राचा घात देखील केल्याखेरीज राहणार नाहीं. मी मूर्ख कीं आजपर्यंत स्वस्थ बसलें. मी राजाची मर्जी पुनः आपल्यावर ओढून घेईन. राजानें पहिल्याप्रथम मला वरलें

त्या वेळीं मी अगदीं अनभिज्ञ अशी मुग्धा होतें. त्या वेळीं कृत्रिमता म्हणजे काय हें मला मुळींच ठाऊक नव्हतें; परंतु आतां मी तशी नाहीं. मी आतां नखशिखांत कृत्रिममय झालें म्हणून समज. इतकीं वर्षे स्वस्थ बसलें त्याबद्दल मला पुरा पश्चात्ताप झाला आहे. झाली ती गोष्ट झाली. किरात राजाची कन्या मी मुरा, ही जर पुनः आर्यपुत्राची पूर्ण कृपा संपादन करून त्याच्या चित्ताची स्वामिनी झालें नाहीं, आणि तीही एका चातुर्मास्याच्या आंत, तर तुला बरोबर घेऊन हिमाचलाच्या अरण्यांत तुझ्या समक्ष अग्निकाष्ठ भक्षण करून प्राण देईन. त्याबद्दल मुळींसुद्धां तुला शंका नको. पण असा प्रसंग येणार नाहीं. मी आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें अक्षरशः सर्व गोष्टी खऱ्या करीन. आर्यपुत्राची प्रीति पुनः संपादन करीन, मी म्हणेन तें तें त्याच्याकडून करवीन, यांत मला तर तिळमात्र शंका नाहीं. राजमहिषींपैकीं एकीच्याही पुत्रास मगध देशाचें राज्य मिळूं देणार नाहीं, किरात वंशांतील धनुर्धराला येथें आणून महाराजांकडून त्याला गादी देववीन. त्यांनीं आपल्या पाठीमागें खुषीनें त्यास मगधराज केलें नाहीं, तर त्याच्या हातून त्यांनाही सिंहासनावरून दूर करून त्या गादीवर त्याला बसवीन. माझ्या अंगांत आज कोणीं तरी दुसऱ्यानें संचार केला आहे, असें समज. मी पूर्वीची मुरा नाहीं. माझ्या ठिकाणीं वृषलीत्व स्थापून माझा छळ करून माझ्या पोराचा घात करून, मला आज इतकीं वर्षे छळणाऱ्या सर्व राजमहिषींना मी वृषली बनवीन. त्यांना दासींपेक्षांही दासी करीन, यापेक्षां आतां जास्त कांहीं मी बोलत नाहीं. चल. तुझ्याबरोबर मी येतें. माझा शोक मी आंवरून टाकितें, क्रोधाला रजा देतें, दुःखानें म्लान झालेलें मुख मंद सुहास्यानें विलसित करितें. आतांपर्यंत रिकाम्या शिव्याशाप देण्यांत गुंतलेली जिव्हा नानाप्रकारचीं अभिनंदनप्रदर्शक नागरिक भाषणें बोलेल असें करितें. अंतरंगांत मात्र क्रोध तसाच जागृत ठेवितें. आणि त्यांत कपटविष जितकें सांठवावयाचें तितकें सांठवून तें बाहेर काढावयाचे वेळीं मात्र मधुर भाषणानें आच्छादित करून टाकीन. आजपर्यंतची निष्कृत्रिम, निष्कपट, मुग्ध, अशी तुझी मुरादेवी मी यापुढें नव्हे. यापुढें अत्यंत कपटपटु, स्वार्थाखेरीज जिची दृष्टि दुसरीकडे कोठेंही नाहीं जिचें प्रत्येक भाषण, प्रत्येक चलन, प्रत्येक वलन, प्रत्येक वीक्षण, केवळ स्वार्थसाधनासाठींच असणार, आपल्या वैऱ्यांचा नाश करण्यासाठीं आर्यपुत्रास फसवून घेऊन आपल्या म्हणण्याप्रमाणें प्रत्येक गोष्ट त्याला करावयाला लावण्यासाठींच असणार, अशी ही मुरादेवी तुला आपली स्वामिनी पतकरत असली तर तूं यापुढें माझ्याजवळ रहा. नाहीं तर इतरांप्रमाणें तूंही माझी वैरीण हो. माझ्या सेवेंत राहिलीस, तर तुला कोण्या वेळीं काय दुष्कृत्य, काय अनन्वित कृत्यें करावें लागेल याचा नेम नाहीं. पहा. विचार कर. ”

हें भाषण बोलत असतांना मुरादेवीच्या चर्येंत खरोखरीच एकदम विलक्षण फरक झाला, तो पाहून वृंदमाला देखील अतिशय चकित होऊन तिच्या तोंडाकडे पाहूं लागली. मंथरेच्या अंगांत कलीचा संचार झाल्याप्रमाणें आपल्या स्वामिनीच्या अंगांतही खरोखरीच तसाच कांहीं तरी संचार झाला आहे असें तिला वाटलें.

# प्रकरण ४ थें.

## बुद्धभिक्षु.

णक्य आपला आश्रम सोडून निघाल्यानंतर कांहीं दिवसांनीं मगध देशांत येऊन पोहों-चला. चाणक्याचा हेतु हा कीं, आपल्या शिष्याकडून जर मगध देश जिंकावयाचा आहे, तर तो सैन्य आणून धनानंदाचा पराभव करून होणें शक्य नाहीं. कारण मगध-देशाचा सेनापति व त्याचें सैन्य हीं फार मोठीं आणि जय्यत. आपल्या शिष्याची सेना, म्हणजे भिल्ल, किरात, गोंड, खोंड वगैरे लोकांची सेना. त्यांजवळ धनुर्बाण, परशु, करवाल वगैरे हत्यारांखेरीज हत्यारें नाहींत, आणि त्यांची संख्या फार कमी. अशा स्थितींत आपण उगीच तें सैन्य घेऊन येऊन मगधावर स्वारी करणें, म्हणजे आपण आपलाच घात करून घेण्यासारखें होणार आहे. तेव्हां आपण प्रथमतः मगध देशांत जाऊन तेथल्या अंतर्व्यवस्थेंत किती भेद करणें शक्य आहे हें पाहिलें पाहिजे. अल्पबलाच्या मनांतून एखादा प्रासाद पाडावयाचा असला, तर त्यावर बाहेरून प्रहार करण्यापूर्वी खालून पाया पोखरून ठेवण्याच्या खटाटोपास लागलें पाहिजे. त्याखेरीज इष्ट हेतु साध्य होत नाहीं. करितां आपण धनानंदाच्या राज्यावर बाहेरून घाला घालण्यापूर्वी आधीं त्याचा पाया पोखरून आंत भेद केला पाहिजे. त्याचे आधारस्तंभ असतील, ते काढून घेतले पाहिजेत. त्याच्यावर ज्यांचा ज्यांचा कांहीं कारणानें क्रोध झाला असेल, त्यांस त्यांस वश करून घेतलें पाहिजे. आणि अशी अंतस्थ पोखरणी झाली, म्हणजे मग बाहेरून घाव पडण्याचा अवकाश, कीं सर्व कांहीं आपल्या इच्छेप्रमाणें ढांसळून त्याचा अगदीं चक्काचूर होईल. तेव्हां आपल्यास जो काय बुद्धिपराक्रम करावयाचा तो आधीं धनानंदाचीं मर्मस्थानें कोणतीं आहेत तीं शोधून काढण्यासाठींच केला पाहिजे. तो साध्य होऊन राजाचीं मर्मस्थानें एकदां हातीं सांपडलीं, म्हणजे मग त्यावर आघात करून धनानंदास जर्जर करण्यास मुळींच कठीण पडणार नाहीं. असा विचार करून चाणक्य पाटलिपुत्रांत जाण्यास निघाला होता. आपण पाटलिपुत्रांत गेलों आणि कांहीं खटाटोपास लागलों, तर आपल्याला कोणी ओळखणार तर नाहीं? अशी एकवार त्यास शंका आली. परंतु आपण राजसभेंत एकवार गेलों. त्यास आज जवळजवळ तीन वर्षे झालीं तेव्हां कोण ओळखणार ! त्यांतून क्वचित् ओळखलें असें वाटलेंच, तर मग पुढें पहातां येईल. जो कार्य करण्याची इच्छा धरतो, त्यानें दूरवर दृष्टि देऊन काय करणें तें करावें हें खरें; परंतु अनेकविध संकटें प्रारंभींच

कल्पून सर्व संकटमय आहे असें चित्र आपल्यापुढें ठेविल्यास कांहींच उपक्रम होणार नाहीं. तेव्हां बुद्धिमानानें साधारण विचार करून कार्यास हात घालावा आणि मग जसजशीं संकटें येतील, तसतसा त्यांचा विचार होतोच आहे. असा विचार करून त्यानें पाटलिपुत्रांत पाय ठेविला.

पाटलिपुत्रांत जाण्याबरोबर प्रथमतः उतरावें कोठें याच्या त्यास मोठा प्रश्न पडला. कोणा तरी ब्राह्मणाच्या घरीं जाऊन उतरावें, तर कोणाचाही परिचय नाहीं. तेव्हां प्रथमतः जेथें स्थान मिळेल तेथें जावें असाच त्यानें विचार करून तो शोणनदाच्या कांठानें चालला असतां समोरून येणाऱ्या एका बुद्धभिक्षूनें त्यास पाहिलें. त्याच्या चर्येवरून भिक्षूनें तत्काळ ताडलें कीं, हा ब्राह्मण या नगरांत अगदीं नवखा आहे आणि कोठें उतरावें या विचारांत आहे. या वेळीं बुद्धभिक्षूंचा प्रसार मगधांत थोडथोडा होऊं लागला असून आपल्या धर्माकडे ब्राह्मण व क्षत्रिय मंडळीस ओढून आणण्याचा त्यांचा खटाटोपही चाललेला होता. परंतु या त्यांच्या प्रयत्नाला विशेषसें उग्र व भयप्रद स्वरूप आलेलें नव्हतें. तें म्हणजे एक मोठें थोरलें अरिष्ट आहे अशी समजूत प्रचलित झाली नव्हती. कट्टे ब्राह्मणधर्मी मात्र त्यांचा मनापासून तिटकारा करीत. तेव्हां बुद्धभिक्षुस पाहण्याबरोबर चाणक्याच्या कपाळाला आंठ्या चढल्या; आणि बुद्धभिक्षु हास्ययुक्त मुद्रा करून, " नमो अरिहंताणम् " असें म्हणून त्याच्याजवळ आला, तेव्हां तर त्याची मुद्रा फारच तिरस्कारयुक्त झाली. तें पाहून बुद्धभिक्षूस विशेषच हंसूं आलें, आणि तो त्यास म्हणतो, "ब्राह्मणश्रेष्ठा, तूं माझा तिरस्कार करतोस हें मी जाणून आहें; परंतु आपला जो तिरस्कार करील त्याच्याच उपयोगीं पडावें अशी भगवान् बुद्धदेवाची आम्हांला आज्ञा आहे. तूं या नगरांत अगदीं नवखा आहेस हें तुझ्या चर्येवरून उघड दिसतें आहे. तेव्हां तूं माझ्याबरोबर येशील, तर माझ्या विहाराजवळच श्रीकैलासनाथाचें मंदिर आहे, तेथें तुझी योग्य व्यवस्था लावून देतों. तुला असें बोलावण्यांत माझ्या मनांत कोणतीही पापबुद्धि नाहीं. "

बुद्धभिक्षु वृद्ध होता आणि त्याचें बोलणें फार प्रेमयुक्त होतें. चाणक्यासही कोठें तरी आपलें मस्तक टेंकण्यास तात्पुरतें स्थान पाहिजे होतें. तेव्हां तितक्या वेळेपुरता आपला बुद्धभिक्षूंबद्दलचा तिरस्कार विसरून जाऊन चाणक्यानें त्या बुद्धभिक्षूचें आमंत्रण स्वीकारण्याचा बेत केला.

बुद्धभिक्षूनें आपल्या विहाराकडे त्यास नेऊन जवळच्या मंदिरांत त्याची सगळी व्यवस्था लावून दिली.

बुद्धभिक्षूचें हें सर्व स्वागत मोठ्या कष्टानें त्यानें स्वीकारलें. त्यास त्याबद्दल पश्चात्ताप होतच होता. परंतु त्याच रात्रीं कांहीं चमत्कार झाला, त्यामुळें तो त्याचा पश्चात्ताप दूर होऊन उलट त्यास आनंद झाला.

आतांच सांगितलें आहे कीं, या काळीं उत्तरहिंदुस्थानांत बौद्ध मताचा प्रसार फार जारीनें होत नव्हता. परंतु त्या धर्ममतांच्या विरुद्ध होईल तितकी खटपट करून त्याचा पाडाव करावा व त्याचा प्रसार होऊं देऊं नये अशाबद्दलचे प्रयत्नही फारसे जारीनें सुरू झालेले दिसत नव्हते. क्वचित् एखादा ब्राह्मण, थोडे क्षत्रिय, तितक्याच मानानें वैश्य आणि त्याहून थोडे अधिक शूद्र त्या धर्ममताकडे वळूं लागण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. बौद्ध भिक्षूंचे स्वधर्मप्रसारार्थ प्रयत्न चालले नव्हते असें नाहीं, त्यांचे प्रयत्न चाललेच होते; परंतु ते अद्यापि ब्राह्मणधर्मी राजांच्या किंवा स्वतः ब्राह्मण आचार्यांच्या व कुलपतींच्या

डोळ्यांवर येण्याजोगे नव्हते. एक वेडगळ धर्म आहे, कांहीं माणसें नादीं लागताहेत, लागेनात असें म्हणून त्यांच्या प्रयत्नाकडे दुर्लक्ष्य होत असे. अगदीं कट्टे ब्राह्मण मात्र त्यांचा पूर्ण तिरस्कार करीत; किंबहुना त्यांचें नांव घेणें सुद्धां त्यांस पापजनक वाटत असे. परंतु त्यामुळें त्यांचें समूळ उच्चाटन करावयास पाहिजे असें वाटण्यापर्यंत मजल आली नव्हती. आपण पाटलिपुत्रांत येण्याबरोबर आपल्याला प्रथमतः बुद्धभिक्षुच भेटावा, आणि त्यानें आपणास आश्रय द्यावा हें चाणक्यमुनीस बरें वाटलें नाहीं, याचें कारण हेंच. परंतु जर आपल्याला गुप्तपणें राहून आपलें काम करून घ्यावयाचें आहे, तर आपण अमक्यापासून मदत घ्यायची नाहीं, आणि अमक्यापासून घ्यायची, असें करून उपयोगी नाहीं. शिवाय आपल्याला तो आपल्या विहारांत या म्हणत नाहीं, श्रीकैलासनाथाच्या मंदिरांत उतरण्याची व्यवस्था करितो आहे, तर नुसतें त्याच्याबरोबर जाऊन त्या मंदिरांत राहण्यास काय हरकत आहे? असा सगळा विचार करूनच चाणक्यानें त्याच्य आमंत्रणाचा स्वीकार केला होता.

श्रीकैलासनाथाचें मंदिर फार विशाळ व रमणीय होतें. त्याच्या सभोंवतालीं मोठें थोरलें उपवन असून त्याला **पुष्पवाटिका** म्हणत असत. या पुष्पवाटिकेंत अनेक ठिकाणीं आणखीही लहान लहान देवालयें होतीं, व त्या प्रत्येक देवालयाच्यापुढें एक एक सुंदर पुष्करिणी असून त्या पुष्करिणीपासून जवळच ब्राह्मणांस आपापलीं आन्हिक पवित्र कर्में करण्याला फार सुंदर अशीं स्थानें बांधून ठेविलेलीं होतीं. हिरण्यवती म्हणून एक लहानशी नदी पुष्पपुरीच्या एका बाजूनें वहात होती, त्या हिरण्यवतीचें पाणी नळ बांधून आणून या पुष्करणींतून घेतलेलें होतें. त्याचप्रमाणें या पुष्पवाटिकेंत एका बाजूस एक कृत्रिम वन तयार करून त्यांत दर्भही लाविलेले होते. सारांश, कर्मनिष्ठ व तपोनिष्ठ ब्राह्मणांस आपलीं पवित्र कर्में शांतपणें व स्वस्थपणें करण्यास जसें स्थळ असावें तसें तें होतें. बुद्धभिक्षूचा निरोप घेऊन श्रीकैलासनाथाच्या मंदिरांत चाणक्य गेला तेव्हां तें मंदिर पहातांक्षणींच त्यास फार आनंद झाला.

त्यानें आपलीं सर्व आन्हिक कर्में केलीं तों बुद्धभिक्षूनें त्यास भोजनाची सामग्री पाठवूं, कीं कांहीं फलमूलादि पाठवूं, असा निरोप पाठविला. आपण याचा हा उपकार किती घ्यावा, याबद्दल पुनः चाणक्यास संकोच झाला व शेवटीं माझें आन्हिक आटोपल्यावर मी आपल्यास येऊन भेटून मग काय तें सांगतों, असा चाणक्यानें उलट निरोप पाठविला. बुद्धभिक्षु मनांत उमजला कीं, ब्राह्मण आपल्यापासून भोजनसामग्री घेण्यास फार संकोच करितो आहे, तथापि येथें आल्यानंतर त्याची समजूत घालूं असें त्यास वाटलें. थोड्या वेळानें चाणक्याचें आन्हिक वगैरे आटपून तो पुढें आतां काय करावें या विचारांत होता, इतक्यांत बुद्धभिक्षूकडून पुनः एक माणूस येऊन त्यानें ब्रह्मर्षींचें आन्हिक आटोपलें असल्यास भिक्षु वाट पहात आहेत, असें सुचविलें. पहिल्या सपाट्यास चाणक्यास हा त्या भिक्षूचा फार मोठा लोचटपणा वाटला, आणि आपण त्यास कांहीं तरी तिरस्काराचें उत्तर द्यावें असेंही वाटलें. परंतु दुसऱ्याच क्षणीं ती मति बदलली. आपण या नगरांत ज्या कार्याकरितां आलों आहों, तें कार्य जर आपणास साधावयाचें आहे, तर कोण्या वेळीं कोणाचा आणि कसा उपयोग होईल, याचा नेम नाहीं. गरजवंतानें अतिशय नीच माणसापासून

तर उच्चतम पदवीच्या माणसापर्यंत सर्वांचा स्नेह संपादावा. गवताच्या काडीपासून सर्व गोष्टींचा यथावकाश संग्रह करावा. अमुक एक तुच्छ व तिरस्करणीय, आणि अमुक मात्र संग्रहणीय, असें म्हणूं नये. सर्व वस्तूंचा व माणसांचा यथावकाश व यथाकाल उपयोग होतो, असा आपल्या मनाशीं नीतिविचार करून त्यानें आपल्या जिव्हेचें नियंत्रण केलें आणि त्या निरोप आणणाऱ्या माणसास म्हटलें "मी आपल्या मागोमाग येतोंच, आपण पुढें चला."

वरील विचार मनांत आल्यानंतर थोड्याच वेळांत चाणक्य त्या भिक्षूकडे गेला.

बुद्धभिक्षु त्याची वाटच पहात होता. चाणक्य येतांक्षणींच त्यानें त्यास उत्थापन देऊन नमस्कारपूर्वक स्वागत केलें, आणि पुनः उपाहाराबद्दल प्रश्न केला. तो प्रश्न ऐकतांच चाणक्यास पुनः किंचित् संकोच वाटून तो त्यास ह्मणतो, "भिक्षो, आपण मला जर धान्यादि पदार्थ कोठें मिळतात तें सांगितलें, किंवा पण्यवीथिका कोणीकडे आहे तें दाखविण्यास माणूस दिला, तर मजजवळ द्रव्य आहे, त्या द्रव्यव्ययानें मी आपली भोजनसामग्री आणून भोजन करीन. आपल्याला त्याबद्दल विनाकारण श्रम नकोत. आपण आतांपर्यंत मला सहाय्य दिलें याबद्दल मला किती तरी ऋण वाटत आहे. आपल्यासारख्यांचें ऋण हें कधीं फिटावयाचें नाहीं असें ऋण. कारण आपल्यास प्रतिसाहाय्य मुळींच कधीं आवश्यक नाहीं. उपकार अशा माणसांकडून करून घ्यावे कीं, वेळीं प्रसंगीं आपणासही त्याजवर प्रत्युपकार करण्याची पाळी यावी. तेव्हां..."

तें त्याचें बोलणें ऐकून भिक्षु किंचित् हंसला व चाणक्यास म्हणतो:—

"ब्राह्मणश्रेष्ठा, तुझें म्हणणें अगदीं खरें आहे; परंतु कोणीही अन्नदान करीत असतां त्याच्याकडे पाठ फिरवूं नये. त्यांतून मी कांहीं तुला शिजलेलें अन्न घे असें म्हणत नाहीं. भगवान् गौतमानें आम्हांस असें उपदेशिलें आहे कीं, अतिथींचें स्वागत हें सर्वांत महत्त्वाचें कर्म होय. आज तूं अगदींच नव्यानें येथें आला आहेस. आतां अपराण्हकाल झाला आहे. तर फलमूलादिकांचा आहार कर! उदईक जशी तुझी इच्छा असेल तसें करण्याला माझ्याकडून मुळींच हरकत नाहीं. माझी विनंति एवढीच कीं, यावत्कालपर्यंत तूं या पाटलिपुत्रांत असशील, तावत्कालपर्यंत तुला जें काय साहाय्य पाहिजे असेल तें देण्याला मी सिद्ध आहें. तें मागण्याला मुळींच संकोच करूं नको. भगवान् बुद्धदेवाचें शिष्यत्व आम्हीं पतकरिल्यानें अधमांत आमची गणना होते काय?"

भिक्षूचें हें भाषण ऐकून चाणक्य अगदीं स्वस्थ बसला. नंतर त्यानें पुढें केलेल्या फलमूलादिकांतून जें काय इष्ट वाटलें ते घेऊन आपल्या पुष्करिणीजवळ जाऊन त्यानें उपाहार केला व पुढें काय करावें यासंबंधाचा विचार करीत स्वारी बसली. इतक्यांत अस्तमानाचा समय झाला. त्या सर्व मंदिरांत व निरनिराळ्या लहान देवालयांत दीप लागले. उपवनांतील वृक्षलतांवर घरटीं करून राहिलेले सर्व पक्षी आपापल्या घरट्यांकडे येऊं लागले. तेव्हां चाणक्य आपले सायंसंध्यादि विधि उरकण्याच्या विचारास लागला. सर्व विधि झाल्यानंतर त्यानें मनांत विचार केला कीं, आपण या पाटलिपुत्रांत आलों, ते कांहीं केवळ ब्रह्मकर्म करून उदरनिर्वाह करण्यास आलों नाहीं. तेव्हां बसून काय उपयोग आहे? धनानंद राजाचीं मर्मस्थानें काय आहेत, आणि त्याच्या घरांत कोठें भेद करण्यास जागा आहे, त्याचप्रमाणें काय केलें असतां आपल्याला लोकांचीं मनें त्याच्या विरुद्ध क-

रतां येतील, याचा आपणास शोध करावयाचा आहे. असें असतां आपण अमक्याचें आतिथ्य कसें घ्यावें, आणि अमुक कसें करावें, असा विचार करीत बसण्यांत काय तात्पर्य आहे ? गुरुपुत्रास मृतसंजीविनीचा लाभ झाला तो शुक्राचार्यांच्या पोटांत शिरल्यानेंच झाला. तेव्हां आपण आतां या मगध देशांतील लोकांत मिळून मिसळून अंतःस्थ गोष्टी काय काय आणि कसकशा आहेत तें काढलें पाहिजे. तसें केलें, तरच आपल्यास सर्व प्रकारची माहिती कळून पुढील व्यूहाची रचना करतां येईल. तर आतां बातमी काढण्यास प्रारंभ करावयाचा, तो आपल्या या बुद्धभिक्षूपासूनच करूं. बुद्धभिक्षूच्या मनातून तरी आपल्या धर्माचा प्रसार राजकुलांतसुद्धां व्हावा असें असेलच. तेव्हां राजकुलांत एकंदर काय व्यवहार चालले आहेत, त्याचें ज्ञान त्यानें करून घेतलेंच असेल. करितां आतां चार दिवस–नव्हे आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें नंदवंशाचीं पाळेंमुळें खणून काढून आपल्या प्रिय शिष्याला जर या मगधाच्या सिंहासनावर बसवावयाचें, तर तें सिद्ध होईपर्यंत–आतां आपलें कर्मकांड अगदीं एका बाजूस ठेवावें. क्षात्रधर्म–आपण आजपर्यंत जरी त्या धर्मास योग्य अशीं कृत्यें केलीं नाहींत, तरी तीं आपल्याला आपल्या शिष्याकडून करवावयाचीं आहेत, तेव्हां आपल्यालाच तो आचरावयाचा आहे. अर्थातच तें कार्य सिद्ध होईपर्यंत आपण आतां ब्राह्मणधर्म थोडा आटोक्यांत आणला पाहिजे. हा कोण बुद्धभिक्षु, याच्याशीं बोलूं नये, व्यवहार करूं नये, असें करून कसें चालणार ? तेव्हां आज आतां, आपण बुद्धभिक्षूकडे जाऊन, गप्पागोष्टी सांगत बसूं, न जाणों त्या गोष्टींत काय निष्पन्न होईल आणि काय नाहीं ! जें निष्पन्न होईल तें आपणास कदाचित् फार उपयोगी पडेल. असा विचार करून स्वारी उठून बुद्धभिक्षूच्या बिऱ्हाडांत आली आणि बुद्धभिक्षूनें स्वागत केल्यानंतर तेथें बसल्यावर त्यानें राजसभेची, अमात्यगणाची वगैरे माहिती विचारण्यास सुरुवात केली. भिक्षूस अर्थातच असें वाटलें कीं, हा ब्राह्मण केवळ राजसभेंत आपला प्रवेश कसा होईल आणि आपली संभवना कोणत्या मार्गानें होईल, या हेतूनें ही विचारणा करीत असावा. यामुळें त्यानेंही त्यास त्या दृष्टीनें सर्व माहिती सांगितली व असेंही सुचविलें कीं, राजसभेंत अमात्यगणांपैकीं कित्येकांजवळ ज्यांचें वजन आहे असे धनाढ्य श्रेष्ठी गुप्तपणें माझे शिष्य बनलेले आहेत, त्यांचेजवळ आपली गोष्ट काढून मी आपला राजसभेंत प्रवेश करून देईन. आपला खरा हेतु कळूं नये अशी इच्छा चाणक्यास असल्यामुळें त्यानेंही भिक्षूस आपण असें केलें, तर माझें कार्य होईल, असें बोलून दाखविलें आणि रात्रीं आपल्या स्थानाकडे जाण्यास तो उठणार, तों बुद्धभिक्षूनें त्यास सहजीं ' इतक्यांत कां उठतां ? बसा, मला आतां कांहीं काम नाहीं; आपली कांहीं अधिक माहिती मला सांगा,' असें म्हटलें. तेव्हां चाणक्य तेथें बसला. भिक्षु कांहीं प्रश्न त्यास विचारणार, तों एक स्त्री बुद्धभिक्षूकडे आली, आणि मोठ्या भक्तीनें नमस्कार करून त्यास म्हणाली, "भगवन् वसुभूति, आज मी आपणास कांहीं विचार विचारण्यास आलें आहें. मला मोठी काळजी पडली आहे. जवळ जवळ एक पक्षभर मीं कसें तरी मनांतल्या मनांत आपलें गुह्य ठेविलें; परंतु आज असें वाटलें कीं, आपल्याजवळ येऊन सर्व सांगावें आणि आपला विचार घ्यावा."

तें ऐकतांच बुद्धभिक्षु वसुभूति तिला म्हणाला, " वत्से वृंदमाले, तूं अशी अगदीं शुष्क कशानें झालीस ? तुला कांहीं चिंता

लागली आहे वाटतें ? मुरादेवी शरीरानें स्वस्थ आहेना ? ”

तो शेवटला प्रश्न ऐकतांच वृंदमाला एकदम म्हणते, “ भगवन्, मुरादेवी शरीरानें अगदीं स्वस्थ आहे, परंतु अंतःकरणानें मात्र फार फार अस्वस्थ आहे. कुमार सुमाल्य याला यौवराज्याभिषेक झाल्या दिवसापासून तिची चित्तवृत्ति ठिकाणावर नाहींशी झाली आहे. ”

वृंदमाला आल्याबरोबर आणि विशेषतः “आज मी आपणास कांहीं विचार विचारण्यास आलें आहें, ” असें तिनें म्हटल्याबरोबर चाणक्यानें, आपण आतां येथून उठून जावें असा विचार केला होता; परंतु मुरादेवीचें नांव ऐकल्याबरोबर राजघराण्यांतील कांहीं तरी गोष्टी निघणार असें वाटून तो तेथेंच जरा थांबला व कुमार सुमाल्यास यौवराज्याभिषेक झाल्यापासून तिची चित्तवृत्ति ठिकाणावर नाहींशी झाली आहे, हें ऐकल्याबरोबर तर त्यानें आपण तेथें बसून काय हकीकत आहे ती ऐकण्याचा निश्चय केला, आणि वृंदमालेला आतां वसुभूति काय म्हणतो व वृंदमाला त्याला पुढें काय सांगते, तें ऐकण्याविषयीं त्याचे कर्ण अत्यंत उत्कंठित झाले. चाणक्य फार चाणाक्ष होता असें म्हटलें, तर कांहीं तरी विलक्षणच म्हणणें होणार आहे. तसें म्हणणें म्हणजे चाणक्य चाणक्य होता असेंच म्हणणें होय. कारण ‘ चाणाक्ष ’ हा शब्द या महाधूर्त व चतुर ब्राह्मणाच्या नांवावरूनच मराठींत आला आहे. तेव्हां चाणक्याची आणखी वर्णना काय करावी ? वृंदमाला ही मुरादेवीची दासी असावी, आणि कुमार सुमाल्याला यौवराज्याभिषेक झाल्यामुळें मुरादेवीला मत्सर-पिशाचानें पछाडलें असावें असें स्पष्ट दिसलें. जर हें अगदीं खरें असेल तर आपल्यास अत्यंत इष्ट अशी बातमी कळली व त्या बातमीचा उपयोग यथायोग्यपणें केल्यास राजकुलांत भेद करण्याला एक उत्तम मार्ग आपल्यास सांपडला असें त्यास वाटलें. तेव्हां अर्थातच चाणक्याला तेथून हलावेसें वाटेना हें साहजिक होतें.

वसुभूति वृंदमालेस म्हणतो, “ वृंदमाले, तूं हें काय बोलते आहेस? तूं कोठें आहेस, काय बोलते आहेस, याचा विचार कर. वत्से, हीं गृहच्छिद्रें कोणा तिसऱ्याच्या कानीं सुद्धां जाऊं नयेत. त्यांतून तुझ्यासारख्या विश्वासू सेवकानें तर आपलें तोंड किती तरी आंवरून धरलें पाहिजे, मुरादेवीचा स्वतःचा पुत्र आज असता तर, आणखी इतर सपत्नींनीं व मंत्र्यांनीं जर त्याच्याबद्दल देवीवर भलतेंच कुभांड रचलें नसतें, तर आज त्यालाच यौवराज्य मिळून पट्टाभिषेक झाला असता, असें देवीच्या मनांत येऊन तिला अतिशय खेद व उद्वेग वाटणें साहजिक आहे; परंतु त्याबद्दल तुझ्यासारख्या सेवकांनीं कोठें बभ्रा करूं नये. विश्वासू सेवकानें आपले नेत्र, आपलें कान हे जरी उघडे ठेवले, तरी तोंड नेहमीं मिटून धरलेलें असावें; त्यांतून तें उघडावेंसेंच वाटलें, तर स्वामीजवळ उघडून आपल्याला त्याला काय सांगायचें तें सांगावें, इतर कोणाजवळ त्याचा स्फोट करूं नये. ” वसुभूति याप्रमाणें बोलत असतां वृंदमाला शांतपणें ऐकत होती; परंतु त्याचें बोलणें संपतांच ती म्हणाली, “ भगवन्, आपला उपदेश मीं ऐकला व तो मी बद्धांजलि होऊन शिरावर धारणही करतें; पण माझी एक विनंति आहे. आतां आपल्याजवळ मीं ज्या गोष्टीचा उच्चार केला, ती गोष्ट मीं अद्यापपर्यंत कोणाजवळही बोललें नाहीं. परंतु आज माझ्यानें राहवेना. जी देवीची सध्यांची स्थिति आहे, तीच जर आणखी कांहीं दिवस राहिली, तर कांहीं तरी फार मोठा प्रलय होईल, किंवा देवीचा स्वतःचा सर्वस्वी घात होईल, असें मला

आज वाटूं लागलें. आपण माझे गुरु. भगवान् तथागताचा उपदेश मला आपण केला कीं, कोठेंही कोणाचा घातपात होत असला, आणि तो आपल्या हातून निवारण होण्याजोगा असला तर तो अवश्य निवारण करावा. म्हणून मी आपल्याकडे आपला विचार विचारायला आलें. माझी स्वामिनी जर अशाच स्थितींत राहील, तर तिचा स्वतःचा तरी घात होईल, नाहीं तर आणखी कांहीं प्रलय होईल हें मला धडधडीत दिसतें आहे; पण त्याचें निवारण कसें करावें हें मला समजत नाहीं. देवीला मीं पुष्कळ समजुतीच्या सांगितल्या; पण नाहीं, तिची समजूत पडत नाहीं. तेव्हां आतां आपल्याला ही हकीकत सांगून आपला विचार घेण्यासाठीं मी आलें. गृहच्छिद्र कोणाच्याही कानीं जावें या हेतूनें मी आलें नाहीं. दुसऱ्या कोणाकडे बरें जाऊं ? ”

वसुभूतीची इच्छा ही कीं, चाणक्याच्या देखत हिनें अशा गोष्टी बोलूं नयेत. आणि आपली इच्छा तिच्या लक्षांत यावी या हेतूनेंच त्यानें वर दिलेला उपदेश जरा कठोर शब्दांनीं व चाणक्याकडे पहात पहात तिला केला. परंतु चाणक्य आपल्यासारखाच वसुभूतीचा गुप्त शिष्य असेल, अशी तिची समजूत झाली म्हणून म्हणा, किंवा राजमंदिरांतून निघाली तेव्हांपासून तिची जिव्हा तिला अनावार झाली होती म्हणून म्हणा, तिला आत्मसंयमन न होऊन आपल्या पोटांतल्या सर्व गोष्टी चाणक्याच्या देखतच तिनें वसुभूतीच्यापुढें ओकून टाकिल्या. वसुभूतीला त्या ब्राह्मणाला ‘ तुह्मी आतां येथून जा ’ असेंही सांगतां येईना. तो अप्रत्यक्ष रीतीनें तिला सुचवूं लागला, तरी तिच्या लक्षांत येईना. तेव्हां शेवटीं तिचें नियंत्रण करण्याचा प्रयत्न एके बाजूस ठेवून वसुभूति तिला म्हणतो, “ वत्से वृंदमाले, तुझी स्वामिनी, मनाला शांति नाहीं ह्मणून असें करते तर तिला तूं येथें तरी घेऊन ये. नाहीं तर मीं जो तुला भगवान् तथागताचा उपदेश केला, तो तिला करून तिच्या मनाला शांति दे. दुसरें काय सांगूं ? वत्से, तूं आज ही बातमी मला सांगितलीस, यामुळें मला मोठी काळजी उत्पन्न झाली आहे. तथापि मीं आज आतां याचा विचार करीन, आणखी मग तुला काय तो उपाय सांगेन. तूं उद्यां येथें ये. मात्र एक गोष्ट ध्यानांत धर. जें मजजवळ आज येऊन बोललीस, याचा उच्चार दुसऱ्याजवळ तर काय, परंतु आपल्या स्वतःजवळ सुद्धां करूं नकोस. आजपर्यंत तूं मला आपल्या स्वामिनबिद्दल जें जें सांगितलेंस त्यावरून तर मला वाटतें कीं, भगवान् तथागताचें या नगराविषयींचें भविष्य तिच्याच द्वारें खरें होणार. ती मोठी दीर्घद्वेषी दिसते. मला वाटतें तिच्या तान्ह्या मुलास रानांत पाठवून त्याची हत्या करविल्याला जवळ जवळ १६।१७ वर्षें झालीं असतील, नव्हे ? ”

“ हो ! हो ! सोळा वर्षें खचित होऊन गेलीं; परंतु देवीला तें सर्व आज आठवून इतकें दुःख व उद्वेग होतो आहे कीं, जणूं काय कालच तें क्रूर कृत्य झालें ! ”

“ हं ! भगवान् अर्हताची काय मर्जी असेल ती खरी ! तूं आतां जा. उद्यां ये. ” असें म्हणून वसुभूतीनें वृंदमालेला निरोप दिला. आणि एक मोठा थोरला सुस्कारा टाकून तो किती वेळ तरी स्वस्थ बसला. चाणक्याच्या मनांत, आतां जें काय आपण ऐकलें त्यासंबंधानें बुद्धभिक्षूला प्रश्न विचारून आणखी माहिती काढून घ्यावी असें आलें, म्हणून तो तेथून उठेना; परंतु एकदम त्यास प्रश्नही विचारतां येईना. इतक्यांत वसुभूतीनें

पुनः एकदां मोठा सुस्कारा टाकून चाणक्याला उद्देशूनच म्हटलें:-

" ब्राह्मणश्रेष्ठा, तुला कदाचित् खरें वाटणार नाहीं; परंतु आमच्या महापरिनिब्बाणसुतांत भगवान् बोधिसत्त्वानें या पाटलिपुत्राबद्दल भविष्य केलें आहे कीं, या नगरींवर तीन अरिष्टें येणार आहेत-अग्निप्रलय, जलप्रलय व गृहकलह. त्यांपैकीं हा गृहकलहचा प्रारंभ तर नसेल ! राजा आणि मंत्री योग्य विचार करणारे नसेल तर हा असाच प्रकार व्हावयाचा. ही मुरादेवी खरी राजकन्या, किरातराजाची कन्या, परंतु तिला वृषली ठरवून तिच्या पोटीं धनानंदाला झालेल्या पुत्राविषयींही कुत्सित संशय काढून तान्हेपणींच त्याचा हिमाचलाच्या अरण्यांत घात करविला. तो अन्यायानें केलेला घात कदाचित् आतां गृहकलहास कारण होऊन भगवान् बोधिसत्त्वाचें भविष्य खरें करून दाखविणार असेल. "

हें वसुभूतीचें भाषण चाणक्य मोठ्या उत्सुकतेनें ऐकत होता हें सांगावयास नकोच.

# प्रकरण ५ वें.

## चाणक्याचा विचार.

वसुभूति भिक्षु याप्रमाणें बोलत असतां चाणक्याच्या अंतःकरणांत नानाप्रकारचे विचारतरंग उठूं लागले. आपण जें कार्य करण्याचे उद्देशानें आपल्या आश्रमांतून निघून या नगरींत आलों, त्या कार्याला साधक अशी स्थिति राजकुलांत सध्यां आहे, इतकेंच नव्हे, तर जो गृहकलहाग्नि पेटूं घातला आहे, त्यावर यथास्थित आज्याहुति देण्याचेंही आपल्या हातीं आहे, असें चाणक्यास दिसून आल्यानंतर आणखी काय पाहिजे ? आधींच चाणाक्य फार दूरदर्शी व सूक्ष्मदर्शी आणि वसुभूति भिक्षूनें सांगितलेली मुरादेवीच्या पुत्राची कथा इतकी चंद्रगुप्ताच्या कथेशीं जुळली, मग काय विचारतां ? चाणक्याचें अंतरंग आनंदमय होऊन गेलें हें सांगावयास नकोच. तथापि आपल्याला अत्यंत अनुकूल अशी स्थिति एकदम खरी वाटत नाहीं. आपल्या समजांत कांहीं तरी चुकी झाली असेल, तेव्हां काय आहे त्याचा नीट तपास करावा आणि मग त्यांच्याबद्दल आनंद किंवा विषाद काय मानावयाचा तो मानावा. कोणत्याही कार्याच्या सिद्धतेबद्दल आधीं पूर्ण खात्री झाल्याखेरीज ती सिद्धच झाली असें धरून केलेला आनंद पुष्कळ वेळां अत्यंत खेदाला कारण होतो. असा विचार करून चाणक्य वसुभूतीस ह्मणतो—

" भिक्षुश्रेष्ठा, मला आपल्या या नगरीचें

कांहींच माहिती नाहीं. मी आपला हिमाचलांत मरुद्वतीच्या तीरीं चाणक्याश्रमांत होतों. ही नगरी मोठी, हिच्या राजाची दिगंत कीर्ति, तेव्हां जर कांहीं कोठें महाश्रय मिळाला तर पहावा, या हेतूनें येथें आलों; तों राजकुलांतच कलहाग्नि पेटल्याची ही कथा ऐकून मी अगदीं चकित झालों. जेथें गृहकलह उत्पन्न झाला, तेथें फार दिवसपर्यंत लक्ष्मी वास करीत नाहीं. असो. आपल्याला काय ! पण भगवान् वसुभूते, मुरादेवी ही कोण ? आणि तिच्या पुत्राचा घात कोणीं व कसा करविला? मीं विचारतों याबद्दल क्षमा असावी; पण मला जर हें सर्व कळलें, तर मी त्या कलहाच्या शांतीसाठीं कांहीं अनुष्ठान करीन. ”

चाणक्याचें तें भाषण ऐकून वसुभूति भिक्षु हंसला व म्हणतो, “ ब्राह्मणश्रेष्ठा, त्या सर्व गोष्टी तुला काय सांगाव्या ? या पाटलिपुत्राची कीर्ति तुम्हां दूरच्या लोकांना जितकी धवल दिसते, तितकी ती नाहीं. राजा धनानंद अतिशय अविचारी आणि परप्रत्ययनेयबुद्धि आहे. त्याच्या पदरीं अनेक मंत्रि आहेत; परंतु दैवाची गति अशी कांहीं विलक्षण आहे कीं, त्या मंत्र्यांतले जेवढे म्हणून मूर्ख व काख्साधु, तेवढ्यांच्या बुद्धीनें धनानंदाचे सर्व व्यवहार चालतात. मुरादेवी ही एकवार राजाच्या प्रीतींतली होती. तिच्यावांचून राजाला क्षणभरही चैन पडत नसे. अशांतच राजाच्या अवरोधांत इतर राजपत्न्या होत्या. त्यांना तिच्याविषयीं असूया उत्पन्न होऊन त्यांनीं तिचा नाश करण्याचा प्रयत्न सुरू केला. सेनापति भागुरायणानें किरात राजाचा पराजय करून त्याची कन्या धरून आणली व महाराजांस अर्पण केली. तिचें अलौकिक सौंदर्य पाहून महाराजांनीं तिच्याशीं विवाह केला व तिच्या पोटीं गर्भही राहिला. तोंपर्यंत महाराजांच्या इतर पत्न्यांपैकीं एकीलाही पुत्र झाला नव्हता. यामुळें मुरादेवीबद्दलचा त्यांचा मत्सर अधिकच पेटला आणि तिच्याविरुद्ध कारस्थानें सुरू झालीं. तीं शेवटीं इतकीं अतिरेकाला गेलीं कीं, ही किरातराजाची दासीपुत्री असून स्वतःही फारशी शुद्ध वर्तनाची नव्हती, अशी धनानंदाची समजूत केली गेली व त्यानें तिला बंदींत घालून तिच्या पोटीं जें पोर होईल—मुलगा होवो, मुलगी होवो—त्या पोराला ठार मारून टाकावें असा हुकूम केला. राजाज्ञेला विरुद्ध कोण होईल ? लागलीच त्या आज्ञेप्रमाणें सर्व व्यवस्था झाली. मुरादेवीला बंदींत टाकलें आणि ती प्रसूत होतांच तिच्या पोटीं जो पुत्र झाला, त्याचा घात करण्याची आज्ञा झाली, अगदीं तान्हें पोर आणि त्यांत फार सुंदर व तेजस्वी दिसलें. तेव्हां ज्या परिचारिकांवर त्याचा घात करण्याची पाळी आली होती, त्यांना अमात्यानें व अंतःपुरांतील सपत्नींनीं विशेषच उत्तेजन देऊन त्याचा घात करविला. या गोष्टीस आज कितीतरी वर्षें झालीं ! राजाच्या दुसऱ्या एका पत्नीचे पोटीं झालेल्या सुमाल्य नांवाच्या पुत्राला—तो सगळ्यांत वडील म्हणून—थोडेच दिवसांपूर्वी यौवराज्याभिषेक झाला. त्या उत्सवाचे वेळीं ज्या कित्येक बंदिवानांना सोडलें, त्यांत मुरादेवीलाही बंदिवासांतून मुक्त केलें आणि पूर्वीप्रमाणें अंतःपुरांतील इतर स्त्रियांप्रमाणें तिची पुन्हां व्यवस्था व्हावी, अशी आज्ञा झाली. परंतु ह्यापासून मुरादेवीला आनंद न होतां तिची मात्सर्यानें काय अवस्था झाली आहे, हें वृंदमालेनें आतां सांगितलेंच. या मुरादेवीला जर भगवान् तथागताच्या उपदेशामृताचें पान करविण्यास सांपडलें तर तिला मी या संसारापासून मुक्त करून नि-

र्वाणप्राप्तीचा मार्ग दाखवीन म्हणजे तिला या राजकुलांतील लोकांची संगति नकोशी होऊन ती अपापच संन्यासदीक्षा घेईल आणि सर्वसंगपरित्याग करून त्या मार्गाला लागेल. ''

वसुभूति हें बोलत असतां चाणक्य अगदीं शांतपणें ऐकत होता. त्याच्याही मनांत कांहींतरी निराळेच विचार चालले होते. शेवटीं वसुभूतीनें जेव्हां तिनें संन्यासदीक्षा घेऊन बुद्धरक्षिता व्हावें असें सुचविलें, तेव्हां मात्र त्याला फार हंसूं आलें. तथापि तो नुसतें, '' हं ! भगवान् शंकराची इच्छा. त्याच्या मनांत येईल त्याप्रमाणें तो करतो. आपल्या हातीं काय आहे ? '' असें बोलून आपल्या त्या कैलासनाथाच्या मंदिरांत जाऊन निजावें म्हणून उठला. रात्र बरीच होऊन गेली होती म्हणून म्हणा किंवा बुद्धभिक्षूस आपल्या मनाशींच कांहीं विचार करावयाचा होता म्हणून म्हणा, त्यानें चाणक्यास आणखी बसण्याविषयीं आग्रह केला नाहीं.

चाणक्य गेला व आपल्या हरिणाजिनावर पडला, परंतु त्याला कांहीं केल्या झोंप येईना. नानाप्रकारचे विचार त्याच्या मनांत उभे राहिले आणि तो उठून बसला. आतां पहिलें काम म्हणजे वृंदमालेस भेटून तिची यजमानीण मुरादेवी हिची गांठ घेतां येईल अशा तजविजी करणें हें होय. एक वेळ मुरादेवीची व आपली भेट झाली म्हणजे मग आपण तिची महत्वाकांक्षा सपाटून वाढवूं आणि तिला आपल्या स्वाधीन ठेवूं. त्याचप्रमाणें चंद्रगुप्ताची कथा आणि तिच्या मुलाची कथा या दोन्ही अगदीं तंतोतंत जुळत असल्यामुळें तिच्या मनांत चंद्रगुप्तच आपला मुलगा अशी बुद्धि उत्पन्न करण्यासही कांहीं हरकत नाहीं, असें त्याच्या मनास वाटलें. चंद्रगुप्त खरोखरच तिचा मुलगा असला, तर उत्तमच. परंतु जरी यदाकदाचित् नसला, तरी तोच तिचा मुलगा असें तिला भासवून त्याला राज्यावर बसविण्याला मदत करण्याचें तिच्या मनांत भरवून द्यावयाचें. तिला तो आपलाच मुलगा आहे असें एकदां वाटलें म्हणजे मग आणखी काय पाहिजे ? आपल्याला कोणत्याही प्रकारचा विशेष यत्न करण्याची जरूरच रहाणार नाहीं. फक्त कोणत्याही प्रकारचा अविचार तिच्या हातून होऊन सर्व कारस्थान बाहेर फुटणार नाहीं, इतकी काळजी वाहिली म्हणजे झालें. आपण पाटलिपुत्रांत् आलों ते शुभमुहूर्तावर आलों असें त्याला वाटूं लागलें. कारण अद्यापि आठ प्रहर झाले नाहींत तों आपलें इष्ट कार्य साधण्याला उपयोगी असें केवढें थोरलें तरी साधन आपल्या स्वाधीन झालें ! हें सर्व ठीक झालें. मुरादेवीचें व आपलें दर्शन झाल्यानंतर आपण तिच्या मनांत नानाप्रकारच्या गोष्टी भरून देऊं, तिचा पुत्र जिवंत आहे अशाबद्दल तिची वाटेल तशी खात्री करून देऊं, परंतु तिची व आपली एकांतांत भेट कशी व्हावी, हेंच त्यास समजेना. ती भेट होण्याचें पहिलें साधन वृंदमालेचा विश्वास बसवून घेणें हें होय. वृंदमाला वसुभूतीकडे येते तेव्हां तेथें तिच्याजवळ यासंबंधानें बोलण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं; परंतु तिला एकीकडे गांठून तिच्याकडून तिच्या यजमानीणीपर्यंत दाद लावली पाहिजे. असा निश्चय झाल्यानंतर दुसरी विचाराची गोष्ट वसुभूतीला आपली कारस्थानें कळवावयाची, कीं त्याला नकळत वृंदमालेचें चित्त आपल्या स्वाधीन करून घेऊन तिच्याकडून आपलें काम साधावयाचें? वसुभूतीला नकळत हें सर्व साधणें केवळ अशक्य–किंबहुना अनिष्टही आहे. वसुभूतीला आपल्या मंत्रांत घेतला असतां त्याच्या-

पासून आपल्याला फायदाच होणार आहे. कारण वसुभूतीचा प्रवेश बऱ्याच ठिकाणीं असून त्याच्या सांगण्याप्रमाणें कित्येक श्रेष्ठी-ही त्याचे गुप्त शिष्य आहेत. तेव्हां त्याला मुळापासूनच आपला हेतु कळविला असतां तो कदाचित् आपल्यास साहाय्य करील; परंतु हा विचार फार वेळ टिकला नाहीं. आपण या पाटलिपुत्रांत अगदीं नवे. आल्यास अद्यापि पुरे आठ प्रहरही झाले नाहींत, तोंच जर आपण अशा भानगडींत पडण्याबद्दल वसुभूतीजवळ गोष्ट काढली, तर आपल्या-विषयीं विनाकारण त्याच्या मनांत भलताच ग्रह उपस्थित व्हावयाचा. त्यापेक्षां आपण आपल्या कार्यास—वृंदमालेस वळवून, किंवा फसवून अंतःपुरांत प्रवेश करून घेण्याच्या कार्यास—प्रारंभ करावा आणि आतां वसु-भूतीला हा प्रकार कळल्याखेरीज रहातच नाहीं असें दिसून आलें, तर आपणच त्याला सर्व गोष्टी सांगून त्याचें सहाय्य मागावें, असा त्यानें निश्चय केला. इतका त्याचा विचार होतो, तों उषःकाल झाला. त्या रा-त्रींत त्या ब्राह्मणास एक निमिषभरही निद्रा लागली नाहीं.

उषःकाल झाला. पूर्वेच्या आकाशाकडे त्यानें दृष्टि फेंकली, तों अरुणतेजानें ती दिशा अगदीं आरक्त झालेली दिसली. हा आ-जच्या दिवसाचाच नव्हे, तर आपल्या प्रति-ज्ञात कार्याच्या सिद्धीचाच उषःकाल होय असें त्यास वाटलें, आणि "निद्रे, जशी तूं आज आली नाहींस अशीच या धनानंदाचें व त्याच्या आठ पुत्रांचें पूर्ण तत्सत् होऊन माझा चंद्रगुप्त या पाटलिपुत्राच्या सिंहासना-वर अभिषिक्त होईपर्यंत तूं माझ्याकडे ढुंकून नाहीं पाहिलेंस तरी चालेल. तूं सुखकालीं हवीस. कार्यकालीं तुझी संगति नसली तरच बरें." असें आपल्याशींच म्हणून तो आपले प्रातर्विधि करण्यास उठला.

त्या दिवशीं त्यानें आपलीं कर्में यथा-स्थितपणें नित्याप्रमाणें केलीं खरीं, परंतु एकाही कर्मांत त्याचें चित्त नव्हतें. त्याचें चित्त वृंदमाला, मुरादेवी आणि चंद्रगुप्त यांच्याकडे लागलें होतें. वृंदमालेला अनु-कूल करून घेऊन राजाच्या अंतःपुरांत शिरावें कसें, आणि मुरादेवीला भेटून तिचा व चंद्र-गुप्ताचा संबंध मातापुत्रांचा आहे अशाबद्दल तिची खात्री कशी करावी, या विचारांत अगदीं गढून गेलें होतें. असें करितां करितां माध्यान्हीनंतर त्याचें सर्व पवित्र कर्म उर-कलें, आणि तो भोजनाच्या नादीं लागला. आदल्या दिवसाप्रमाणें वसुभूतीनें आपल्या-कडून शिधासामग्रीही पाठविली. त्या दि-वशीं कांहीं आदले दिवसाप्रमाणें त्यानें शिधा-सामग्रीचा अनादर केला नाहीं. त्यानें आ-पल्याबरोबर एक शिष्य आणावयास पाहिजे होता, तो आणला नाहीं यामुळें आपली अडचण फार होते असें त्यास दिसलें. तथापि शिष्यांना काय तोटा? थोडीशी व्यवस्था लागतांच कांहींतरी शास्त्र पढवि-ण्याचें मिष केलें असतां शिष्यच शिष्य येऊन उभे राहतील, असें मनांत योजून त्यानें आपलें अन्न तयार करण्यास चुल्लिकापूजन केलें. पाकसिद्धि झाल्यावर यथाविधि त्याचें सेवन केलें, आणि पुन्हां त्यानें वसुभूतीच्या विहाराची वाट धरली. वसुभूतिही आपलीं धर्म-कर्में उरकून कांहीं पत्रलेखनांत गुंतला होता. चाणक्य तेथें जाऊन त्याच्या शेजारीं बसला तों वसुभूतीचें पत्रलेखन झालें व त्यानें आ-पल्या एका सिद्धार्थक नांवाच्या शिष्यास बोलाविलें आणि हें पत्र गुप्तपणें नेऊन वृंद-मालेला दे म्हणून त्यास सांगितलें.

तोच क्षण. चाणक्याच्या मनांत त्याच

क्षणीं एक कल्पना आली, आणि ती लागलीच कृतिरूपांत आणावयाची असा निश्चय करून त्यानें वसुभूतीस म्हटलें, " भिक्षुश्रेष्ठ, येथें या नगरांत मी अगदीं नवा. अद्यापि नगरी पाहिलीही नाहीं, तेव्हां आपली आज्ञा असल्यास मीही या सिद्धार्थकाबरोबर जातों. जातां जातां सहज नगरीची शोभा मला पहायला सांपडेल. "

वसुभूतीनें क्षणमात्र विचार केला, आणि म्हटलें, " जा. जाण्याला कांहीं हरकत नाहीं. परंतु त्याला कांहीं गुप्त कार्यासाठीं पाठवतों आहें, तेव्हां तूं बरोबर असल्यानें.........."

" माझ्या बरोबर असण्यानें कांहीं कार्यघात होत असला तर माझा मुळींच आग्रह नाहीं; परंतु गोपनस्फोट होईल, हा संशय मात्र कालत्रयींही धरूं नये. ज्यांनीं मी या नगरींत प्रवेश केल्या वेळेपासून इतक्या आदरानें व प्रेमानें माझें आतिथ्य केलें, त्यांच्या कार्याचा स्फोट माझ्या हातून होईल हें कोणी मनांत सुद्धां आणूं नये. माझ्या हातून होईल तर मी महाय्यच करून आपलें ऋण फेडीन. "

चाणक्यानें हें भाषण इतक्या आतुरतेनें केलें कीं, तें ऐकण्याबरोबर वसुभूतीच्या मनांत संशयाचें किल्मिषही राहिलें नाहीं. त्यानें लागलीच, "तसें कांहीं नाहीं. सिद्धार्थक, यांनाही आपल्याबरोबर घेऊन जा. मात्र वृंदमालेला पत्र देशील, तें अगदीं गुप्तपणें दे." असें सिद्धार्थकास सांगितलें. चाणक्यास संतोष झाला आणि तो सिद्धार्थकाबरोबर जाण्यास निघाला.

सिद्धार्थक हा अगदीं तरुण कायस्थ होता. त्यास कांहीं कारणावरून राजदंड होऊन तो विमार्गास लागला असतां वसुभूतीनें त्याला उपदेश करून आपला शिष्य केलें होतें. आणि तोही वसुभूतीच्या ठिकाणीं अत्यंत भक्ति धरून त्याची सेवा करीत असे. चाणक्यानें सिद्धार्थकास पाहिल्यावेळेपासून असा निश्चय केला कीं, या मूर्तीचा आपल्यास आपल्या प्रतिज्ञात कार्यांत फार उपयोग होईल. तेव्हां याला आपल्याकडे वळवून घेण्यास त्याच्याशीं मित्रता करण्याचा प्रयत्न करून त्यांत यश मिळविलें पाहिजे. म्हणजे फार चांगलें होईल. असा निश्चय करूनच चाणक्य सिद्धार्थकाबरोबर निघाला.

सिद्धार्थकाजवळ वृंदमालेला देण्यासाठीं एक पत्र होतें. त्या पत्रांत काय मजकूर असेल याची कल्पना चाणक्यानें सहज केली. कारण आदले दिवशीं वसुभूति व वृंदमाला यांचें भाषण चाललें असतां चाणक्य त्याच्याजवळ होताच. सिद्धार्थकानें चाणक्यास वाटेनें जातांना लागणाऱ्या नाना स्थळांचीं, मंदिरांचीं व प्रासादांचीं नांवें सांगितलीं. निरनिराळे धनाढ्य श्रेष्ठी, व्यापारी वगैरे लोकांच्या वीथिकेंत जाण्याबरोबर त्या त्या लोकांपैकीं मोठमोठाले श्रेष्ठी होते, त्यांचीं नांवें सांगितलीं. त्याचप्रमाणें निरनिराळीं उद्यानें, वाटिका व प्रेक्षणीय स्थानें जीं जीं त्यांच्या मार्गांत दिसलीं, त्यांचींही नांवें सांगून त्यांचें त्यांचें थोडेंबहुत वर्णन केलें. शेवटीं ते एका जलमंदिराजवळ आले. तेव्हां त्याचें वर्णन करितां करितां धनानंद राजाचें नांव निघालें, त्याबरोबर सिद्धार्थकानें राजाची निंदा करण्यास आरंभ केला. " धनानंदासारखा अन्यायी राजा कोणी नाहीं. त्याच्यासारखा छांदिष्ट व हट्टाग्रही कोणी नाहीं. त्याला सत्याची चाड नाहीं. त्यानें मला माझा कांहींही अपराध नसतांना, केवळ दुष्ट बुद्धीनें राजदंड करविला. या पाटलिपुत्रांत एकाही मनुष्याच्या तोंडून त्याची स्तुति ऐकूं यायची नाहीं." अशा प्रकारचे प्रलाप

त्याच्या तोंडून निघत होते. चाणक्यास तें ऐकून प्रथम थोडेंसें आश्चर्य वाटलें; परंतु सिद्धार्थकाला राजदंड झाल्यामुळें हा राजावर गालिवृष्टि करीत आहे असें दिसतांच त्याचें तें आश्चर्य मावळलें; तथापि आपण त्याला प्रश्न विचारून त्याची स्वतःची हकीकत काय आहे आणि त्याला किती दिवस कारागृहांत काढावे लागले तें विचारावें असें चाणक्याच्या मनांत आलें. आणि त्याप्रमाणें त्यानें सिद्धार्थकास प्रश्न विचारण्याचा उपक्रम केला.

सिद्धार्थकानें त्यास आपली हकीकत सांगितलीही. अर्थातच आपला कोणत्याही प्रकारचा दोष नसून केवळ मत्सरानें आपणास राजानें दंड केला असेंच त्यानें प्रतिपादिलें आणि धनानंदास त्यानें यथास्थित गालिप्रदान केलें. तेव्हां चाणक्य हंसत हंसत त्यास म्हणतो, " सिद्धार्थका, तुझा राजावर फारच रोष दिसतो. मला वाटतें राजाचें कांहीं अहित करण्याचें जर तुझ्या हातांत असलें, तर तूं क्षणभरसुद्धां मागेंपुढें न पाहतां तें करून टाकशील. "

सिद्धार्थक त्यास तात्काळ उत्तर करतो, " अवश्य अवश्य करीन. कधी सुद्धां चुकणार नाहीं. धनानंद किती मूर्ख, किती दुष्ट व अंध आहे, याची तुह्माला कल्पना सुद्धां—होणार नाही; परंतु अमात्य राक्षस जोंपर्यंत राज्यकारभार चालविण्यांत प्रमुख आहे तोंपर्यंत कोणाला राजाचें अणुरेणुमात्र अहित करायला सांपडावयाचें नाहीं. वृंदमाला मला सांगत होती कीं, मुरादेवीसारखी साध्वी व सद्गुणसंपन्न स्त्री दुसरी मिळायची नाहीं; परंतु राजानें तिच्याविषयीं व्यर्थ कुतर्क काढून आणि सपत्नीजनांच्या मत्सरानें प्रेरित अशा दोघांना खरें मानून तिचा त्याग केला. इतकेंच नव्हे, तर तिच्या बालकाचा घात करविला. हें काय हें ? आतां सुमाल्याला यौवराज्याभिषेक केला, तेव्हां तिला बंधमुक्त केलें. जणूंकाय साधारण कारागृहांतील चोरांप्रमाणें तीही एक होती. ..."

" काय ! मुरादेवी इतकी उत्तम स्त्री काय ? " चाणक्य मध्येंच म्हणतो, " मी या नगरींत पाऊल घातल्यापासून ज्याच्या त्याच्या तोंडीं त्या साध्वी स्त्रीचें गुणस्तोत्र ऐकतों आहें. अशी महा पुण्यवती सती ती असेल, तर आपल्याला तिचें दर्शन व्हावें, असें फार फार मनांत येतें आहे. "

" मग त्यांत अशक्य काय आहे ? " सिद्धार्थक लागलीच त्यास म्हणतो, " मुरादेवी मोठी शिवभक्त आहे. ती दर सोमवारीं कैलासनाथाच्या मंदिरांत कैलासनाथाचें दर्शन घेण्यास व पुराण ऐकण्यास येते. बंदिवासांत असतांनासुद्धां तिला येथें येण्याची परवानगी होती. परवांचे दिवशीं सोमदिन आहे आणि त्याच दिवशीं पक्षप्रदोषही आहे. तेव्हां ती सूर्यास्ताचे सुमारास प्रदोषकाळीं अवश्य येईल. आतां तिच्याभोंवतीं राजपुरुषांचें वलय नसतें. तिचा परिजन तेवढा असतो, तेव्हां आपल्याला तिचें दर्शन होण्याला मुळींच प्रत्यवाय नाहीं.

चाणक्यानें आपली मान हलविली. शब्दांनीं त्यावर कांहीं उत्तर दिलें नाहीं. मुकाट्यानें चालण्यांत कांहीं वेळ गेला. इतक्यांत सिद्धार्थक त्यास म्हणतो; " हें राजप्रासादाच्या पुढच्या अंगास लहानसें उपवन आहे. यांत शिरून एखाद्या छायावृक्षाखालीं शिलातलावर बसा. मी गुरुजींनीं दिलेलें गुप्त पत्र वृंदमालेच्या हातीं देऊन किंवा कचित तिच्याच हातीं जाईल अशी व्यवस्था करून येतों. " चाणक्य किंचित् स्तब्ध उभा राहिला; नंतर म्हणतो, " सिद्धार्थका, माझ्याबद्दल तुम्हांला संशय कीं, माझ्या

हातून गोपनस्फोट होईल, असें वाटून तर नाहींना तूं मला येथें बसावयास सांगत ? ज्या गोष्टी त्या पत्रांत तुझ्या गुरुजींनीं लिहिलेल्या आहेत, त्या सर्व मला माहीत आहेत. वृंदमाला काल रात्रौ कां आली होती आणि गुरुजींपाशीं तिनें काय सांगितलें, तें सर्व मीं ऐकिलें आहे. तेव्हां आतां माझ्यापासून कांहीं लपवून ठेवण्याच्या भानगडींत पडूं नकोस. उलट मला आपल्याबरोबर घेऊन चल. म्हणजे जर कांहीं तुला अडचण आली तर तुझ्या मीं कदाचित् उपयोगीच पडेन. मी येथें एकटाच वेड्यासारखा बसून काय करणार ? ''

चाणक्याचें तें भाषण ऐकून सिद्धार्थक कांहीं वेळ अगदीं स्तब्ध राहिला. त्याच्यानें चाणक्यास तूं येऊं नको म्हणून निक्षून सांगणें होईना. अशा स्थितींत त्यानें त्यास इतकेंच म्हटलें, " आपण येत असलां तर या, पण आमचाच प्रवेश जेथें फारसा उघडपणें होत नाहीं, तेथें आपल्याला घेऊन जाणें शक्य दिसत नाहीं, एवढेंच. "

" काय ! माझ्यासारख्या ब्राह्मणाला आंत जाण्याला अडचण ? वा ! फार उत्तम राज्यव्यवस्था ! तर मग मीं आपल्याबरोबर येतोंच. चुकून ब्राह्मण आला असतां त्याला राजा काय व कसा दंड करतो, तें तरी पहावें. चलाच. वृंदमाला ओळखीची आहे. मीं आपल्याबरोबर असल्याबद्दल तिला यत्किंचित् सुद्धां वाईट वाटणार नाहीं, किंवा ती तुजवर रागावणार नाहीं. "

सिद्धार्थकाचा आतां अगदीं नाइलाज झाला, आणि 'तुम्हीं येतों म्हणतां तर चला' असें म्हणून तो पुढें चालला. चाणक्य त्याच्याबरोबर चाललाच होता. हे दोघेही राजप्रासादाच्या पश्चाद्भागाकडे अंतःपुराचें द्वार होतें त्या द्वाराकडे गेले. सिद्धार्थकानें वृंदमालेस कोठें व केव्हां भेटावें हें नेहमींचें ठरलेलें होतें. कोणीही पुरुषास अंतःपुरांत जाण्याची परवानगी नसे हें उघडच आहे; परंतु द्वारपालांच्या व अंतःपुरांतील दासदासींच्या परिचयाच्या माणसांनीं अंतःपुराच्या बाहेरील प्राकारांत जाण्याला हरकत नव्हती. तो प्राकारपरिघ उलटून पलीकडे जाण्याला मात्र विशेष परवानगी लागे. ज्या वेळीं सिद्धार्थक गेला ती वेळ वृंदमालेच्या व त्याच्या भेटीची होती आणि म्हणूनच तो तेथें त्या वेळीं आला. ते दोघे नियमित स्थानीं उभे राहिले. इतक्यांत वृंदमाला तेथें आली. सिद्धार्थकानें तिच्या हातांत गुरुजींचें पत्र दिलें. तिनें चाणक्याकडे पाहिलें आणि म्हटलें, " गुरुजींच्या उपदेशामृताचें पान करून त्यांची सेवा करण्याचें व्रत आपणही आचरणार वाटतें ? ठीक आहे. मला त्यांची सेवा जितकी करावीशी वाटते तितकी माझ्या हातून होत नाहीं म्हणून फार वाईट वाटतें; परंतु दिवसानुदिवस त्यांना अधिकाधिक शिष्य मिळत चाललेले पाहून मला मोठा आनंद होतो. " असें म्हणून त्यांना तिनें निरोप दिला व ते दोघेही बाहेर पडले.

# प्रकरण ६ वें.

## आरंभ.

व सुभूतीचें पत्र वाचण्याविषयीं वृंदमाला फार उत्सुक झाली होती. तिची अगदीं मनापासूनची इच्छा कीं, मुरादेवीच्या मनांतलें वेड दूर होऊन तिनें अंतःपुरांत सुखासमाधानानें रहावें. मुरादेवीच्या ठिकाणीं वृंदमालेची अतिशय दृढ अशी भक्ति होती. धनानंद राजानें तिच्यासंबंधानें अत्यंत अन्याय केला आणि तिच्या बालकाचा विनाकारण घात केला याविषयीं वृंदमालेसही फार वाईट वाटत होतें. परंतु जें झालें गेलें, तें आज पंधरा सोळा वर्षांनंतर उकरून काढून विनाकारण आपल्या जीवास घात करून घेणें हें तिला बरें वाटलें नाहीं. त्याचप्रमाणें गृहकलह माजविणें हेंही बरें नव्हे, असें तिला अंतःकरणापासून वाटत होतें. त्यांतून मुरादेवीचा पुत्र जिवंत असून त्याला राज्य प्राप्त होण्याचा संभव असता, तर तिनें मुरादेवीला साहाय्यही केलें असतें; परंतु तसा कोणताही प्रकार आतां नव्हता. आपल्या मुलाचा घात केला, आणि आपला अत्यंत अपमान केला म्हणून केवळ दीर्घद्वेषानें आपल्या राजकुलाचा विध्वंस करण्याची बुद्धि धरून कांहीं तरी उपक्रम करणें हें तिला फार अनर्थकारक वाटलें. नंदकुळाचा विध्वंस करून आपल्या पितृगृहापैकीं कोणास तरी गादीवर बसविण्याचा तिचा हेतु तर तिला अत्यंत अनिष्ट वाटला. मुरादेवीच्या हातून म्हणजे हा सर्व व्यूह रचला जाऊन तिला त्यांत कांहीं सिद्धि प्राप्त होईल असें वृंदमालेस मुळींच वाटलें नाहीं. कारण मुरादेवीची शक्ति ती काय? परंतु आपल्या हेतूप्रमाणें कांहींतरी करावयास जाऊन ती आपल्या स्वतःवरच भयंकर संकट ओढून घ्यावयाची, हेंच वृंदमालेला मोठें भय पडलें. आज इतकीं वर्षें ती बंदिवासांतच होती, आणि आतां कोठें सहजगत्या त्या बंदिवासांतून सुटली नाहीं, तोंच पुनः असलें कांहींतरी वेडें वांकडें कृत्य करून तिनें पुनः बंदिवासांत पडावें, किंवा त्याहूनही कांहीं भयंकर शिक्षेला पात्र व्हावें, हें वृंदमालेला अत्यंत अनिष्ट वाटलें. वृंदमालेची आपल्या स्वामिनीचे ठिकाणीं अतोनात भक्ति होती, आणि त्यामुळेंच तिजवर कोणत्याही प्रकारचें संकट येऊन तिचें अहित होऊं नये असें तिला वाटे. ती आपल्या दीर्घद्वेषानें भलतेंच कांहींतरी संकट आपल्यावर ओढून आणील तें टाळून तिला शहाणपणा शिकवावा या बुद्धीनें तिनें बुद्धभिक्षु वसुभूति यांजकडे जाऊन सर्व प्रकार निवेदन केला

होता. ते कांहींनाकांहीं तरी युक्ति काढून आपल्या स्वामिनीचें रक्षण आपल्या हातून होईल असें करतील, किंवा आपल्या स्वामिनीला सद्बोध करून तिला आपल्या वेड्या विचारांपासून परावृत्त करतील, असें तिला खरोखर वाटत होतें. तशांत सिद्धार्थकानें वसुभूतीचें पत्र आणून दिल्याबरोबर तर तिला अगदीं पूर्णपणें असें वाटलें कीं, गुरुजींना आपल्या स्वामिनीबद्दल कळकळ वाटूं लागली असून ते कांहींना कांहीं तरी करून तिच्या मनास शांति देतील.

पत्र हातीं येतांच तिनें तें एका बाजूस जाऊन उघडून वाचलें, तें असें होतें:—स्वस्ति। तूं येथून काल रात्रीं गेल्या वेळेपासून मन अत्यंत चिंतामग्न झालें आहे। तूं मुरादेवीबद्दलचा जो प्रकार सांगितलास त्यावर पुष्कळ विचार केला,मुरादेवीला आपल्या विचारांतच राहूं दिलें तर एकंदरींत बरा प्रकार होणार नाहीं। तिचाच घात होईल। तरी कांहीं उपाययोजना केली पाहिजे।ती काय करावयाची त्याचा मीं विचार केला आहे। तूं मला पुनः एकदां येऊन भेट। म्हणजे मुरादेवीची व माझी भेट कशी होईल, व कोठें होईल याचा विचार करतां येईल। तिचें व माझें एकवार दर्शन झालें तर सर्व कार्य होईल असें माझ्या मनास वाटतें। एका दृष्टीनें आपणास असें वाटतें कीं, मुरादेवीच्या अशा वल्गनांनीं तिच्या स्वतःच्या घाताखेरीज दुसरें कांहींही होणार नाहीं। परंतु त्याचा तरी काय नेम। सध्यांच्या काळीं धनानंदाविषयीं अमात्यगणांतही थोडाबहुत असंतोष उत्पन्न झालेला आहे। आणि यवन तर आपल्याकडून मगधांत प्रवेश करण्याकरितां अहोरात्र झटतच आहेत। अशा वेळीं थोडा गृहकलह पेटला पुरे। त्याचा मोठा भडका होण्याचा संभव आहे। तेव्हां आपण वेळींच त्याच्यावर जलवृष्टि केली पाहिजे। मुरादेवीची वृत्ति आहे याहून अधिक अनिवार होऊं नये अशाबद्दल तूं आतां सदोदित चिंता वहा। मी तर आपल्याकडून सर्व प्रकारची चिंता वहातोंच आहें। मुरादेवीच्या अंतःपुरांत यापर कोण येतो, कोण जातो, ती कोणाशीं बोलते, काय बोलते, यावर तूं आपली नजर ठेव। आणि कांहीं अधिक उणें झालें तर तूं मला तें त्वरित कळवीत जा। आतां अधिकोत्तर प्रत्यक्ष भेट होईल तेव्हां। पत्रपठनानंतर याचा नाश करून टाकावा। तें ठेवूं नये। भगवान् बुद्धाचा विजय असो। आणि तुझें कल्याण होवो। तोच आपणास प्रस्तुत प्रसंगीं कांहीं तरी मार्ग दाखवील। इति शुभम्।

हें पत्र वाचल्याबरोबर वृंदमालेचें मन थोडें स्वस्थ झालें. वसुभूतीवर तिचा फार विश्वास. आपल्या गुरुजींनीं हें कार्य मनावर घेतलें आहे, आतां त्यांत कांहीं विघ्न येणार नाहीं. ते सर्व यथोचित करतील असें तिच्या मनानें घेतलें व त्याच रात्रीं पुनः वसुभूति भिक्षूच्या दर्शनास जाण्याचा तिनें निश्चय केला. आणि त्याप्रमाणें ती योग्य वेळीं अंतःपुरांतून बाहेर पडली.

इकडे सिद्धार्थक आणि चाणक्य वृंदमालेला वसुभूतीचें पत्र देऊन परत निघाले, ते थोडेसें नगरप्रेक्षण करीत चालले. मार्गानें जातां जातां चाणक्य दोन कार्यें करीत चालला होता. सिद्धार्थकास नानाप्रकारचे प्रश्न विचारून त्याच्यापासून नगराची व राजकुलाची अंतर्बाह्य स्थिति काय होती तिचें ज्ञान करून घेत होता; आणि वृंदमालेला गांठून तिला आपल्या स्वाधीन करून घेण्यास काय काय उपाययोजना केली पाहिजे, याचाही विचार त्याच्या मस्तकांत चाललाच होता. आज वसुभूतीनें वृंदमालेला जें पत्र पाठविलें, त्यांत बहुतकरून तिला बोलाविलें असावें.

काल रात्रीं तिनें त्यास सांगितलेल्या वृत्तांतासंबंधानें त्यानें कांहीं विचार करून, तो विचार सांगण्यासाठींच तें पाचारण असावें, असाही त्यानें विचार केला. व त्या दोघांचें काय संभाषण होतें तें आपण श्रवण केलेंच पाहिजे, त्याचा आपल्या पुढच्या कार्याला फार उपयोग होणार आहे, असा त्यानें विचार करून काल रात्रीप्रमाणेंच आपण आजही रात्रीं वसुभूतीच्या तेथें जाऊन बसावें असें त्यानें मनांत योजिलें. परंतु कालच्याप्रमाणेंच आज केल्यास वसुभूतीला कदाचित् बरें वाटणार नाहीं, तेव्हां आज आतां दुसरीच कांहीं युक्ति काढावयाची असा त्यानें निर्धार केला आणि सिद्धार्थकाशीं कांहीं बोलतां बोलतां मध्येंच एका मंदिरापुढें तो उभा राहिला. तें मंदिर कोण्या देवतेचें आहे हें त्यानें जाणलें, परंतु मुद्दाम सिद्धार्थकास म्हणतो, " सिद्धार्थका, हें विशाल मंदिर कोणाचें आहे ? " तो प्रश्न ऐकतांच सिद्धार्थकानें आपलें अंग शिरारल्याप्रमाणें करून म्हटलें, " नमो अलिहंताणम् । नमो अलिहंताणम् । ब्राह्मणश्रेष्ठा ' हें मंदिर कोणाचें आहे, त्याच्या नांवाचा उच्चारसुद्धां माझ्या मुखानें होऊं नये. हें वाममार्गी कालिभक्तांचें आहे. आंत देवीची मूर्ति आहे तिला चंडिकेश्वरी म्हणतात आणि दर मंगळवारीं किती तरी पशूंची हत्त्या त्या तिच्या पुढच्या कुंडावर होत असते. " इतकें म्हणून सिद्धार्थकानें एक दीर्घ उसासा टाकला, व तो स्तब्ध बसला. इतक्यांत चाणक्य त्यास म्हणतो, "खरेंच, सिद्धार्थका, ही एवढी हत्त्या बंद होईल, तर फार चांगलें होईल; परंतु भगवती अंबिकेची उपासना करण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. मी चंडीशभक्त आहें, तेव्हां मला अनायासानें होणारें चंडीचें दर्शन घेतलेंच पाहिजे. तूं येथेंच उभा रहा. मी दर्शन घेऊन येतो."

सिद्धार्थकास, त्यानें त्या मंदिरांत जावें असें वाटलें नाहीं. तो त्याचा निषेधही करणार, तों चाणक्य त्या मंदिराच्या द्वारांत जाऊन आंतही गेला. सिद्धार्थक अर्थातच प्राण गेल्यानें त्या मंदिरांत जावयाचा नाहीं. तो चाणक्याची मार्गप्रतीक्षा करीत मार्गावर बसला.

एक घटका झाली, दोन झाल्या, चाणक्याचा मुळींच पत्ता नाहीं. सिद्धार्थकास त्या मंदिरांत पाऊल घालावयाचें नाहीं आणि चाणक्य नवखा ब्राह्मण, तो परत आल्याखेरीज आपण गेलों, तर तो नगरांत कोठें चुकून भलतीकडेच जावयाचा. त्याला सोडून गेलों तर गुरुजीही आपल्याला दोष द्यावयाचे, असा विचार मनांत येऊन तो आणखी कांहीं वेळ तेथेंच उभा राहिला; परंतु अगदीं तिन्हीसांजा झाल्या तरी चाणक्याची वार्ताही नाहीं.

त्या मंदिरास चोहों बाजूंनीं द्वारें होतीं. त्या द्वारांपैकीं कोणत्या तरी द्वारानें चुकून बाहेर पडून तो भलत्याच द्वारानें तर बाहेर पडला नसेलना, असें त्याच्या मनांत येऊन त्यानें त्या मंदिरास प्रदक्षिणा घालण्याचा विचार केला, आणि त्याप्रमाणें लागलीच प्रदक्षिणा घातली व प्रत्येक द्वाराजवळ थोडा थोडा वेळ वाटही पाहिली; परंतु चाणक्याची कांहीं वार्ता नाहीं. तेव्हां अगदीं निरुपाय होऊन त्यानें तेथून आपल्या विहाराचा मार्ग धरला. किती वेळ वाट पहाणार ? तरी वाटेनें जातां जातां त्यानें अनेक वेळां चाणक्यासाठीं इकडे तिकडे वळून पाहिलेंच.

इकडे चाणक्य त्या मंदिरांत शिरला, तो मुद्दामच शिरला होता. त्याला पक्कें ठाऊक होतें कीं, सिद्धार्थक आपल्या मागोमाग आंत येणार नाहीं आणि आपणाला त्याला टाळण्याचा जो उपक्रम करावयाचा आहे, तो फार उत्तम तऱ्हेनें साधणार आहे. या हेतूनेंच तो

एकवार आंत गेल्यानंतर किती वेळ तरी बाहेर म्हणून आला नाहीं. त्या चंडिकेश्वरीच्या मंदिरांतही कैलासनाथाच्या मंदिराप्रमाणेंच पुष्करिण्या वगैरे होत्या. तेथेंच आपलें सायंसंध्यादि कर्म करून नंतर योग्य वेळ झाली म्हणजे बाहेर पडूं, असा विचार करून त्यानें त्या मंदिरांत दडी दिली. थोडा सायंप्रकाश पडूं लागतांक्षणींच एका पुष्करिणीवर बसून त्यानें संध्यावंदनादि विधींस प्रारंभ केला आणि सर्व कर्मे अगदीं यथाविहित व स्वस्थपणें चालविलीं. जणूं काय आपल्याकरितां कोणी वाट पहात असेल हें त्याच्या स्वप्नींही नाहीं. जाणून बुजून जेथें गोष्टी करावयाच्या तेथें स्मरण तरी काय करणार ?

स्वस्थचित्तानें सर्व कर्मे आटपून चाणक्य त्या मंदिरांतून बाहेर पडला. तो आंत शिरल्यापासून आतां बाहेर पडेपर्यंत एक प्रहर झाला होता, सिद्धार्थक एक प्रहरपर्यंत खचित आपल्यासाठीं त्या मंदिराबाहेर वाट पाहणार नाहीं, ही त्याच्या मनाची खात्री, तेव्हां त्यानें तो कोठें आहे कीं काय हें आजूबाजूला दृष्टि फिरवून पाहिलें सुद्धां नाहीं.

चाणक्य चंडिकेश्वरीच्या मंदिरांतून बाहेर पडला, तो राजमंदिराच्या दिशेला वळला, त्यास मार्ग चांगलासा माहीत नव्हता; तथापि पुनः केव्हां तरी आपल्याला इकडे यावें लागणार हें मनांत आणून त्यानें मघाशीं त्या बाजूस जातांना व तेथून येतांनाही मार्ग नीट ध्यानांत धरला होता. चाणक्याच्या मनांत वृंदमाला रात्रीं वसुभूतीकडे जाईल, तेव्हां तिला अर्ध्या वाटेंत गांठावी आणि आपण रस्ता चुकल्याकारणानें इतस्ततः भटकत असतां सहजगत्याच तिला भेटलों असें म्हणून तिच्याबरोबर वसुभूतीच्या विहाराकडे जावें. वाटेनें अर्थातच कांहींना कांहीं तरी भाषण होणारच, त्यांत वृंदमालेकडून आपल्याला तिच्या स्वामिनिबद्दल कांहींना कांहींतरी हकीकत कळेल. आणि तिचा आपल्यास उपयोगही करून घेतां येईल. असा मनांत एकंदर व्यूह रचून स्वारी तेथून निघाली ती राजप्रासादाच्या पश्चाद्भागीं जाऊन त्याच्याभोंवतीं प्रदक्षिणा घालावयास लागली. वसुभूतीनें वृंदमालेला ‘ आज रात्रीं तूं मला येऊन भेट ’ असें लिहिलें आहे, अशाबद्दल त्याला अणुरेणुमात्र शंका नव्हती.

सुमारें प्रहर रात्रीला वृंदमाला खरोखरीच राजमंदिराच्या पश्चाद्भागाच्या द्वारानें बाहेर पडली. चाणक्य पाळथीवर बसलाच होता. त्यानें तिला बाहेर पडतांना व द्वाराच्या आंतल्या बाजूस उभें असलेल्या कोणास कांहीं निरवितांना पाहिलेंही. चाणक्य त्या द्वारापासून मुद्दाम दूर उभा होता, हेतु हा कीं, आपण राजमंदिराच्या आजूबाजूला अशा वेळीं हिंडतांना कोणाच्या दृष्टीस पडूं नये. निदान आपण हिंडतों आहोंत ते राजमंदिरांतील कोणाकरितां तरी हिंडतों आहों अशी शंका कोणासही येऊं नये.

त्याच्या तर्काप्रमाणें वृंदमाला खरोखरीच बाहेर पडली हें वर सांगितलेंच आहे. ती वसुभूतीच्या विहाराकडे जाणाऱ्या मार्गाला लागली. तिच्याबरोबर एक परिचारक मात्र होता. वृंदमाला त्या मार्गानें बरीचशी पुढें जाईपर्यंत आपण तिच्या मार्गांत जाऊन तिला हांक मारून बोलूं नये. नाहीं तर आपण येथेंच कोठेंतरी कांहीं तरी हेतूनें भटकत असून मार्ग चुकल्याचा उगीच बहाणा करितों आहों असें वाटावयाचें. असा विचार करून त्यानें तिला थोडासा मार्ग चालूं दिलें आणि नंतर आपण तिच्यापुढें जाऊन परत फिरल्याप्रमाणें करून तो तिला आडवा झाला. जणूं काय समोरूनच येतो आहे. वृंदमालेच्या जवळून थोडासा तिच्या उलट दिशेस पुढें जाऊन नंतर एकदम जणूं

काय स्मरल्याप्रमाणें करून माघारी येऊन मोठ्यानें तिला म्हणतो, "कोण वृंदमाले? अहाहा! भगवान् कैलासनाथानेंच तुला या वेळीं माझ्या सोडवणुकीला पाठविलें. वसुभूति भिक्षूचें पत्र देऊन सिद्धार्थक व मी तुझा निरोप घेऊन निघालों तों कोठें चंडिकेश्वरीच्या देवालयाजवळ गेलों आणि मला सहज अशी इच्छा झाली कीं, आपण देवीच्या दर्शनार्थ आंत जावें. सिद्धार्थक मला म्हणत होता कीं, बलिदानाच्या नांवानें तेथें मेषादिकांची हत्त्या फार होते, तूं जाऊं नको; परंतु चंडिकेश्वरीच्या दर्शनाची इच्छा होऊन मी आंत गेलोंच. तों त्या भिक्षूच्या अवज्ञेचें मला भलें फळ मिळालें. मी कोणत्या द्वारानें बाहेर पडलों कोणास कळे. सिद्धार्थक कांहीं मला कोठें दिसेना. पुनः मंदिरांत गेलों, पुनः इकडे तिकडे हिंडून आपलें पहिलें द्वार—ज्या द्वाराशीं सिद्धार्थक माझी वाट पहात बसला होता. तें द्वार सांपडलें तर पहावें म्हणून प्रत्येक द्वारांतून बाहेर जाऊन सिद्धार्थक कोठें दिसतो का म्हणून पाहिलें; तों तो कोठेंच दिसेना. शेवटीं निरुपाय झाला. तेव्हां आपला भटकूं लागलों. इतक्यांत तुला पाहिलें. वृंदमाले, तूं कोणीकडे जात आहेस? माझा तर जीव अगदीं दमून गेला. तूं वसुभूतीकडेच जात असलील, तर मला घेऊन चल. आम्ही मघाशीं तुझ्याकडेच येत होतों तेव्हां मीं विहाराकडे परत जाण्याचा सगळा मार्ग ध्यानांत धरला होता. पण काय उपयोग? ज्या मार्गानें आलों त्याच मार्गानें आम्ही परत चाललों नव्हतों, यामुळें माझी भूल झाली, आणि मी भलत्याच मार्गाला लागलों!

तें ऐकून वृंदमालेला त्या ब्राह्मणाची दया आली, ती त्याला म्हणते, "ब्राह्मणश्रेष्ठा, मी तुला भेटलें हें खरोखरीच फार चांगलें झालें. तूं अगदींच उलट दिशेला जात होतास. आतां मजबरोबर चल. मी गुरुजींकडेच जातें आहें. मघाशीं पत्र आणून दिलें कीं नाहीं, त्यांत मला तिकडे दर्शनालाच बोलाविलें आहे. खरेंच, माझी आणखी तुझी जर गांठ पडली नसती, तर तूं काय केलें असतेंस कोण जाणे! याच दिशेनें गेला असतास, तर तुला सगळी रात्र भटकत रहावें लागलें असतें. असो. झालें तें ठीक झालें. आतां तूं मजबरोबर चल. मी तुला तुझ्या कैलासनाथाच्या मंदिरांत अगदीं सुरक्षितपणें नेऊन पोहोंचवितें. भगवान् वसुभूति आणि सिद्धार्थक दोघेही तुझी काळजी करीत असतील, नव्हे, सिद्धार्थकाला कदाचित् वसुभूतींनीं पुनःतुझ्या शोधाकरितां परतही पाठविलें असेल."

"काय करूं? माझा नाइलाज झाला. ज्या द्वारानें मंदिरांत शिरलों, त्या द्वारानें बाहेर पडण्याची सुद्धां मला बुद्धि नाहींसारखी झाली. याचेंच मला मोठें वाईट वाटतें आहे. पण नगर विस्तृत आणि मी नखवा."

इतकें होऊन तीं दोघें मार्ग चालूं लागलीं. इतक्यांत चाणक्य तिला म्हणतो, "वृंदमाले, काल तूं गुरुजींच्याजवळ आपल्या स्वामिनीबद्दल सांगत होतीस तें ऐकून माझें मन मोठें उद्विग्न झालें. तूं गेल्यानंतर माझें व वसुभूतींचें त्यासंबंधानें पुष्कळ बोलणें होऊन त्यांनीं मला पूर्वीचा सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून तर मला फार वाईट वाटलें. काय विचारीवर प्रसंग!"

"प्रसंग वाईट तर खराच!" वृंदमाला त्यास म्हणते, "परंतु त्या प्रसंगाबद्दल आतां त्रासून, संतापून आणि नाहीं नाहीं ते निर्धार करून काय उपयोग? असे वेडे विचार केले, तर त्यापासून तिचाच कांहीं तरी घात होईल."

"वृंदमाले, असें कां म्हणतेस?"

चाणक्य तिला उलट म्हणतो, " स्त्रिया ज्या प्रतिज्ञा करितात, त्या काय त्यांच्या हातून पार पडणार नाहींत ? आतां मुरादेवीनें असली प्रतिज्ञा करूं नये हें खरें; पण स्त्रियांनीं केलेल्या अशाही प्रतिज्ञा सिद्ध झाल्याचीं उदाहरणें आहेत. वृंदमाले, आपल्याकडे यत्किंचित् सुद्धां अपराध नसतां आपल्या नांवाला आणि पितृकुलाला कलंक लावण्याजोगा आपल्यावर आरोप करून आपल्या पोटच्या पोराचा घात करवावा यासारखें दीर्घद्वेषाला आणखी कोणतें कारण पाहिजे ? "

चाणक्यानें हें भाषण थोडेसें आवेशानें केलें, यामुळें वृंदमालेस कांहीं चमत्कारिक वाटून ती त्या तसल्या अंधकारांतही त्याच्याकडे जरा विलक्षण नजरेनें पाहूं लागली. कांहीं वेळ ती कांहीं बोलली नाही. परंतु नंतर त्यास म्हणतेः—

" ब्राह्मणश्रेष्ठा, तूं म्हणतोस ही गोष्ट खरी. आम्हांलाही तें दिसतेंच आहे. परंतु ज्याप्रमाणें पर्वत अंगावर पडला असतां त्याच्याखालीं चेपून मरण्याखेरीज आपल्या हातीं कांहीं नसतें, त्याप्रमाणें हें आहे. राजानेंच जेथें अन्याय केला, तेथें आपण काय करणार ! त्याबद्दल न्याय कोणाकडे मागायला जाणार आणि काय करणार ? "

" वृंदमाले, तूं म्हणतेस तें खरें; पण त्याच्याहीबद्दल न्याय मागायला भगवान् श्रीकैलासनाथ आहेच. त्याचें नांव घेऊन जर आपण उद्योग आरंभला, तर आपल्याला यश येणार नाहीं असें नाहीं. "

थोडा वेळ थांबून, चाणक्य पुनः तिला म्हणतो, " वृंदमाले, तुझ्या बोलण्यावरून मला वाटतें कीं, तूं आपल्या स्वामिनीचें रक्षण करण्याकरितां काय वाटेल तें साहस करशील."

" हो. अगदीं अवश्य करीन. त्याबद्दल कोणाला संशय नको. प्रत्यक्ष प्राण देण्याची पाळी आली, तरी देईन. मग आणखी तर काय ? "

" वा ! स्वामिनिष्ठा असावी, तर अशीच असावी. तुला पाहिलें तेव्हांपासूनच माझ्या मनाला पक्कें वाटून चुकलें कीं, तूं खरी स्वामिनिष्ठ आहेस. नाहीं तर स्वामिनीवरली राजाची प्रीति दूर होऊन त्यानें तिला बंदींत टाकलें असतां कोण आपल्या स्वामिनीबद्दल इतकी चिंता वाहणार आहे ! " ती स्तुति ऐकून वृंदमाला अतोनात संतुष्ट झाली व म्हणते, " ब्राह्मणश्रेष्ठा, यांत मी कांहींच विशेष करीत नाहीं. हा माझा धर्मच आहे. "

" हो, हो ! " चाणक्य एकदम मधेंच म्हणतो, " धर्म तर खराच; परंतु तो पाळणारे भृत्य आजकाल फार थोडे आहेत एवढेंच काय तें. "

पुनः दोघेंही कांहीं वेळ स्तब्धपणें चाललीं नंतर पुनः चाणक्य तिला म्हणतो, " वृंदमाले, जशी तूं आपल्या स्वामिनीच्या प्राणरक्षणासाठीं काय वाटेल तें करशील, तशीच तूं स्वामिनीचा एखादा हेतु पार पाडण्यासाठीं सुद्धां वाटेल तें साहस करशील असेंही पण मला वाटतें. "

" अहो, करीन म्हणजे शंका का आहे त्यांत कांहीं ? फार तर काय, देवी आज ज्यासंबंधानें वेडें वेडें बोलते आहे, तें जर सुसंगत आणखी सुसाध्य असतें, तर मीं तिच्या कार्यांत तिला वाटेल तें साहाय्य केलें असतें; पण काय उपयोग ? ती अगदींच वेड्यासारखें बोलते. ती म्हणते, मी नंदकुळाचा नाश करीन, आणखी त्या जागीं आपल्या पितृकुलांतला कोणी तरी आणीन. हें काय बरें हें ? हो, असें जर असतें, कीं तिचा स्वतःचा मुलगा आहे, तर मग कांहीं

तरी त्यांत होतें. बाकी त्यांत तरी शक्य काय ? ”

चाणक्यानें तिच्या अगदीं शेवटल्या बोलण्याकडे दुर्लक्ष्य करून तिला म्हटलें, “ एकूण तिचा स्वतःचा मुलगा जिवंत आहे आणि त्याच्याकरितां जर तिनें प्रयत्न केला, तर तूं तिला सर्वथा मदत करणार ? ठीक; वृंदमाले, तूं खरी खरी स्वामिनिष्ठ. तुला नित्य वंदन करावें.”

हें वंदनाचें भाषण ऐकून तर वृंदमाला अतिशय आनंदली.

---

# प्रकरण ७ वें.

## पाऊल.

जा धनानंद आपल्या प्रासादाच्या सौधावर बसून नगराची मौज पहात होता. जवळ दासदासी आणि परिचारक मंडळी फार थोडी होती. जणूं काय त्या परिचारकांच्या नित्य सहवासाला कंटाळूनच त्यानें त्यांपका बहुतेकांना घालवून देऊन तो स्वस्थपणें आपल्याशींच विचार करीत किंवा नगरप्रेक्षणानें होणाऱ्या आनंदाचा अनुभव घेत बसला होता. होती ती मंडळीही जवळून घालवून द्यावी, अशा इच्छेनें त्यांच्याकडे वळून त्याप्रमाणें त्यांस त्यानें आज्ञा केली. तेव्हां त्यांतूनही कांहीं मंडळी निघून गेली. राहतांपैकीं द्वारांत, फक्त प्रतिहारी आणि द्वाराच्या आंतल्या बाजूस वेत्रवती, इतकी दोनच मंडळी तेथें राहिली. बाकी सौधप्रांत अगदीं निर्मक्षिक झाला. धनानंदाच्या मनाची स्थिति या वेळीं कांहीं चमत्कारिक झालेली दिसली. खालीं चारही बाजूंला नगराचा विस्तार पसरलेला, त्यांत नागरिकांचे अनेक प्रकारचे व्यवसाय चालले होते. परंतु त्या देखाव्यांकडे धनानंदाचें लक्ष्य होतें कीं नाहीं, याबद्दल शंकाच होती. त्याचें मन कोठें तरी दुसरीचकडे होतें असें दिसलें. त्याच्या चर्यंवरून त्याच्या मनांतील विचार विशेषसे आनंददायक असतील असें दिसत नव्हतें. उलट कांहीं तरी औत्सुक्य त्याच्या मनाला होऊन, त्या औत्सुक्याचें कारण काय तें जणूं काय तो शोधीत होता. त्या औत्सुक्याचें मूळ कांहीं तरी भीति–आपल्यावर लवकरच कांहीं तरी दुःख, कांहीं तरी अरिष्ट येणार, अशा प्रकारची कांहीं भीति–होय असेंही दिसलें. कांहीं कारण नसतां, कोणत्याही दिशेकडून अरिष्टाच्या संभवाची वार्तासुद्धां नसतां, राजा केवळ सुखस्थितींत नगरशोभा पहाण्याच्या इच्छेनें बसलेला असतां एकाएकीं त्याच्या मनांत वर सांगितल्या प्रकारचा औत्सुक्यपूर्ण व भीतिप्रद विचार आला. राजा अशा विचारांत तर काय, परंतु प्रत्यक्ष भीतिप्रसंग आला असतांही कधीं कचर खाणारा नव्हता; परंतु केव्हां केव्हां मनाची स्थितिच अशी

असते कीं, त्या वेळीं मनांत येणारे विचार मनाला पूर्णपणें ग्रासून बसतात. आणि जलानें मिश्रित अशा धूलीप्रमाणें नुसत्या झाडण्यानें दूर होत नाहींत. कितीही झाडा, ते आपला वरावाईट प्रभाव स्थानीं ठेवितातच. राजा धनानंदानें आपल्याकडून वर सांगितलेले सर्व विचार आपल्या मनांतून दूर करण्यासाठीं अत्यंत प्रयत्न केला, परंतु त्याला त्यांत सिद्धि प्राप्त झाली नाहीं. इतकेंच नव्हे, तर जों जों त्या विचारांस दूर करण्याचा त्यानें प्रयत्न चालविला, तों तों त्यांनीं आपलें ठाणें त्याच्या मनांत जास्ती जास्तीच कायमचें केलें, आणि नंतर त्याला त्याच विचारांत थोडासा सखेदानंदही वाटूं लागला. अर्थातच आपल्याजवळचे हे परिचारक वगैरे अगदीं जवळ नकोत असें त्यास वाटूं लागलें. अशा विलक्षण मनःस्थितींत असून तो तेथें बसला आहे, तों वेत्रवती हळूच जवळ येऊन अत्यंत नम्रपणानें हात जोडून व भूमीवर जानु टेंकून म्हणते, "देव, अंतःपुरांतील कोणी परिचारिका एक पत्रिका घेऊन आली आहे, आणि ती पत्रिका स्वतः महाराजांसच देण्याविषयीं आपल्या देवींची आज्ञा आहे असें म्हणते. विनयंधर कंचुकीनें महाराजांची मनःस्थिति जाणून आधीं आज्ञा घेऊन येतों आणि मग तुला आंत सोडीन असें म्हणून तिला दारांतच अडकावून ठेविलें आहे. मग जशी महाराजांची आज्ञा !"

वेत्रवतीचें तें भाषण ऐकतांच महाराजा धनानंद अंमळ देहावर आल्याप्रमाणें होऊन म्हणतो, "वेत्रवति, काय म्हणतेस देवींकडून परिचारिका आली आहे? आणि ती पत्रिका माझ्याचजवळ द्यावयाची असें म्हणून आंत येण्याची आज्ञा मागते आहे? देवींची परिचारिका, आणखी या वेळीं पत्रिका घेऊन आली आहे? काय बरें त्या पत्रिकेंत असावें?" इतकें अर्धवट वेत्रवतीला उद्देशून व अर्धवट आपल्याशींच बोलून कांहीं वेळपर्यंत राजा स्वस्थ बसला. वेत्रवती जागच्याजागींच स्तब्ध उभी होती. शेवटीं राजा धनानंदाच्याच मनांत असें आलें कीं, आपण असेच बसून आपल्या त्या भीतिप्रद विचारांत गुरफटूं तर ते विचार अमर्यादपणें अन्य विचारांस प्रसवतील. त्यापेक्षां हें नवीन काय कार्य आलें आहे तें पाहूं, म्हणजे त्याच्यांत मन शिरून आपले सध्यांचे विचार दूर होतील. असा विचार करून राजानें वेत्रवतीस म्हटलें, "वेत्रवति, जा. त्या परिचारिकेला आंत येऊं दे असें विनयंधराला सांग व त्या परिचारिकेला घेऊन ये."

आज्ञा होतांच वेत्रवती गेली, आणि तिनें त्या परिचारिकेस आंत आणिलें. परिचारिका येण्यावरोबर तिनेंही महाराजांस योग्य अशा तऱ्हेनें जानुक्षेपन करून व मस्तकावर अंजलि धरून महाराजांस विज्ञापिलें, "देव, देवींनें ही पत्रिका दिली आहे, आणखी ती वाचून देव काय आज्ञा करितील; ती मला लवकर सांगायला ये अशी मला आज्ञा केली आहे. तेव्हां देवांनीं ही वाचून पाहून गरीब दासीला आज्ञा करावी."

राजा धनानंदानें त्या परिचारिकेकडे एकवार पाहिलें व त्यास असें वाटलें कीं, ही परिचारिका नेहमींच्या पहाऱ्यांतली नव्हे. कधीं एकवार आपण हिला कोठेंतरी पाहिलें असावें, मात्र आपण अमुक वेळीं आणि अमक्याच स्थळीं पाहिलें असावें असें त्यास वाटेना; तथापि परिचारिकेबद्दल जास्त चौकशी न करतां त्यानें ती पत्रिका उघडली व ती तो आपल्याशींच वाचूं लागला.

"स्वस्ति. महाराजांना या माझ्या पत्र-

लेखनानें अत्यंत क्रोध येईल. कदाचित् या चरणदासीला आजपर्यंत जसें ठेविलें तसेंच ठेवावें असेंही आपल्या मनांत येईल. परंतु एकवार दर्शन देऊन या दासीची विज्ञप्ति तरी ऐकावी. कुमार सुमाल्याला यौवराज्याभिषेक झाल्याच्या आनंदोत्सवांतही ज्या अर्थी या दासीचें स्मरण होऊन तिला बंधमुक्त केलें, त्या अर्थी आर्यपुत्रांना या दासीचें सर्वथा विस्मरण झालें नाहीं हें उघडच आहे. तशा प्रकारचें स्मरण आहे हें पाहून पत्रलेखनाचें व ही विज्ञप्ति करण्याचें दुष्कर साहस दासीनें केलें आहे. ज्याप्रमाणें स्वातिबिंदूच्या प्राप्तीसाठीं चातकी किंवा आपल्या पतीच्या पुनर्दर्शनासाठीं निशासमयीं वियुक्त झालेली चकोरी अत्यंत उत्सुक होतात, त्याप्रमाणें ही मुरा आपल्या दर्शनाचीप्रतीक्षा करीत आहे. याउपर आर्यपुत्र सर्व कांहीं करण्यास समर्थच आहेत."

प्रथमतः कांहीं ओळी वाचीपर्यंत हें पत्र कोणाचें आहे, हें धनानंदाच्या एकदम लक्षांत आलें नाहीं; परंतु पत्र अर्धे वाचून होतें तोंच पत्रलेखक कोण असावें याविषयीं संशय येऊन शेवटल्या दोन ओळींत तर त्या संशयाचा निरासही झाला. पत्र घेऊन येणारी परिचारिका जवळ उभीच होती. तिच्याकडे एकवार त्यानें पाहिलें, आणि पुनः एकवार पत्रिकेकडे नेत्र फिरविले. नंतर पुनः एकदां तें पत्र त्यानें वाचलें आणि कांहीं वेळ स्तब्धपणें विचार केला. नंतर एकदम त्या परिचारिकेस म्हटलें, "परिचारिके, जा. तूं आपल्या स्वामिनीला सांग कीं, महाराज लागलीच तुझ्या अंतःपुरांत येताहेत. वेत्रवति, मुरेच्या अंतःपुराचा मार्ग दाखीव."

धनानंदाचें तें भाषण ऐकतांच परिचारिका आणि वेत्रवती दोघीही अनपेक्षित अशा आकाशवाणीनें चकित व्हाव्या, किंवा विद्युल्लतेच्या आघातानें जीवहीन व्हाव्या, त्याप्रमाणें उभ्या राहिल्या; परंतु परिचारिका लागलीच सावध झाली. महाराज अंतःपुरांत येताहेत ही शुभवार्ता सांगावयास आपण त्वरित गेल्यास आपली स्वामिनी अत्यंत आनंदित होईल, असें एकदम मनांत येऊन ती तेथून निघाली, आणि मुरादेवीच्या अंतःपुराकडे धांवत गेली. वेत्रवतीचें आश्चर्य मात्र इतक्या लवकर दूर झालें नाहीं. आपण ऐकिले हे शब्द खरोखर ऐकले कीं आपल्याला कांहीं स्वप्न पडत असून त्यांत आपण हें सर्व पहातों व ऐकतों आहों, हें कांहीं तिला समजेनासें झाल्याप्रमाणें दिसलें. ती खरोखर एखाद्या पाषाणमय मूर्तीप्रमाणें उभी राहिली. तिची तशी अवस्था होईल, हें जणूं काय राजा धनानंदास कळून चुकलेंच होतें. कारण तो स्मित करून म्हणतो, "वेत्रवति, तूं स्वप्नांत नाहींस. तूं चांगली जागी आहेस, समजलीस? किरातकन्या मुरादेवी हिच्या अंतःपुराचा मार्ग खरोखरीच मला दाखव. मला तिचें दर्शन घेण्याची इच्छा झाली आहे. आज सतरा वर्षें तिचा मीं त्याग केला, पण आतां या कुमार सुमाल्याच्या यौवराज्याच्या उत्सवांत तिला दुःखांत ठेवावयाची नाहीं."

राजानें वरून हें कारण सांगितलें; परंतु खरोखरीचें कारण असें होतें कीं, त्याला आज आतांपर्यंतच्या अरिष्टदर्शी व भीतिप्रद अशा विचारांतून मनाला काढून कोठें तरी दुसरीकडे व्यापृत करण्याची इच्छा झाली. जिचा आपण पंधरा सोळा वर्षें त्याग करून जिला बंदिवासांत टाकलें, तिनें बोलावलें आहे, तर तिच्या संगतींत क्षणमात्र घालवून त्या आपल्या विचारांचा विसर पडला तर पहावें. नवीन कांहीं तरी असलें, म्हणजे सहज मनाला करमणूक होते आणि तशी

करमणूक झाली तर सहजच आपल्याला जे विचार मनांतून जावे असें वाटत आहे, ते दूर होतील. असा विचार करून राजा धनानंद आपल्या आसनावरून उठला आणि वेत्रवती मार्ग दाखवीत होती त्या मार्गानें चालला.

इकडे मुरादेवीची परिचारिका आपल्या स्वामिनीच्या अंतःपुरांत आज महाराज येणार या विचारानें अर्थातच अत्यंत आनंदित होऊन वेड्याप्रमाणें धांवतच आपल्या स्वामिनीकडे गेली, आणि अत्यंत हर्षानें स्वामिनीस तिनें ती आनंदवार्ता सांगितली. ती ऐकण्याबरोबर एक क्षणभर—एकच क्षणभर—मुरादेवीस ती खरी वाटली नाहीं. नंतर परिचारिकेच्या चर्येकडे पाहिल्याबरोबर ती खरी आहे असें तिला वाटलें आणि लागलीच महाराजांच्या स्वागताकरितां तयारी करण्यास ती उठली. तिच्या अंगावर भूषणें कांहीं विशेष नव्हतींच; परंतु त्यांतही जीं पांच चार होतीं, तीं तिनें काढून टाकिलीं. प्रथम परिहित वस्त्र रेशमी होतें, तें सोडून अगदीं शुभ्र असें कापसाचें वस्त्र तिनें परिधान केलें, गळ्यांत एकच मौक्तिकमाला धारण केली आणि अगदीं अस्ताव्यस्त नाहीं व फार सुव्यवस्थित नाहीं अशा प्रकारची केशरचना करून वर तिनें एक मदनबाणाचें पुष्प खोंविलें. नंतर आज आठ पंधरा दिवसांत चर्येवर जो क्रोध वगैरे दिसत होता, किंवा केव्हां केव्हां मात्सर्याचें तेज दिसत असे, तें सर्व अगदीं दूर सारून तिनें एखाद्या विरहिणीप्रमाणें त्यावर कळा आणली. हें सर्व जसें आपणास पाहिजे तसें झालें, अशी खात्री व्हावी म्हणून तिनें एकवार आरशांत आपलें मुख पाहिलें आणि ती महाराजांची मार्गप्रतीक्षा करीत बसली. इतकेंच नव्हे, तर महाराज आले असतां आपण कशाप्रकारें भाषण करावें, कसें हंसावें, किती हंसावें, कोणत्या वेळीं कशा चर्या कराव्या, याबद्दलचीसुद्धां तिनें आपल्या मनांत सर्व योजना करून ठेविली.

थोड्याच वेळांत—मुरादेवीनें आपला सर्व बातबेत यथास्थितपणें बसविला नाहीं तोंच—महाराज येऊन ठेपले. ते येण्याबरोबर व वेत्रवती रीतीप्रमाणें त्यांस " इत इतो देवः ही मुरादेवी आपली वाट पहात आहे. " असें म्हणून स्वतः दृष्टीआड होताच, मुरादेवीनें एकदम अत्यंत उद्वेगजनक अशा स्वरानें,

" आर्यपुत्रा, मी सर्वस्वी अपराधी असें समजून आजपर्यंत माझी उपेक्षा केली ती केली; परंतु आतां यापुढें तरी माझ्यावर कृपादृष्टि असूं द्यावी. " असें म्हणून राजाच्या चरणांवर मस्तक ठेऊन ते तिनें अश्रुजलानें भिजविले. तिचा कंठ त्या वेळीं इतका सद्गदित होऊन ती इतक्या आर्तस्वरानें शोक करीत होती कीं, तो ऐकून राजाचें अंतःकरण अगदीं द्रवलें आणि त्यानें तिला उठवून कांहीं एक न बोलतां आपल्या अंकावर बसविलें. तिच्या चर्येकडे पाहिलें तेव्हां तिची करुणार्द्र परंतु अत्यंत सुंदर अशी मुद्रा पाहून त्याचें चित्त तिजकडे वेधलें. या वेळीं ती वर सांगितल्याप्रमाणें अगदीं शुभ्र वस्त्र परिधान केलेली, अलंकाररहित व विरहिणीला योग्य असें एक पुष्प धारण करणारी, अशी फारच मनोहर दिसत होती. निसर्गमधुर असें स्वरूप स्वभावतःच अतिशय चित्ताकर्षक असतें. मुरादेवी स्वरूपानें फारच उत्तम होती. तिला आपलें सौंदर्य खुलवून दाखविण्यास अलंकारादि बाह्योपचारांची मुळींच जरूरी नव्हती. तशांत आतां ती प्रौढा झाल्याकारणानें तर तिला तें शुभ्र वस्त्र, ती शुभ्र परंतु फार सतेज अशी मौक्तिकमाला, तें मदनबाणाचें सुंदर पुष्प हीं फार फार शोभत. त्या मदनबाणाच्या पुष्पानें तर राजाचें चित्त अत्यंत विव्हलच झालें म्हटलें तरी चालेल. आणि तशा स्थितींत

मुरेनें आपल्या कांहीं नम्र वाक्यांनीं, कांहीं प्रेमवाक्यांनीं, भ्रुकुटिविलासांनीं आणि नेत्रकटाक्षांनीं व विरहोद्गारांनीं धनानंदास तत्काळ अगदीं चीतच करून टाकलें. आज पहिल्याप्रथमच पत्रलेखन करून एकदम महाराजांकडे तें पत्र पाठविण्याचें साहस केलें, त्यांत मुरादेवीला चांगलीच सिद्धि मिळाली. आज आपण पत्रिका लिहून पाठवावी, झाला उपयोग तर ठीकच आहे, नाहीं तर पुनः आपण आणखी एक पत्रिका लिहूं. पुनः लक्ष्य नाहीं दिलें, तर आणखी तसेंच लिहूं; पण कधींना कधीं तरी महाराज आपल्या अंतःपुरांत येतील असें करूं, आणि एकवार त्या कामांत सिद्धि आली व एकवार त्यांनीं येथें येऊन आपल्यास पाहिलें व ते दोन शब्द बोलले कीं, पुढें त्यांना आपण स्वाधीन करून घेऊं अशी तिच्या मनाची पक्की खात्री होती. त्या खात्रीप्रमाणें एकदम सर्व कांहीं झालें, मग तिला अत्यानंद व्हावा यांत नवल काय? तथापि तिनें तो अत्यानंद बाहेर दिसूं दिला नाहीं. महाराज एकवार आपल्या भूर्जपत्रावर लिहून पाठविलेल्या पत्रिकेनें एथवर आले, आणि त्यांच्या चरणांवर आपण लोटांगण घातलें असतां आपल्याला त्यांनीं उठविलें याबद्दल आपण फार कृतज्ञ आहोंत असेंच तिनें आपल्या भाषणानें, हावभावांनीं आणि मुद्रेनें स्पष्टपणें दिसेल असें केलें. महाराज धनानंदाच्या मनावर त्याचा फार विलक्षण परिणाम झाला आणि नंतर तो तिला म्हणतो, " प्रिये, पुरे; नको, आतां उगीच दुःख करूं नकोस. जी गोष्ट झाली गेली, तिच्याबद्दल आतां शोक करूं नकोस. तो काल तसा होता, माझ्याही बुद्धीला भ्रंश झाला; परंतु आज मीं तुला पाहिल्याबरोबर माझी चित्तवृत्ति पालटली आहे. सतरा वर्षांच्या बंदिवासानें तुझी विरहावस्था कशी झाली आहे ती पहातांच मला माझी त्या वेळीं खरोखर गैरसमजूत झाली असावी, असें वाटूं लागलें आहे. नाहीं तर तुझें असें हें प्रेम इतकें अचल राहिलें नसतें. कांहीं चिंता करूं नकोस. यदाकदाचित् तुझ्या हातून कांहीं अपराध घडला असला तरी त्याचा आतां विचार नाहीं. माझ्या हातून अविचार झाला असला, तरी त्याचा आतां तूं विचार करूं नकोस. त्याचें जें काय प्रायश्चित्त मिळावयाचें तें तुला आणि मला दोघांनाही मिळालें. आतां तें विसरूं या कसें! प्रिये मुरे, तुला मीं विनाकारण छळलें ना?"

" आर्यपुत्रा, मी असें कसें म्हणूं? आपल्या हातून केवळ अन्यायानें किंवा अदूरदर्शीपणानें कधीं तरी कांहीं होईल का? मला तर बाई वाटतें, कीं आपल्या हातून अन्याय असा कधींच व्हायचा नाहीं. पण माझ्या दुर्भाग्यामुळें आपल्याला सत्यस्थिति समजलीच नाहीं, तर त्याला मी तरी काय करणार? आणखी आपण तरी काय करणार? आपल्याला मी मुळींच दोष देत नाहीं. तो मी आपल्या प्राक्तनाला देतें. पण आपल्या चरणाजवळ एवढें वरोक सांगून ठेवतें कीं, मला झालेल्या बंदिवासाला किंवा लोकापवादाला मी मुळींसुद्धां योग्य नाहीं. मी खरोखरीच किरातराजाची कन्या—एकुलती एक कन्या—आपण जिचें क्षात्रधर्मानें—गांधर्वविधीनें पाणिग्रहण केलें, ती मी आतां आज मोठ्या भाग्यानें आपल्या दर्शनाचा लाभ होऊन आपल्या नेत्रांचें पारणें फेडून घेत आहें. आतां यापुढें तरी मजवर पूर्ण कृपादृष्टि असावी."

हें बोलणें बोलत असतां मुरादेवीच्या चेष्टा इतक्या निसर्ग मनोहर होत्या, तिचें एकंदर वर्तन इतकें चित्ताकर्षक होतें व दृष्टिक्षेप आणि भ्रुकुटिविलास हीं अशा प्रकारें चाललीं होतीं कीं, एखाद्या चतुर व्याधा च

जाळ्यांत जसा कृष्णमृग सांपडावा, आणि तो दर पावलास अधिक अधिक गुंतत चालला असतांही ज्याप्रमाणें त्या व्याधानें मुखानें वाजविलेल्या वेणुनादाला भुलून जाऊन स्तब्धपणें उभा राहतो व त्याच्या बाणांनीं विद्ध होतो, अगर त्या पाशांत पूर्णपणें सांपडतो, त्याप्रमाणेंच त्या धनानंदाची अवस्था झाली. तो मुरादेवीच्या मधुर स्वरानें अगदीं मोहित होऊन व तिच्या नेत्रकटाक्षांनीं विद्ध होऊन तिच्या वाक्पाशांत पूर्णपणें सांपडला. सतरा वर्षांपूर्वी ज्या वेळेस त्याच्या सेनापतीनें तिच्या पित्याला जिंकून तिला लुटींत आणलें, तेव्हांपेक्षांही आज या प्रौढावस्थेंत तीं फार रमणीय दिसत आहे, असें त्यास वाटून त्यानें तिला पुनः म्हटलें:—

"प्रिये मुरे, तूं आतां अगदींसुद्धां शंका धरूं नकोस. मी आजची रात्र तुझ्याच मंदिरांत घालविणार. आजचा रात्रीचा उपाहारसुद्धां तुझ्याच मंदिरांत तुझ्याबरोबर करणार. मात्र, गतगोष्टींचें तूं स्मरण करूं नकोस, मला दोष देऊं नकोस, किंवा तुला मी देणार नाहीं. मीं सुमाल्याला यौवराज्याभिषेक केला आहे. कांहीं दिवसपर्यंत आतां त्याच्याच हातून अमात्य राक्षस आणि सेनापति भागुरायण यांच्या तंत्रानें राज्यकारभार चालविण्यास त्याला सांगणार आणि तुझ्या सहवासांत ते दिवस घालविणार. मग तर झालेंना?" इतकें मुरादेवीला उद्देशून बोलून त्यानें तिला आपल्या पोटाशीं धरलें, आणि तिचे अश्रु पुसून तिचें समाधान केलें आणि पुनः अर्धवट आपल्याशीं 'व अर्धवट मुरादेवीला उद्देशून तो म्हणतो, "काय चमत्कारिक योग आहे पहा! ज्या वेळीं मी लवकर आपल्यावर कांहींतरी अरिष्ट येणार अशा भीतिपूर्ण विचारांत होतों, त्याच वेळीं तसें कांहीं न होतां 'जिची आजपर्यंत विनाकारण उपेक्षा केली अशा प्रियेचा मला पुनः लाभ होतो! तें माझें मघांचें औत्सुक्य कोठें गेलें? अशा विलक्षण मनःस्थितीवर भरंवसा ठेवून किती बिचारे प्राणी फसत असतील! आणि शेवटीं त्या औत्सुक्याचें आनंदांत पर्यवसान झालें म्हणजे त्यांना माझ्यासारखा आनंद होत असेल; प्रिये मुरे, अशा तऱ्हेनें फसलें तर किती तरी बरें, नव्हे?"

मुरा कांहीं चमत्कारिक तऱ्हेनें हंसली आणि एकीकडे पाहून तिनें कपाळास आंठ्या घातल्या.

# प्रकरण ८ वें.

## दुसरें पाऊल.

मुरादेवीनें आपल्या परिचारिकेबरोबर सहजगत्या पत्र पाठविलें, त्याचा परिणाम इतका सुखावह होइल असें इतरांस तर काय, परंतु खुद्द परिचारिकेस व मुरादेवीसही वाटत नव्हतें. ती पत्रिका पोंचविणारी परिचारिका वृंदमालाच होय. दोनच दिवसांपूर्वी हीच वृंदमाला आपल्या स्वामिनीच्या वर्तनाबद्दल चिंतामग्न होऊन वसुभूतीकडे विचार विचारण्यासाठीं गेली होती. त्या वेळीं वसुभूतीनें तिला तूं माझी व तुझ्या स्वामिनीची कशी तरी एकवार गांठ घालून दे, मग पुढचें सर्व कांहीं मी जुळवितों असें म्हटलें होतें. आणि त्याप्रमाणें दुसरे दिवशीं वसुभूतीची व आपले स्वामिनीची भेट कशी करवावी या विचारांत ती गढून गेली होती. तिनें आपल्या मनांत अशी योजना केली होती कीं, सोमवारीं मुरादेवी कैलासनाथाच्या दर्शनास आली, म्हणजे आपण तिला कांहीं तरी करून वसुभूतीला भेटवावें. आणि तशी एकवार भेट झाली, म्हणजे भगवान् वसुभूति सर्व कांहीं यथास्थित करतील. अशा विचारांत ती असतां तिची यजमानीण अर्थातच निराळ्या विचारांत होती. आपलें सूड उगविण्याचें काम यथास्थितपणें पार पाडण्यास आपण काय केलें पाहिजे आणि त्याचा उपक्रम कसा केला पाहिजे, यासंबंधानें ती एकसारखा विचार करीतच होती. अर्थातच पहिलें काम म्हणजे राजाचें व आपलें दर्शन आणि संभाषण झालें पाहिजे हें होय. तें कसें घडावें ही विवंचना. आपण होऊन एके दिवशीं उठून जावें, आणि राजासमोर उभें रहावें तर तें एक तर शक्यही नव्हे, आणि इष्टही नव्हे; कारण एक तर आपण सर्व लज्जा सोडून राजसभेंत किंवा महाराज जेथें कोठें बसले असतील तेथें जावें कसें? बरें यदाकदाचित् आपण गेलों तरी आपला अपमान होणार नाहीं म्हणून तरी कसें म्हणावें? आणि असा आपला अपमान झाला तर मग पुढे काय होणार? आपला अपमान खुद्द महाराजांनीं जरी केला नाहीं, तरी सपत्नीजनांकडून व त्यांच्या पक्षाच्या मंडळीकडून खाचित होणार. तेव्हां आपण आपलें स्थान सोडून जाऊन आपला कार्यभाग कधींच होणार नाहीं. आपण जर जागचें हलावयाचें नाहीं, तर दुसरा उपाय महाराजांनीं आपणास सहजगत्या कोठेंतरी पहावयाचें. परंतु तेंही सध्यांच्या स्थितीला शक्य नाहीं. इतर सर्व सपत्नींनीं आपणास बहिष्कृत केलेलें

तेव्हां त्यांच्यामध्यें आपणास मिसळण्यास कसें सांपडणार? आणि तसें मिसळण्यास सांपडलें नाहीं, तर अकस्मात् महाराजांच्या नजरेस पडून आपण आपला इष्टार्थ साधूं हेंही अर्थातच अगदीं अशक्य. तेव्हां इष्टार्थ साधण्यास तिसरा मोठा उपाय म्हणजे धाडस करून खुद्द महाराजांसच एक पत्र लिहावयाचें आणि तें पत्र आपल्या परिचारिकेबरोबर पाठवून स्वतः महाराजांच्या हातीं जाईल अशी व्यवस्था करावयाची. तें पत्र गेलें तरच आपल्या हेतूप्रमाणें कांहीं घडलें तर घडण्याचा संभव; नाहीं तर मुळींच संभव नाहीं. या संभवाप्रमाणें जर कांहीं झालें तर उत्तमच. नाहींपेक्षां गेल्या सतरा वर्षांत जी आपली स्थिति होती तिच्यापेक्षां कांहीं अधिक वाईट अशी स्थिति तरी होणार नाहीं. असा पक्का विचार करूनच तिनें वृंदमालेजवळ मागें दिलेलें पत्र देऊन तें मुकाट्यानें राजाकडे पोहोंचतें होईल असें करण्यास सांगितलें. एकदम आपण कोण आणि कोणाकडून आलों हें न सांगतां मोघम "देवीची परिचारिका" आणि "देवीनें महाराजांस दिलेलें पत्र घेऊन आलें आहें" असें प्रतिहारी वेत्रवती व कंचुकी वगैरेंस सांगण्यास सांगितलें. हेतु हा कीं, "देवी" या मोघम शब्दानें राजाच्या मनांत "मुरादेवी" मुळींच न येतां आपल्या सुमाल्याची आई मनांत यावी आणि त्यानें मोठ्या उत्सुकतेनें पत्र उघडावें. एकवार पत्र उघडलें व आपलें लिहिणें राजाच्या दृष्टीस पडून त्यानें वाचलें, म्हणजे मग पुढें आपल्या नशिबांत असेल तसें होईल. असा एकंदर दूरवर विचार करून तिनें वृंदमालेस चांगल्या प्रकारें पढवून तें पत्र देऊन पाठविलें होतें. आपण आंत कांहीं भलतेंच लिहिलें असेल असें वृंदमालेस वाटून वृंदमालेनें मधल्यामधेंच पत्र ठेवूं नये, म्हणून आंतील मजकूर तिनें वृंदमालेस स्पष्टपणें दाखवून तिला असें भासविलें कीं, झाल्या गोष्टीबद्दल आपणास खरोखर पश्चात्ताप झाला असून आपण महाराजांजवळ निव्वळ क्षमा मागण्यासाठींच एवढा खटाटोप करीत आहों. पहिला आपला सूड उगविण्याचा आणखी तसेंच दुसरे वेडेवांकडे विचार पार नाहींसे झाले.

या हिच्या पत्रापासून कांहीं चांगलें निष्पन्न होईल असें कांहीं वृंदमालेस वाटलें नाहीं. पण त्यांत कांहीं कपटनाटक आहे, असेंही तिला वाटलें नाहीं. झालेंच कांहीं तर बरें होईल. असा विचार करून वृंदमालेनें तें पत्र मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें महाराजांच्या हातीं जाण्याची तजवीज केली. त्यापासून काय निष्पन्न झालें तें वाचकांस माहीत आहेच. वृंदमालेनें आपलें नांव राजवाड्यांत सांगितलें नाहीं. नुसती देवीची परिचारिका, एवढ्यावरच भागवून तिनें कार्यभाग उरकला. पत्रामुळें महाराजांच्या वृत्तींत असा फरक पडून ते येतील हें तिला संभवनीय वाटलेंच नाहीं. अर्थात् जें आपण असंभवनीय म्हणतों, तेंच प्रत्यक्ष घडलेलें पाहिलें म्हणजे आपल्यास किती तरी आश्चर्य वाटतें! तशीच बिचाऱ्या वृंदमालेची स्थिति झाली. राजा धनानंद मुरादेवीच्या आमंत्रणाप्रमाणें आला इतकेंच नव्हे, तर त्या रात्रीं भोजनादि सर्व विधि तिच्याच महालांत करणार व कांहीं दिवस आपण तेथेंच राहणार अशी त्यानें जिकडे तिकडे द्वाही फिरविली. त्याबरोबर सगळ्या अंतःपुरांत आश्चर्य, खेद आणि त्वेष या विकारत्रयीचें वर्चस्व झालें. सुमाल्यासुद्धां राजास आठ पुत्र होते, ते सर्व एकाच स्त्रीच्या उदरीं जन्मलेले नव्हते. अर्थातच त्या सर्व मुलांच्या मातांना मुरादेवीचें हें दैव एकदम कसें उघडलें याबद्दल आश्चर्य वाटलें.

नंतर आजपर्यंत जिचें त्यानें नांव टाकलें होतें, तिच्या महालांत जाऊन त्यानें कांहीं दिवस वसति केली हें ऐकून त्यांस खेद झाला; आणि असें होण्याला त्या दुष्ट मुरेनें कांहीं तरी मांत्रिक उपाय केले असावेत, हिला असेच आपले उपाय योजूं दिल्यास ती आपणा सर्वांचें उच्चाटन करील, असें मनास वाटून जिला तिला द्वेष आला. आधींच मुरादेवीबद्दल सर्वजणींच्या मनांत दीर्घ द्वेष आणि त्यांत आतां तिनें आपणा सर्वांना राजाच्या प्रेमांतून दूर सारून त्याच्या मनावर आपलें साम्राज्य केलें असें जिला तिला वाटलें. मग काय विचारतां ! हें झालें कसें काय ? याबद्दल जिकडे तिकडे चौकशा सुरू झाल्या आणि कंचुकी, वेत्र-वती व प्रतिहारी यांनीं कांहीं तरी आंतून कपट केलें असावें, असें स्त्रीजनांना वाटून त्यांच्यावर सर्वांच्या शिव्याशापांचा भडिमार सुरू झाला. आपण धनानंद राजाकडे जी पत्रिका दिली, ती मुख्य देवीकडून आलेली अशा समजुतीनें दिली असें त्या तिघांनींही सांगितलें; परंतु तें कोणास खरें वाटतें ? लबाडी करून मुरेनें पत्रिका पाठविली, म्हणून तिजवर आणि तिच्या कारस्थानांत शिरून ती पत्रिका राजाच्या हातीं पोहोंचविली म्हणून त्या तिघांवर सर्वांचा रोष झाला आणि जिकडे तिकडे अंतःपुरांत जळफळाट सुरू झाला. बिचाऱ्या वृंदमालेला तर आतां अगदीं फारच चमत्कारिक झालें. आपल्या स्वामिनीला बरे दिवस आले, म्हणून आनंद करावा कीं आपला व तिचा इतरांकडून अत्यंत द्वेष होऊं लागला आहे म्हणून दुःख करावें, हेंच तिला समजेनासें झालें; तथापि आपल्या स्वामिनीला सुखांत पाहून तिला खरोखर आनंदच झाला. तिच्या सपत्नीजनांनीं तिचा द्वेष केला तरी तो फार दिवस टिकणार नाहीं, चार दिवसांनीं सर्व मंडळी तें सर्व विसरून जशा इतर चार राजमहिषी आहेत तशीच तीही एक आहे, असें समजूं लागतील असें तिला वाटलें.

कांहीं मनुष्यांचा स्वभाव असा असतो कीं, जों जों त्यांस चिडवावें, तों तों त्यांचें तेज अधिकाधिक प्रज्वलित होतें; त्यांना स्वीकृत कार्यांत जा जों विघ्नें उपस्थित व्हावीं तों तों त्या विघ्नांना दूर सारून आपलें कार्य करून घेण्यासाठीं त्यांचा उत्साह अधिकाधिक वाढत जातो. मुरादेवी अशाच प्रकारची स्त्री होती; किंवा सतरा वर्षांच्या बंदिवासानें तिच्या मनाची स्थिति अशी झाली होती. आपल्या पतीचें मन आपण आपल्या स्वाधीन करून घेण्यास्तव केलेल्या प्रयत्नांत अगदीं अनपेक्षितपणें आपल्यास यश आलेलें पाहून तिला जितका आनंद झाला, त्याच्यापेक्षां दुप्पट आनंद त्या आपल्यास मिळालेल्या यशानें आपल्या सपत्नींना वाईट वाटूं लागलें व त्या आपला हेवा करूं लागल्या म्हणून झाला; परंतु या आनंदानें ती फुगून गेली नाहीं. तिनें आपलें मस्तक अगदीं शांत ठेविलें होतें. न जाणो, जितक्या अनपेक्षित-पणें आपल्याला हा आनंद प्राप्त झाला आहे तितक्याच अनपेक्षितपणें तो आपल्यापासून नष्टही होण्याचा संभव आहे, हें ती पूर्णपणें जाणून होती. आणि जर का आपण मिळ-विलेला हा प्रसंग घालविला, तर पुनः आपलें डोकें वर काढण्यास आपल्यास मुळींच जागा मिळणार नाहीं. तेव्हां आपण महाराजांच्या मनावरलें आपलें सध्यांचें साम्राज्य क्षणो-क्षणीं दृढ करण्याकरितांच झटलें पाहिजे; स्वस्थ बसून उपयोग नाहीं, असें ती आपल्या मनाशीं पक्कें समजून होती.

धनानंदराजाच्या मर्जीचा कल पाहून ती प्रत्येक गोष्ट करी. प्रत्येक शब्द बोलावयाचा,

तो त्याच्या मनाची प्रवृत्ति पाहून बोले. अमुक एक भाषण या वेळीं नको, तर तें तितकेंच ठेवी; इतकेंच नव्हे, तर वेळ पाहून त्याच्या उलटसुद्धां बोले. इतर सपत्नी आपला अत्यंत द्वेष करताहेत असें त्याच्या दर्शनास आणण्याला जेवढे म्हणून उपाय योजावयाचे तेवढे योजी, परंतु आपण त्यांच्याबद्दल एक अक्षरसुद्धां वांकडें बोलत नसे. एके वेळीं तर तिनें फारच चातुर्याची रचना केली.

धनानंद पलंगावर पडला होता आणि ही त्याची चरणसेवा करीत होती. राजास झोंप लागलेली नाहीं हें तिला पक्कें ठाऊक होतें. आणि तें जाणूनच तिनें एका दासीस आपल्याला कांहीं येऊन सांगण्यास सांगितलें होतें. ती दासी जवळ येऊन उभी रहातांच मुरादेवी अगदीं हलक्या आवाजानें परंतु अगदीं त्रासून त्या दासीच्या खस्कन् अंगावर येऊन म्हणते, "काय ग ए मूर्खे, महाराजांचा आतां कुठें डोळा लागला आहे, हें तुला ठाऊक नाहीं ? केवढ्यानं पाय वाजवीत आलीस ? काय एवढं मला सांगायचं होतं तुला ? येऊन जाऊन आज अमुक देवींनीं असं केलं, आणखी त्यांच्या परिचारिकेनं तसं म्हटलं, असलीं गाऱ्हाणींच कीं नाहीं ? जा, ही वेळ नव्हे असलीं गाऱ्हाणीं ऐकायची. आणखी मला मुळीं तीं गाऱ्हाणीं ऐकायला नकोतच. त्यांनीं मला अगदीं बंदिवासांत टाकून देववली होती, आणखी आतां महाराजांनीं माझा पुनः अंगिकार केला, तेव्हां त्यांना तें कसं बरं चांगलं वाटणार ? त्या माझं अहित चिंतणारच; पण मी कांहीं त्यांचं एक क्षणभरसुद्धां अहित चिंतीत नाहीं. आपल्या पतीनं आपला त्याग केला, म्हणजे पतिव्रतांची काय अवस्था होते, याचा अनुभव त्यांना नसला, तरी मला चांगला आहे. तसा प्रसंग त्यांना यावा असं माझ्या मनांत कधीं कध्धीं सुद्धां यायचं नाहीं. उलट महाराजांना थोडे दिवसांनीं मी आपण होऊनच म्हणेन कीं, 'महाराज, मला सुख देण्यासाठीं आपण माझ्या इतर सपत्नींना असुखी करूं नका.' जा कशी तूं. मला कांहीं सुद्धां सांगूं नकोस. वेडी कुठली ! माझ्या सपत्नींच्या द्वेषानं मी रागावेन आणखी आपल्या मनाला रिकामं दुःख करून घेईन असं का तुला वाटतं ? "

तथापि ती दासी हळूच मुरेस म्हणाली:—"देवी, आपल्याला राग आणावा म्हणून कांहीं मी सांगायला आलें नाहीं. कांहीं गोष्टींत आपण मन घातलें नाहीं, तर कांहीं तरी भयंकर परिणाम होतील असें वाटण्याजोगें मीं कांहीं ऐकलें म्हणून एवढ्या घाईघाईनें मी आलें आहें. महाराज निजले आहेत, हें एक बरेंच आहे म्हणायचें."

तें ऐकतांच मुरादेवी अत्यंत उत्सुक अशा स्वरानें म्हणते, "असं तूं काय ऐकलंस ? लवकर सांग ! महाराजांनीं ऐकूं नये असं काय बाई असायचं ?"

"देवी," ती दासी पुढें म्हणते, "महाराजांच्या कानीं पडूं नये असेंच कांहीं तरी आहे. फार भयंकर आहे. आपल्यावर इतर सगळ्या देवींचा रोष म्हणून महाराजांच्या सुद्धां जीवाला बरंवाईट करण्याचा त्यांचा हेतु दिसतो; पण बाई महाराजांना खरोखरीच झोंप लागली आहेना ? नाहीं तर एक करतां एक व्हायचं !"

"नाहीं. नाहीं. कांहीं व्हायचं नाहीं. महाराजांना गाढ झोंप लागली आहे. तूं सांग. पण कांहीं जरी असलं, तरी माझ्या जीवांत जीव आहे, आणखी महाराज माझ्या महालांत आहेत, तोंपर्यंत मी त्यांच्या केंसाला तरी धक्का लागूं देईन का ? माझा पुनः त्याग करून ते दुसरीकडे गेलेच, तर मी तरी काय

करणार ? बरं मग सांग कीं काय तें. तुझ्या त्या मोघम बोलण्यानं माझ्या बाई जीवाचा अगदीं थरकांप होऊन गेला आहे. ”

इतकें भाषण झाल्यावर ती दासी मुरादेवीच्या अगदीं जवळ आली व तिच्या कानांत कांहीं कुजबुजली. त्याबरोबर मुरादेवीनें आपलें तोंड एकदम कावरेंबावरें केलें आणि जणूं काय महाराज निजले आहेत हें तिच्या ध्यानींही नाहीं अशा प्रकारें एकदम मोठ्यानें म्हणते, “ काय मेलं, म्हणतेस तरी काय ? माझ्याविषयीं त्या सगळ्याजणींच्या मत्सराची इथपर्यंत का आतां मर्यादा आली ! नष्टे, तूं कांहीं तरी मला येऊन सांगते आहेस. चल, जा इथून, नीघ. क्षणभर सुद्धां इथें उभी राहूं नकोस. वेड्या कुठल्या, कांहीं तरी ऐकतात आणखी माझ्याजवळ येऊन सांगतात. हें जर खरं असलं, तर आतां या वेळेपासून महाराजांना खायला ठेवलेला एक सुद्धां पदार्थ मीं खाऊन पाहिल्याखेरीज त्यांना खाऊं द्यायची नाहीं. होतां होईतों प्रत्येक पदार्थ मी आपल्या हातानं करून त्यांना घालीन. छे. छे. छे. मत्सराचा कडेलोट असा होईल, हें माझ्या स्वप्नींसुद्धां नाहीं बाई ! काय करूं आतां ! ”

इतकें बोलून तिनें अंगावर शहारे आल्याप्रमाणें अंग हलविलें व एक दीर्घ उसासा टाकून स्वस्थ बसली. जणूं काय या भयंकर संकटांतून आपण आतां महाराजांस कसें निभावून नेऊं; अशी तिला मोठी काळजी पडून तींतच ती निमग्न झाली.

धनानंदराजास झोंप लागली नव्हती हें वाचकांनीं ताडलेंच असेल. दासीचें व मुरादेवीचें जें संभाषण झालें, तें त्यानें इत्थंभूत ऐकिलें. प्रथमतः ती दासी आंत येण्याबरोबर व ‘ महाराज जागे नाहींत हें एक बरेंच झालें ’ असें म्हटलेलें त्याच्या कानीं पडल्याबरोबर आपण उठून बसावें, अगर आपण जागे आहोंत असें दाखवावें असें त्यास वाटलें; परंतु पुढच्याच क्षणीं आपण यांचें बोलणें काय होतें, आपण ऐकूं नये असें त्यांत काय आहे तें ऐकून घेऊन मग शेवटीं उठावें, असा त्यानें विचार केला; आणि आपल्यास झोंप लागली आहे, असें अधिकच भासविण्याचा प्रयत्न केला. मुरादेवी फार चतुर, तिनें तें जाणलें, आणि त्यामुळें तर तिला फारच आनंद झाला. आपला व्यूह चांगला रचला गेला. आणि त्यांत आपल्यास सिद्धिही पण मिळणार, असें तिला खात्रीनें वाटूं लागलें. राजानें त्या दोघींचें सर्व बोलणें ऐकलें. मात्र सुमतिका दासी मुरादेवीच्या कानांत काय कुजबुजली तें त्यास समजलें नाहीं. आणि त्यामुळें तर त्यास अत्यंत [illegible]कता झाली. पुढें त्यावरून मुरादेवीनें जे आवेशाचे उद्गार काढले, त्यांनीं तर त्याच्या मनाचें औत्सुक्य अतोनातच वाढलें. सुमतिका तेथून निघून जाण्याचा व मुरादेवी शहारे आणल्यासारखें करून व दीर्घ उसासा टाकून बसण्याचा अवकाश, राजा धनानंद एकदम उठून बसला व त्यानें मुरादेवीस घट्ट मिठी मारून विचारलें, “ प्रिये मुरे, सुमतिकेचा आणखी तुझा संवाद झाला, तो मीं सगळा ऐकला; पण तिनें तुझ्या कानांत काय सांगितलें तें ऐकलें नाहीं. तेवढें मला सांग. ”

‘ राजानें जें ऐकूं नये तें ऐकलें, आतां काय होईल कोणास ठाऊक ’ असें वाटून अत्यंत घाबरून जाऊन आपण थरथरा कांपूं लागलों आहों असें तिनें दाखविलें, आणि त्या कांपऱ्या कांपऱ्या आवाजानेंच ती राजास म्हणतेः—

“ आर्यपुत्रा, तें आपण मला विचारूं नये, आणखी मीं आपल्याला सांगूं नये. ”

“ कां बरें ? तें काय होतें तें माझ्याच-

बद्दल होतेंना ? तर मग मीं ऐकल्यानें बरें होईल कीं वाईट ? "

" कोण जाणें कसं होईल ? तें ऐकल्यावर आपलं चित्त शांत राहिलं आणि जें काय करायचं, तें आपण शांतपणें केलं तर बरं होईल; नाहीं तर फार भयंकर प्रकार होईल. कांहीं जरी झालं, तरी मी तोंडानं कांहीं तें आपल्याला सांगणार नाहीं. तें जर सगळंच खोटं असलं, तर विनाकारण माझ्यावरच भलताच आरोप यायचा कीं नाहीं ? आपणच सांगा. "

" कांहीं नाहीं. तुझ्यावर काय यायचं आहे ? कांहीं तूं बनवून सांगते आहेस थोडंच ? "

" तें खरं पण बाई मला भय वाटतं. "

" कांहीं नाहीं भय. सांग काय असेल तें. "

" आपली आज्ञाच असेल तर सांगतें "

" हो. हो. माझी आज्ञा आहे म्हणूनच सांग, मग तर झालं ? "

" सांगतें. माझं काय जातं ? "

असें म्हणून तिनें त्यास काय तें सांगितलें. धनानंदाचे डोळे इंगळाप्रमाणें लाल झाले

# प्रकरण ९ वें.

## पत्रवाचन.

चाणक्य आणि वसुभूति यांचा परिचय चांगलाच होत चालला. वृंदमाला रोज रात्रीं–निदान एक दिवसा दोन दिवसांआड तरी वसुभूतीकडे येऊन आपल्या स्वामिनीची हकीकत सांगे आणि चाणक्यही त्या वेळीं जवळ बसून ऐकून घेण्याची संधि वांयां जाऊं देत नसे. वृंदमालेचा तर त्याच्या ठिकाणीं पुरता लोभ जडला; आणि वसुभूतीलाही त्याच्याबद्दल आदर उत्पन्न झाला. कोणा तरी श्रेष्ठीकडून मी तुझा राजसभेंत प्रवेश करून देईन, असें वसुभूतीनें चाणक्यास आश्वासन दिलें, परंतु चाणक्यानें त्यास सध्यां आपण त्या पंचाइतींत पडूं नका असें सांगितलें. कारण राजसभेंत आपण एकदम गेल्यानें कदाचित् आपणास कोणी ओळखतील, आणि तसें जर कोणीं ओळखलें, तर आपला हेतु एकीकडेच राहून भलतेंच कांहीं-तरी होईल; तेव्हां सध्यां आपण दुरूनदुरूनच काय होतें तें पहावें आणि नंतर योग्य वाटेल तेथें प्रवेश करावा असा त्यानें विचार केला. होता. राजसभेंत प्रवेश करून घेण्याची त्याची मुळींच इच्छा नव्हती. राजसभेंत प्रवेश करून घेऊन आपल्या विद्वत्तेचें प्रदर्शन करून राजाश्रय मिळवावयाचा हा त्याचा हेतु नव्हता, हें सांगणें नकोच. मुरादेवीची भेट घेऊन तिला आपल्या अंकित करून घ्यावयाची हाच काय तो त्याचा आतां हेतु. परमेश्वराच्या मनांतून आपल्याला यश द्यावयाचें व आपली प्रतिज्ञा पूर्ण करावयाची

असें दिसतें असें त्याला पक्कें वाटलें, आणि सध्यांपुरतें तरी निदान पुढें काय काय करावयाचें त्याबद्दलचा त्याचा विचार कायमचा ठरला. राजाचा व त्याच्या कुळाचा उत्खात करून त्याच्या जागीं चंद्रगुप्ताला बसविण्यास जे काय उपाय योजावयाचे त्यांतला पहिला उपाय अर्थातच राजगृहांत भेद उत्पन्न करावयाचा हा होय. तो भेद उत्पन्न करण्याला अगदीं उत्तम साधन आपल्याला परमेश्वरानें साधून दिलें आणि त्यावरून आपल्याला स्वीकृत कार्यांत यश येणार असें स्पष्टपणें दाखविलें असें त्यास वाटलें. तेव्हां आतां आपण आपला जो काय प्रयत्न करावयाचा तो मात्र सोडतां कामा नये हें उघडच झालें. पाटलिपुत्रांत आल्याबरोबर कोणत्या मार्गानें प्रयत्न करावा याबद्दल जी आपल्याला मुख्य काळजी असावयाची, तीच जर नष्ट झाली, आयतेंच ताट वाढून ठेवल्याप्रमाणें आपल्याला हें मुरादेवीचें साधन लाभलें आणि आतां आपण त्या साधनाचा लाभ करून घेऊन नीट उपयोग केला नाहीं, तर त्यांत दोष कोणाचा? असा विचार करून त्यानें मुरादेवीची भेट घेण्यास काय उपाय योजावा याचा विचार चालविला. मुरादेवी दर सोमवारीं कैलासनाथाच्या दर्शनासाठीं येते तेव्हां कांहीं तरी युक्ति करून तिचें दर्शन घ्यावें, असें त्याला सिद्धार्थकानें सुचविलें होतें. परंतु तसल्या भेटीचा मुळींसुद्धां उपयोग नाहीं. आपल्याला तिची भेट पाहिजे. ती अगदीं निराळ्या प्रकारानें पाहिजे. तशी भेट झाली तरच आपलें कार्य होणार, नाहीं तर होणार नाहीं हें तो जाणून होता. म्हणून त्यानें कैलासनाथाच्या मंदिरांत तिची भेट घेण्याबद्दल कांहीं प्रयत्न केला नाहीं; अगदींच निराळ्या मार्गानें तिची भेट घेण्याला त्यानें उपाय योजिला.

एके दिवशीं रात्रीं वृंदमाला वसुभूतीकडून लवकर उठली आणि आपल्या राजमंदिराकडे जाण्यास निघाली. चाणक्य तिच्याबरोबर तेथून उठला आणि नित्याप्रमाणें आपल्या कैलासनाथाच्या मंदिरांत जाण्याच्याऐवजीं वृंदमालेबरोबर बोलत बोलत जाऊं लागला. "माझा परिचारक मजबरोबर आहे, आपण कशाला आतां रात्रीचा त्रास घेतां!" असें वृंदमालेनें त्याला म्हटलें; परंतु "कांहीं हरकत नाहीं. मला अद्यापि निद्रा येत नाहीं, आणखी कांहीं गोष्ट तुला सांगायचीही आहे म्हणून मी तुझ्याबरोबर यतों आहें." असें चाणक्यानें उत्तर देऊन तो तिच्याबरोबर चालूं लागला. आज इतक्या दिवसांनीं गुप्तपणें आपणास काय बरें हा सांगणार असें वाटून वृंदमाला आपल्याशींच विस्मय करूं लागली.

थोडा मार्ग गेल्यानंतर चाणक्य वृंदमालेस म्हणतो, "वृंदमाले, आजपर्यंत तुला मीं कोण, कुठला, वगैरे कांहीं सांगितलें नाहीं; परंतु आज तें सांगतों. मी किरातराजाकडून कांहीं कार्याकरितां आलों आहें-किंवा होतों म्हटलें तर विशेष शोभेल. कारण आतां तें कार्य कांहीं राहिलं नाहीं असं दिसतं. तरी पण मुरादेवीची भेट घेऊन तिला मी कोण, काय, कशाकरितां आलों आणखी किरातराजानं मला कां पाठविलं हें सांगून तिचा निरोप घेऊन गेलं पाहिजे. तेव्हां मी एक पत्रिका देईन, तेवढी तिला पावती करशील तर पहा. वृंदमाले, आपल्या भगिनीचा अशा प्रकारानं छळ झालेला पाहून किरातराजाला फार वाईट वाटत होतं हें काय सांगायला पाहिजे? परंतु राजा धनानंद फार बलाढ्य आणि आपण यःकश्चित्. तेव्हां त्याच्याशीं आतां त्यासंबंधानं कलह उत्पन्न करून काय उपयोग? असं मनांत येऊन त्यानं आजपर्यंत

फारसा प्रयत्न केला नाहीं. परंतु मुरादेवीची आई मायादेवी हिला स्वस्थ कसं बसवतं ? ‘ आज इतकीं वर्षं स्वस्थ बसलास तर बसलास; परंतु आतां तरी निदान कांहीं उपाय योजून तूं आपल्या भगिनीला त्या दुष्ट राजाच्या बंदिवासांतून सोडवून इकडे आण. माझा वृद्धापकाळ झाला. तिला पाहिल्याखेरीज मला राहवत नाहीं, ’ असं तिनं प्रद्युम्नदेवाला सांगितलं तेव्हां इकडील एकंदर स्थिति काय आहे, आपण मुरादेवीला सोडविण्याचा प्रयत्न केला तर यश येईल किंवा नाहीं, याची माहिती मिळविण्यासाठीं त्यानं मला इकडे पाठविलं. सुमाल्याला यौवराज्याभिषेक होणार आहे, तेव्हां सर्व लहानमोठ्या मांडलिकांना आमंत्रणपत्रं—आमंत्रणपत्रं कसलीं ? आज्ञापत्रंच तीं—धनानंदाकडून गेलीं. त्यांत प्रद्युम्नदेवालाही एक अर्थातच गेलं. तें मायादेवीला कळलं, तेव्हांपासून तर मायादेवीची चित्तवृत्ति फार विलक्षण झाली. आणि ती प्रद्युम्नदेवाच्या फारच पाठीस लागली कीं, कसेंही करून मुरेला सोडवून घेऊन ये. पण विचारा प्रद्युम्नदेव काय करणार ? तो आतां केवळ नामधारीच किरातराजा आहे. तथापि आपल्या बहिणीच्या मुलाला जो अभिषेक व्हायचा तो भलत्यालाच होतो आहे आणि त्याच्या उत्सवाप्रीत्यर्थ आपण जायचं, हें बरं नव्हे असं वाटून व मायादेवीनेंही त्याला तूं जाऊं नको असंच सांगितल्यावरून तो इथें आला नाहीं. मात्र तो समारंभ झाला असं कळल्यानंतर इथली एकंदर स्थिति जाणण्यासाठीं त्यानं मला पाठविलं. सुमाल्याच्या यौवराज्याभिषेकाप्रीत्यर्थ मुक्त केलेल्या बंदिवानांत आपल्या भगिनीलाही मुक्त केलं असेल, आणि राजानं तिला पुनः आपल्याजवळ केलं असेल हें त्याच्या स्वप्नींही नाहीं; परंतु आतां तुझ्या सांगण्यावरून ही अशी स्थिति आहे, तेव्हां मला इथें राहून अधिक चौकशी करण्याचं कांहींच कारण नाहीं. वृंदमाले, तुझ्यापेक्षां आणखी कोणाजवळ मी काय चौकशी करणार ? हें सर्व कळल्यावर मी तसाच गेलों असतों, परंतु प्रद्युम्नदेवानं मला जर विचारलं कीं, तूं मुरादेवीला भेटून तिचं सुखस्वास्थ्य प्रत्यक्ष तिला विचारून आलास का ? तर मी उत्तर काय देणार ! म्हणून तुला आज एकीकडे गांठलं, आणखी ही माझी खरी खरी हकीकत सांगितली. तेव्हां उद्यां मी पत्रिका देईन ती तूं आपल्या स्वामिनीला दे, आणखी तिनं मला आपल्या दर्शनाला बोलावलं, तर मी नेमल्या वेळीं तुझ्याबरोबर येऊन तिची भेट घेईन, प्रद्युम्नदेवाला आणखी मायादेवीला तिचा कांहीं निरोप असला तर तो ऐकेन, आणि पुनः आपला परत जाईन. ”

चाणक्याचें हें लांबलचक भाषण चाललें असतां वृंदमाला अगदीं मुकाट्यानें ऐकत होती. इतके दिवस या ब्राह्मणानें आपल्यास हें कांहीं सांगितलें नाहीं, याबद्दल तिला फार आश्चर्य वाटलें; परंतु आजपर्यंत आपल्याशीं बोलून बोलून त्यांत मिळालेल्या माहितीचा उपयोग करून चाणक्यानें हा कांहीं तरी बनाव बनविला आहे असें तिच्या स्वप्नांत सुद्धां आलें नाहीं. यानें इतके दिवस आपल्यापासून हें सर्व गुप्त कां ठेवलें, याच्याबद्दल मात्र तिला आश्चर्य वाटलें, आणि ती त्यासंबंधानें कांहीं बोलणार तों चाणक्य जणूं काय तिचा विचार जाणून तिला आणखी म्हणाला, “ वृंदमाले, आज मीं तुला जें काय सांगितलं तें भगवान् वसुभूतीला सांगूं नको हो ! मीं त्याला यांतलं एक अक्षरसुद्धां सांगितलेलं नाहीं. कसं सांगूं ? मी असा असा किरातराजाकडून गुप्त बातमी काढायला आलों आहें, हें सांगूं कसं ? एकाच्या तोंडून दुसऱ्या-

च्या तोंडीं, दुसऱ्याच्या तोंडून तिसऱ्याच्या तोंडीं असं जर तें पसरलं, तर राजपुरुषांच्या कानावर जाण्याचाही संभव, आणि तसं तें एकदां गेलं म्हणजे मग काय? राजाच्या कानावर जाण्यास मुळींच अवकाश नाहीं. आणि राजाच्या कानीं गेलं, म्हणजे मग आमची चांगलीच गच्छंती. धनानंद काय करील आणि काय नाहीं! मला तर त्यानं मगधाच्या बाहेर घालविलंच असतं; परंतु असे हेर पाठवून गुप्त भेद करण्याच्या खटपटींत असतो, म्हणून प्रद्युम्नदेवालाही शासन करण्यासाठीं त्यानं तत्काळ कांहीं तरी योजना केली असती. तुला आपलं सांगितलं कां, तर तूं मोठी स्वामिनिष्ठ, तुझं आपल्या स्वामिनींवर फार प्रेम आणि तिची माझी एकवार भेट झाली, तर ती तुझ्याचयोगानं होणार, म्हणून तुझ्याजवळ आज गोष्ट काढली. कारण आतां मी इथून जाणार. मुरादेवी चांगली सुखांत आहे, तेव्हां आतां विशेष चौकशी काय करायची आहे? एकदां तिला भेटून, तिचं सुख प्रत्यक्ष पाहून, तिचा आपल्या बंधूस व मातेस कांहीं निरोप असला, तर तो घेऊन जावं असा विचार आहे. मी एक पत्रिका लिहून देतों, ती तूं उद्यां घेऊन जाऊन तिला दे, म्हणजे सर्व कांहीं व्हायचं तसं यथास्थित होईल. आपली कन्या पुनः सुखांत पडली असं ऐकलं म्हणजे मायादेवीला आनंद होणार आहे, तिच्या पुत्राचा यौवराज्याभिषेक पहाण्याचं तिच्या नशिबीं तर नाहीं, त्याला काय करायचं!"

चाणक्याच्या वाणींत विशेष मोहकपणा असे आणि वृंदमाला बिचारी अगदीं भोळी. आपल्या यजमानणीला हें सर्व कळलें, मायादेवीकडून व आपल्या बंधूकडून असा असा ब्राह्मण आला आहे हें आपण जाऊन सांगितलें म्हणजे तिला फार आनंद होईल, सध्यांच्या तिच्या आनंदांत आणखी भर पडेल, असें वाटून वृंदमालेला आनंदच झाला. व सुभूतीला या ब्राह्मणानें आतांपर्यंत कांहीं सांगितलें नाहीं, तें बरोबरच केलं असें तिला वाटलें; तथापि "आतां खरी हकीकत त्यांना सांगायला कांहीं हरकत नाहीं, तुम्ही सांगा; त्यांच्याकडून ती फुटायची नाहीं" असें तिनें चाणक्याला म्हटलें, आणि "आपण पत्र दिलं म्हणजे तर देवीला नेऊन देईनच; परंतु आपण सांगितलेला सगळा वृत्तांत आधीं तिच्या कानावर घालीन. आपलं दर्शन होऊन मायादेवी व प्रद्युम्नदेव यांजकडील वृत्तांत कळला, तर मुरादेवीला फार आनंद होईल आणि आपल्याला भेटायला खचित बोलावणं येईल," असें तिनें त्यास आश्वासन दिलें. तें ऐकून चाणक्य मोठ्यानें हंसला व वृंदमालेस म्हणतो, "वृंदमाले, स्वामिनींचं कार्य आणि तुझ्याजवळ त्याजबद्दल गोष्ट काढली मग तें होईल कीं नाहीं याजबद्दल शंका घेईल कोण? खरोखर तुझं मुरादेवीवरलं प्रेम पाहून मला विलक्षण आनंद होतो. वाटतं कीं, परिचारिका असावी तर अशी असावी. परमेश्वर तुला चिरायु करो आणखी शेवटपर्यंत तुझ्या हातून तुझ्या स्वामिनींची सेवा अशीच एकनिष्ठपणें होवो. आतां मी तुझा निरोप घेतों. माझं कार्य झालं असंच मी समजतों. आजपर्यंत तुला मी कोण, काय, कशाला आलों, हें कांहीं सांगितलं नाहीं, किंवा कांहीं दुसरंच सांगितलं असेल, तर त्याजबद्दल राग मानूं नको. माझा नाइलाज होता. मी ज्या कारणाकरितां आलों, तें कारणच असं होतं कीं, आपण कोणाजवळ बोलतों, तें नीट जाणल्यावांचून बोलूं नये. आतां तुझी मला पूर्ण ओळख झाली. शिवाय तुझं आपल्या स्वामिनींवरलं प्रेम खरोखर किती आहे हें पक्कं समजलं; माझं कार्यही

कांहीं राहिलं नाहीं. तेव्हां आतां आज तुला स्पष्टपणें सांगितलं. आतां मी परततों. मुरादेवीची एकवार भेट घेण्यापलीकडे आतां माझं कांहीं कार्य राहिलं नाहीं. तेवढा योग जुळवून आण. मी कां आलों आहें, कसा आलों आहें, हें तूं सांगितलंस म्हणजेच ती मला अगदीं त्वरित बोलावील.आपल्या बंधूकडून व मातेकडून निरोप घेऊन येणाऱ्या मनुष्याला भेटायला कोणती स्त्री उत्सुक होत नाहीं ! जा, आतां मीही जातों. तुझा फार खोळंबा मीं केला."

इतकें बोलून चाणक्य खरोखरीच परतला. आतां पुनः तेंच तेंच बोलत राहिलों, तर वृंदमालेला कदाचित् संशय येईल असें चाणक्यास वाटल. तथापि पुनःएकदां तो तिला मोठ्यानें म्हणतो, " वृंदमाले, मीं सांगितलेला वृत्तांत, आणखी माझा निरोप कोणाच्याही देखत मुरादेवीला सांगूं नकोहो. नाहीं तर मुरादेवीच्या वाड्यावर असलेल्या मंडळींना तिला तिच्या सख्यांच्या सुखशिखरावरून ओढून खालीं पाडायला व तिची स्थिति पूर्ववत् करायला आयतंच शस्त्र सांपडेल. तुला जास्ती सांगायाला नकोच, पण मला आपली तुझ्याबद्दल आणखा देवीबद्दल काळजी वाटते म्हणून पुनः सांगितलं."

इतकें बोलून चाणक्य खरोखरीच तेथून निघून गेला आणि वृंदमाला आपल्या मार्गानें चालली. तिच्या मनांत आता नानाप्रकारचे विचार येऊं लागले. परंतु चाणक्यानें जें काय सांगितलें, तें खोटें असेल, असा संशय तिला मुळींच आला नाहीं. आपण आपल्या स्वामिनीला हा सर्व वृत्तांत सांगितला, म्हणजे तिला किती आनंद होईल, ती आपल्यास काय म्हणेल, चाणक्याची भेट कशी होईल, आणि चाणक्यानें आपल्या पितृगृहाकडील वृत्तांत सांगितला म्हणज त्याचा परामर्ष कसा घेईल याबद्दलचे विचार तिच्या मनांत कांहीं वेळ चालले. नंतर पुनः थाडस भीति उत्पन्न करणारे विचारही तिच्या मनतां उद्भवले. हिच्या बंधूकडून हिला कांहीं निरोप आला आहे, त्याच्याकडून हा ब्राह्मण आला असें कळलें, तर महाराजांचा या ब्राह्मणावर राग होईल, कीं सांप्रत मुरादेवीवर त्यांचें प्रेम पुनः जडत चाललें आहे, तेव्हां याचाही ते आदर करतील असाही प्रश्न तिच्या मनांत उद्भवला. तिला असं वाटलें कीं, राजा धनानंद क्षणिक बुद्धीचा आहे. तेव्हां त्याच्या मनांत कोण्या वेळीं काय विचार येऊन तो काय कृत्य करील याचा नेम नाहीं. करतां आपण चाणक्याबद्दल मुरादेवीजवळ बोलावयाचें तें प्रथमतः कोणी जवळ नसतां गुप्तपणें बोलावें. मग ती आपला काय विचार करावयाचा तो करून कोणास कळवावयाचें किंवा नाहीं तें ठरवील व आपणास सांगेल त्याप्रमाणें करूं. असा विचार करीत करीतच ती रोजच्याप्रमाणें आपल्या स्वामिनीच्या महालांत आपल्या जागीं गेली.

मुरादेवी आतां राजसेवेंत अगदीं दंग होती. आपण राजावर टाकलेल्या मोहिनी अस्त्राचा प्रभाव यत्किंचितही कमी होतां कामा नये, दिवसानुदिवस तो वाढला पाहिजे, आणि आपल्या दुसऱ्या सपत्नीजनाविषयीं त्याच्या मनांत जितका द्वेष उत्पन्न होईल तितका केला पाहिजे, याबद्दल तिच्या मनांत अतिशय काळजी वाटत होती. आणि तसें व्हावें म्हणून जो प्रयत्न म्हणून शक्य, तो करण्याचा तिनें निश्चय केला होता. अर्थातच राजा तिच्या मंदिरांत आल्या वेळेपासून तिनें त्याला आपल्याव्यतिरिक्त म्हणून बसूं दिलें नाहीं. ती नेहमीं त्याच्याजवळ असे. आणि त्याच्यासारख्या लहरी स्वभावाच्या माणसाला आपल्या मुठींत ठेवण्यासाठीं जे कांहीं विविध हावभाव व मोहक चेष्टा करावयाच्या त्या सर्व

तिनें चालू ठेविल्या होत्या. अशी स्थिति असल्यामुळें वृंदमालेस तिच्याजवळ चाणक्याची गोष्ट काढण्यास मुळींसुद्धां अवकाश सांपडेना. तथापि सवडींत सवड साधून तिनें चाणक्याचा निरोप तिला सांगितलाच; पण तसें करण्यापासून कांहीं उपयोग झाला नाहीं. आपल्या पितृगृहाकडील वार्ता घेऊन येणाऱ्या माणसास ती ताबडतोब भेटेल असा जो तिचा अजमास होता तो अगदीं चुकला. वृंदमालेनें सांगितलेली हकीकत ऐकल्याबरोबर मुरादेवीनें एकदम कपाळास आंठ्या घातल्या आणि ती अर्धवट आपल्याशीं व अर्धवट वृंदमालेस म्हणाली, “ इतक्या लवकर कशी बाई दादाला आणखी आईला माझी आठवण झाली ? जा, त्यांना सांग कीं, मी सुखरूप आहें असें सांगा. प्रत्यक्ष गांठ घ्यायला मला कांहीं वेळ नाहीं. ” तें उत्तर ऐकून वृंदमालेला फार आश्चर्य वाटलें. आणि रात्रीं पुनः चाणक्याला तिनें जेव्हां मुरादेवीचें उत्तर सांगितलें, तेव्हां त्यालाही बरेंच आश्चर्य वाटलें; तथापि थोडासा विचार केल्याप्रमाणें करून त्यानें एक भूर्जपत्रावर लिहिलेलें पत्र तिच्यापुढें करून म्हटलें, “ वृंदमाले, कांहीं हरकत नाहीं, पण तूं एवढं माझं पत्र तिच्या स्वाधीन करच. माझी अशी खात्री आहे कीं, हें पत्र वाचतांक्षणींच ती मला भेटायला बोलावल्याखेरीज राहणार नाहीं. ” वृंदमालेनें प्रथम त्यांत कांहीं अर्थ नाहीं असें त्याला म्हटलें; परंतु ती भिडस्त, त्यानें फार आग्रह केल्याबरोबर तिनें तें पत्र घेऊन मुरादेवीच्या हातांत पोहोंचविण्याचें कबूल केलें व दुसरे दिवशीं तें पत्र मुरादेवीच्या हातीं दिलेंही.

तें पत्र मुरादेवीनें त्रासिकपणानें घेतलें. काय कुठलें आणलें आहे असें ती पुटपुटली; परंतु काय चमत्कार ! तें वाचून पाहण्याबरोबर तिची चर्या एकदम बदलली आणि तिनें त्याला भेटण्यास आणण्यास सांगितलें. मग त्या पत्रांत काय असेल तें असो !

# प्रकरण १० वें.

## काय भाषण झालें ?

दमाला फार चकित झाली. आपली धनीण अशा प्रकारें राजसेवेंत निमग्न झालेली असतां चाणक्यासारख्या अनोळखी ब्राह्मणास भेटण्यास वेळ काढील असें तिला मुळींच वाटलें नव्हतें. आणि तें पत्र तिच्या हातीं दिलें तेव्हां मुरादेवीनें जो आविर्भाव केला, तो त्रासिकपणाचाच होता; परंतु पत्र उघडून पाहतांक्षणींच तें सर्व बदललें. तिच्या चर्येवरली त्रासिकपणाची कळा एकदम नाहींशी होऊन चर्या प्रफुल्लित झाली व एक प्रकारची उत्सुकता उत्पन्न झालेली दिसली. अर्थातच चाणक्यानें त्या पत्रांत एवढें काय लिहिलें असावें बरें, असें वाटून वृंदमाला आपल्या स्वामिनीकडे साकांक्ष दृष्टीनें पाहूं लागली, व म्हणाली, “ त्यांना इकडे आणा म्हणतां, परंतु केव्हां आणखी कुठें आणूं ? ” मुरादेवीनें तें पत्र पुनः एकदां वाचलें आणि

पुनः ती वृंदमालेस म्हणाली, " वृंदमाले, हें पत्र लिहिणारा ब्राह्मण तुला कसा व कोठें भेटला ? त्यानं तुला तूं माझी सखी म्हणून कसं ओळखलं ? त्यानं तुला काय सांगितलं ? तो आतां कुठें आहे ? तो पाटलिपुत्रांत केव्हां आला ?........... "

वृंदमालेस वाटलें कीं, आपल्या स्वामिनीचे हे प्रश्न कधीं सरणारच नाहींत. आणि त्या प्रश्नांवरून असेंही पण तिच्या लक्ष्यांत आलें कीं, त्या ब्राह्मणास भेटण्याला मुरादेवी अत्यंत उत्सुक झाली असावी. तेव्हां आतां आपण तिचे सर्व प्रश्न विचारून संपेपर्यंतसुद्धां न थांबतां भराभर उत्तरें देऊन टाकावीं. असा विचार करून तिनें, " हा ब्राह्मण मला आपल्या गुरूच्या घरीं भेटला. तो कैलासनाथाच्या मंदिरांत उतरलेला आहे. माझी आपल्या ठिकाणीं पूर्ण निष्ठा आहे हें पाहून आपला विश्वासही मजवर असलाच पाहिजे असा त्या‍ं सहजच तर्क केला व मला एकीकडे गांठून ही पत्रिका आपल्या हातीं द्यायला सांगितलं. आपण कोण, कोठले व इकडे कां आलों, हें त्यानं मला आधींच सांगितल्यामुळें मींही कांकूं केलं नाहीं. " असें सर्व सांगितलें. तें ऐकून मुरादेवीस आतां समाधान झाल्याप्रमाणेंच दिसलें, व " ब्राह्मणाला भेटायचं तर खास; पण त्याला केव्हां, आणि कसं आणावं, हाच काय तो कठिण प्रश्न आहे. आणखी इकडे महाराज तर आतां मला आपल्यापासून क्षणभर सुद्धां दूर होऊं देत नाहींत. " असें अर्धवट आपल्याशींच व अर्धवट वृंदमालेस ऐकूं जाईल अशा प्रकारें ती पुटपुटली. नंतर वृंदमालेस म्हणते, " त्याला तूं इथें भोजनासच बोलाव—नव्हे आपल्याला रहायालाच बोलावलें आहे असें त्याला सांग. तो येथें यज्ञशालेंतच येऊन राहील, म्हणजे मग वाटेल तशी संधि साधून भेटतां बोलतां येईल. महाराजांना निद्रा लागली म्हणजे मग संधि साधून मी येईन. ब्राह्मण येथें संनिधच असला, म्हणजे मग वेळेची अडचण नाहीं. नियमित वेळ मला कशी सांगतां येणार ? "

मुरादेवी इतकें बोलते आहे, तों महाराजांकडून मुरादेवीस खरोखरीच आमंत्रण आलें आणि ती घाईघाईनें तेथून निघून गेली. मात्र जातां जातां तिनें वृंदमालेस, " मीं सांगितल्याप्रमाणें त्या ब्राह्मणाला येथेंच यज्ञशालेंत येऊन रहायला सांग, " असें बजावून गेली.

आपल्या स्वामिनीची ती आज्ञा ऐकतांच वृंदमाला फार आनंदली. हें एकंदर काय गूढ आहे तें काढण्यास आपल्याला आतां फार चांगली संधि आहे, असें तिला वाटलें. दुसरे दिवशीं लागलींच तिनें चाणक्याकडे जाण्याचा बेत केला आणि त्याप्रमाणें ती गेलीही. वाटेनें जातांना हा सर्व प्रकार आपण वसुभूतीस सांगावा कीं नाहीं, याबद्दल तिच्या मनांत विचार चाललाच होता. चाणक्याची तर सांगी अशी कीं, वसुभूतीस आपण कोण, काय हें सांगूं नये. अशा स्थितींत आपण काय करावें, या विवंचनेंत असतांच ती वसुभूतीच्या विहाराजवळ गेली. या वेळीं तूं इकडे कशी, असें आपणास भगवान् वसुभूतींनीं विचारलें तर आपण काय उत्तर द्यावें असेंहीं तिला वाटलें; परंतु कर्मधर्मसंयोगानें तो प्रसंग तिजवर आला नाहीं. वसुभूति भिक्षेसाठीं नगरांत गेला होता आणि सिद्धार्थकही . विहारांत नव्हता. तेव्हां एक प्रकारचें दडपण मनावरून उतरलेंसें वाटून ती श्रीकैलासनाथाचे मंदिरांत गेली.

आर्य चाणक्य आपलीं प्रातःकर्में करून नुकताच कांहीं विचार करीत बसला होता, इतक्यांत वृंदमाला तेथें जाऊन पोंचली व त्यास म्हणते, " ब्राह्मणश्रेष्ठा, आपल्याला माझ्या यजमानणीनें आपलें सगळें सामान घेऊन.

च तिकडे आपल्या मंदिरांत बोलावलें आहे. तेथेंच यज्ञशालेंत आपली राहण्याची व्यवस्था केली जाईल आणि फुरसत सांपडेल तेव्हां देवी आपल्याशीं गोष्टी सांगायला व तिच्या पितृगृहाचें वृत्त विचारायला येईल. " तें ऐकतांच आर्य चाणक्यानें आश्चर्यचकित झाल्याप्रमाणें दाखविलें. वस्तुतः पहातां त्याला विशेष आश्चर्य वाटलें नाहीं. जें काय आश्चर्य वाटलें तें फक्त आपल्यास तिकडे राहण्यास बोलावलें याबद्दलच होय. आपली भेट मुरादेवी घेईल किंवा नाहीं याबद्दल त्याला मुळींच शंका नव्हती, असें त्या वेळच्या त्याच्या वर्तनावरून दिसलें; परंतु यज्ञशालेंत राहण्यास चलण्याविषयींचा निरोप ऐकतांच, आपल्या अपेक्षेच्याही फार पलीकडे गेलें असें त्यास वाटलें. आणि आतां आपण काय करावें अशी त्यास पंचाईत पडली. ज्या राजाच्या कुळाचा विध्वंस करण्याबद्दल आपण प्रतिज्ञा केली, त्याच राजाच्या मंदिरांत, त्याच्याच यज्ञशालेंत जाऊन, त्याचेंच अन्न खाऊन त्याच्याविरुद्ध कारस्थानें करावयाचीं, हा विचार मनांत येतांच त्याला कसेंसेंच झालें. शिवाय त्याला असेंही वाटलें कीं, आपण प्रत्यक्ष राजमंदिरांत यज्ञशालेंत जाऊन राहिलों तर आपल्याला कोणी तरी ओळखणें अगदीं साहजिक होय. राजसभेंतून आपण राजास शाप देत गेलों, त्यास फार वर्षें झालीं नाहींत. तेव्हां जरी आपल्या प्रतिज्ञांकडे किंवा शापांकडे कोणीं लक्ष्य दिलें नाहीं, तरी आतां आपण अन्य वेषानें प्रत्यक्ष राजमंदिरांतल्या यज्ञशालेंत येऊन राहिलों आहों असें पाहिलें कीं, सहजच कोणासही आपल्याबद्दल शंका येणार. तेव्हां आपल्या स्वतःच्या रक्षणदृष्टीनें आणि आपण जें कार्य करणार, त्याला अनुचित म्हणूनही आपण राजमंदिरांत जाऊन राहूं नये आणि अन्नग्रहण तर मुळींच करूं नये, असा त्यानें आपल्या मनाचा निश्चय केला; परंतु वृंदमालेस उत्तर काय द्यावें तें त्यास सुचेना. शेवटीं त्यानें तिला असें तर सांगितलेंच कीं, " मी आतां तुझ्याबरोबर येत नाहीं. सायंकाळीं येईन. देवीची तेव्हां गांठ पडली तर घेईन आणि पुनः मोठ्या प्रातःकाळीं मी आपला निघून येईन. मला तेथें कायमचें राहणें होणार नाहीं. भगवान् कैलासनाथाचा आश्रय टाकून, दुसरा आश्रय कोणीं पत्करावा ? सायंसंध्यादि विधि झाले कीं, निघेन सुमारें सवाप्रहर रात्रीला, मंदिराच्या द्वाराशीं येईन, तेथें तूं मला भेट आणि कोठें घेऊन जायचें तें घेऊन जा. "

वृंदमालेस वाटलें होतें कीं, आपण मुरादेवीचा निरोप सांगतांच ब्राह्मण अगदीं धांवत मोठ्या औत्सुक्यानें येईल; परंतु तसें न होतां ब्राह्मणानें असा थोडासा निक्षून उलट निरोप सांगितला, तेव्हां तिला फार आश्चर्य वाटलें; परंतु तें तिनें बोलून दाखविलें नाहीं. नुसतें " बरें आहे " असें म्हणून ती चालती झाली.

परत गेल्यानंतर मुरादेवीची व तिची पुनः भेट झाली नाहीं. अर्थातच रात्रीं आर्य चाणक्य आला तर त्याला आणून यज्ञशालेंत बसवून ठेवणें आपलें काम आहे असें समजून तिनें त्याप्रमाणें करण्याची योजना केली. रात्रीं ठरल्या वेळीं आर्य चाणक्य आला व त्यास तिनें यज्ञशालेंत नेऊन आसनादि उपचार करून बसविलें. चाणक्य मुरादेवीची वाट पहात बसला. वृंदमालेनें तो आला असल्याबद्दलचा निरोप मुरादेवीच्या कानावर कसा तरी पोंहोंचविला होता. त्यामुळें मुरादेवी तिकडे येऊन त्यास भेटण्यास उत्सुक होतीच. राजा धनानंदाचा डोळा लागला आहे असें पहातांच तेवढी संधि साधून मुरादेवी मध्यरात्रीच्या आधीं कांहीं वेळ यज्ञशालेंत आली,

आणि तिनें चाणक्याची भेट घेतली. आपल्याला जें कांहीं सांगावयाचें आहे, तें एकांतांतच सांगितलें पाहिजे, नुसतें सांगतां येणार नाहीं, असें त्यानें सुचविल्यावरून तिनें त्यास एका बाजूस नेलें आणि त्यांचें दोघांचें बराच वेळ भाषण झालें. त्या भाषणांत परस्परांनीं परस्परांस काय सांगितलें असेल, तें त्यांचें त्यांसच ठाऊक; परंतु दोघांचेंही भाषण संपल्यानंतर मुरादेवी जातां जातां चाणक्यास म्हणाली, "मला असं साहाय्य मिळालं, तरी उत्तम, न मिळालं तरी माझी मी प्रतिज्ञेप्रमाणें सर्व कार्य शेवटास नेऊन पोहोंचवायला पक्की तयार आहें. माझा उपक्रम सुरू सुद्धां झाला आहे. आणखी थोडेच दिवसांत त्याचें पाहिलें फल दृष्टीस पडेल. आपण म्हणतां तें जर सिद्ध झालं तर मग आणखी काय पाहिजे ? परंतु मी रात्रीं पुनः इथें येईन असा नेम नाहीं. मला आतां तर गेलंच पाहिजे. उदईक आपण इथें या, मी पुनः भेटेन आणि मग त्याबद्दल विचार करूं." इतकें बोलून ती तेथून झटकन् निघून गेली. शेवटच्या भाषणाचा बराच भाग—तोही प्रारंभींचा—वृंदमालेनें स्पष्ट ऐकला आणि तिच्या डोळ्यांपुढें एकदम लकन झालें. महाराज धनानंदानें आपल्या स्वामिनीवर पूर्ववत् प्रेम करण्याचें सुरू केलें, तेव्हां आतां ती आपला त्याच्यावरला सर्व राग विसरून गेली असेल, आणि थोड्याच दिवसांत पुनः पूर्ववत् तिची स्थिति होईल असें नुकतें तिला कोठें वाटूं लागलें होतें; परंतु आतांच्या तिच्या स्वामिनीच्या बोलण्यावरून तो आपला सगळा भ्रम होता असें तिला वाटलें. 'माझा उपक्रम सुरू सुद्धां झाला आहे. आणखी थोडेच दिवसांत त्याचें पहिलें फळ दृष्टीस पडेल,' असें जें ती म्हणाली तें काय ? असा प्रश्न तिच्या मनांत उभा राहिला आणि ती एकदम अगदीं विचारांत मग्न झाली. वृंदमाला अतोनात पापभीरू, अधर्मभीरू आणि भोळीही होती. तिच्या स्वामिनीला तिचा हा स्वभाव पक्का ठाऊक होता. तेव्हां अलीकडे ती आपल्या कारस्थानांत तिला मुळींच घेत नसे. अगदीं सात्विक वृत्तीचीं जीं कामें किंवा ज्या कामांत आपला हेतु वाईट आहे असें मुळींच दिसून येणार नाहीं, अशीं कामें वृंदमालेला ती सांगत असे आणि दुसऱ्या कामाला दुसऱ्या परिचारिका असत. कारण एक तर कांहीं लबाडीचें काम कर म्हणून सांगितलें, तर ही करावयाची नाहीं; आणि यदाकदाचित् आपली आज्ञा म्हणून केलें, तर तें अशा प्रकारें करावयाची कीं, त्यांत हजारों प्रकारच्या चुका होऊन सारेंच भांडवल बाहेर फुटावयाचें. सरळ मार्गानें जाणारी व आपल्या स्वामिनीच्या ठिकाणीं अत्यंत दृढ भक्ति असलेली अशी ती होती. स्वामिनिष्ठ व प्रामाणिक सेवक या दृष्टीनें तिची योग्यता फार मोठी; परंतु ज्या प्रकारचें कार्य मुरादेवीला करावयाचें होतें, त्याला तिचा उपयोग मुळींच नव्हता. उलट, झालें तर तिच्या भोळेपणानें नुकसान व्हावयाचें. हें सर्व जाणून त्या धूर्त मुरादेवीनें तिला तसल्या कामांत घालावयाचें नाहीं व आपलें काय चाललें आहे, आणि आपण काय कारस्थानांत गुंतलो आहोंत, हें तिनें तिला पुरतें कळूं दिलें नाहीं.

अशा स्थितींत वृंदमालेनें वरील उद्गार ऐकले, तेव्हां तिचें मन एकदम दचकल्याप्रमाणें झालें. एकूण आपली स्वामिनी आपल्या पूर्वप्रतिज्ञेप्रमाणें राजकुलाचा विध्वंस करण्याच्या उद्योगांत आहे काय ? राजाचें प्रेम पुनः मी आपल्यावर ओढून घेण्याचा प्रयत्न करीन, त्याला आपल्या पाशांत पक्का गुरफटवीन आणि मग माझ्या मनोदयाप्रमाणें सर्व गोष्टी घडवून आणून माझी प्रतिज्ञा खरी करीन,

असें ती बंदिवासांतून सुटल्या दिवसापासून, सौमाल्याला यौवराज्याभिषेक झाल्या दिवसापासून, बोलत आली, तें ती अद्यापि विसरली नाहीं काय ? आजच्या या बोलण्यावरून अर्थोतच विसरली नाहीं असें झालें, असें पाहून तिच्या अंगावर शहारे आले. राजवंशावर कांहीं तरी भयंकर अनर्थोपात होणार काय ? एकूण भगवान् वसुभूतींनीं सांगितल्याप्रमाणें गृहकलहाचें अरिष्ट या पाटलिपुत्रावर येणार ना ? असे नानाप्रकारचे दुःखकारक विचार तिच्या मनांत येऊन ती स्तब्ध उभी राहिली होती.

# प्रकरण ११ वें.

## चाणक्याचें कारस्थान.

मुरादेवीनें आपल्या कपटनाटकाचा पहिला प्रवेश केला त्या दिवसापासून राजानें असा निश्चय केला कीं, आतां आपण मुरादेवीचें अंतःपुर सोडून कधींच कोठें जावयाचें नाहीं. मुरादेवी खरी कुलीनाची कन्या दिसते. आपलें प्रेम आज तिच्या ठिकाणीं आहे म्हणून मंडळींनीं जसा तिचा द्वेष आरंभून आपल्या जीवापर्यंतही पाळी आणली आहे, त्याप्रमाणें सतरा अठरा वर्षांपूर्वीही या गरीब बिचाऱ्या मुलीचा विनाकारण द्वेष करून हिच्याबद्दल आपल्या मनांत संशय उत्पन्न करविला आणि आपणही मूर्खाप्रमाणें त्या संशयावरून तिच्या पोराची हत्त्या करविली आणि तिला तुरुंगांत टाकलें, याबद्दल त्याला आतां वाईट वाटूं लागलें. आज आपल्यास तिची खरी किंमत किती आहे हें समजून आलं आहे. तर आतां तरी आपल्याकडून तिला पूर्ण सौख्य द्यावयाचें, असा त्यानें आपल्या मनाशीं बेत केला. आपल्या जीवाला कांहीं तरी बरें वाईट करण्याचा आपल्या दुसऱ्या राण्यांचा विचार आहे, हें ऐकतांक्षणींच, त्याचा पहिला विचार त्या सर्वांचें पारिपत्य करावें असा होता; परंतु मुरादेवीनें त्याचा निषेध केला. ती म्हणाली, " महाराज, दासींनीं सहजगत्या ऐकलेल्या गोष्टी आपल्यास येऊन सांगितल्या, त्यांवर सर्वथैव विश्वास ठेवून कसं चालेल ! न जाणों तें कदाचित् सगळंच खोटं असेल, किंवा दासींनीं कांहीं तरी ऐकून काहीं तरी येऊन सांगितलं असेल. माझी सुमतिका स्वतः कधीं कांहीं बनवून सांगायची नाहीं; पण तिच्या ऐकण्यांतच जर चुकी झाली असली तर ? महाराज, एकवार माझ्या बाबतींत आपल्याकडून अविचार झाला तेवढा पुरे. कोणालाही आतां विनाकारण शिक्षा, मी तर कांहीं जाणून बुजून होऊं द्यायची नाहीं. आपण जें कांहीं ऐकलं त्याला प्रत्यक्ष पुरावा पाहिजे तो मिळाला, तर आपण काय वाटेल तें करायला समर्थ आहांच."

मुरादेवी हें सर्व बोलली त्या वेळीं तिचे हावभाव व नेत्रकटाक्ष जर कोणीं पाहिले असते, तर पहाणारास असें वाटलें असतें कीं, ही निःपक्षपातित्व आणि दयाशीलत्व यांची जणूं काय मूर्तिच आहे. आणि राजास तर तिचें तें बोलणें इतकें शुद्धपणाचें वाटलें कीं, त्यानें तिची तिच्या सरळपणाबद्दल व भोळेपणाबद्दल फारच स्तुति केली व " तूंच म्हणते आहेस, म्हणून मी आपला सध्यां स्वस्थ बसतों; बाकी ज्यांनीं अनेक खोट्यानाट्या गोष्टी सांगून माझं मन तुझ्याविषयीं कलुषित केलं, त्या आतां तुझ्यावर माझं मन जडलं आहे, तेव्हां मागलीं सगळीं कृष्णकारस्थानं बाहेर पडतील, या भयानं काय करतील, आणि काय नाहीं याचा नेम नाहीं; तथापि कांहीं तरी प्रत्यक्ष पुरावा मिळेपर्यंत थांबा म्हणतेस, तर तुझ्यासाठीं थांबतों. माझ्या मनाची तर पक्की खात्री होऊन चुकली आहे कीं, सुमतिकेनं सांगितलेली हकीकत पूर्णपणें खरी आहे. " असें म्हणून त्यानें तिला मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें.

मुरादेवीला तेवढ्यानें फार आनंद झाला. आपले ग्रह सध्यां चांगले उच्चीचे आहेत, आपण जें काय करण्यास हात घालूं तें सर्व सिद्धीस जाणार असें तिला पूर्णपणें वाटूं लागलें; तथापि या विचारानें फुशारून जाऊन आपण आपल्या मनाची समता बिघडवूं देतां उपयोगी नाहीं. जें काय करणें तें पूर्ण विचाराअंतीं केलें पाहिजे, आणि पाऊल असें टाकलें पाहिजे कीं, तें मागें घेण्याची पाळी म्हणून येतां कामा नये. असा एकंदर विचार करून ती राजाचें मन इतर सपत्नींविषयीं अधिकाधिक कलुषित करण्यासाठीं ज्या ज्या योजना कर. याच्या त्या त्या करण्यांत गुंतली.

चाणक्याचें व तिचें काय भाषण व्हावयाचें तें झाल्यानंतर तो तिच्या अंतःपुरांतून बाहेर पडला, तेव्हां त्याच्या आनंदास पारावारच नाहींसा झाला. पाटलिपुत्रांत पाऊल घातल्या दिवसापासून इतक्या थोड्या अवधींत, आपल्या स्वीकृत कार्यांत यश येण्याला अनुकूल अशा इतक्या गोष्टी घडून येतील, असें त्यास मुळींच वाटलें नव्हतें; परंतु त्या घडून आल्या, तेव्हां मग त्यास आनंद झाला असल्यास त्यांत नवल काय ? मुरादेवी आपणास पूर्ण साहाय्यकारी होईल, याबद्दल तर त्याला मुळींच शंका राहिली नाहीं. आणि जी एक गोष्ट अद्यापि तिला त्यानें सांगितली नव्हती, ती सांगून तिचा पूर्ण पुरावा दिला, म्हणजे ती आपला हेतु साध्य करण्याकरितां अमुक एक साहस करणार नाहीं असें मुळींच नाहीं, हेंही पण त्यास पक्कें ठाऊक होतें. आपल्यास भोगाव्या लागणाऱ्या यातनांबद्दल सूड उगविण्याचा हेतु जर एकपट साहस करवील, तर आपल्या मुलाला सिंहासन मिळवून देण्याची व त्याच्या डोक्यावर सम्राट्—चक्रवर्तीचीं छत्रचामरें पहाण्याची महत्त्वाकांक्षा दसपट नव्हे शतपट साहसें करवील, हें जाणूनच त्यानें आतां काय तो उपक्रम करावयाचा असा निश्चय केला. तेव्हां आतां पहिली गोष्ट काय करावयाची, याचा त्यानें विचार चालविला. आणि असें ठरविलें कीं, प्रथम राजगृहीं व वेळप्रसंग पडल्यास राजाच्या समोरही अगदीं उघडपणें जाण्यायेण्याला मार्ग करून ठेवावयाचा. आपण उघडपणें जाऊं येऊं लागलों तर, अर्थातच कांहीं तरी लोक, ' हा राजसभेंतून अपमान होऊन गेलेला व जातांना राजास शिव्याशाप देणारा ब्राह्मण ' असें ओळखतील. तेव्हां आतां आपणास तें कसें टाळतां येईल याचा विचार प्रथम केला पाहिजे. आपण रागाच्या भरांत कांहीं तरी बोललों तें राजानें किंवा त्याच्या मुत्सद्यांनीं

अथवा पंडितांनीं मनांत आणूं नये, असें म्हणून एकवार आपला पक्ष खालीं करून घ्यावा व अशा तऱ्हेनें लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकून आपला कार्यभाग करून घ्यावा, हा एक मार्ग; किंवा आपण तो ब्राह्मण नव्हेच, आपण मुरादेवीच्या बंधूच्या राज्यांत हिमाचलाच्या परिसरांत मरुद्वतीच्या कांठीं आश्रम घालून रहाणारे ब्राह्मण. मुरादेवीच्या भावानें आपल्या स्वाधीन केलेल्या त्याच्या कुमाराचा विद्याभ्यास झाला, तेव्हां तीर्थयात्रा करून त्याच्या शिक्षणाची पूर्णता करून घेण्यासाठीं त्या मुलाबरोबर आलों आहों असें सांगून लोकांस फसवावें, हा दुसरा मार्ग; किंवा जें ज्या वेळीं उपयोगी पडेल तें त्या वेळीं करून वेळ मारून नेऊन आपलें कार्य साधावें हा तिसरा मार्ग. यांपैकीं काणता मार्ग या वेळीं स्वीकारावा याचा चाणक्यानें आपल्या मनांत बराच खल चालविला आणि शेवटीं हीं तर गाष्ट त्यानें ठरविलीच कीं, वसुभूतीला आतांपर्यंत जें आपण सांगितलें तें तसें नव्हे, आपण खरोखर किरातराजाकडून मुरादेवीची अवस्था काय आहे ती जाणून घेण्याकरितां आलों होतों; आतां ती सर्व हकीकत कळली आहे, तेव्हां परत जाऊन त्याला येथील सर्व हकीकत फार चांगली आहे, मुरादेवीचे ग्रह आतां चांगले झाले आहेत, वगैरे सांगण्यास परत जातों. त्यांनींच जर पुनः कांहीं कारणानें आपल्याला इकडे पाठविलें; तर आपण येऊं. आणि आलों म्हणजे पुनः आपल्याकडे येऊन भेटेनच असें सांगावें. आणि आतांपर्यंत आपण खरी हकीकत लपवून ठेविल्याबद्दल क्षमा असावी; आपली खरी स्थिति एकदम परक्याजवळ सांगूं नये अशी नीतिच आहे वगैरे वगैरे बोलून त्याला गार करावें. वसुभूतीला आपल्या पक्षाला चिकटून धरला पाहिजे. त्याची व आपली मैत्री जुळली आहे ती आपल्याला कोणत्या तरी प्रसंगीं फार उपयोगीं पडेल. त्यांतून सिद्धार्थक तर खचितच हरकाम्या आहे. असा विचार करून त्यानें विहारांत जाऊन वसुभूतीला म्हटलें, "मला आपल्याजवळ कांहीं एकांतांत बोलायचं आहे." वसुभूतीनें त्यास एकीकडे नेलें. तेव्हां चाणक्यानें मन मोकळें करण्याचा विलक्षण आव घालून व वसुभूतीसारख्या धर्मपरायण व सत्यप्रिय भिक्षूशीं आपण इतका वेळ प्रतारणा केली याबद्दल आपणास अतोनात पश्चात्ताप होतो आहे असें दाखवून त्यास, आपल्या स्वतःबद्दल नवीन बनविलेली हकीकत सांगून झाल्या अपराधाबद्दल क्षमा मागितली. त्याचें तें एकंदर भाषण इतकें चातुर्याचें झालें कीं, वसुभूति बिचारा पूर्णपणें फसला व उलट चाणक्यास म्हणतो, "ब्राह्मणश्रेष्ठा, कांहींसुद्धां हरकत नाहीं. परक्या स्थळीं गेल्यावर शहाण्या माणसानें आपण कोण, काय, काय कारणानें येथें आलों, हें सहसा सांगूं नये अशी नीतिच आहे" असें बोलून चाणक्याचें समाधान वसुभूतीनें केलें; तथापि वसुभूतीसारख्या बुद्धभिक्षूला, कीं जो कधींच असत्य मार्गानें जाणार नाहीं, किंवा असत्य भाषण करणार नाहीं, अशा पवित्र बद्ध भिक्षूजवळ आपण असत्य भाषण केलें याबद्दल आपल्याला इतकें वाईट वाटतें आहे असें चाणक्यानें दाखविलें कीं, कांहीं वणन करून सांगतांच यावयाचें नाहीं. अर्थातच वसुभूति पुनः त्याच्या एकंदर भाषणावर फसून त्यानें त्याचें वारंवार वारंवार समाधान केलें. इतक्यांत वृंदमाला तेथें आली, तेव्हां तर चाणक्यास पश्चात्तापाचें भरतेंच आलें. "मी कोण आणि पाटलिपुत्रांत कां आलों, हें मीं हिला सांगितलें, तेव्हां तिनें मला मदत करून माझी व आपल्या स्वामिनीची भेट करून दिली. माझा कार्यभाग झाला. मला माया-

देवीनें पाठविल्यासारखी कांहीं तरी चांगली वार्ता घेऊन मी परत जाणार, यांत मला किती तरी आनंद आहे. परंतु या आनंदाचें खरें खरें मूळ, ही आपली फार उत्तम शिष्यीण वृंदमाला होय. हिला मी आपली खरी हकीकत सांगतांच हिनें मला साहाय्य करण्याचें व आपल्या यजमानणीची भेट करून देण्याचें कबूल केलें." असें म्हणून त्यानें तिची अतोनात स्तुति करण्यास प्रारंभ केला. ती स्तुति अशी केली कीं, वृंदमाला त्या स्तुत्योघांत गटंगळ्या खाऊं लागून ज्या कार्याकरितां आली होती तें जणूं काय विसरूनच गेली. नंतर चाणक्यानें त्या दोघांस म्हटलें, "आतां आपण परत आपल्या आश्रमांत जातों, आपल्याला बरेच दिवस झाले, तेव्हां आश्रमाचे कुलपति रागें भरतील, आणि किरातराजासही काळजी वाटेल." असें तसें बोलून त्यानें त्या मंडळींचा निरोप घेतला व एवढेंही बोलून ठेविलें कीं, "किरातराजाच्या मनांतून आपल्या पुत्रास म्हणजे मुरादेवीच्या भाच्यास पाटलिपुत्रास कांहीं दिवस राजधर्म शिकण्यासाठीं किंवा देशपर्यटन करण्यासाठीं पाठविण्याचा विचार आहे. त्यानें जर मला त्या मुलाला घेऊन येथें येण्यास सांगितलें, तर मी त्याच्याबरोवर येण्याचा संभव आहे. आलों तर आपल्याला भेटल्याखेरीज राहणार नाहींच."

चाणक्य याप्रमाणें बोलत असतां थोड्याच वेळांत वृंदमाला त्या स्तुतिप्रवाहामुळें वाहून गेली होती ती थोडी सांवरली आणि चाणक्याचें आणि मुरादेवीचें जें शेवटलें बोलणें तिनें अर्धवट ऐकलें होतें तें जर या ब्राह्मणाला विचारलें तर हा ब्राह्मण आपल्यास काय तें खरें सांगेल काय ? निदान त्यानें तसें सांगितलें नाहीं, तरी काय म्हणतो तें तर पाहूं, असें मनांत योजून ती त्यास म्हणते, "ब्राह्मणश्रेष्ठा, आपण निघतेवेळीं मुरादेवी आपल्याला काय म्हणाली त सागाल काय ? मीं अर्धवट ऐकलें, आणि तेव्हांपासूनच आपली गांठ पडतांक्षणीं आपल्याला त्याबद्दल विचारायचें असा मीं बेत केला होता. आतां आयतीच संधि आली म्हणून विचारून घेतें."

"मुरादेवी ? मुरादेवी आपल्या बंधूला, आणखी मातुःश्रीला काय निरोप सांगायचे ते सांगत होती. कोणी आपल्या माहेरीं जायला निघाला, कीं बायका काय निरोप सांगत असतात, तुला माहीत आहेच. त्यांतलेच निरोप सांगत होती. माझ्या ते सगळे लक्ष्यांत सुद्धां राहिले नाहींत. एकंदरींत सगळ्या निरोपांचा इत्यर्थ एवढाच होता कीं, मी [illegible] अगदीं सुखांत आहें. गल्या सतरा अठरा वर्षांत जो काय त्रास झाला, त्या सगळ्याची अगदीं पूर्णपणें आतां भरपाई होते आहे. तेव्हां हे सुखाचे दिवस आले आहेत, तोंच तुम्ही कोणी येऊन हा सुखसोहळा पाहून जा. निदान माझ्या भाच्याला तरी पाठवा. अशाच प्रकारचे निरोप सांगत होती. निरोप दुसरे काय असायचे बायकांचे आपल्या माहेरच्या माणसांना ?"

"छे छे !" वृंदमाला त्यावर एकदम म्हणाली, "हा निरोप नव्हे. 'तिकडून तुम्ही म्हणतां ती मदत आली, तर ठीकच; नाहीं तर मी आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें करायला तयारच आहें,' अशा अर्थाचें जें ती कांहीं बोलली तें काय तें सांगा. तुम्ही अगदीं जायला निघालां तेव्हां हे शब्द ती म्हणाल्याचें माझ्या कानीं पडले."

तें ऐकतांच चाणक्य किंचित् चपापला, परंतु तें आपलें चपापणें बाहेर न दाखवितां आपल्याशींच पुटपुटल्याप्रमाणें करून म्हणतो, "प्रतिज्ञा ? आणखी तिकडली मदत" असे शब्द तिच्या तोंडून निघाले आपल्याला तर

कांहीं बोआ असे शब्द आठवत नाहींत. पण... पण...पण ती असें म्हणाली खरी कीं, या वेळीं महाराजांची मर्जी कायम राहण्याकरितां तिकडून कोणी तरी येऊन माझ्याजवळ राहायला पाहिजे म्हणजे माझा निभाव लागेल. नाहीं तर महाराजांची माझ्यावर पुनः मर्जी बसली हें पहातांच माझा मत्सर करूं लागलेल्या माझ्या सवती माझी काय अवस्था करतील आणि काय नाहीं याचा नेम नाहीं. तेव्हां माझ्या मायेचें कोणी तरी माणूस मला जपायला सध्यां पाहिजे आहे. आजपर्यंत कोणी नाहीं आलें तर नाहीं, पण आतां या सुखाच्या दिवसांतही जर कोणी आलें नाहीं, तर मी पुनः त्या माणसांचें तोंडसुद्धां पाहणार नाहीं अशी प्रतिज्ञा केली आहे. असें कांहीं ती बोलली खरी बोआ. आणखी तर कांहीं नाहीं. मग यांतलें तूं काय ऐकलें असशील तें खरें. मला तिनें असा आग्रह केला आहे कीं, आपल्या मातुःश्रीला आणखी आपल्या भाच्याला चार दिवस इकडे घेऊन यावें. इतकें आग्रहाचें निमंत्रण जाऊनही जर कोणी आलें नाहीं, तर आपण पुनः माहेरच्या माणसांचें नांव सुद्धां घेणार नाहीं, अशी तिची प्रतिज्ञा; दुसरें कांहीं सुद्धां नाहीं. " तें ऐकून वृंदमाला आश्चर्यचकित झाली. आपल्याला जो संशय आला होता, तो एकूण खरा नव्हे काय ? मुरादेवीनें बंदींतून सुटतांच ज्या प्रतिज्ञा केल्या कीं, आपण आतां नानाप्रकार करून आपल्या पतीचें प्रेम आपल्यावर ओढून घेऊन त्याच्या सुखांत माती कालवूं, सगळ्या राज्याचा सत्यनाश करूं आणि राजकुलाचा विध्वंस करून आपण आपल्या माहेरच्यापैकीं कोणाला तरी सिंहासनावर बसवूं वगैरे जें ती बोलत होती, त्याप्रमाणें करण्याचा हा पहिलाच प्रारंभ असें आपणास वाटलें, तें खोटें काय ? असें तिच्या मनांत येऊन ती पुनः बुचकळ्यांत पडली, परंतु तिनें आतां चाणक्यास आणखी कांहीं त्यासंबंधानें विचारलें नाहीं. जें काय तिचें तिला वाटत होतें तें तिनें आपल्या मनांत ठेविलें.

चाणक्य दुसरे दिवशीं निघून गेला.

येथपर्यंत सर्व ठीक झालें; परंतु आतां पुढें कसें ? येथपर्यंत नुसता शोध करून, आपल्यास इष्ट अशी अंतःस्थिति मगधांत आहे कीं नाहीं एवढेंच पहावयाचें होतें, तें सर्व एकट्यास करतां आलें. परंतु पुढें काय ! मुरदेवीला सांगावयाचें कीं चंद्रगुप्त हा तुझा भाचा आणि चंद्रगुप्तास राजपुत्रास योग्य अशा लव्याजम्यानिशीं मगधांत आणून त्याला या पुष्पपुरींत अधिष्ठित करावयाचा, ही सर्व युक्ति बसवितांना ठीक. परंतु ती अमलांत कशी आणावयाची ? आपण दरिद्री आणि चंद्रगुप्त तर गुराख्यांनीं वाढविलेला अशा स्थितींत त्याला राजपुत्राच्या वेषानें मगधासारख्या देशांत नेऊन मोठ्या थाटानें व लव्याजम्यानिशीं ठेवावयाचें म्हणजे सोपी गोष्ट नव्हे. आपल्या पर्णकुटींत एक कपर्दिक— फुटका कपर्दिक—सुद्धां नाहीं, आणि आपणास मगधदेशांत कांहीं दिवसपर्यंत त्या राजबिज्या तरुणास घेऊन रहावयाचें आहे. तेव्हां आपल्या नुसत्या मोहक भाषणांवर आणि चातुर्यावर भुलून केवळ एकनिष्ठेनें आपली सेवा कोणी करणार नाहीं. आतांपर्यंत आपल्यास एकट्यास काय वाटेल तें करतां आलें; परंतु यापुढें आपल्याला अनेक गुप्त हेर ठेवावे लागतील; अनेकांस अनेक तऱ्हेनें संतुष्ट करून त्यांच्याकडून आपलीं कामें करून घ्यावीं लागतील. हीं सगळीं कामें करून घेणें, आणि नानाप्रकारचे हेर, चार ठेवणें हें पैशावांचून होणें शक्य नाहीं. पण पैसा आणणार कोठला ! चाणक्यास स्वतःस खरोखर एका कपर्दिकेचीही जरूर नव्हती. त्याच्याइतका निः—

स्पृह व निराकांक्ष माणूस त्या कालीं तोच दुसरा कोणीच नव्हता. परंतु स्वीकृत कार्य पार पडण्यास तर द्रव्याची आवश्यकता अत्यंत होती. तें द्रव्य कोठून आणावें ? ही त्यास मोठी चिंता पडली. या चिंतेंतच तो हळू हळू पावलें टाकीत चालला होता. आपल्या पश्चात् चंद्रगुप्तानें आपल्या आश्रमाची कशी काय व्यवस्था लाविली असेल ? आपल्या त्या भिल्ल, खास, प्राच्य, गाड, खोंड वगैरे लोकांच्या मुलांना त्यानें नीटपणें सांभाळलें असेल, कीं त्यांच्याशीं भांडणें करून सगळा आश्रम उध्वस्त केला असेल, याचीही त्यास चिंता वाटूं लागली. आजपर्यंत आश्रम नीटपणें चालविण्याला त्याला कांहीं श्रम पडत नसत. कारण कंद, मूळ, फळें त्या त्याच्या तरुण शिष्यांनीं आणावीं, त्याला अर्पण करावीं आणि आपण शिकार वगैरे करून आपलें पोट भरून त्याची सेवा करून त्याच्यापासून विद्या संपादन करावी असें चाललें होतें. शिवाय भिल्लकिरातादिकांचे राजे, हा मोठा तपोनिष्ठ ब्राह्मण, आपल्या मुलांस शिकवितो, म्हणून यथाशक्ति त्यास कांहीं पोंचवीत. परंतु आतां पुढें कसें काय ? पुढें जें कारस्थान करावयाचें तें एवढ्या तेवढ्यावर चालावयाचें नाहीं. त्याला आतां चांगलाच निधि सांपडावयाला पाहिजे. शेवटीं त्यानें विचार केला. कांहीं हरकत नाहीं. आतां आपण जाऊन त्या पोरांकडून त्यांच्या विद्येचा उपयोग करवून ग्रीकयवनांना लुटवून लवकरच द्रव्य मिळवूं. लवकरच कांहीं तरी करून द्रव्यसाहाय्य उत्तम प्रकारें संपादित होईल अशी व्यवस्था करूं. असें मनांत योजून परंतु खिन्नचित्त असा तो चाणक्य आपल्या आश्रमाकडे चालला.

तो जों जों आपल्या आश्रमाच्या जवळ जवळ गेला, तों तों त्याची विवंचना अधिकाधिक होत गेली; परंतु तो आश्रमाच्या अगदीं नजीक गेला, तेव्हां ती विवंचना थोडी दूर होऊन आपला प्रिय शिष्य आपल्याला पाहिल्याबरोबर काय म्हणेल ? त्याला किती आनंद होईल वगैरे विचारही त्याच्या मनांत येऊं लागले. अशी कांहीं चिंता, कांहीं उत्सुकता यांनीं युक्त अशा अंतःकरणानें स्वारी एकदांची आपल्या आश्रमाच्या मर्यादेवर येऊन पोंचली, तों पुढें कांहीं सुवार्ता त्याच्या कानीं पडणार होती, तिच्या सूचनार्थच कीं काय, त्याचें मन एकदम किंचित् आनंदित झालें आणि या आकस्मिक आनंदविकाराचें कारण काय बरें असावें ? असा विचार करीतच तो आपल्या तपोवनांत शिरला; तों दूर कोठें तरी मोठा गलगा—आनंदाचा गलगा—चालला आहे असें त्यास वाटलें. आपलें शिष्यमंडळ त्याच बाजूला असेल. कोठें एखाद्यानें एखादें मोठें थोरलें सावज, एखादा अरण्यमहिष, गवा, अरण्यसूकर, व्याघ्र किंवा सिंह कोणीं तरी मुलानें मारला असेल, आणि त्या मारणाराच्या अभिनंदनार्थ हा एवढा हर्षामर्ष चालला असावा. अशा स्थितींतच जर आपण त्यांच्यापुढें जाऊन उभे राहिलों, तर त्यांच्या आनंदाला पारावार नाहींसा होईल. असें वाटून चाणक्य त्या गलग्याच्या अनुसंधानानें पुढें चालला; पहातो, तों सर्व मुलें जमलीं असून चंद्रगुप्त मध्यें आहे, त्याच्यापुढें कांहीं आहे आणि एके बाजूस दोन चार यवन दोऱ्यांनीं बांधिले असून, सर्व मंडळी आपापसांत बोलत आहेत. आपण झाडाच्या आड असें उभें राहून त्याचें बोलणें थोडा वेळ ऐकून मग पुढें जावें असा विचार करून चाणक्य कान देऊन ऐकूं लागला, तेव्हां त्याच्या कानीं पुढील भाषण पडलें. " चंद्रगुप्ता, आज जर गुरुजी येथें असते तर त्यांनीं तुझी केवढी धन्यता केली असती ! "

" वीरव्रता, ' तुझी ' असें कां म्हणतोस ?

' आपली ' असं कां म्हणेनास ? या प्रसंगीं जितका मी तितकाच–किंबहुना त्याच्याही-पेक्षां कितीं तरी अधिक असा तुम्हीं पराक्रम केला आहे. कसंही असो, पण मित्रांनो, हा निधि–हें सर्व द्रव्य–आपण अगदीं असंच्या असंच ठेवूं आणि गुरुजी येण्यावरोबर त्यांच्या चरणीं आपल्या सर्वांची ही गुरुदक्षिणा अर्पण करूं. हा आपला विचार दृढ आहे ना ? "

" दृढ म्हणजे ? चंद्रगुप्ता, हें काय विचारतोस ? ही सर्व गुरुदक्षिणाच आहे " असा एकदम ओरडा झाला.

' पराक्रम ' ' निधि ' आणि ' द्रव्य ' हे शब्द ऐकतांच चाणक्यास अत्यंत आश्चर्य वाटलें. या मुलांनीं कांहीं पराक्रम करून कोठें तरी निधि संपादन केला काय ? वहावा, असें जर असेल, तर या सगळ्यांची मला अतोनात धन्यता कां वाटणार नाहीं ? असें मनांत म्हणून चाणक्य एकदम पुढें सरला. ज्या वेळीं आपणास द्रव्याची अतोनात आवश्यकता, त्या वेळीं या बालवीरांनीं कांहीं पराक्रम करून कोणा शत्रूंस जिंकून जर द्रव्य संपादन केलें असलें तर आपलें केवढें काम झालें ! असें मनांत येऊन त्याच्यानें पुढें एक क्षणभरही आपल्या गुप्तस्थानीं उभें रहावलें नाहीं. "वत्सांनो, चिरायू व्हा. तुमची ही मजवरली भक्ति पाहून मी अतोनात आनंदित झालों. " असें म्हणत तो पुढें झाला. इतक्यांत त्या मुलांच्या पुढें असलेली सौवर्णनिष्कराशि त्याच्या दृष्टीस पडली. आणि त्याचे नेत्र अगदीं दिपून गेल्याप्रमाणें झाले. गुरुजींच्यासंबंधानें आपण बोलत असतां प्रत्यक्ष गुरुजी एकदम आपल्यापुढें उभे राहिले हें पाहून त्या सर्व शिष्यमंडळीस अतोनात आश्चर्य वाटलें व आनंदही झाला हें सांगावयास नकोच. तो आश्चर्याचा भर थोडासा कमी झाल्यावर सर्वांनीं अत्यंत भक्तीनें चाणक्याच्या चरणांचें वंदन केलें. कोणीं आसन मांडिलें आणि बसण्याविषयीं त्यांना विज्ञप्ति केली. ते बसल्याबरोबर वीरव्रतानें एकदम त्यांस म्हटलें " गुरुजी, या चंद्रगुप्तानें आज पांचसातशें ग्रीकयवनांवर चाल करून त्यांचा पराजय केला. कितीक मारले, आणि कितीक पळवून लावले. हे पांचचार जण चतुर्भुज करून ठेविले. गुरुजी, यांनीं कोणाच्या तरी राज्यांत शिरून गरीब प्रजा नाडून ही लूट आपला राजा सल्यूकस निकत्तर याच्याकडे चालविली होती, ती त्यांच्यापासून हिरावून घेतली आहे. गुरुजी, याचा पराक्रम... "

" गुरुजी " चंद्रगुप्त मध्येंच म्हणतो, " माझं एकट्याचं नांव हे उगीच घेतात हो-या सगळ्यांनींच आज पराक्रम केला आहे. पण तें कसंही असो. हें सर्व द्रव्य गुरुदक्षिणा म्हणून आपल्या चरणीं निवेदन करण्याचं व हे यवन आपल्याला दास म्हणून अर्पण करण्याचं आम्हीं ठरविलं होतं. आमचं मोठं भाग्य कीं, तीं अर्पण करण्याला आपण आजच येथें आलां. आतां हिचा स्वीकार करा आणि आम्हाला आशीर्वाद द्या " तें त्याचें बोलणें संपतांच सर्व शिष्यमंडळींनीं " गुरुजींचा जयजयकार असो " " आर्य चाणक्यांचा जयजयकार असो " असा एकदम जयजयकार केला.

तो ऐकून चाणक्याच्या डोळ्यांत प्रेमाश्रु उभे राहिले. त्याचा कंठ सद्गदित झाला. त्याच्या तोंडून एकही शब्द निघेना. वीरव्रत, चंद्रगुप्त वगैरे जे शिष्य अगदीं जवळ होते, त्यांस त्यानें मोठ्या प्रेमानें कवटाळिलें. आणि " वत्सांनो ! हा द्रव्यराशि संपादन करून तुम्हीं केवढं महत्कार्य संपादिलं, याची तुम्हांला कल्पना नाहींरे ! " एवढा उद्गार अत्यंत सद्गदित कंठानें काढला. पुढें त्याच्यानें बोलवेना.

पुढें एक दोन दिवसांतच चंद्रगुप्त, वीरव्रत वगैरे सच्छिष्यांना एके बाजूस नेऊन चाणक्यानें काय सांगावयाचें तें सांगितलें. वीरव्रतास आश्रमाची व्यवस्था राखण्यास व आपणाकडून वेळोवेळीं आज्ञापत्रें येथील त्याप्रमाणें करण्यास आश्रमांत ठेविलें, आणि राजपुत्रास योग्य असा सर्व परिवार घेऊन व योग्य वस्त्राभरणें चंद्रगुप्ताकडून लेववून चाणक्य त्यास घेऊन पाटलिपुत्रास आला. तें सर्वही द्रव्य त्यानें आपल्याबरोबर घेतलें होतें हें सांगावयास नकोच.

# प्रकरण १२ वें

## चाणक्याचा स्वतःशीं विचार.

गील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें चाणक्य पाटलिपुत्रांत आला तो एका राजपुत्रास घेऊन आला. या वेळीं पाटलिपुत्रांत कोठें जाऊं, काय करूं, असें त्याला मुळींच वाटत नव्हतें. तो तडक गेला, तो मुरादेवीच्या महालांतच गेला आणि तिच्या पुढें त्यानें चंद्रगुप्तास उभा करून म्हटलें, “ देवी, तुझा बंधु प्रद्युम्नदेव व माता मायादेवी यांनीं आशीर्वादपूर्वक तुला कुशल विचारलं आहे व असं सांगितलं आहे कीं, तुझ्या आमंत्रणाप्रमाणें आपल्याला येतां येत नाहीं म्हणून खेद वाटतो आहे, तरी तुझा भाचा–जो त्यांचा अगदीं जीव कीं प्राण–तो चाणक्याबरोबर पाठविला आहे, त्याला चार दिवस आपल्याजवळ ठेवून घे. तो आम्हांपासून कधींच दूर झालेला नाहीं. तुझी व त्याची मुळींच ओळख नाहीं, परंतु त्याला तुझ्या आमंत्रणावरून पाठविलं आहे, तर आतां चार दिवस त्याचा तूं सांभाळ कर. त्याला इकडली आठवण होऊं दिली नाहींस, तर तो मोठ्या आनंदानं राहील. त्याला आठवण न होऊं देण्याला उपाय एकच. आम्हां दोघांबद्दल किंवा इकडल्या कोणत्याही गोष्टीबद्दल त्याला कांहीं विचारूं नकोस. त्यांनीं तुला देण्यासाठीं एक पत्रही मजजवळ दिलं आहे. ” इतकें बोलून चाणक्यानें तिच्याजवळ एक पत्र दिलें.

चंद्रगुप्ताला पाहून मुरादेवीची चर्या कांहीं चमत्कारिक झाली; परंतु ती एकदम कांहीं एक बोलली नाहीं. किती वेळ तरी स्तब्ध बसली. कांहीं वेळानें फक्त तिनें तें पत्र वाचलें आणि नंतर चाणक्यास म्हटलें, “ आर्या चाणक्या, या मुलाला पाहून मला फार आनंद झाला. आतां मी याला महाराजांचं दर्शन करवितें. आपणही महाराजांच्या दर्शनाला चलावं. ”

तें मुरादेवीचें आमंत्रण ऐकतांच आर्य चाणक्यच्या कपाळावर आंठ्या चढल्या. तथापि त्या क्षणभरही तेथें टिकूं न दे

सुहास्य करून चाणक्य तिला म्हणतो, " देवी, मला-सर्वथा निरिच्छ ब्राह्मणाला राजदर्शन करून तरी काय करायचं आहे? तर तूं आतां मला जाऊं दे. चंद्रगुप्त जोंपर्यंत येथें आहे, तोंपर्यंत मीही पाटलिपुत्रांत रहाणारच आहें. चार दिवस इथें रहाणं झाल्यावर त्याला बरोबर घेऊन परत या, असं मला प्रद्युम्नदेवानं व मायादेवीनं सांगितलं आहे. तेव्हां मी आतां आपल्या स्थानीं जातों."

" आपल्या स्थानीं? पाटलिपुत्रांत आपलं स्थान तें कोठेंसें आहे? आपण आतां एखादें स्थान शोधून काढण्यासाठीं जाणार असलां, तर तसे श्रम करूं नका. आमच्या यज्ञशाळेंत आपण सुखानें रहा. आपल्या तपश्चरणाला किंवा इतर कर्मांना कोणाकडूनही व्यत्यय येणार नाहीं. आणि या माझ्या भाच्यालाही माझी ओळख होईपर्यंत आपण येथें जवळ असलां, तर बरें वाटेल. आमची यज्ञशाला आपल्यासारख्यांच्या तपःक्रियांनीं पुनीत व्हावी असें माझ्याही मनाला फार वाटतें आहे. बाहेर तरी आपण कोठें रहाणार?"

" देवी मुरे," चाणक्य तत्काळ तिला म्हणाला, " तुझी माझ्या ठिकाणीं एवढी भक्ति आहे हें पाहून मला फार संतोष होतो; परंतु मला येथें रहातां येत नाहीं. पाटलिपुत्राच्या बाहेर गंगानदीचे तीरीं एक लहानशी पर्णकुटी मीं घालविली आहे. माझे शिष्य सुमारें चार दिवसांपूर्वींच येथें येऊन त्यांनीं ही सर्व सिद्धता करून ठेविली आहे. देवी, मी अगदीं निरिच्छ असा गरीब ब्राह्मण आहें. मला तुझ्या या राजमंदिरांतलीं सुखं काय करायचीं आहेत? प्रद्युम्नदेवानं फार आग्रह करून विनंति केली कीं कुमार चंद्रगुप्ताबरोबर जा म्हणून त्याच्या आग्रहामुळं आणि कुमार चंद्रगुप्तावरही माझं फार प्रेम—तो बाल्यापासून प्रद्युम्नदेवानं माझ्या स्वाधीन केला आहे, तेव्हां त्याला दोन दिवस पाहिलं नाहीं तर मलाही फार अवघड होतं—म्हणून आलो. देवि, कुमार चंद्रगुप्ताचे एक एक गुण तूं पाहशील, तसतसा तो तुला फार आवडत जाईल. आणखी तुला गुप्तपणें सांगतों. त्याच्या हातावर चक्रवर्ती होण्याचीं सर्व लक्षणं आहेत! भगवान् कैलासनाथ त्याला चिरायु मात्र करो. बाळा चंद्रगुप्ता, मी येतों. ही तुझी आते देवी मुरा तुला सर्वथा चांगलें करील. मी एक दोन दिवसांनीं—किंबहुना दररोज तुला भेटत जाईनच. तूं अगदीं काळजी करूं नकोस."

असें म्हणून चाणक्य उठलाच. मुरादेवीच्या आग्रहाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. चाणक्यानें पूर्वी येथून जाण्याचे आधीं गंगातीरावर शांत, स्थिर व रम्य अशा स्थानीं एक पर्णकुटी खरोखरच करविण्याची व्यवस्था केली होती. आणि आपण येथें येऊन राहण्याला सर्व सामग्री सिद्ध करून ठेवण्यास त्यानें सिद्धार्थकासही पूर्वींच सांगून ठेविलें होतें. वसुभूतिभिक्षूच्या विहारांत सिद्धार्थक त्यास भेटल्यानंतर त्याचें व चाणक्याचें फार चांगलें जुळलं होतें. तेव्हां त्यानें यास येथें सर्व प्रकारची मदत देण्याचेंही कबूल केलें होतें. त्याप्रमाणें चाणक्याचे शिष्य चार दिवस आधीं येतांच पर्णकुटी वगैरे घालविण्याचे कामीं यानें त्यांस फार मदत केली.

आपण एवढा आग्रह करीत असतां हा निरिच्छ ब्राह्मण आपलें आदरातिथ्य स्वीकारीत नाहीं, हें पाहून मुरादेवीस किंचित् राग आला; परंतु राजाच्या प्रेमांत असणारी महिषी स्वतः आग्रह करीत असतां तिच्या आदरातिथ्याचा स्वीकार न करणारा प्राणी खरा खरा निरिच्छ व निर्लोभी असला पाहिजे हें तिला पक्कें वाटून तिला त्याच्याबद्दल फार आदरहा वाटू लागला.

चाणक्य तेथून निघाला तो खरोखरीच गंगातीरीं आपल्या त्या नवीन पर्णकुटींत गेला. तेथें सर्व व्यवस्था आपल्यास पाहिजे तशी झाली आहे, हें पहातांच त्यास फार आनंद झाला आणि आपण जी प्रतिज्ञा केली त्या प्रतिज्ञेला आतां आपल्याला पाहिजेत तशीं फळें आणण्याचा उपक्रम करण्यास कोणत्याही प्रकारची हरकत नाहीं, आतां आपल्या चातुर्याचे प्रयोग करून नानाप्रसंगानीं नंदराजांचा विध्वंस करण्यास सुरुवात करावयाची असें त्यानें योजिलें. चंद्रगुप्तास मुरादेवीच्या स्वाधीन ज्या दिवशीं केलें, त्याच रात्रीं सर्व शिष्यमंडळी निद्रावश होऊन पर्णकुटिकेंत स्वस्थता झाली असतां चाणक्य एकटाच आपल्या मनाशीं पुढें काय काय करावयाचें आणि आतांपर्यंत झालें यांतलें आपल्यास काय उपयोगी पडणार आहे, याचा विचार करीत बसला. चाणक्याची प्रतिज्ञा अशी कीं, नऊ नंदांचा उत्खात करून त्यांच्या सिंहासनावर आपण हातीं धरून मोठपणास चढविलेला असा कोणी तरी पुरुष बसवावयाचा. आतांपर्यंत,आपल्या चातुर्यापेक्षां दैवाच्या गतीनें म्हणा, आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्यास लागणारी बरीच सामग्री संपादित झाली. नंदराजानें आपला अपमान केल्यामुळें खिन्न व संतप्त होऊन त्याच्या उत्खाताविषयींची प्रतिज्ञा त्याच्या तोंडावर करून आतां पुढें काय करावें या विचारांत पाटलिपुत्रांतून बाहेर पडून फार मुक्काम गेलों नाहीं तोंच, आपण हातीं धरून मोठेपणास चढविण्याला योग्य असा व सर्व चक्रवर्ती चिन्हांनीं युक्त असा बालक आपल्या दृष्टीस पडला; इतकेंच नव्हे, तर थोडासा प्रयत्न करतांक्षणींच तो आपल्या स्वाधीनही झाला. त्याला क्षत्रियास योग्य अशा विद्या व कला आपण शिकविल्या. त्याला पुढें उपयोगी पडावे म्हणून किरात, व्याध, खास वगैरे लोकांचे तरुण मुलगे व त्यांचे राजपुत्र यांनाही आपण त्याच्या बरोबरीनें तयार करून त्यांच्या मनांत त्याच्याविषयीं परम भक्ति उत्पन्न केली. ही सामग्री तर ठीक झाली. आतां एक पाऊल पुढें घातलें पाहिजे म्हणून आपण चंद्रगुप्तास आश्रमांत ठेवून इकडे पाटलिपुत्राची हालहवाल काय ती पहाण्यास आलों. तों येथें आपल्याला फार अनुकूल अशी परिस्थिति दिसली. आपली प्रतिज्ञा पार पडावयाची याचा जणूं काय स्वतः श्रीगिरिजेस अभिमान वाटून तिनें राजाकडून मुरादेवीला बंधमुक्त करविलें आणि मुरादेवीच्या मनांत मत्सराचा संचार करवून आपल्यास आपली प्रतिज्ञा सिद्ध करण्यास एक उत्तम साधन तयार करून दिलें. तिची भेट घेऊन आपण तिच्या मत्सराग्नीस अधिक चेतविलें आहे आणि आतां चंद्रगुप्तास तिच्याजवळ आणून ठेविलें आहे. जशी एखादी व्याघ्री आपल्या तान्ह्या पिलाचें संरक्षण मोठ्या जागरूकतेनें करते, त्याप्रमाणें ती आतां त्याच संगोपन करील, याबद्दल शंका सुद्धां मनांत बाळगावयास नको. एखादी काळसर्पिणी सुद्धां आपल्या पिलास क्वचित् विसंबेल; परंतु मुरादेवी आतां चंद्रगुप्ताला विसंबणार नाहीं. तथापि अजून पूर्ण बार भरावयाचा तो आपण भरलाच नाहीं. चंद्रगुप्ताच्या जीविताला संभाळण्याला ती जागरूक राहील, एवढ्यावरच आपण बसतां उपयोगी नाहीं. आपणही फार जागरूकता धरली पाहिजे. त्याच्यावर तर आपली सगळी भिस्त. त्याच्या जीवाला जर कांहीं झालें, तर आपला सर्वच व्यूह ढांसळून पडेल. तेव्हां आतां पुढें काय कार्य करावयाचें ? आतां पहिली गोष्ट ही कीं, म्लेच्छराजा पर्वतेश्वर याचा वकील येथें आहे त्यास भेटून असें सांगावयाचें कीं, पर्वतेश्वर जर या वेळीं उचल करील, तर आज

प्रसंग फार चांगला आहे. अशी सुसंधि पुनः कधीं येणार नाहीं. त्याला आणखी किरातराराजाचें व आपल्या खास वगैरे लोकांचेंही साहाय्य आपण देऊं असें सांगूं. मृत्युंजय कांहीं कमी चतुर नाहीं. त्यानें हा प्रसंग नंदराजांचा घात करण्यास फार चांगला आहे, असें जाणलेंच असेल. त्यांत आपण जर त्याला या वेळीं आपल्याकडून अशी अशी मदत होईल, आपण असा असा गृहभेद करूं शकूं असें वचन देऊन विलोभन दाखविलें, तर त्याच्या तोंडास खास पाणी सुटेल, आणि नंदराजांनीं आजपर्यंत जो त्याचा छळ केला, त्याचा सूड उगविण्याची इच्छा त्याला होईल. अशी इच्छा झाली म्हणजे पर्वतेश्वरास वाटेल तें साहाय्य देऊन आपण त्याच्याकडून नंदराजांचें यथास्थित कंदन काढूं. परंतु अशा तऱ्हेनें नंदराजांचा समाचार घेऊन पर्वतेश्वर मगधांत शिरला, तर अर्थातच तो मगधाच्या सिंहासनावर हक्क सांगेल. आणि त्यानें सिंहासन घेतलें म्हणजे मग त्याला त्या सिंहासनावरून हुसकावून देण्याला फार कठीण जाईल, किंबहुना अशक्यच होईल. अशा स्थितींत काय करावें ? पाहूं या. प्रथम नंदराजाच्या हयातींतच सुमाल्याचा वध ठरविल्या प्रकारानें करावयाचा. आणि तो वध झाला, कीं पर्वतेश्वरानें मगधावर स्वारी करून सर्व नंद मारावयाचे. नंद मारल्याबरोबर चंद्रगुप्त खरा कोण हें प्रसिद्ध करवून, लोकांची भक्ति त्याजवर—नंदाचा खरा पहिला मुलगा एकटाच राहिला म्हणून—बसेल असें करून पर्वतेश्वरास लोक प्रतिकूल करावयाचे. तसें न जुळलें, तर पर्वतेश्वराचा विश्वस्तपणें घातही करावयाचा. त्याचा पुत्र मलयकेतु लहान आहे, त्याला लोक इतके अनुकूल होणार नाहींत. त्याला आपण फुसलावून घेऊं किंवा वेळीं त्याला तेथून घालवून देऊन चंद्रगुप्ताच्या नांवाची द्वाहीही फिरवूं. त्याच्या बापाचा—पर्वतेश्वराचा—घात करण्याची आवश्यकता वाटली, तर तो घात आपण करावयाचा; परंतु त्याचा आळ मात्र नंदाचे पक्षपाती जे राक्षसादि त्यांच्यावर घालावयाचा. एकंदरींत काम मोठें बिकट. व्यूह मोठ्या कौशल्यानें रचला पाहिजे. परंतु सर्वच गोष्टी आतांच एकदम पूर्णपणें रचून चालणार नाहीं. सध्या आपल्यापुढें तीन गोष्टी आहेत. एक सुमाल्याचा मृत्यु, भागुरायण सेनापतीचा स्नेह हीं साधावयाचीं आणि पर्वतेश्वराचा वकील मृत्युंजय याची भेट घेऊन खडा टाकून पहावयाचा. सुमाल्याचा मृत्यु ज्या युक्तीनें साधण्याचा आपण संकल्प केला आहे, ती युक्ति साधल्यास अगदीं बेमालुम काम होणार. न साधल्यास आपलें कार्य प्रत्यक्ष जरी सिद्ध झालें नाहीं, तरी पुनः प्रयत्न केल्यास सिद्धि येण्याची खात्री आणि सध्यां प्रतिपक्षाबद्दल राजाच्या मनांत केवढा तरी संशय उत्पन्न होईल. तेवढें कार्य झालें, तरी कांहीं लहान गोष्ट नव्हे. भागुरायणाचा स्नेह संपादण्याला फारसें अवघड जाणार नाहीं. माझ्या शोधावरून मला असें कळलेंच आहे कीं, सेनापति भागुरायणाचें मन राजाविषयीं कांहीं केवळ शुद्ध नाहीं. वृषलकन्या क्षत्रियकन्या म्हणून राजाला अर्पण केली, आणि तिच्या पोटीं झालेला पुत्र नंदाच्या पवित्र सिंहासनावर बसविण्याचा यानें जाणून बुजून यत्न केला, असा इतर मंत्रिमंडळांनीं त्याच्यावर आरोप केला आणि त्याच्यावर राजाची नाराजी होईल असा व्यूह रचला होता. तेव्हां आपल्या प्रतिपक्ष्यांची जर फजिती उडाली, तर त्याला तें इष्टच आहे. तो जर इतर कांहीं युक्त्यांनीं आपल्या पक्षास आला तर ठीकच. नाहींपेक्षां आपण त्यास चंद्रगुप्ताचा खरा वृत्तांत सांगून त्याचें मन आपल्या पक्षाकडे

ओढून घेऊंच घेऊं; पण तो तीर शेवटला. बाकी सर्व तीर मोघ ठरेपर्यंत आपला तो अमोघ तीर बाहेर काढण्यांत अर्थ नाहीं. भागुरायण आपल्या पक्षाला मिळाला म्हणजे नव्याण्णव हिस्से काम झालें. कारण त्याच्या ताब्यांत सगळें सैन्य आहे. तो सेनाधिपति आहे. तो आणि लोक असे अनुकूल झाले, म्हणजे राक्षसारखे सचिव आपल्यास अनुकूल झाले नाहींत तरी हरकत नाहीं. राक्षस अनकूल होण्याची आशाच नको. तो नंदांचा अगदीं वाहिलेला सेवक नंदाचा उत्खात होई-पर्यंत–नंदरूप कोंवड्यांचें एक पिल्लूं जिवंत असेपर्यंत–तो कधींच अन्यपक्षाला मिळणार नाहीं. आणि नंदांचा उत्खात झाला, माझ्या प्रतिज्ञेप्रमाणें ही पृथ्वी निर्नंद झाली, नंदांचें किंवा नंदवंशाचें नखही धरित्रीवर नाहींसें झालें कीं, मग त्यांच्या उत्खाताबद्दल सूड उगविण्या-साठीं म्हणून तो आपल्या सगळ्या सामर्थ्याचा, चातुर्याचा व वजनाचा उपयोग करील. प्रजेपैकीं जितके लोक आमच्या विरुद्ध होतील तितके विरुद्ध करील. वेळीं प्रसंगीं कोणा तरी परकी राजाला मित्र करून त्याच्याकडून आमचा नाश करावयाला उद्युक्त होईल; पण मी त्याला पुरून उरेन. तो ज्या ज्या युक्तया आमचा पाडाव करण्यासाठीं योजील, त्या त्या मी हाणून पाडीन. आणि शेवटीं जर जमलें, तर त्याला सुद्धां आपल्या पक्षाकडे वळवून घेऊन चंद्रगुप्ताचा प्रधान करीन. मी तर काय ? बोलून चालून ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण. मला राज्याची, धनाची, अधिकाराची किंवा कसलीसुद्धां लालसा नाहीं. लालसा काय ती केलेली प्रतिज्ञा पूर्ण करून, हातीं धरलेल्या या अर्भकाला मगधदेशाच्या साम्राज्याचा चक्रवर्ती महाराजा करण्याची. याला या पुष्पपुरीच्या सिंहासनावर बसवि-ण्यांत कोणत्याही प्रकारचा अन्याय होणार नाहीं; उलट न्यायच होईल. वस्तुतः पहातां याच पोराचा अधिकार या सिंहासनावर सर्वांच्या आधीं आहे. सुमाल्याला यौवराज्या-भिषेक झाला, तो याला झाला पाहिजे होता; परंतु तो झाला नाहीं. याला जगांतून नष्ट केला अशा समजुतीनें जे आज आनंदांत आहेत, त्यांच्या डोळ्यांत अंजन घातलें पाहिजे. तसें अंजन घातलें, तर त्यांत अन्याय काय होणार ? एक वेळ त्यांनीं जाणूनबुजून केलेल्या अन्यायाबद्दल त्यांना जर चांगली कडक शिक्षा केली; तर त्यांत अन्याय काय ? आणि माझ्यासारखा सर्वथा पवित्र, विद्वान्, चतुर व राजाचें खरें हित चिंतणारा ब्राह्मण द्वारीं येऊन आशीर्वाद करतो, त्याला प्रथम आश्रय दिल्याची वाणी उच्चारून पुनः तीच वाणी पद-रच्या बुभुक्षित पंडितांच्या मूर्खपणाच्या गोष्टी ऐकून जो परत घेतो, त्याला तपोनिष्ठ, कर्म-निष्ठ, ब्रह्मनिष्ठ व शपादपि शारादपि असा ब्राह्मण नष्ट करण्याला उद्युक्त झाला तर त्यांत तरी अन्याय काय ?

असे नानाप्रकारचे विचार आर्य चाण-क्याच्या मनांत समुद्रकल्लोळाप्रमाणें वर उठत होते व खालीं पडत होते. शेवटला स्वतःविष-यींचा विचार मनांत आला, तेव्हां तर त्याची चित्तवृत्ति व चर्या हीं दोन्ही अत्यंत क्षुब्ध अशा महासागराप्रमाणें झालीं. ज्या दिवशीं राजसभेंत त्याचा अपमान झाला, त्या दिव-शींचा तो विलक्षण देखावा त्याच्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष दिसूं लागला. आपण मोठया उद्धतपणें राजसभेंत शिरून राजास आशीर्वचन करीत असतां आपली ती उद्धत मूर्ति पाहून चकित, क्रुद्ध व उद्विग्न झालेले सर्व पंडित आपल्या-कडे डोळे वटारून पहात आहेत, आणि राजानें आपलें आदरातिथ्य केलेलें पाहिल्या-बरोबर त्यांचा तो क्रोध फारच वाढला. इत-केंच नव्हे, तर त्या क्रोधाला मत्सराचें स्वरूप

आलें. तें पाहून आपल्यास फार आनंद झाला व राजाच्या गुणग्राहित्वाबद्दल आपणास संतोष होऊन विशेष आदरानें आपण राजाकडे पाहून त्याची मनःपूर्वक चांगली स्तुति करणार, तों एक सभापंडित उठून त्यांनीं आपली चर्पटपंजरी सुरू केली. ती ऐकून आपल्या अंतःकरणांत क्रोधाग्नि भडकून उठला. इतक्यांत त्या सभापंडिताचें भाषण संपून राजानें त्याच्या बोलण्याला मान डोलवून आपला अपमान केला तेव्हां आपल्या क्रोधाग्नीच्या भडक्याला अगदीं सीमाच नाहींशी होऊन आपल्या तोंडांतून शब्द नव्हेत तर त्या अंतःप्रज्वलित क्रोधाग्नीच्या ज्वालाच बाहेर पडूं लागल्या. दर पावलागणिक जणूं काय आपण धरित्रीला वांकवीतच आहों, अशा उद्दाम गतीनें आपण पावलें टाकीत राजसभेंतून जाऊं लागलों व जातां जातां तोंडानें आपल्या घोर प्रतिज्ञेचा उच्चार चाललाच आहे, असा एकंदर विलक्षण देखावा आणि त्यांत ती स्वतःची त्या वेळची मूर्ति हीं सर्व आदर्शांत पाहिल्याप्रमाणें त्याच्या दृष्टीसमोर उभीं राहिलीं, आणि आपण या वेळीं कोठें आहों, काय करीत आहों, हें जणूं काय पार विसरून जाऊन तो कोपिष्ठ ब्राह्मण एकदम उठून उभा राहिला. आणि फार उद्दाम गतीनें चालूं लागून तोंडानें " अरे मूर्खा धननंदा, तूं माझा अपमान केला नाहींस, तर दीर्घद्वेषी अशा कालसर्पाच्या फणीवर जाणूनबुजून पाय दिलास असें समज. तो कालसर्प आतां तुलाच काय, पण तुझ्या सगळ्या कुळाला, तुझ्या सगळ्या विर्णाला दंश करून सर्वांचा पूर्ण निःपात करील असेंही समज. हा विष्णुगुप्त—नव्हे चाणक्य आहे.–आतां तें विष्णुगुप्त नांव एव्हां कां येतें? झालेल्या अपमानाचें या नंदांच्या रक्तानें परिमार्जन होईल, तेव्हांच त्या नांवाचा पुनः या देहाकडून स्वीकार होईल. मधें कशाला तें मनांत येतें? " असे व अशा अर्थाचे आणखीही अनेक उद्गार फारच मोठ्यानें बाहेर पडले. त्या वेळचा आपला ध्वनि ऐकून व दण्दण् अशीं पावलें पडत होतीं त्यांचा प्रतिध्वनि ऐकूनच चाणक्य चपापला आणि थोडा भानावर आला. नंतर त्याच्या मनांत आलें, आपण कायबडबडलों तें आपल्या शिष्यांपैकीं कोणीं ऐकलें नाहींना? ऐकलें तर ते काय म्हणतील? आपल्या गुरुजींचें मस्तक बिघडलें, त्यांना वेड लागलें, कांहीं त्यांच्या मनाजोगें न झाल्यामुळें संतापवायु तर नाहींना झाला असेंही त्यांस वाटेल. तेव्हां आतां आपण स्वस्थ पडून निद्रा तरी घ्यावी, असें चाणक्यानें मनांत आणलें; परंतु मनाला इतका क्षोभ झाला असतां कोठली निद्रा येणार? अगदीं अरुणोदय होईपर्यंत त्याला झोंप आली नाहीं. आणि त्यामुळें त्याचे डोळे इतके लाल झाले कीं, जणूं काय प्रातःसूर्यानें आपलें रक्ततेजच त्याच्या त्या नेत्रांत उतरविलेंसें दिसलें. मात्र प्रातःसूर्य सौम्य असतो आणि चाणक्याचे नेत्र रौद्र दिसले.

# प्रकरण १३ वें.

## सुवर्णकरंडकांतील अपूप.

चंद्रगुप्त मुरादेवीपाशीं राहावयास आल्या पासून मुरादेवीच्या अंतःकरणाची स्थिति कांहीं चमत्कारिक झाली. त्याच्या प्रथमदर्शना-पासूनच तिचें चित्त कांहीं आनंदित व कांहीं खिन्न असें झालें. आपल्या भावाचा मुलगा असा मदनसुंदर, शूर व गुणी निघाला आहे हें पाहून तिला फार आनंद झाला व आज माझा बाळ जर असता, तर तोही एवढाच आणि असाच सुंदर, शूर व गुणी झाला असता, असें वारंवार मनांत येऊन ती खिन्न होई. तिनें चंद्रगुप्ताला राजदर्शन करविलें, त्या वेळीं, ' महाराज, हा माझ्या भावाचा— प्रद्यु-म्नदेवाचा-मुलगा चार दिवस माझ्याजवळ रहाण्यासाठीं म्हणून माझ्या भावानें व आईनें पाठविला आहे. आपली अनुमति असल्यास ठेवून घेतें, " असें ती महाराजांस म्हणाली. तेव्हां तिचा कंठ अत्यंत सद्गदित होऊन डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या आणि महाराजांनीं, " तुला रडायला काय झालें ?" असें विचारलें असतां तिचा शोक द्विगुणित होऊन ती अगदीं मोठमोठ्यानें स्फुंदन करून रडूं लागली. धनानंदानें अर्थातच तिला आग्रह केला, परंतु ती कांहीं केल्या सांगेना. शेवटीं त्यानें तिला आपल्या पोटाशीं धरून मुख कुर-वाळून अत्याग्रहानें विचारलें असतां, "आर्य-पुत्रा, मी कसं सांगूं ? जी गोष्ट आतां अगदीं विसरून जा, पुनः तिचं स्मरण करूं नको, अशी आपली आज्ञा झाली, ती गोष्ट मी आपल्यापुढें आतां कशी सांगूं ? पण आर्य-पुत्रा, आपली आज्ञा म्हणून तिचा उच्चार न करणें माझ्या हातचं आहे. त्याचं स्मरणही न करणं माझ्या हातचं नाहीं. पुत्राचं स्मरण मातेला होणार नाहीं, तर दुसऱ्या कोणाला होणार ? चंद्रगुप्ताला पाहिल्यापासून माझा बाळ आज एवढाच......" परंतु पुढें तिच्या तोंडून शब्द निघेनातच. अश्रु तर इतके वाहूं लागले कीं, राजाचा स्कंध व उरप्रदेश यां-वरील उत्तरीय भिजून गेलें. तिची समजूत घालतां घालतां राजास पुरेपुरेसं झालें आणि शेवटीं थोडा हंसत हंसत असेंही म्हणाला, " प्रिये मुरे, चंद्रगुप्त इथें राहिल्यानं तुला रोज असंच स्मरण होऊन शोक करशील, तर मी आपली अनुज्ञा देणार नाहीं. त्याला पाहून तुला गतगोष्टींचं विस्मरण होईल, आणि तूं समाधान मानून राहशील, तरच अनुज्ञा देईन, नाहींपेक्षां एक दोन दिवसांतच त्याला आपला परत जाऊंदे कसा. तुला आतां इतःपर काडी-इतकंही दुःख द्यायचं नाहीं, असा मीं निश्चय केला आहे, आणि तूं अशा प्रकारें गतगोष्टींचं स्मरण करून शोक करूं लागलीस, तर कसं बरं होणार ? "

" नाहीं. नाहीं. आर्यपुत्रा, " मुरादेवी चट्कन महाराजांच्या स्कंधावरून आपलें मस्तक उचलून व डोळे पुसून म्हणाली, " हा मीं आपला शोक आवरला. चंद्रगुप्ताला पाहिल्याबरोबर आज पहिल्यानं म्हणूनच मला दुःखाचा उमाळा आला. परंतु आतां पुनः नाहीं येणार. त्याला माझ्या दादानं पाठविल्यासारखा चार दिवस राहूं द्यावा अशी माझी विनंति आहे. "

"चार दिवस ?" धनानंद लागलीच तिला म्हणतोः—" चार दिवस कां ? तुला वाटेल तितके दिवस ठेवून घे. चारच दिवस कां म्हणतेस ? पाहिजे तर त्याला एखादा अधिकार सुद्धा देतों. म्हणजे माझ्या सुमाल्यावरोबर तोही कांहीं तरी राजकार्य शिकेल. कायरे चंद्रगुप्ता, शिकशील कीं नाहीं ? "

तें ऐकतांच चंद्रगुप्त किंचित् लाजला व अत्यंत विनीतपणें म्हणतो, " महाराजांचा अनुग्रह झाल्यावर आपण धन्य म्हणून त्याचा स्वीकार करणार नाहीं असा या आर्यावर्तांत कोण आहे ? " तें त्याचें उत्तर आणि तें उत्तर उच्चारतांना त्याची ती एकंदर ऐट पाहून राजा धनानंदास कौतुक वाटलें आणि तो एकदम त्यास पुढें म्हणतो, " शाबास, तूं मोठा वाक्चतुरही दिसतोस. माझ्या सुमाल्याला सोंगडी चांगला शोभशील. दम धर, त्याच्याकडे तुला पाठवितों. "

" नको नको, आर्यपुत्रा, " मुरादेवी मध्येंच म्हणाली, " आजच तो आला आहे, आजच नाहीं पाठवला तरी चालेल. सुमाल्यराज रोजच्याप्रमाणें आपल्या पादवंदनाला उदयिक येतील. तेव्हां त्यांची व याची समक्ष भेट करवावी म्हणजे झालं. "

मुरादेवीचें हें बोलणें चाललें असतां राजाचे नेत्र एकसारखे चंद्रगुप्ताकडे लागून राहिले होते. त्याचा तो सुंदर चेहरा पाहून एकदम त्याच्या मनांत कांहीं विचार आला व तो मुरादेवीस म्हणतो, " प्रिये, मुरे, मी मघापासून याच्या मुखाकडे पहातों आहें, तर माझ्या मनांत याच्याविषयीं विलक्षण वात्सल्य उत्पन्न झालं आहे. प्रथमदर्शनींच असं कां व्हावं, म्हणून कारण शोधूं लागलों, तर तें बेटं फारच लवकर व अगदीं जवळ सांपडलं !"

" तें काय बरं ? " मुरादेवीनें चट्कन् मोठ्या उत्सुकतेनें व कौतुकानें विचारलें.

" अग, तुझ्या आणखी याच्या चर्येंतलं विलक्षण साम्य ! तूंच पहा, याच्या मुखावरली प्रत्येक रेषा, आणखी एकंदर सगळी ठेवण अगदीं हुबेहूब तुझ्या या मुखकमलाप्रमाणें आहे. चंद्रगुप्ता, गुलामा येथें येऊन तुला चार घटका झाल्या नाहींत तोंच अशा चोऱ्या करूं लागलास काय ? मग बाबा, तुला आम्ही क्षणभरसुद्धां येथें ठेवून घ्यायला अनुज्ञा देणार नाहीं. " महाराज कांहीं तरी विनोद करीत आहेत हें मुरादेवीला खचित समजलें; परंतु जणूं काय आपल्यास कांहीं समजलें नाहीं असें दाखविण्यासाठीं अगदीं घाबरल्यासारखें दाखवून प्रथम चंद्रगुप्ताकडे वळून म्हणते, " चंद्रगुप्ता, काय बाबा केलंस, काय कुणाचं चोरलंस ? " व नंतर लागलीच तशाच घाबऱ्या परंतु त्यांत थोड्या केविलवाण्या स्वरानें महाराजांस म्हणते, " महाराज, काय यानं कोणाचं चोरलंन् ? मला कांहीं वाटत नाहीं तो असं कांहीं..."

धनानंद एकदम मधेंच चंद्रगुप्ताकडे डोळे मिचकावून, परंतु मुरेकडे गंभीरपणें पाहून म्हणतो, " अग, नाहीं कसं ? ज्याचा मी स्वामी आहें अशी वस्तु यानं चोरली आहे. बरं चोरली तर चोरली; पण ती अगदीं राजरोसपणें बरोबर घेऊन माझ्यापुढें आला आहे. तेव्हां आतां याला त्याबद्दल चांगलाच दंड केला पाहिजे. तुझा भाचा म्हणून त्याला

गय करतां कामा नये. आणखी मी करणारही नाहीं. वाहवारे चंद्रगुप्ता, असा का तूं आहेस ? ''

इतका वेळ मुरादेवीला तो विनोद वाटत होता; आतां तर तो कांहीं तरी विनोदच अशाबद्दल खात्री झाली, परंतु जितकी तिची खात्री झाली, तितक्याच मानानें तिनें अधिक घाबरल्याचें सोंग केलें आणि ती एकदम कावरीबावरी होऊन उठून उभी राहून व अर्धवट हात जोडून म्हणते, " महाराज, नकाहो, त्याला इथें येऊन चार घटका झाल्या नाहींत तोंच शिक्षा वगैरे करण्यापर्यंत येऊं नका. काय जो अपराध त्यानं केला असेल तो क्षमा करा. त्यानं काय घेतलं असेल, तें मी आपल्या चरणापाशीं ठेवायला लावतें. आणखी त्याला आपली परत लावून देतें कशी.''

" नाहीं, नाहीं. '' राजा धनानंद अधिकच निष्ठुरतेचा आव आणून म्हणतो, " याचा अपराध क्षमा करण्याजोगा नाहीं. इतर कोणाची वस्तु यानं चोरली असती, तर मीं क्षमा केली असती; पण माझी वस्तु घेऊन पुनः माझ्यासमोर येऊन उभा रहातो, इतका हा जर धीट आहे, तर याला शिक्षा का होऊं नये ? मी ती तेव्हांच ओळखीन अशी भीति सुद्धां वाटूं नये ? चंद्रगुप्ता, बोल...''

शेवटीं राजानें चंद्रगुप्ताला जी हांक मारली, ती फारच कठोर स्वरांत होती. ती ऐकून चंद्रगुप्तसुद्धां कावराबावरा झाला. त्याच्या भुंवया वर चढल्या, डोळे कांहीं आश्चर्य व कांहीं क्रोध यांनीं विस्फारित झाले आणि युद्धास उभें रहावें त्याप्रमाणें त्याचा पवित्रा झाला. त्याचप्रमाणें इकडे मुरादेवीनें तर अतिशयच घाबरल्याचा आविर्भाव आणला व ती एकदम, ' नकाहो, नकाहो ' असें फार केविलवाण्या स्वरानें म्हणूं लागली. ती त्या दोघांची स्थिति पाहून राजा धनानंदास एकदम फारच हंसूं आलें व तो आपल्या प्रियपत्नीस म्हणतो, " अग वेडे, पहा बरं आतां एक आरसा आणून. तूं आपल्या मुखाकडे पहा, आणखी याच्या मुखाकडे पहा. म्हणजे मी म्हणतों त्याप्रमाणें माझ्या वस्तूची चोरी करून ती आपल्या अगदीं चर्येवर हा घेऊन आला आहे कीं नाहीं तें समजेल, तुझं हें अलौकिक सौंदर्य यानं घेतलं आहे कीं नाहीं पहा ? आणखी तुझ्या सौंदर्याचा स्वामी कोण ? मग यानं माझी वस्तु चोरलीन् का नाहीं ? कां ? चोरलीन् असं सिद्ध करायला आणखी कांहीं प्रमाण पाहिजे का ? काय रे चोरा ? तूं आपला अपराध कबूल करतोस का नाहीं ? तूं आपल्या आतेचं सौंदर्य चोरलं आहेस का नाहीं ?'' तें ऐकतांच मुरादेवी एकदम खुदकन हंसली व केवढें तरी एक अरिष्ट टळलें असें वाटून माणसानें उसासा टाकावा असा उसासा टाकून म्हणते:—

" काय बाई तरी मी घाबरलें ! मला आपलं खरंच वाटलं कीं, कांहीं तरी-पण माझ्या दादाचा मुलगा असं कधींसुद्धां कांहीं करायचा नाहीं, अशी माझ्या मनाची पक्की खात्री. तरी पण आपण जेव्हां अगदीं गंभीरपणानं बोलूं लागला, तेव्हां बाई माझ्या जीवाचा थरकांप झाला. वाटलं कीं, आपल्या भाच्याला ये बस सुद्धां पुरतं म्हटलं नाहीं, तों हें काय नवीन लचांड उद्भवलं...''

" पहा पण मी म्हणतों तसं आहे कीं नाहीं ? प्रिये मुरे, हा मुलगा आहे. तेव्हां तसा कांहीं फरक असायचाच; पण तूं याच्या वयाची प्रथम जेव्हां येथें आलीस, तेव्हां अगदीं हुबेहूब अशी दिसत होतीस. मला तें तुझं रूप आठवलं, अगदीं फारच साम्य आहे तुझ्या आणखी याच्या चर्येंत. हा गुलाम मोठा भाग्यशालीही निघणार, अशीं याचीं सामुद्रिक चिन्हंही दिसत आहेत. ''

" इडापिडा टळो, आणखी माझ्याचसारखा भाग्यशाली न निघो म्हणजे झालं..."

" कां बरं, तुझं भाग्य काय वाईट आहे?" राजानें मधेंच तिला म्हटलें व तिच्याकडे पाहून हंसूं लागला.

" आर्यपुत्रा, आपल्याला राग येणार नाहीं तर सांगतें कीं, आपल्या या हंसण्यांतच आपल्या प्रश्नाला उत्तर आहे."

अशा तऱ्हेनें आणखीही कांहीं विनोदात्मक व कांहीं इतरप्रकारचें भाषण होऊन चंद्रगुप्ताची व राजाची प्रथमभेट होऊन राजानें त्यास आतेजवळ राहण्यास आज्ञा दिली.

प्रथमभेटीचा समारंभ तर आपल्याला जसा पाहिजे त्याच्याहीपेक्षां अनुकूल असाच झाला हें पाहून मुरादेवीस फारच आनंद झाला. आणि तिनें त्या दिवशीं सायंकाळीं चंद्रगुप्तावरून बळी ओवाळून टाकविला. चंद्रगुप्ताची आपल्याच मंदिरांत रहाण्याची उत्तम सोय करून दिली. मात्र त्याच्या खाण्यापिण्याच्या बाबतींत ती सर्व कांहीं स्वतः पाहत असे. तिनें चंद्रगुप्तास बजावून बजावून सांगितलें होतें कीं, एक घोटभर पाणी प्यावयाचें झालें, तरी तें मला दाखविल्याखेरीज पिऊं नको. किंवा कोणी दुसऱ्या कोठेंही कांहीं खावयाला दिलें तरी खाऊं नको. या पाटलिपुत्रांत स्थिति मोठी वाईट आहे. कोण्या वेळीं काय होईल याचा कांहीं नेम नाहीं. आपल्या आतेनें आपल्यास असें कां बजावून सांगितलें, हें चंद्रगुप्ताच्या लक्षांत आलें नाहीं; परंतु चाणक्यानें त्यास आज्ञाधारकपणानें वागण्याची संवय लावून ठेवली असल्यामुळें, त्यानें असें कां, तसें कां, असे कांहीं प्रश्न न विचारतां आज्ञा पाळीन.असें वचन दिलें. अशा प्रकारें चंद्रगुप्ताची नंदाच्या राज्यांत पाटलिपुत्रांत त्याच्या प्रिय महिषीच्या मंदिरांत स्थापना झाली.

ह्या गोष्टीस सुमारें पांच दिवस झाले. एके दिवशीं राणी मुरा महाराजांच्या जवळ बसली होती, इतक्यांत तिची एक दासी येऊन तिला म्हणाली, " देवी, पट्टमहिषी सुनंदाबाईसाहेब यांच्याकडून एक परिचारिका महाराजासाठीं एक सुवर्णकरंडक आणि पत्रिका घेऊन आली आहे. आमच्याजवळ द्या, आम्ही पोंचवितों म्हटलं तर म्हणते महादेवींची अशी आज्ञा आहे कीं, तूं स्वतःच महाराजांच्यापुढें नेऊन ठेव, नाहीं तर तशीच परत ये. ती बाहेर उभी आहे. मग जशी आपली आज्ञा होईल तसं खरं."

तें ऐकून मुरादेवी एकदम तिच्या अंगावर येऊन तिला म्हणते, " हा मूर्खे, तिला नको म्हणून आडवून धरायला तुम्हाला कोणीं सांगितलं? एक लक्ष वेळां तुम्हांला सांगितलं असेल कीं, इतर महिषींकडून केव्हांही कांहीं घेऊन कोणी दासदासी आल्या तर त्यांना नको म्हणत जाऊं नका. अगदी बेधडक आंत येऊं देत जा. माझ्यासारखं दुःख कोणाला कधीं यापुढें –निदान माझ्याकडून–होऊं नये. जशी मी महाराजांची पत्नी, तशा त्या सर्व नाहींत वरं? जा, तिला म्हणावं काय असेल तें घेऊन महाराजांस अर्पण करून जा. तुला कोणीही अडविणार नाहीं. जा. जा. तोंड काय पहातेस? तिला घेऊन ये."

तें ऐकून राजा धनानंद तिला म्हणतो, " ती दासी कशाला आंत यायला हवी? काय असेल तिनं आणलेलं, तें आत घेऊन ये म्हणजे झालं." परंतु मुरादेवी पुनः राजास म्हणाली, " महाराज तसं नको. आपल्याच चरणापाशीं ती पत्रिका आणि करंडक ठेवावा म्हणून जर तिच्या स्वामिनीची आज्ञा आहे, तर तिचा भंग करायला आपण कशाला तिला लावावं! आपल्या चरणाजवळ आणून ठेवून जाईना बिचारी? जा

जा. तिला म्हणावं काय आणलं आहेस तें घेऊन ये. महाराज वाट पहाताहेत. ”

दासी बाहेर गेली आणि थोड्याच वेळानें दुसऱ्या एका दासीस घेऊन आंत आली. या दासीच्या हातांत एक सुवर्णकरंडक होता आणि एक पत्रिका होती. ती आंत येण्याबरोबर तिनें महाराजांच्या चरणाजवळ त्या जिनसा ठेवून विज्ञप्ति केली, “ महाराज, महादेवी सुनंदा हिनें अनेक प्रणतिपूर्वक विज्ञप्ति केली आहे कीं, महाराजांनीं ही पत्रिका वाचावी आणि या सुवर्णकरंडकांतील उपायनाचं ग्रहण करावं. कांहीं उत्तर परत न्यायचं असल्यास मला थांबायलाही सांगितलं आहे. मग जशी महाराजांची आज्ञा. ”

“ परिचारिके, ती पत्रिका आणखी तो करंडक दोन्ही परत घेऊन जा. चार दिवस मी तिच्या भेटीस गेलों नाहीं, तों कसल्या पत्रिका आणखी कसलीं उपायनं पाठवते ? तुम्हां दासींनाही कांहीं उद्योग नाहीं असं वाटतं. जा, एक क्षणभर सुद्धां इथें उभी राहूं नकोस. तिला म्हणावं मी तुझ्या भेटीला येईन ते दिवशीं ही पत्रिका आणखी हें उपायन काय आहे तें घेईन. स्त्रिया किती तरी मत्सरी असतात बोआ ! ”

“ महाराज ” मुरादेवी मध्येंच म्हणाली, “ पट्टमहिषी महादेवी सुनंदा हिचा आपण असा विनाकारण कां उपमर्द करतां ? पत्रिका ठऊन घेऊन वाचून तर पहावी. एखाद्यानं औत्सुक्यानं कांहीं पाठवावं आणि तें ज्याला पाठविलं असेल, त्यानं तें परत पाठवावं म्हणजे त्या पाठविणाराचा केवढा बरं उपमर्द होतो, त्याला किती खेद होतो ? तर माझी हात जोडून विनंति आहे कीं, महादेवीच्या पत्रिकेचा आणि उपायनाचा आपण असा अनादर करूं नये. मी ती पत्रिका उघडून आपल्याला वाचून दाखवितें. ”

“ प्रिये मुरे, तूंच अशी कशी अगदीं निर्मत्सर आणखी निर्द्वेष झालीस ग ? आणखी त्यांतही सपत्नीजनांविषयीं निर्मत्सरता. तुझा त्या सगळ्या जणी इतका मत्सर करतात, आणखी तूं आपली,– मी या तुझ्या रंगमहालांत आल्या दिवसापासून पहातों आहें,– तूं आपली त्यांचा पक्ष घेऊन भांडत असतेस. याला काय म्हणावं ? तूं तर त्यांचा अत्यंत द्वेष करावास, त्यांना नेहमीं पाण्यांत पहावंस तसं कांहींसुद्धां नाहीं, हें काय ? ”

तें ऐकून मुरादेवी किंचित् हंसली व म्हणते, “ महाराज, अपराधावांचून पतीनं परित्याग केला असतां स्त्रीच्या मनाला काय दुःख होतं व त्याचा उद्वेग कसा असतो, याचा अनुभव मला फार उत्तम आहे, यामुळें माझ्या स्वप्नांतसुद्धां–आणखी माझ्या शत्रूवर देखील–असा भयंकर प्रसंग येऊं नये अशी माझी सदोदित इच्छा असते. मग मी सुनंदादेवीसारख्या साध्वी स्त्रीचा कसा बरं मत्सर आणि द्वेष करीन ? कधीं करावयाची नाहीं. माझं तें ब्रीदच नव्हे. आणखी काय सांगूं ? ”

मुरादेवीचें हें बोलणें चाललें असतां ती सुनंदेची परिचारिका अगदीं चकित होऊन ऐकत होती. महाराजही त्याप्रमाणेंच मुरादेवीच्या चर्येकडे, कांहीं आश्चर्य व पुष्कळशी आदरबुद्धि या दोहोंच्या मिश्रणानें युक्त अशा दृष्टीनें पहात होते. त्या तेवढ्या शेवटल्या बोलण्यानें तर फारच कार्य झालें. धनानंदाच्या मनास पक्कें वाटलें कीं, मुरेसारखी अत्यंत सुशील, सुचरित, शुद्ध व निष्कपटी स्त्री अत्यंत विरळ. किंबहुना दुसरी कांहीं या जगतांत असणें शक्य नाहीं. तिचें बोलणें झाल्यावर थोडा वेळ तिच्याकडे स्तब्धपणें पाहून तो त्या सुनंदेच्या परिचारकेकडे वळून म्हणतो, “ परिचारिके, तूं आपल्या स्वामिनी-

सांग कीं, महाराज पत्रिका आणखी तो करंडक परतच करीत होते, परंतु मुरादेवींनं तुमच्याबद्दल रदबदली–ज्या मुरादेवीचा तुम्हीं सगळ्यांनीं इतका द्वेष केलात, तिला विनाकारण जगांतून उठवून लावलीत-त्या मुरादेवीनं तुमची रदबदली केली, म्हणून तो करंडक, आणखी ती पत्रिका त्यांनीं ठेऊन घेतली. जा त्या पत्रिकेचं एवढंच उत्तर, दुसरं कांहींसुद्धां उत्तर नाहीं. ''

महाराजांचें तें भाषण ऐकून ती परिचारिका त्या दोनही जिनसा तेथें महाराजांच्या चरणापाशीं ठेवून तेथून चालती झाली. मात्र जातांना तिनें मुरादेवींकडे फार चमत्कारिक दृष्टीनें पाहिलें.

इकडे मुरादेवीनें ती पत्रिका हातीं घेऊन महाराजांकडे पहात पहात म्हटलें, '' आर्यपुत्र, हीं आपण हातीं घेऊन वाचतां कीं मी उघडून वाचून दाखवूं आपल्याला? माझी पत्रिका आपण जर वाचून न पाहतां तशीच परत लावून दिली असती, तर मला किती बरं वाईट वाटलं असतं! तसंच त्यांना वाईट वाटेल. म्हणून म्हणतें कीं, तसं आपण करूं नये. मी वाचतें. ''

असें म्हणून मुरादेवी ती पत्रिका उघडणार तों धनानंदानें ती तिच्या हातांतून ओढून घेऊन तिला म्हटलें, '' छे. छे. तूं नको ती उघडून वाचूं. न जाणों तुझ्याबद्दल कांहीं तरी लिहून माझं मन तुझ्याविषयीं कलुषित करण्याचा हा यत्न असेल, नाहीं म्हणून कशावरून? मीच पाहतों. ''

'' बरं तर, तोंपर्यंत मी हा सुवर्णकरंडक उघडून त्यांत काय आहे तें पहातें, '' असें म्हणून तिनें करंडक उघडला. तों आंत सुंदर रीतीनें बनविलेले अपूप दिसले. महाराज तिकडे वाचीत होते. पत्रिकेंतील मजकूर अगदीं थोडा होता. तो एका क्षणांत वाचून महाराज म्हणाले, '' कांहीं नाहीं. काल रोजीं महादेवीनं कैलासनाथाच्या कोणत्याशा व्रताचं उद्यापन केलं, त्याच्या प्रसादाचे चार अपूप पाठविले आहेत. हे अपूप तिनं स्वतः आपल्या हातानं केलेले आहेत, तेव्हां मीं त्यांतला एक तुकडा तरी खावा अशी तिची विज्ञप्ति आहे. प्रिये मुरे, हा कैलासनाथाचा प्रसाद आहे, त्याचा अनादर करूं नये. ये, तूं आणखी मी एक एक तुकडा खाऊं. ''

असें म्हणून राजानें करंडकांत हात घालून एक अपूप घेतला व त्याचा एक तुकडा मोडून त्यानें तिच्या हातावर ठेविला व दुसरा घेऊन तो आपल्या मुखांत घालणार, इतक्यांत मुरादेवीनें एकदम, '' महाराज, दगा, कांहीं तरी दगा, आपण खाऊं नका, '' असें घाबऱ्या घाबऱ्या म्हणत त्याचा हात खालीं ओढला.

राजा चकित होऊन, '' काय! म्हणतेस काय! कसला दगा? '' असें तिला विचारूं लागला. तेव्हां ती तितक्याच घाबरेपणानें धापा टाकीत म्हणते, '' आपल्या जीवाला दगा, दुसरा कशाचा दगा! या अपूपांत कांहीं तरी विष आहे. माझं म्हणणं मी प्रत्यक्ष खरं करून दाखवितें. ''

असें म्हणून तिनें आपल्या एका दासीस, '' माझ्या त्या श्वेतांबरी मांजरीला घेऊन ये ग, '' असें झटकन् सांगितलें.

---

# प्रकरण १४ वें.

## मार्जारीचा मृत्यु.

दासी श्वेतांबरीस आणीपर्यंत मुरादेवीची चर्या पहाण्यासारखी होती. जशी एखादी अत्यंत प्रेमळ माता आपल्या वत्साचें फार जागृतपणें पालन करीत असतां अगदीं आकस्मिकपणें त्यावर आलेलें भयंकर संकट पहाते, आणि तिचा जीव उडून जाऊन आतां या वत्साच्या संरक्षणार्थ काय करूं आणि काय न करूं असें तिला होऊन जातें, त्याप्रमाणेंच या वेळीं मुरेची अवस्था दिसूं लागली. आपल्या पिलांवर संकट आलेलें निवारण करण्यासाठीं क्रूर रूप धारण करून पिलांस पाठीशीं घालून त्यांची जननी स्वतः पुढें होते, त्याप्रमाणें तिची अवस्था झाली. अपूपकरंडक आणि राजा यांच्यामध्यें आपण होऊन तिनें तो करंडक झांकून ठेविला. जणूं काय राजा त्यांतील एखादा तुकडा काढून घेईल आणि खाईल असें तिला भय पडलेंसें दिसलें.

तिचें तें एकंदर स्वरूप पाहून राजा फारच विस्मित झाला. ही 'दगा, दगा' म्हणून असें काय करते, आणि हिनें आपल्या श्वेतांबरी मांजरीला आणण्यास सांगितलें याचें कारण तरी काय, हें प्रथम राजाच्या कांहींच लक्षांत आलें नाहीं. त्यानें तिला 'काय? काय?' म्हणून अनेक वेळ विचारिलें, परंतु एखाद्या अत्यंत भ्रांतचित्त माणसाप्रमाणें ती कोणत्याही प्रश्नास उत्तर न देतां त्या करंडकाच्या व राजाच्यामध्यें आपला हात धरून वटारल्या डोळ्यांनीं त्या अपूपांकडे पहात होती. इतक्यांत त्या श्वेतांबरी मांजरीस आणावयास गेलेल्या दासीनें त्या मांजरीस आणलें. तिला पहाण्यावरोबर मुरादेवीनें प्रथम "हां वरी आणलीस, आण इकडे" असें हास्यपूर्वक म्हटलें. त्या मांजरीस तिनें आपल्याजवळ घेतलें आणि नंतर अगदीं खिन्न आवाजानें म्हणते, "वत्से श्वेतांबरी, आजपर्यंत याच माझ्या हातांनीं तुला दूध घातलं आणि प्रेमानं वाढविलं, पण आज याच हातांनीं तुला विष चारून तुझा मी प्राण घेणार, समजलीस? ये. त्याखेरीज या अपूपांत विष आहे, याबद्दल मनाची पक्की खात्री होणार नाहीं. ती खात्री झाली पाहिजे, म्हणजे याच्यापुढें सावधपणानं वागायला ठीक पडेल." हें तिचें भाषण वरेंचसें स्वतःशींच होतें; परंतु तें कांहीं ती अगदीं मनांतल्या मनांत बोलत होती असें नाहीं, चांगली मोठ्यानें बोलत होती. राजानें तें तिचें बोलणें ऐकलें. इतक्यांत तिनें आपल्या हातीं असलेला तो अपूपाचा तुकडा त्या मांजरीपुढें केला., तों काय चमत्कार! तो तुकडा नुसता ती हुंगून दूर झाली. खाईना. तेव्हां मुरादेवी "हं! हं! एकूण तुलासुद्धां यांत विष आहे हें समजलं अं? पण तेवढ्यानं नाहीं माझी खात्री होणार. हा तुकडा मी तुझं तोंड उघडून त्यांत घालीन

आणि तूं टाकूं लागलीस, तरी तो तसाच तुझ्या तोंडांत दडपून तुला त्याचा एक आंवढा तरी गिळायला लावीन, म्हणजे तुझी काय स्थिति होते ती समजून येईल. " असें म्हणाली व तिनें लागलींच तिच्या तोंडांत तो तुकडा कोंबलाच. मांजरीनें आपलीं नखें बाहेर काढलीं व पाठ उंचावून संतापानें ती आपली शेंपटी उडवूं लागली. परंतु दृढनिश्चयी मुरेनें तिकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. तिनें तिचें तोंड दाबून धरलें. मांजरीनें तिच्या हाताचे ओरबाडे काढले. तिच्या नाजूक हातांतून रक्त वाहूं लागलें; परंतु मुरा कांहीं केल्या तिचें मिटलेलें तोंड सोडीना. राजानें तिला, " हें काय ? हें काय हें ! तिला सोडून दे, " असें पुष्कळ म्हटलें; परंतु तिनें तिला सोडलें नाहीं. एकसारखें तिचें तोंड दाबून धरलें होतें. एकीकडे मागल्या व पुढल्या पायांच्या तीक्ष्ण नखांनीं मांजरी ओरबाडण्याचें काम करीतच होती ! कोंपरापासून तों मनगटापर्यंत तिचे दोन्ही हात अगदीं रक्तबंबाळ झाले, परंतु तिकडे तिनें यत्किंचित् सुद्धां लक्ष्य दिलें नाहीं. त्या मांजरीनें त्या अपूपाच्या तुकड्यामुळें सुटलेल्या लाळेचे दोन आंवढे गिळले असें जेव्हां पक्कें तिनें पाहिलें, तेव्हां त्या मांजरीस तिनें सोडून दिलें. मांजरी सुटली ती प्रथम तिनें आपल्या तोंडांतला तो अपूपाचा तुकडा टाकून पळूं लागली; परंतु थोडीशी, सुमारें पंधरा वीस हात पळत जाते न जाते, तों गांगरून जाऊन जागच्या जागींच घोंटाळूं लागली. दोनच घुटके तिनें घेतले असें मुरेस वाटत होतें, परंतु तिनें तोंड दाबल्यापासून कितीं तरी घुटके आंतल्या आंत गिळले होते, आणि आतां त्या विषाराचा परिणाम तिजवर दिसूं लागला. ती जागच्या जागीं घोंटाळूं लागण्याबरोबर मुरादेवी धनानंदास म्हणते, " पहा, पहा, महाराज, ती आतां किती गांगरून गेली आहे. आतां घटकाभरांत ती मरून पडणार यांत शंका नाहीं. आपण उगीच चमत्कार पहा. असलं विष घालून हे अपूप सुवर्णकरंडकांत घालून स्वतः आपल्याला खाण्यासाठीं पाठविणाऱ्या माणसांचं साहस तरी अवर्णनीय, नाहीं तर मौर्ख्य तरी अचिंत्य ! त्याखेरीज असं कोणी करणार नाहीं. परंतु असले प्रकार व्हायचेच असं मनांत येऊन महाराजांच्या जीवरक्षणासाठीं डोळ्यांत तेल घालून जागृत बसलेल्या मुरादेवीचं स्मरण या मंडळींना नाहीं असं दिसतं. ती तशी जागृत नसती, म्हणजे आपल्या मनाप्रमाणें केव्हांच झालं असतं.—पहा, महाराज, आपल्याकरितां मोठ्या प्रेमानं आपल्या पट्टाभिषिक्त आद्यमहिषीनं पाठविलेल्या अपूपाच्या तुकड्यानं या माझ्या श्वेतांबरीची काय अवस्था झाली पहा ! अगबाई ! काय जलाल विष हें ! तिचं सर्वांग काळं पडलं. डोळे तर किती भयंकर दिसताहेत. आणि शेवटले आचके देतांना तिची काय अवस्था होते आहे ती पहा. एकूण त्या अपूपप्रसादाचं सेवन करणाराची अशी स्थिति व्हायची होती ! ठीक ठीक. राज्यलोभानं आणखी अधिकारलोभानं आणखी सवतीमत्सरानं काय काय पापं करायला ही मंडळी उद्युक्त होईल, हें सांगणं मोठं कठीण आहे इतकंच. " असें बोलून मुरादेवी अत्यंत उद्विग्न दृष्टीनें महाराजांकडे पाहूं लागली. इतक्यांत त्या मांजरीनें प्राण सोडला. तिचे ते उघडे डोळे अतिशय भेसुर दिसत होते आणि एकंदर तोंड-ओंठही कोळशाप्रमाणें काळींठिक्कर पडलीं. तें पाहतांच धनानंद संतापला आणि एकदम म्हणतो, " अग चांडाळणी, माझ्या जीवावर तूं उलटलीस अं ? वायनाच्या मिषानं अपूप करून त्यांत असलं भयंकर विष घालून मलाच नष्ट करून टाक

ण्याची दुष्ट इच्छा धरून सुवर्णकरंडकांत ते अपूप भरून मला पाठवलेस ! आणखी बरोबर आपल्या स्वतःच्या हातानं पत्र लिहून ! वा ! वा ! आतां तुला क्षणमात्र तरी तुझ्या एश्वर्यावर ठेवतों का बघ. तुला तुझ्या अंतः-पुरांत गाढवावर उलटी बसवून तुझी धिंड काढून कोल्ह्याकुत्र्यांकडून तुझं शरीर खाववितों. माझ्या सुमाल्याची माता, म्हणून एकवार तुला इतकी कडक शिक्षा करूं नये असं वाटतं; परंतु नाहीं, तूं माझ्या स्वतःच्या जीवावर उठलीस, त्या तुला कशी गय करूं ! तूं उद्या स्वतःचं कार्य साधण्यासाठीं त्या आपल्या पोराच्या जीवावर उठशील. तें कांहीं नाहीं. तुला चांगलीच शिक्षा झाली पाहिजे. ..."

मुरादेवी मध्येंच त्यास म्हणते, " महाराज, असे एकदम इतके क्षुब्ध होऊं नका. महादेवीनंच हें सगळं भयंकर कारस्थान रचलं आणि तिनंच हा विषप्रयोग केला असं म्हणायला आपल्याला तरी काय बरं आधार आहे ? " हें बोलत असतां मुरादेवीचा एकंदर आविर्भाव मोठा पाहण्यासारखा होता. एखाद्या मनुष्याचें मन आधींच विषपूर्ण झालें असतां, त्यांत अधिक भर घालण्याच्या हेतूनें दुष्ट माणसें जशीं बाह्यतः विरुद्ध बाजूनें बोलत असतात, तसाच प्रकार होता; परंतु राजास तें दिसलें नाहीं, तो एकदम म्हणतो, " काय आधार आहे ? याच करंडकांतल्या अपूपाचा तुकडा खाऊन—तुकडा खाऊन सुद्धां नाहीं-नुसता तो तुकडा तोंडांत घातल्यानं सुटलेल्या लाळेच्या घुटक्यांनीं जर मांजरी मेलेली मीं प्रत्यक्ष पाहली, तर आणखी आधार तो काय पाहिजे ? मी स्वतः खाऊन मरून आधार पाहूं का काय ? " " महाराज, असे रागानं उतावळे होऊं नका " मुरादेवी अत्यंत शांतपणें व दृढतेनें म्हणते, " उतावळी केल्यानं कांहींसुद्धां कार्यभाग होत नाहीं. माझ्या कामीं आपण उतावळी केली, त्या उतावळींचा काय उपयोग झाला ? आज युवराज होऊन राज्यकारभारांत आपल्याला हातभार लावायला लागला असता असा पुत्र गेला. कोणी जरी आपल्या जीवाचं कांहीं करण्याचा प्रयत्न केला असला तरी तो प्रयत्न सफल झाला नाहींना ? कृष्णसर्पिणीसारखी जागत बसलेली मी तसा कांहीं भयंकर प्रकार कधीं होऊं देईन का ? जर कांहीं झालं नाहीं, तर कां उगीच उतावळी करतां ? शांत चित्तानं विचार करा, शोध करा आणि अगदीं निःसंशय खात्री झाली, म्हणजे मग कोणाला काय शिक्षा करायची असेल त्याला आपण समर्थच आहां. "

धनानंद हंसून तिला म्हणतो, " दुधानं पोळलं, म्हणजे दहींसुद्धां फुंकरून फुंकरून-प्यावं म्हणणारांपैकींच तूं मला दिसतेस. वेडी कुठली ! म्हणे विचार करा, शोध करा-विचार कसला करा आणखी शोध कसला करा ! माझ्या देखत तिची पत्रिका आणखी सुवर्णकरंडक घेऊन तिची दासि येते. मी ती पत्रिका वाचतों. त्यांत अपूप मुद्दाम आपल्याकरितां पाठविले आहेत असं लिहिलेलं– मु माझ्याकरितां पाठविलेलेच नव्हे, तर केलेलेही खरे !—त्या अपूपाचा एक तुकडा माझ्या हातानं मी तुला देतों. तोच तूं या मांजरीला घालतेस, आणि ती मांजरी माझ्या डोळ्यांदेखत तडफडून मरते ! आणखी आतां शोध काय करूं आणि विचार काय करूं ? "

मुरादेवी त्याचें तें बोलणें ऐकून हंसली व म्हणते, " महाराज, ज्या सपत्नींनीं आजपर्यंत माझा मत्सर करून माझा सर्वस्वीं घात केला, त्या सपत्नींपैकीं अगदीं मुख्यचं कौटिल्य बाहेर पडून तिच्यावर आपला रोष झालेला पाहून मला आनंद व्हावा, असं आपल्याला वाटत असेल; पण मला आनंद

होत नाहीं. ती खरोखर मला निरपराधी असेल, अशी माझी मनोदेवता मला सांगते. जर खरोखर ती निरपराधी असली, तर तिला आपण एकदम शिक्षा केल्यानं केवढा अन्याय होणार आहे ? म्हणून मी आपली आपल्याला शोध करून खात्री झाल्यानंतर काय तें करा; आपल्या अविचाराबद्दल पाठीमागून मनास पश्चात्ताप होऊं नये म्हणतें."

"अग पण, प्रिय मुरे, आतां यांत शंका कोणती राहिली ती सांगशील कीं नाहीं तिचा शोध करायला ?"

"कां बरं शंका नाहीं, महाराज ?" मुरादेवी कपटदृष्टीचा एक कटाक्ष फेंकून म्हणते, "पहा शंका किती आहेत त्या. महादेवीनं कांहीं व्रताचं आज उद्यापन केलं का ? केलं असलं, तरी त्या वेळीं वायनदानाला अपूपच केले होते का ? अपूप केले असले, तरी त्यांनींच ते केले होते का, त्यांनींच ते सुवर्णकरंडकांत भरले का ? त्या करंडकासोबतची पत्रिका त्यांनीं स्वतःच लिहिली का ! करंडकांतले चांगले अपूप काढून टाकून हे विषारी अपूप वाटेंत दुसऱ्या कोणीं भरले नाहींत कशावरून ? देवीचं नांव घेऊन तिच्या शत्रूनं कोणी तरी तिजवर कुभांड रचावं म्हणून कांहीं रचना केली नाहीं कशावरून ? एक नाहीं, दोन नाहीं, हजारों शंका विचार करण्याजोग्या आहेत. फार तर काय ? त्या मांजरीला मी आधींच दुसरा कांहीं विषार चारून ठेविलेला असून आपल्यापुढें अपूप घातल्याचा बहाणा केला असेल, अशी सुद्धां शंका आपण घेऊन तिचं निरसन करून घेऊन मग पुढं काय करायचं तें आपण करावं. या सर्व चौकशा केल्याच्या अगोदर आपण जर एकदम कांहीं शिक्षा आणि तीही पट्टमहिषी, महादेवी, युवराजमाता हिला कराल तर मीं आपलं चित्त भ्रांत करून आपल्या हातून हें सर्व करवलं असं होणार आहे. आपल्यास कोण काय म्हणणार आहे ? चार दिवस आपली मजवर कृपा आहे तोंवर कोणी कांहीं माझं करूं शकणार नाहीं; परंतु कालांतरानं आपली कृपादृष्टि फिरली, म्हणजे मग माझ्या प्राणावर सुद्धां कोणी उठायचं, हें भय मला आहे. आपलं संरक्षण करण्यास आपण समर्थच आहां." इतकें बोलून मुरादेवी अगदीं विषण्ण वदन करून राजाकडे पाहूं लागली.

राजा धनानंद तें तिचें बोलणें ऐकून अतिशय मोठ्यानें हंसला व म्हणतो, "प्रिये मुरे, तूं फारच भित्री झालीस. माझं तुझ्यावरलं प्रेम कमी होऊन दुसरीकडे जाईल, असं तुला खरोखर वाटतं काय ? छे. छे. असं कालत्रयीं होणं नाहीं. आणि तुझ्या नखाला तरी कोण काय धक्का लावण्याचं साहस करतो तें तरी मला पाहूं दे. तें कांहीं नाहीं. मी आतां त्या दुष्ट चांडाळणीला काय शिक्षा करायची त्याचा हुकूम पाठवून देतों. अशा न्यायाच्या कामीं विलंब करणं अगदीं योग्य नाहीं. मी आपल्या पत्नीलासुद्धां, युवराजमातेला सुद्धां. क्षमा करणारा नव्हें, इतका न्यायनिष्ठुर आहें, हें सगळ्या प्रजाजनांना कळलं पाहिजे. तसं न, करितां उगीच बसलों तर बरं नाहीं."

"महाराज," मुरादेवी अगदीं काकुळतीला येऊन हात जोडून म्हणते, "नकाहो असं करूं. आजपर्यंत आपण माझं ऐकलं, तसं याही प्रसंगीं एकवार ऐका. म्हणजे आपल्याला यांतला खरा प्रकार सहज कळून येणार आहे. महादेवी या कृत्याच्या मुळाशीं नाहीं, अशी माझ्या मनाची प्रवृत्ति आहे. त्याच्या मुळाशीं दुसरी कोणी मंडळी आहे..."

"ती कोण ?" धनानंद राजा अत्यंत आश्चर्यानें एकदम मध्येंच तिला विचारतो त्यावर ती पुनः त्यास म्हणते, "कोण तें

मलाही आतांच सांगतां येत नाहीं. पण आपण जर झालेला प्रकार एथल्या एथेंच राहूं देऊन दोन दिवस स्वस्थ बसाल, तर अगदीं त्वरित तें सर्व कांहीं बाहेर फुटण्याचा संभव आहे. ज्यांना मी नको आहें अशा मंडळीचा हा प्रयत्न आहे. आपण माझ्या महालांत आहां. तेव्हां समजा कीं, अजाण-पणें आपण हे अपूप खाऊन कांहीं अनिष्ट प्रकार घडला असता, तर मींच तो प्रकार घडवून आणला म्हणून उठवून माझे धिंडवडे करायला किती अवकाश? ' मीं नाहीं, मी नाहीं. मी अगदीं निरपराधी आहें " असा मीं कितीही आक्रोश केला, तरी कोण भरं-वसा ठेवतो? आणि माझा कैंवार घेणारा मग राहिला कोण? तेव्हां ज्यांनीं हा व्यूह रचिला आहे, तें आतां काय होतें, काय नाहीं, हें पाहण्यासाठीं आपल्या आपल्या चारांच्या द्वारानं शोधांत असतीलच. आपण अंमळ आजारी असल्याचं सोंग घ्या. ते अपूप खा-ल्ल्यापासून आपल्या पोटांत कसंसंच होतं आहे, आपल्या अंगाची आग होते आहे, असें मी उठवतें, म्हणजे ती मंडळी विशेष धीट होतील, आणखी अधिकाधिक जवळ येऊन चौकशा करायला लागतील. म्हणजे मग आपलं चौकशीचं काम विशेषच मौजेचं होईल. ही माझी मांजरी फार आवडती होती हें आपल्याला ठाऊकच आहे. तर अतां आपण प्रकृति बिघडल्याचं मिष करून पडा. मी या माझ्या मांजरीस बागेंत पुरण्याच्या मिषानं बाहेर जातें. आणि माझ्या अंतःपुरां-तली बातमी काढण्यासाठीं कोण कोण घिरट्या घालीत आहे तें पाहून येतें. " राजाने बराच वेळ नाहीं होय म्हणून तिला अनुमोदन दिलें. तिनें एका दासीकडून तें त्या मांजरीचें प्रेत उचलविलें. आणि स्वतः तो सुवर्णकरंडक व त्यांतील अपूप हींही उचलून नेलीं. महा-देवीची पत्रिकाही तिनें केव्हांच उचलली होती. तें प्रेत बाहेर नेल्यानंतर ती त्याजकडे पाहून म्हणते, " श्वेतांबरी, तूं आज माझं केवढं तरी कार्य केलंस ! "

# प्रकरण १५ वें.

## चाणक्याच्या उलाढाली.

चंद्रगुप्तास मुरादेवीच्या मंदिरांत प्रतिष्ठित केल्यानंतर चणक्यानें पहिलें काम आरंभिलें, तें अर्थात्च पाटलिपुत्रांत कोणाकोणाचें वैमनस्य आहे आणि कोणाकोणामध्यें वैमनस्य पडण्याचा संभव आहे, याबद्दलच्या बातम्या काढण्याचें हाय. राजा धनानंद मुरादेवीच्या पक्का अंकित झाला आहे, आणि एखाद्या नक्रीनें एखाद्याचे पाय धरले असतां ती त्याला जलसमाध देईपर्यंत जशी कधीं सोडावयाची नाहीं, तशीच आतां मुरादेवी राजाला आपल्या पकडींतन सोडीत नाहीं, अशाबद्दल त्याच्या मनाची पक्की खात्री होती. जर तिचे या बाब-तींतले प्रयत्न अंमळ शिथिल पडत आहेत, किंवा तिच्या आवांक्याबाहेर प्रकरण जातें

आहे असें दिसलें, तर तिला साहाय्य करण्यास व तिचे प्रयत्न अधिक जोराचे होतील असें करण्यास, म्हणजे तिची महत्त्वाकांक्षा व तिची वैरनिर्यातनेच्छा अधिकाधिक जागृत करण्यास त्याच्याजवळ फारच रामबाण असा उपाय होता. या रामबाण उपायाचा उपयोग अगदीं ऐन वेळीं करावयाचा, असा त्याच्या मनाचा निश्चय होता. जोंपर्यंत अमात्य राक्षस राज्यकारभार पहातो आहे, तोंपर्यंत धनानंद असा निद्रित रहावयाचा. कारण अमात्य राक्षसाच्या ठिकाणीं नंदराजाचा विश्वासच तसा होता. आणि राक्षस सर्वथा विश्वासार्हही होता. नंदराजांच्या हितासाठीं अहोरात्र डोळ्यांत तेल घालून जपणारा जर कोणी स्वामिनिष्ठ सेवक असेल, तर तो एकटा अमात्य राक्षस होता आणि त्याचा दराराही तसाच होता; परंतु खुद्द राजाचा त्याचे ठिकाणीं इतका विश्वास आहे, तो काय करील तीं पूर्वदिशा अशी स्थिति आहे, इतर कोणालाही राजा विचारीत नाहीं. मुरादेवीच्या महालांत गेल्यापासून दुसऱ्या कोणास दर्शन घेण्याची सुद्धां अडचण झाली आहे, हें पाहून चाणक्यास फार चांगलें वाटलें. कारण त्यामुळें कित्येकांच्या मनांत राक्षसाविषयीं मत्सर उत्पन्न झालेला त्यास दिसला. राक्षस हा खरा स्वामिनिष्ठ होता, तो स्वहिताकडे अणुरेणुभरही लक्ष्य देत नसे. त्याचें सर्व वित्त सदासर्वदा राज्याच्या व राजाच्या हिताकडे असे, ही गोष्ट सर्वत्रांस पूर्णपणें मान्य होती; परंतु खुद्द राजानें ज्या गोष्टी करावयाच्या त्या तो करी आणि वस्तुतः तो राजाच बनला याचें पुष्कळांस मोठें वैषम्य वाटूं लागलें होतें. अशा स्थितींत त्यांना अर्थातच राक्षसाविषयीं असूया उत्पन्न झाली आणि स्वामिनिष्ठ काय तो एकटा राक्षसच, असें राजास वाटतें हा त्यांस अन्याय वाटूं लागला. पाटलिपुत्राच्या इतर अधिकारीवर्गांत ही स्थिति आहे, असें चाणक्यास केव्हांच कळून चुकलें होतें. राजा कांहींच पहात नसल्यामुळें आणि राजपुत्र सुमाल्य अद्यापि लहान असल्यामुळें राक्षसास स्वतः राजाप्रमाणेंच आज्ञा कराव्या लागत. राक्षस अशा प्रकारच्या आज्ञा करी, त्या अर्थातच भागुरायणादि सेनापतींस खपत नसत; परंतु खपून आणि न खपून उपयोग काय होता ? ते आपल्याआपल्याशींच तडफडून स्वस्थ होते.

कोणत्याही राज्यांत ही स्थिति फार वाईट. अमात्य कितीही चांगला व सर्वांच्या मानसन्मानास योग्य असला, तरी त्याच्याच हातांत सर्व सत्ता आहे, आणि राजा कांहीं पहात नाहीं, हें इतर अधिकारिवर्गास खपत नाहीं. आतां आपल्या गुणांचें चीज होणार नाहीं, आपण स्वस्थ माशा मारीत बसावें, अशी स्थिति होणार, असें त्यांस वाटूं लागतें आणि असंतोष वाढत जातो; परंतु राजा स्वतः पहाणारा असला, म्हणजे आज नाहीं उद्यां कधीं तरी आपली सेवा राजाच्या नजरेस येईल आणि आपल्या सेवेचें चीज त्याच्याकडून होईल, अशी आशा उत्पन्न होत असते. ती सर्व सांप्रतकाळीं अगदीं नष्ट होऊन गेली असल्यामुळें भागुरायणादिकांचीं मनें असंतोष आणि असूया यांनीं परिपूर्ण होऊन गेलीं होतीं. चाणक्यानें हें सर्व जाणलें आणि आपण प्रद्युम्नदेवाच्या मुलाबरोबर आलेले त्याचे उपाध्याय या मिषानें तो एके दिवशीं सेनापति भागुरायणाकडे गेला. सेनापति भागुरायणानें त्याचें आदरातिथ्य केलें व त्याच्या भाषणादिकांनीं तर तो फारच संतुष्ट झाला. इतका कीं, चाणक्य परत जाण्यास उठला, तेव्हां भागुरायण त्याच्याबरोबर त्याच्या पर्णकुटीपर्यंत पोंचावण्यास

गेला आणि तेथील ती दारिद्रता पाहून त्यानें त्यांस कांहीं दक्षिणा घेण्याचेंही सुचविलें. परंतु " आपण कोणापासून एक कार्षापणही दक्षिणा म्हणून घेऊं इच्छित नाहीं, किंवा कोणापासून कोणत्याही प्रकारचें साहाय्य घेत नाहीं, " असें चाणक्यानें निक्षून सांगितलें. त्यायोगानें तर भागुरायणाचे मनांत त्याच्या-विषयीं फारच विलक्षण आदरबुद्धि उत्पन्न झाली. मनुष्याची बुद्धि अत्यंत निरपेक्ष आहे, हें पहातांच इतरांस त्याच्याबद्दल विशेष आदर उत्पन्न होतो आणि तसा तो झाला म्हणजे त्या व्यक्तीविषयीं भक्ति उत्पन्न होते, तीच अवस्था भागुरायणाची झाली. चाणक्य म्हणजे एक महाविभूति–प्राचीन काळच्या वसिष्ठवामदेवांपैकीं आहे, अशी त्याच्या ठिकाणीं त्याची भावना झाली आणि चाणक्याचें दर्शन घेतल्याखेरीज एक दिवसही तो राहीनासा झाला. रोज नियमित वेळीं तो चाणक्याच्या पर्णकुटिकेंत जाऊं लागला. अशा प्रकारें सेनापति भागुरायण चाणक्याच्या अंकित झाल्यामुळें तर त्यास फारच आनंद झाला. राजाचीं मुख्यांगें दोन; एक सेना-पति आणि एक अमात्य. कित्येक वेळां अमात्य किंवा सचिव यांपेक्षांही सेनापतीच्या प्राबल्याचें महात्म्य विशेष असतें. कारण राज्याची मुख्य शक्ति जी सेना ती त्याच्या ताब्यांत असल्यामुळें अर्थातच त्याच्या हातीं राज्य असल्याप्रमाणें असतें. भागुरायण सेनापतीनेंच मुरादेवीला व्याधराजावर वारी करून धरून आणून राजास अर्पण केलें होतें. तिच्या पोटीं राजापासून पुत्र झाला हें पाहून त्यास मोठा आनंद झाला होता. व्याधराजा खरोखर क्षत्रिय आहे आणि मुरा क्षत्रिय-कन्याच होय, असें त्यानें अनेकवार राजास सांगितलें होतें; परंतु त्याचें कोणीं ऐकलें नाहीं. तेव्हां त्यास फार वाईट वाटलें होतें; परंतु राजाच्या चित्तास अमात्यांनीं त्या वेळीं विभ्रम उत्पन्न केला असल्यामुळें भागुरायणाचें कोणीं ऐकलें नाहीं. उलट यानेंही मुरा राजाला अर्पण केली, तेव्हां हा तिचा पक्ष धरून भांडतो यांत नवल नाहीं, असें कित्ये-कांनीं म्हणून त्याची अवहेलना केली. आणि कित्येकांनीं तर, मुरादेवीचें प्राबल्य वाढलें असतां आपलेंही महत्त्व वाढेल, या हेतूनें हा असें बोलतो, अशी स्वार्थपरायणता त्याचे अंगीं जोडली. तेव्हांपासून त्याचें मन अति-शय खिन्न झालें होतें. आणि मुरादेवीला पुनः बरे दिवस आले असें पाहातांच त्यास अत्यंत आनंद झाला. आपण जें मागें राजास सांगत होतों त्याचा आतां राजास प्रत्यय येऊन तो जागृत झाला आणि निरप-राधी मुरेला त्यानें पुनः आपल्या कृपेंत घेतलें, हें पाहून त्याला खरोखर फार आनंद झाला.

एके दिवशीं सायंकाळीं भागुरायण व चाणक्य संगमाचे तीरीं एकांतांत बसून रम्य व शीतल अशा गंगाकणवाही वाऱ्याचा उप-भोग घेत असतां, भागुरायणानें आपण या मुरादेवीला कशी आणली व राजाला कशी अर्पण केली वगैरे हकीकत चाणक्यास सांगून, पुढें तिच्या पोटीं मुलगा कसा झाला व त्या मुलाचा आणि मुरेचा मत्सर करून इतर सप-त्नींनीं व अमात्यांनीं तिचा कसा छळ केला; आपण तिचा पक्ष घेतला असतां, कसें कोणीं आपलें चालूं दिलें नाहीं वगैरे सर्व प्रकार सांगितला. आणि सहज म्हटलें, " मीं तो पुत्र पाहिला होता. त्याच्या हातावर चक्रवर्ती राजाचीं सर्व चिन्हं होतीं. आजला तो असता तर सुमाल्याहून मोठा असता. राजानं केवळ दुसऱ्यांवर भलत्याच प्रकरणीं विश्वास ठेवून त्या आपल्या पुत्राचा घात करविला. काय करावं ? त्याबद्दल मला अद्यापिही वाईट वाटतं. " भागुरायणाचें तें बोलणें ऐकून

चाणक्य कांहीं वेळ स्वस्थ बसला, आणि आपल्याला बोलण्याला ही संधि उत्तम आहे असें पाहून म्हणतो, " सेनापते भागुरायणा, सत्यपक्षाविषयीं तुझा पक्षपात पाहून मला फार आनंद होतो. राक्षसाच्या स्वामिनिष्ठे-बद्दल जिकडे तिकडे ख्याति आहे, परंतु सत्याची निष्ठा त्याचेठायीं कितपत आहे कोणास ठाऊक ? तुझ्या सत्यनिष्ठेचं तुला लवकरच फळ मिळेल, भिऊं नको. तूं जसा विश्वासानं या मागल्या गोष्टी मला सांगतो आहेस, तशाच, मींही एक दोन गोष्टी तुला सांगाव्या असं मला वाटतं आहे. सेना-पते, पण मीं एक प्रश्न विचारतों त्याचं मला प्रथम उत्तर दे. समज कीं, तो पुत्र मृत नाहीं, जीवमान आहे अशी तुझ्या मनाची कोणीं पक्की खात्री करून दिली, नव्हे, त्याला तुझ्या पुढें उभा केला, तर तूं त्याच्यासाठीं काय करायला तयार होशील ? तो मुलगा खरोखर जीवंत आहे, आणखी मी तुझ्यापुढें लागलीच आणून उभा करणार आहें, अशांतला प्रकार नाहीं. पण आपलं तुला सहज मौजेनं विचा-रतों बरं, तुझं काय म्हणणं पडतं ? "

"ब्राह्मणश्रेष्ठा, तूं मौजेनं विचारतोस, तर मीही तुला मौजेनंच सांगतों कीं, तो मुलगा जर खचित माझ्या दृष्टीस पडेल, तर त्याला यौवराज्य देववीन आणि तें देवविताना कांहीं प्रसंग झाला, तर हें संबंध राज्यसुद्धां त्याला देईन. माझ्या मनानं असं घेतलं होतं कीं, तो मुलगा जर राक्षसादिकांनीं घात करून मारला नसता, तर मोठा महाराजाधिराज होऊन त्यानं मोठं साम्राज्य स्थापन केलं असतं. त्याचे जन्मस्थ ग्रहच असे होते आणि त्याच्या सामुद्रिक चिन्हांवरूनही तसंच वाटत होतं; परंतु काय कुठें बिघडलं असेल, आणि काय ग्रहांची दशा त्याला आली असेल, त्यामुळें तो अगदीं समूळ नष्टच झाला ! "

" त्याला राज्य देणार म्हणतोस, पण सेना तुझ्या हातीं असली तरी ती तुझं कसं ऐकणार ? राजाच्या विरुद्ध, सचिवाच्या विरुद्ध, ती तुझं कसं ऐकेल ? मला वाटतं, तुला तुझ्या एकट्या सेनेवरच अवलंबून राहून चालायचं नाहीं. मला आपली राज-नीतीची मोठी आवड म्हणून मी या प्रश्ना-संबंधानं तुझ्याशीं घटकाभर उगीच मौजेचा विवाद करतों आहें. आपली कल्पना करा-यची कीं, तुझ्या मनाप्रमाणें करण्याचं तूं योजिलंस आणि तें राजा धनानंदाच्या व अमात्य राक्षसाच्या अगदीं विरुद्ध, मग सेना अगदीं मनोभावानं तुला कशी मिळणार ? आणि तुझ्या अधिकारांतली सेना तुला ऐके-नाशी झाली, तर मग तुझे हाल कुत्रासुद्धां खाणार नाहीं. अशा वेळीं काय युक्ति करून तूं आपलं कार्य सिद्धीस नेशील ? "

" ब्राह्मणश्रेष्ठ चाणक्यमुने, हे शुष्क वाद करण्यांत काय अर्थ आहे ? माझी अगदीं पक्की खात्री आहे कीं, माझी सेना सर्वथैव माझ्या ताब्यांत आहे. मीं जें सांगेन त्याच्याबाहेर एक पदातिसुद्धां जाऊं इच्छिणार नाहीं. आणखी तर काय ? ......... या गोष्टीची प्रतीति पाहण्याचा प्रसंग मला यायला नको आहे; पण जर यदाकदाचित् आला, तर आपल्याला मी म्हणतों तें अक्षरशः सत्य आहे कीं नाहीं, हें दाखवीन. "

" तुझ्या बोलण्यांत सत्यता नाहीं असं जो सुचवील किंवा शंकील. त्याची जिव्हा शतधा विदीर्ण होवो. उलट मीं तर म्हटलं कीं, तूं फार सत्यनिष्ठ, पण भागुरायणा, सत्याच्या संरक्षणार्थ निव्वळ सत्यनिष्ठाच उप-योगी पडत नाहीं. त्यांत थोडासा दंडनीतीचाही उपयोग करावा लागतो. नीतिशास्त्राचा महा-गुरु जो कणिक त्यानं सुद्धां म्हटलं आहे कीं, शत्रूला हापटून मारण्यास योग्य संधि येई-

पर्यंत त्याला स्कंधावर वाहण्याचीही जरूर पडली, तरी हरकत नाहीं, तसं करावं. आणि योग्य वेळ आली म्हणजे मग त्याला तडाक्यासारखा आपटून टाकण्यास कमी करूं नये. या न्यायानं मी बोलतों कीं, सत्य जरी असलं तरी कांहीं वेळ त्याचं गोपन करून बाहेरून असत्याचाच आश्रय करावा. तसं तूं जर केलं नाहींस, तर त्या तुझ्या निष्ठेचा कांहीं सुद्धां उपयोग होणार नाहीं. मी म्हणतों याचा नीट विचार कर. नीतिशास्त्राचा हा एक पाठच आहे. ”

भागुरायण तें ऐकून त्यास म्हणतो, “ ब्रह्मन्, आपलं म्हणणं अगदीं खरं आहे. वेळ पडला तर मी तसं करणार नाहीं; परंतु या काल्पनिक गोष्टी विचारांत घेऊन वादविवाद करण्यांत काय अर्थ आहे ? सोडून द्याव्या तेंच बरं नव्हे ? तो मुलगा आतां उत्पन्न होत नाहीं आणि आम्ही कांहीं करीत नाहीं. ”

“ हो बरोबर आहे ! ” चाणक्य किंचित् विचार करून त्यास म्हणतो, “ पण तुझ्यासारख्या राजपुरुषाची व राजकार्यधुरंधराची भेट झाली असतां अशा नीतीच्या गोष्टी काढून वादविवाद करायचा नाहीं, तर करायचा तरी केव्हां ? मी एक त्यावर तोड सुचवितों, ती तुला कशी काय पसंत पडते सांग पाहूं. पाटलिपुत्रापासून जवळच पर्वतेश्वराचं राज्य आहे. राक्षसाच्या नांवानं समज कोणी दूत त्याच्याकडे पाठवून त्याजवळ अशी गोष्ट काढली कीं, तूं येऊन पाटलिपुत्राला वेढा देऊन बस. मी तुला आंतून मदत करून पाटलिपुत्र हस्तगत करून देतों. खुद्द राक्षस आपल्याला अनुकूल आहे असं पाहतांच पर्वतेश्वर फार आनंदेल; कारण त्याचा डोळा या पाटलिपुत्रावर चांगलाच आहे. राक्षसाकडून येणारे निरोप खरोखर राक्षसाकडून येत नाहींत असं तर त्याला कळूं द्यायचं नाहीं; परंतु त्यांतही राक्षसाचं म्हणून असं बोलणं लावायचं कीं, “ बाह्यतः मी आपलं राजनिष्ठेचं सोंग कायम ठेवून तुझ्याशीं वैषम्य दाखवीन, म्हणजे धनानंदाला मजबद्दल मुळींच संशय येणार नाहीं. आणि आंतून तुला पूर्णपणें साहाय्य करून धनानंदाचा तुझ्या हातून नाश होईल असं करून तुला राज्य समर्पण करीन. ही युक्ति जर सफल झाली, तर पर्वतेश्वर आशेनं आपलं सैन्य घेऊन येईल. तो आला म्हणजे राक्षसाच्याच आमंत्रणावरून हा आला असं आपण सर्वत्र उठवावं. पर्वतेश्वराकडून अर्थातच या आपल्या म्हणण्याला आधार मिळेल. नंतर नंदांचा नाश होईपर्यंत तूं आणि तुझ्या सैन्यानं स्वस्थ बसावं. नंदांचा नाश झाला कीं, त्या पुत्राला पुढें करून तुझ्या सैन्यानं नंदाच्या वतीनं म्हणून पर्वतेश्वराशीं लढावं. म्हणजे लोकांचं चित्त तुझ्या बाजूला होईल आणि तूं खरा स्वामिनिष्ठ ठरून त्या मुलाबद्दल लोकांचे मनांत—आतां नंदवंशाचा तो तेवढाच अंकुर राहिला, असं वाटून—प्रेम उत्पन्न होईल. आपल्या सगळ्याच गोष्टी कल्पनेनं रचून मी सांगतों आहें; परंतु ज्याप्रमाणें सोंगट्यांचा अगर बुद्धिबळांचा खेळ खेळायचा, त्याचप्रमाणें हा एक नीतिशास्त्राचा तुझ्यापुढें डाव मांडून पाहतों बरं तूं तो डाव खेळण्यांत किती चतुर आहेस ? दुसरं कांहीं नाहीं. आपल्या शिळेप्याच्या वेळच्या गप्पा आहेत ! ”

“ मला वाटतं आपण म्हणतां हा डाव साधला तर फार उत्तम आहे, पण जर का साधला नाहीं, तर मग त्यांत आपलं जीवसर्वस्वच जायचं. बाकी जर साधलं, तर राक्षसाची पण अगदी खाडकाच जिरेल. त्याला आपल्या राजनीतिविशारदतेचा फार

मोठा डौल आहे ! पण केव्हां तरी गर्वाचं घर खालीं होणारच ! "

चाणक्य त्यावर त्यास म्हणतो, " पण असा डाव साधण्यांत तुला अशक्य काय वाटतं ? राक्षसाकडून असला स्वामिघाताचा संदेश यायचाच नाहीं, असं वाटून पर्वतेश्वराचा कोण्या दूतावर भरंवसा बसायचा नाहीं असं वाटतं ? परंतु पर्वतेश्वराचा भरंवसा बसणं अगदीं शक्य आहे, अशी माझी समजूत आहे. राजा धनानंद सुरेच्या नादीं लागून भलभलतं करायला लागला आहे. यामुळें आपणास त्याच्या सेवेचा कंटाळा आला आहे. तो कोण्या वेळीं त्या शूद्रीच्या नादानं काय करील याचा नेम नाहीं म्हणून आधींच आपण तुला बोलावतों. असं तसं कांहीं सांगून पाठविलं, म्हणजे पाटलिपुत्राचं राज्य घेण्याच्या लोभानं अंध झालेला पर्वतेश्वर तेव्हांच धसून येईल आणि पाटलिपुत्राला वेढा देईल. राक्षसानं पर्वतेश्वराला आमंत्रण देऊन बोलाविलं म्हणूनच तो केवळ आला, असं एकवार लोकांत पसरलं म्हणजे मग काय पाहिजे ? सवच मौज उडेल. तूं मात्र सेना कांहीं केल्या हलूं देऊं नको, म्हणजे तुला पाहिजे तसा डाव होईल. कां, मी म्हणतों तें खरं का खोटं ? "

" आर्या चाणक्या, तो राजपुत्र अगदीं नष्ट झाला आहे हें जर मला ठाऊन नसतं, तर तो जिवंत आहे आणि कोठें आहे हें तुला ठाऊक आ म्हणूनच तूं हें सर्व बोलतो आहेस असं म्हटलं असतं. कारण तूं एकंदर रचना सुचवतो आहेस. ती अशी सुचवतो आहेस कीं, जणूं काय आतां तशी रचना करायचीच आहे ! "

" सेनापते, बुद्धिमंतांनीं गमतीच्या गोष्टी बोलतांनाही कांहीं तरी शहाणपणा वाढेल अशाच गोष्टी बोलत जाव्या. मीं मघाशीच —सांगितलं तुला कीं, मला नीतिशास्त्राचा— त्यांतून अशा कुटिल नीतिशास्त्राचा फार नाद- यामुळें नानाप्रकारच्या रचना करून मी मनाला एक प्रकारची करमणूक करीत असतों. सपत्नींनीं व अमात्यांनीं केवळ असूयेनं मुरादेवीच्या पुत्राचा घात केला याबद्दल तुला वाईट वाटलेलं पाहून सहज माझ्या मनांत आलं कीं, समजा, हा पुत्र मरण पावला नसला आणि आज त्याला तुझ्यापुढें कोणीं आणून उभा केला, तर तूं काय करशील तें पहावं, म्हणून तुला आपले प्रश्न विचारले. एकूण अशा प्रसंगीं मी म्हणतों अशी रचना केली, तर कांहीं तुला वावगी वाटत नाहीं. तींत चांगलीच सिद्धि येईल असं वाटतं. असो, चला. "

भागुरायण व चाणक्य अशा प्रकारें बोलतां बोलतां बराच वेळ गेला. तेव्हां चाणक्य आपल्या पर्णकुटींत जाण्यास व भागुरायण आपल्या मंदिरांत जाण्यास निघाले. भागुरायण रस्त्यानें जातांना त्यास अशी शंका आली कीं, आपल्यावर कोणी तरी नजर ठेवीत असून तो आपल्या पाठोपाठ येत आहे. कदाचित् राक्षसाचा कोणी तरी दूत असून आपल्या पाटीमागें हिंडत असावा. तें मनांत येतांच भागुरायणास अमळ वाईट वाटलें व थोडासा रागही आला; परंतु " नीतिशास्त्र म्हटलं म्हणजे असंच " असें म्हणून त्यानें आपलें समाधान करून घेतलें. तो घरीं जाऊन आपलीं सायंसंध्यादि कर्में करून उपाहारास बसतो, तों अमात्य राक्षसाकडून त्याला आमंत्रण आलें कीं, आपल्यास असाल तसे बोलावलें आहे. तें आमंत्रण ऐकतांच भागुरायणास थोडा जास्त राग आला. तरी आपला राग गिळून तो उपाहार न करतांच

राक्षसाकडे गेला असतां राक्षसानें त्यास पहाण्याबरोबर प्रथम प्रश्न केला, तो असाः

" आपण ज्या ब्राह्मणाकडे हल्लीं फार फार जाऊन बसतां, तो ब्राह्मण कोण आहे हें सांगाल काय ? "

तो प्रश्न ऐकतांच भागुरायणाच्या कपाळास आंठ्या चढल्या.

# प्रकरण १६ वें.

## भागुरायण सेनापति.

अमात्य राक्षसाचा प्रश्न ऐकतांच भागुरायणाच्या कपाळास आंठ्या चढल्या व तो संतापला. अमात्याबद्दल त्याचे मनांत अतोनात आदर होता. अमात्यासारखा स्वामिभक्त कोणाच्याही ठिकाणीं वास करीत नसेल, हें त्यास ठाऊक होतें; आणि या स्वामिभक्तीमुळेंच अमात्य सगळ्यांवर करडी नजर ठेवता, हेंही पण त्यास दिसतहोतें; तथापि आपल्यासारख्याच्या हालचालीवरसुद्धां अमात्य नजर ठेवण्यासाठीं चार ठेवितो, आणि त्यांच्याकडून बातम्या आणून आपल्यास अशा तऱ्हेनें विचारतो, हें मनांत येतांच भागुरायणास राग आला, तर त्यांत नवल काय ? इतका राग आला कीं, तो त्याच्यानें पोटांतल्या पोटांत ठेववेना; तथापि जितकें आत्मसंयमन करवेल तितकें करून भागुरायण अमात्यास म्हणाला, " अमात्यराज, मला मुद्दाम त्वरित बोलावून आणून हें विचारण्याचा हेतु काय हें समजेल काय ? "

आपल्या प्रश्नाचा सेनापतीस राग आला हें राक्षसाच्या तेव्हांच लक्ष्यांत आलें, तथापि तें जणूं काय आपल्यास समजलेंच नाहीं, असें दाखवून तो शांतपणें म्हणतो, " सेनापते, त्या ब्राह्मणाविषयीं मला कांहीं संशय आहे, आणि चारांच्या द्वारें चौकशी करितां त्या माझ्या संशयाला दृढ कारणही सांपडलें आहे. परंतु आपलें तिथें जाणें आहे, हेंही मला त्याच चारांच्या द्वारें कळल्यामुळें मीं एकवार आपणास भेटून विचारावें या विचारांत होतों; एक दोन वेळां आपली भेट झाली; परंतु मला त्याचें स्मरण झालें नाहीं. आज सहज स्मरण झालें, तेव्हां पुनः विस्मरण होईल, म्हणून लागलींच आपल्याला निरोप पाठविला. दुसरा कांहीं माझ्या प्रश्नांत हेतु नाहीं. दुसरा काय हेतु असायचा ? " इतकें बोलून अमात्य भागुरायणाच्या चर्येकडे पहात राहिला. ' सहज स्मरण झालें ' हें राक्षसाचें म्हणणें उगीच. मा जातों, फार वेळ बसतों, नाना प्रकारच्या

गोष्टी सांगतों, हें सर्व कळून मुद्दाम आज यानें आपणास बोलाविलें, हें भागुरायणास पक्कें ठाऊक होतें; परंतु आपण मजपासून कांहीं तरी छपवीत आहां असें राक्षसास कसें म्हणावें, असें वाटून तो अगदीं शांतपणेंच म्हणतोः "मला त्या ब्राह्मणाबद्दल कांहींच माहिती नाहीं. एक वेळ तो मजकडे आला आणि मला म्हणाला कीं, आपण परदेशचे या गंगातीरावर चार दिवस राहण्यासाठीं आलों आहों, आपल्यासारख्यांची भेट व्हावी म्हणून आलों. बोलण्याचालण्यावरून ब्राह्मणाचे अंगीं चांगली विद्वत्ता आहे यांत शंका नाहीं असं वाटलं. तेव्हां त्याच्याशीं अधिक परिचय घडविला. ब्राह्मण अत्यंत विद्वान् तितकाच निरपेक्ष आहे. कोणत्याही प्रकारची त्याला इच्छा म्हणून नाहीं. तेव्हां विशेष आदरणीय वाटून मी केव्हां केव्हां जातों त्याच्याकडे इतकंच." भागुरायणानें इतकें बोलून अमात्याच्या चर्येकडे पाहिलें. आपल्या बोलण्यानें अमात्याचें समाधान झालें नाहीं, हें त्यास सहज दिसून आलें; तथापि अमात्य काय बोलतो, याची वाट पहात तो स्तब्ध राहिला. अमात्यही कांहीं वेळ स्तब्ध राहून पुनः म्हणतोः—

"सेनापते, हा ब्राह्मण मुरादेवीच्या बंधूकडून त्याच्या मुलाबरोबर आला आहे हें आपल्याला माहीत नाहीं असं दिसतं आपल्या बोलण्यावरून."

अमात्याचें हें बोलणें अगदीं छद्मी होतें हें त्याच्या शब्दावरूनच भागुरायणानें ओळखलें. आपण ब्राह्मणाचा तेवढा संबंध सांगितला नाहीं म्हणून यानें तो उद्गारून दाखविला, हें पहातांच भागुरायण त्यास म्हणतो, "होय. असं मी ऐकतों."

"एकूण आपल्याला पक्कं ठाऊक नाहीं तर मग?" अमात्य पुनः विचारतो.

"पक्कं ठाऊक कसं असणार? मी कांहीं कोणाच्या पाठीमागं गुप्त हेर ठेवून बातम्या काढीत नाहीं, यामुळें कोणतीच गोष्ट मला पक्की अशी ठाऊक नाहीं."

आपल्यास हें छद्मी प्रत्युत्तर मुळींच कळलें नाहीं, असा बहाणा करून राक्षस त्यास उलट म्हणतोः "पण मीं हेर ठेवून पक्की बातमी काढली आहे कीं, तो ब्राह्मण जें दाखवतो, त्याच्याहून फार भिन्न आहे. आपल्याला कदाचित् माहिती नसेल, आणि आपण त्याच्या बोलण्यावर भरंवसा ठेवून फसाल म्हणूनच आज इतक्या घाईनं आपल्याला बोलावून आणून सांगितलं. हा ब्राह्मण मुरादेवीच्या आप्तांकडून आपण आलों असं म्हणतो; पण मला त्याचीसुद्धां शंका आहे. त्यानं आणलेला मुरेचा भाचा, हा खरोखर मुरेचा भाचा आहे कीं नाहीं याचीसुद्धां मला शंका आहे. मी त्यासंबंधानं चौकशी करतों आहें. आणि आपणही चौकशी ठेवाल तर बरं, असं मला वाटतं. माझी तर आज अशी इच्छा आहे कीं, या ब्राह्मणाला एक दोन दिवसांत पाटलिपुत्रांतून हांकून द्यावा, हद्दपार करावा नाहीं तर हा यवनांचा हेर ब्राह्मण म्हणून सुद्धां आला असेल. सलूक्षाच्या मनांतून आमच्या राज्यांत घुसावं असं फार आहे, हें आपल्याला मीं सांगावं असं नाहीं. तेव्हां ज्याची माहिती नाहीं अशा माणसाला आपण ठेवण्यापेक्षां घालवून देणं किंवा अडकवून तरी टाकणं बरं, असं मला वाटतं. आपला काय विचार? आपला व त्याचा फार फार स्नेह जमला आहे, म्हणून म्हणतों."

अमात्याच्या शेवटल्या बोलण्याचा भागुरायणास फार राग आला. अमात्य स्वतःलाच काय तो चतुर व स्वामिहितपरायण समजून आपल्याला मूर्ख व स्वामिहिताविषयीं अनास्था करणारे असें समजतो, असें त्यास

वाटलें. व तो लागलीच त्यास म्हणतो, " अमात्य, आपण या पाटलिपुत्रांत काय वाटेल तें करायला समर्थच आहां; परंतु विनाकारण संशय घेऊन एखाद्या पवित्र ब्राह्मणाचा उपमर्द करूं नये तें चांगलं. आपण सर्व प्रकारच्या नीतिशास्त्रांत फार विशारद, तेव्हां आपल्याला मीं कांहीं सुचवावं असं नाहीं; परंतु आपल्या हेरांच्या द्वारानं पक्की बातमी आपण आणवावी; आर्य चाणक्य हा खचित म्लेच्छांचा किंवा यवनांचा हेर आहे, अशी खात्री करून घ्यावी आणि मग काय करणं तें करावं; परंतु माझा जो चार दिवसांचा त्या ब्राह्मणाशीं परिचय झाला आहे त्यावरून मला तर वाटतं कीं, तो अगदीं निरागस ब्राह्मण सहजगत्या इथें पाटलिपुत्रांत आला आहे. मुरादेवीनं त्याला आपल्या मंदिरांतील यज्ञशालेंत येऊन राहण्याविषयीं किती आग्रह केला, परंतु त्या निरिच्छ ब्राह्मणानं तिचं आमंत्रण स्वीकारलं नाहीं. तेव्हां तो कोणाचा हेर किंवा असं कांहीं होऊन आला असेल हें संभवनीय नाहीं; तथापि आपण शोध करा आणि आपल्याला पक्का शोध लागला, म्हणजे काय करणं तें करा. आपण फार शांत व विचारी आहां, तेव्हां आपल्याला मीं कांहीं सुचवावं असं नाहींच. गरीब ब्राह्मणाचा उगीच उपमर्द होऊं नये, इतकंच काय तें. ब्राह्मण फार ब्रह्मनिष्ठ आणि पंडित आहे."

भागुरायणाचें व अमात्य राक्षसाचें याप्रमाणें भाषण झाल्यानंतर भागुरायण आपल्या मंदिराकडे जाण्यास निघाला. मात्र अमात्याविषयीं त्याच्या बुद्धींत आज फरक झाला. अमात्य आपल्याविषयीं सुद्धां संशय घेतो, आणि आपल्यावरही हेर ठेवून आपल्या हालचालीवर नजर ठेवतो. असल्या अमात्याच्या अधिकाराखालीं आपण रहाणें म्हणजे आपला आपणच अपमान करून घेणें होय. अमात्य आणि सेनापति हे दोघेही समानाधिकारी असावे; परंतु तसे नसले, तरी सेनापतीबद्दल अमात्यानें असलें संशयित वर्तन ठेवूं नये; तसें न करतां अमात्य आपलाही संशय घेतो, त्याअर्थीं जोंपर्यंत राक्षस या राज्यांत आहे तोंपर्यंत आपण येथें राहूं नये, कोठें तरी निघून जावें हाच मार्ग बरा, असेंही आज त्याच्या मनांत आलें. एकदां असले विचार मनांत येऊं लागले, म्हणजे ते माशांच्या वाढीप्रमाणें किती आणि कसे वाढत जातात याचा नेमच नाहीं. आपण इतक्या चांगल्या तऱ्हेनें वागत असतां आपल्याविषयीं इतका संशय सचिवाच्या मनांत असावा याचें कारण तरी काय, याच्या शोधाकडे त्याचें चित्त लागलें. आणि मुळपासून-मुरादेवीला आपण राजा धनानंदास अर्पण केली, तेव्हांपासून–आपल्यावद्दलचा द्वेष किंवा मत्सर अमात्य राक्षसाच्या मनांत असावा, असें त्यास वाटूं लागलें. आणि आजपर्यंत ज्या गोष्टी त्यास जशा दिसल्या नव्हत्या तशा दिसूं लागल्या. एकंदरींत आपल्यासंबंधानें अमात्याच्या मनांत बरें नाहीं, आणि वेळ प्रसंग सांपडला, अगदीं क्षुल्लक कारण जरी सांपडलें, तरी अमात्य आपली या पाटलिपुत्रांतून केव्हां उचलबांगडी करील, आणि केव्हां नाहीं याचा नेम नाहीं, असेंही पण त्याच्या मनांत येऊं लागलें. अशा स्थितींत आपण तरी कशाला येथें रहावें ? राजा धनानंद कांहींही पहात नाहीं, यामुळें सर्व कारभार या पुरुषाच्या स्वाधीन होऊन हा आपल्यालाच राजा समजून सर्व व्यवस्था करतो. यानें व्यवस्था केली, म्हणूनही कांहीं हरकत नाहीं; परंतु दुसऱ्या अधिकाऱ्यांची–आपल्या बरोबरीच्या दुसऱ्या अधिकाऱ्यांची–कांहीं तरी इभ्रत राखून यानें व्यवस्था करावी कीं नाहीं ? जे हेर यानें मजवर ठेवले असतील, त्यांच्याचवळ माझी काय किंमत ? पुष्प-

पुरांतला एखादा चोर आणि मी दोघे सारखेच झालों कीं नाहीं ? आणि ज्याच्या त्याच्याबद्दल संशय- संशय म्हणजे काय ? आर्य चाणक्य किती गरीब, किती उत्तम माणूस ? कसला ब्रह्मनिष्ठ, कसला विद्वान्, त्याला म्हणे हद्दपार करणार. कां ? तर तो मुरेच्या भावाकडून आलेला आहे म्हणून ? शाबास अमात्य राक्षसा, असा तूं संशय घेऊन जर वागशील, तर माझ्यासारखे मानी पुरुष क्षणभरसुद्धां या पाटलिपुत्रांत राहणार नाहींत. आर्य चाणक्यानें आज सायंकाळीं बोलतां बोलतां गमतीनें म्हणून जो प्रश्न घातला, त्या प्रश्नाप्रमाणें जर खरोखर तो बालक जिवंत असला, तर त्याचा पक्ष घेऊन या अमात्याला पण चांगलीच अद्दल घडविली असती; परंतु तसें कांहीं नाहीं. तें कोठलें शक्य ? मारेकऱ्यांकडून हिमाचलाच्या अरण्यांत मारविलेला बालक कोठला जिवंत राहणार ? पण जर असला तर ? वा ? मग काय, त्या अमात्याची मी चांगलीच फजीती उडवीन. राजा धनानंद काय, एर्वी तेर्वी राज्यकारभारांत मन घालीत नाहींच; मग त्याच्या जागीं सुमाल्य असला काय किंवा दुसरा कोणी असला काय त्याला सारखेंच. उलट तो बालक असला, तर त्याचा खरा अधिकार राज्यावर बसण्याचा किंवा युवराज होण्याचा. अशा प्रकारचे अनेक, परंतु एकाच प्रकारचे विचार मनांत घोळत असतां तो चालला होता. जातां जातां आपल्या मंदिरांत पोंचला. त्याची भूक पार जिरून गेली होती. आणि या विचारांच्या अतिरेकामुळें त्यास त्या रात्रीं झोंपही आली नाहीं. त्याच्या मनांत असें आलें कीं, आर्य चाणक्यास जागृत करून ठेवावें. अमात्याच्या मनांत त्याच्याविषयीं संशय आलेला आहे, तेव्हां तो काय करील याचा नेम नाहीं. त्याला आणखी कोणी कांहीं सांगेल आणि मग त्याच्या मनांत भलतेंच कांहीं येईल, व तो त्या ब्राह्मणाचा विनाकारण अवमान करून त्यास पाटलिपुत्रांतून हद्दपार करील, त्यापेक्षां आपण त्या ब्राह्मणास सावध करावें तें चांगलें. असा विचार मनांत येण्याबरोबर दुसरा दिवस केव्हां उजाडेल, केव्हां मावळेल आणि आपण आर्य चाणक्याकडे जाऊन त्यास केव्हां सावध करूं, असें त्यास होऊन गेलें.

दुसरा दिवस उजाडला आणि मावळलाही. तो मावळल्यावर भागुरायण चाणक्याकडे गेला. आपल्या पाठीमागें कोणी तरी हेर असतात हें त्यास आदल्या दिवशीं कळलें होतें. अर्थातच आज तसे हेर आहेत कीं काय हें पाहण्यासाठीं त्याची दृष्टि चहूंकडे फिरली आणि आहेत अशी त्याच्या मनाची खात्रीही पण झाली. तेव्हां तर त्यास ज्यास्तच संताप आला, आणि असा आपला-आपण सेनापति असतां आपला-ज्या नगरींत अपमान होतो, त्या नगरींत रहावें तरी कशाला ? दुसऱ्या कोणत्या राज्यांत जाऊन आपणास आपलें पोट भरण्याचें सामर्थ्य नाहीं काय ? असे प्रश्न त्याच्या मनांत एकसारखे उभे राहिले. जो हेर आपल्या पाठीमागें आहे असें त्यास वाटत होतें त्यास धरून आणून आपल्यापुढें उभा करून त्याच्याकडून तो कोणाच्या हुकमानें काय म्हणून आपल्या पाठीवर असतो हें विचारणें त्याला शक्य नव्हतें असें नाहीं. आपल्या एका शिपायास नुसता हुकूम करण्याचा अवकाश; परंतु आतां ती इच्छा त्यानें आपल्या मनांतल्या मनांत जिरविली, आणि तो चाणक्याच्या आश्रमाकडे चालला. जातां जातां मनांत आणखी एक विचार आला आणि त्यानें मुद्दाम आपल्या बरोबरचा लवाजमा परत पाठवून दिला. एक नोकरसुद्धां ठेवला नाहीं. नोकरांस तो हुकूम ऐकून मोठें आश्चर्य वाटलें; परंतु स्वामीची आज्ञा ऐकण्यापलीकडे ते तरी

काय करणार ? गेले बिचारे. भागुरायण एकटाच गंगाकणवाही शीतल वाऱ्यानें आपलें तप्त मस्तक शांत करीत आर्य चाणक्याच्या पर्णकुटींत आला.

आर्य चाणक्यानें खरोखर त्याची आज अपेक्षाच केली होती, परंतु जणूं काय अगदींच अनपेक्षित असा तो आला असें दाखविण्याकरितां तो त्यास म्हणतोः—

" सेनापते, आज आपण इकडे याल असं कांहीं मला वाटलं नव्हतं. काल आज अगदीं लागोपाठ येणं झालं ? बाकी आपल्या येण्यानं मला मोठा आनंद होतो, हें मीं आपल्या मुखानं सांगायला पाहिजे असं नाहीं. "

" आणखी आपल्या दर्शनानं व आपल्याशीं भाषण केल्यानं मला फार आनंद होतो हें मींही पण सांगायला पाहिजे असं नाहीं. मी तरी आतां आपल्याला गुरुच समजतों. तें असो; पण आर्य चाणक्य, आज मी आपल्याला कांहीं गोष्ट सांगायला आणखी विचारायला पण आलों आहें, मी जें विचारीन त्याबद्दल किंवा सांगेन त्याबद्दल राग किंवा विषाद मात्र वाटूं नये. " असें भागुरायणानें म्हटलें.

" मला राग आणखी विषाद ! सेनापते, दरिद्री ब्राह्मणांनीं लाज, राग, आणखी खेद या त्रयीला कधींच सोडून दिलेलं असतं. तेव्हां तीं आतां कोठून येणार ? जें काय विचारायचं असेल तें आपण बेलाशक विचारा आणि जें काय सांगायचं असेल, तेंही पण खुशाल सांगा. मी उत्तर द्यायला आणखी ऐकायला तयार आहें. "

तें चाणक्याचें भाषण ऐकून सेनापति अंमळ स्तब्ध झाला. नंतर म्हणतोः " आपण मला आपलं स्वतःचं जें वृत्त सांगितलं. त्याहून तें कांहीं निराळं आहे कीं काय ? असलं तर मला सांगावं एवढी एक विनंति आहे. आणि त्याच उत्तर मला मिळालं म्हणजे मग मला आपल्याला काय सांगायचं तें सांगेन. "

तें ऐकून चाणक्य हंसला व म्हणतोः " सेनापते, काल रात्रौ आपण येथून गेल्यानंतर आपल्याला माझ्याबद्दल कोणी कांहीं तरी बाललं असावं. त्याखेरीज आपला हा प्रश्न यायचा नाहीं. तेव्हां ज्यांनीं आपल्याला कांहीं सांगून आज हा प्रश्न करावा अशी बुद्धि उत्पन्न केली, त्यांनाच जर आपण अधिक विचारलं असतं, तर मजकडे येऊन हा प्रश्न विचारण्याचं कारणच राहिलं नसतं. जें वृत्त आपल्याला सांगितलं तें काय, आणि त्याहून निराळं तें काय असणार ? गरीब ब्राह्मणाचं वृत्त आणखी काय असणार ? जें काय आहे तें मीं आपल्याला सांगितलंच आहे. तें निराळं आहे, असं जर कोणीं कांहीं सांगितलं असलं तर तें मला काय तें सांगा, म्हणजे त्यांत खराखोटा भाग किती तें सांगेन. बाकी कोणीं आपल्याला काय सांगितलं असेल, त्याबद्दल मीं तर्क केलाच आहे. सेनापते, नीतिशास्त्राचं तत्त्वच हें कीं, आपल्या राज्यांत जो कोणी नवा माणूस येईल त्याच्यावर हेर ठेवावे, तो काय करतो, कोठें जातो, कोणाशीं बोलतो, याबद्दल चौकशींत असावं, त्याप्रमाणें अमात्य राक्षसानं मजवर हेर ठेवले असतील हें मी जाणूनच आहें. राजा हा चारचक्षु असतो. राजाच्या ठिकाणीं सध्यां अमात्य राक्षस आहे तेव्हां तोही चारचक्षु असेल, तर त्यांत नवल काय ! पण माझ्या चरित्रांत कांहीं लपवण्याजोगंच नाहीं, तर मला त्याचं भय कशाला ? पण सेनापते, खरा नीतिशास्त्रज्ञ जो आहे तो केवळ आपल्या चारांवरच भरंवसा ठेवीत नाहीं. त्यांच्या बातम्याचीं प्रत्यंतरं पाहिल्याखेरीज कधीं कोणत्याही गोष्टीवर तो भरंवसा ठेवीत नाहीं. तेव्हां जर मजबद्दल आपल्याला कोणीं कांहीं विचारलं असेल, तर तें अमात्य

राक्षसानेंच विचारलं असेल. कारण ज्याप्रमाणें माझ्यावर त्याचप्रमाणें आपल्यावरही नजर ठेवणारे त्याचे चार असतील. आणि आपण येथें येतां हें त्यांना कळून त्यांनीं आपल्याला माझ्याबद्दल विचारलं असलंच पाहिजे. मी म्हणतों हें खरंना ? माझा तर्क बरोबर आहेना ? ”

चाणक्य हें सर्व बोलत असतां भागुरायण फार चकित झाला. चाणक्याचा तर्क इतका खरा कसा झाला, याचें त्यास आश्चर्य वाटूं लागलें. राक्षसाप्रमाणें याचे हेर आपल्या पाठीमागें किंवा ठिकाठिकाणीं असणें शक्यच नाहीं. केवळ हा चतुर व नीतिशास्त्रज्ञ आहे, यामुळेंच यानें तर्क केला काय ? असें मनांत येऊन तो अगदीं बुचकळ्यांत पडला. इतक्यांत चाणक्य हंसत हंसत त्यास म्हणतो: “ बरं, आपण जें काय विचारणार होतां, तें झालं; आतां सांगणार होतां तें काय ? तें एकण्याविषयीं मी फार उत्सुक आहें ” .

तो प्रश्न ऐकून भागुरायण शुद्धीवर आला व एकदम “ सांगतोंच, ” असें म्हणून त्यानें आदले रात्रीं चाणक्याच्या पर्णकुटिकेंतून गेल्यापासून जें काय झालें, तें सर्व चाणक्यास सांगितलें. तें ऐकून चाणक्य अतिशय संतापला; परंतु त्यानें तो संताप अणुरेणुभरही बाहेर दिसूं दिला नाहीं. मात्र मनांत म्हणतो: “ अमात्या राक्षसा, आतां तुझं आणि माझं युद्धच होणार. ह्या युद्धांत कोण जय पावणार आणि कोण हद्दपार होणार हें पाहूं. ” नंतर भागुरायणास मोठ्यानें म्हणतो: “ सेनापते, आपण जशी हकीकत सांगितली, तशी मलाही आपल्याला सांगायची आहे; परंतु ती फार गुप्तपणानं सांगायची आहे. आपण परतीरावर जाऊं, तेथें सांगतों. ”

परंतु ही हकीकत काय ती त्यांस सांगण्यास व ऐकण्यास सोडून आपण आपल्या इतर पात्रांकडे वळूं.

# प्रकरण १७ वें.

## अमात्य राक्षस.

मागील प्रकरणांत सांगितलेला वृत्तांत घडल्यानंतर दुसरे दिवशीं मध्यान्हीनंतर अमात्य राक्षस आपल्या मंदिरांत अगदीं अंतर्गृहांत एकटाच कांहीं विचार करीत बसला होता. जेव्हां कोणीही आपल्याकडे येऊन आपल्याला त्रास देऊं नये, असें त्यास वाटत असे, तेव्हां तो याच आपल्या अंतर्गृहांत येऊन बसत असे आणि आपल्या प्रतीहारीला सक्त ताकीद देत असे कीं, आपल्याकडे कोणासही घेऊन येऊं नये किंवा कोणी आल्याची वर्दी आणून पोंचवूं नये. फक्त अमुक अमुक, चार जर आले तर आंत येऊन कळविण्यास हरकत नाहीं. त्याप्रमाणेंच आज प्रतीहारीस आज्ञा करून स्वारी आपल्याशीं विचार करीत बसली होती.

अमात्य राक्षस दिसण्यांत फार तेजस्वी

असा पुरुष होता व शरीरानें उंच व धिप्पाड असाही होता. त्याची एकंदर चर्या किंवा अंगाची ठेवण कोणाच्याही मनावर विशेष वजन पाडील अशाच होती. डोळे पाणीदार व सर्वग्राही असे दिसत. कपाळ उंच व विस्तीर्ण, आणि उरःप्रदेश चांगला विशाल असा असे; यामुळें व त्याची नेक फारच चांगली असल्याकारणानें त्याचा सर्वांवर फार दरारा असे. अमात्यानें अमुक एक गोष्ट अशी करावयाची म्हणून सांगितलें, म्हणजे त्याच्याबाहेर जाईल कोण? परंतु या दराऱ्याचा सर्वांवर सारखाच परिणाम होत असे, यामुळें अमात्य जितका लोकप्रिय व्हावा तितका नव्हता. जितकी कदर एखाद्या दासावर किंवा कायस्थावर ( कारकुनावर ) तितकीच कदर आपल्या बरोबरीच्या इतर मंत्र्यांवरही ठेवण्याकडे त्याची प्रवृत्ति असल्यामुळें ते मंत्रि त्यास मनांतून तितक्या अंतःकरणपूर्वक मानीत नसत. राजप्रतिनिधि आणि खरा स्वामिहितदर्शी, त्याचप्रमाणें मोठा न्यायनिष्ठ व स्वहितनिरपेक्ष, यामुळें लोकांत त्याची कीर्ति फार व लोकांना तो प्रिय फार. त्याचप्रमाणें तो जिकडे तिकडे काय चाललें आहे त्याचा हेरांकडून तपास आणण्याविषयीं अगदीं तत्पर असल्याकारणानें अमात्यापासून आपल्याला कांहींही चोरून ठेवतां येणार नाहीं, असें ज्यास त्यास वाटून जो तो वचकूनच असे; परंतु ज्या तोलानें साधारण लोक, त्याच तोलानें मोठमोठ्या अधिकाऱ्यांचेंही माप केलें जात असल्यामुळें मंत्रिमंडळ त्याच्यावर तितकें संतुष्ट नसे. आपल्यावरसुद्धां राक्षसाचा अविश्वास आहे, असें त्यांस वाटून ते उदासीन असत, राक्षसास त्यांची मनःस्थिति मात्र दिसत नसे; परंतु आतां आपण राक्षसाच्या सभ्यांच्या विचारांकडे वळूं.

वर सांगितलेंच आहे कीं, राक्षस त्या वेळीं अगदीं एकटा होता आणि कांहीं तरी फार गूढ असा विचार करीत होता. त्याच्या विचाराचा विषय राज्याची तात्कालिक स्थिति होय, आणि त्यांत मुरादेवी, तिचा नाचा व आर्य चाणक्य, ही त्रयी विशेष प्रकारानें पुढें होती. मुरादेवीला बंधमुक्त केल्या दिवसापासून एकदम तिनं राजावर आपलें केवढें वजन बसविलें! आपल्याला राजाची भेट घ्यावयाची असली तरीसुद्धां पंचाईत पडूं लागली, हें झालें कसें? याचेंच त्याला आश्चर्य वाटत होतें व त्यानें आपला सगळा चतुरस्रपणा एकत्र करून विचार केला, तरी तें आश्चर्य दुणावण्यापलीकडे त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. या मुरादेवीच्या तावडींतून राजा सुटला नाहीं तर कोण्यावेळीं काय परिणाम होईल, याचा नेम नाहीं, असेंही त्यास वाटे, परंतु तिनें राजाच्या मनावर संपादिलेलें स्वामित्व काढून टाकून पुनः राजाला पूर्वस्थितीवर आणण्यास काय प्रयत्न करावा, हेंच त्यास समजेना. मुरादेवी राजापासून एक क्षणभरही दूर होत नाहीं आणि दूर झाली, तरी अशा बेतानें होते कीं, त्या वेळीं राजापाशीं कोणीही नसावें. जरा कोणी दुसरें येतें आहे असें तिला दिसलें, कीं ती आपली तेथ हजरच. ज्याप्रमाणें इतर जागीं चार ठेविलेले आहेत त्याप्रमाणें मुरादेवीच्या मंदिरांतही आतां कोणी तरी आपल्यास गुप्त बातमी सांगेल अशी व्यक्ति शोधून काढली पाहिजे, असा त्यानें विचार केला आणि आपल्या अंतःपुरांतील एका दासीच्या द्वारानें तेथली एखादी दासी फोडण्याबद्दल त्यानें विचार केला आणि त्याप्रमाणें उपक्रमही केला. मुरादेवीची अत्यंत आवडती व मोठी विश्वासांतली दासी वृंदमाला आहे, हें त्यास ठाऊक होतें. तेव्हां तिलाच आपण या वेळीं फोडून आपल्याला अनुकूल करून घेतलें, तर फार

चांगलें होणार आहे, असें वाटून त्यानें वृंदमालेस आपलेकडे आणून एकवार तिचें व आपलें भाषण व्हावें, अशी योजना केली होती. वृंदमालेसारखी दासी जर आपल्यास अनुकूल झाली, तर फार चांगलें होईल. मुरादेवीचें जें कांहीं चालेल, मुरादेवी जें कांहीं बोलेल, तें सर्व आपल्याला खडान् खडा समजेल, आणि तें समजत गेलें, म्हणजे केव्हांच राजास आपण पूर्ववृत्तीवर आणूं, असें त्यास वाटलें. वृंदमालेची व आपली भेट होऊन एकवार तिचें आपलें भाषण झालें कीं, ती आपल्याला अनुकूल झालीच. ती कांहीं सामान्य जनांहून भिन्न नाहीं, असें त्यास खात्रीनें वाटलें. एक दोन दिवसांत तें सिद्ध होईल असें वाटण्याइतकी व्यवस्था झाली होती.

त्यामुळें मुरादेवीसंबंधींचा विचार या वेळीं त्यानें थोडयाच अवकाशांत दूर सारला. नंतर चंद्रगुप्ताविषयीं तो विचार करूं लागला. चंद्रगुप्तास पाहिल्या दिवसापासून राक्षसास कांहीं चमत्कारिक झालें होतें. एखादें तेजस्वी, अत्यंत चंचल व पिंवळेंजर्द, असें नागाचें पिलूं पाहिलें म्हणजे प्रथम किंचित् भीति, परंतु थोडी मौजही वाटते, कौतुकही वाटतें, त्याच्या चपलतेनें मन मोहित होतें, परंतु लागलींच आपल्या जीवास याच्यापासून फार भीति आहे तेव्हां याला जवळ ठेवूं नये, दूर करावें—ठार करावें —असेंही वाटतें आणि आपण त्यास मारण्याचें साधन पाहूं लागतों, त्याप्रमाणेंच चंद्रगुप्ताला पाहिल्या वेळेपासून अमात्य राक्षसाच्या मनाची स्थिति झाली. मुलगा मोठा सुंदर, तेजस्वी, चतुर, सर्व कलांत पारंगत आणि साहसी, अशी तर त्याच्या मनाची खात्री झाली आणि त्या खात्रीप्रमाणें थोडया दिवसांत त्याचा अनुभवही पण आला; परंतु त्याच्या चर्येंत असें कांहीं तरी होतें कीं, ज्याच्यायोगानें त्याला हा मुलगा पाटलिपुत्रांत मुरादेवीच्यासंबंधानें आला, हें कांहीं बरें झालें नाहीं, यास आपण येथें टिकूं देऊं नये, टिकूं दिल्यास काय संकट येईल आणि काय नाहीं याचा नेम नाहीं असें वाटलें. मुरादेवी आजकाल राजाचा केवळ श्वासोच्छ्वास होय. तेव्हां तिच्या भाच्यासंबंधानें जर कीं आपण कांहीं गडबड करतों आहोंत असें राजास दिसलें, तर राजाची आपल्यावर नाराजीही होण्याचा संभव आहे. तेव्हां या मुलाच्या बाबतींत जें काय करणें तें मोठ्या बेतानेंच केलें पाहिजे. प्रथम हा मुलगा खरोखरच मुरादेवीच्या भावाचा मुलगा कीं काय याचा शोध करण्याचा त्यानें उपक्रम केला होता व त्याप्रमाणें हिमाचलांत प्रद्युम्नदेवाच्या राज्यांत जाऊन त्याला पुत्र आहे कीं काय, याचाच शोध करण्यास त्यानें एक चार पाठविण्याचा विचार केला व आजच त्याप्रमाणें विचार कायम करून त्यानें आपल्या प्रतीहारीस आंत बोलाविलें. प्रतीहारी आंत येतांच "हिरण्यगुप्ताला बोलावून आण," म्हणून सांगितलें. प्रतीहारी "जशी आपली आज्ञा," असें म्हणून तसाच उभा राहिला. तेव्हां अमात्यानें "सांगितलेलें काम तत्काळ करण्याचें सोडून तूं उभा कां?" असें विचारतांच प्रतीहारी हात जोडून म्हणाला: "अमात्यराज, हिमाचलांतून कोणी एक भिल्ल दूत आपल्या राजाकडून कांहीं पत्रिका घेऊन आला असून ती आपल्या चरणाजवळ द्यायची म्हणून बसला आहे."

तें ऐकतांच राक्षस आश्चर्यचकित झाला आणि आपल्या मनांत म्हणतो:—"भिल्ल आणि आपल्या राजाकडून पत्रिका घेऊन आला आहे? हें आहे तरी काय? हिमालचलांतला राजा म्हणजे प्रद्युम्नदेवाखेरीज कोण असणार?

तथापि जी गोष्ट प्रत्यक्ष आहे, तिच्याबद्दल आपण आपल्या मनाशीच विचार करण्यांत काय अर्थ आहे ? त्यास बोलावून पत्रिका वाचली म्हणजे सर्व खुलासा होईल " नंतर त्या प्रतीहारीस म्हणतोः—"ठीक आहे. त्या भिल्लाला आंत घेऊन ये."

प्रतीहारी बाहेर जाऊन त्या भिल्लास आंत घेऊन आला. भिल्ल अगदीं काळा कभिन्न परंतु फार लांबून चालत आल्याकारणानें त्याचे अंगावर सांचलेल्या धुळीनें धूसर दिसत होता. जणूं काय कृष्णवर्ण अशा मेघावर अगदीं अस्तमानीं सागरांत निमग्न झाल्यानंतरच्या सूर्याच्या धूसर कांतीची छटाच पसरलली होती. आंत येण्याबरोबर त्यानें राक्षसापुढें सपशेल दंडवत घालून उठून उभें राहून त्याच्यापुढें एक थैली ठेवून हात जोडून म्हटलें:– " महाराज, आमच्या महाराजांनीं कुशलप्रश्नपूर्वक ही पत्रिका आपलेकडे पाठविली आहे. कांहीं उत्तर असल्यास परत घेऊन जाण्यास दास सिद्ध आहे." भिल्ल याप्रमाणें बोलत असतां राक्षसानें ती थैली नीट इकडून तिकडून पाहिली व ती उघडून आंतून भूर्जपत्रावर लिहिलेली ती पत्रिका काढून वाचली. ती येणेंप्रमाणें:– " स्वति । श्रीमत्सकलसामन्तमुकुटमणिरंजितचरणनखरमहाराज धनानंदामात्यवर राक्षसवर्म यांप्रत । हिमाचलांतर्गत निषादखासप्राच्याधिपति महाराज प्रद्युम्नदेव यांचे अनेक कुशल प्रश्न । उपरि लेखन कारण । सांप्रत महाराज प्रद्युम्नदेव यांची भगिनी श्रीमन्महादेवी मुरा इच्या विज्ञप्तीवरून महाराजांनीं आपले पुत्र युवराज चंद्रगुप्त यांस पाटलिपुत्रांत चार दिवस राहण्यास व तेथील राज्यव्यवस्था समजावून घेण्यास पाठविलें आहे । ते येथून गेले तेव्हां त्यांचेबरोबर आपणांसही पत्र देण्याचा विचार होता । परंतु लिहिलेलें पत्र कांहीं दृग्भ्रम होऊन तसेंच राहून गेलें । म्हणून आतां आदरून फार शीघ्रगामी असा दूत पाठविला आहे । त्याजबरोबर हें पत्र पाठविलें आहे । आमची भगिनी मुरादेवी इजवर महाराजांची पुनः पूर्णकृपा झाली आहे, हें पाहून मातुःश्रीस व मलाही फार आनंद झाला आहे । आणि आपलाही आतां तिजसंबंधानें संशय नाहीं किंवा तिजवर रोष नाहीं असें ऐकून तर फार आनंद झाला व म्हणूनच तिच्या आमंत्रणावरून आमच्या येथील एका ऋषीसमान पंडिताबरोबर युवराजास पाठविलें आहे । युवराजास नानादेश पहावयास सांपडून आपल्यासारख्या चतुर व नीतिज्ञ अमात्यश्रेष्ठाचें दर्शन व्हावें आणि आपल्या हातून होत असलेल्या राज्यव्यवस्था. दिसाव्या, एवढ्याकरितां त्यास पाठविलें आहे । तो तेथें आहे तोंपर्यंत आपल्या पदरांत आहे, व म्हणूनच मी अगदीं निश्चिंत आहें । आपल्यासारखे अमात्य सर्वच राजांना कोठून मिळणार । त्याप्रमाणें आपल्यासारख्याचें दर्शन व आपल्यासारख्यांपासून शिक्षण, हीं तरी कितीकांना सांपडणार । तीं कुमार चंद्रगुप्तास मिळावीं म्हणून आपल्याकडे त्यास पाठविलें आहे । आर्य चाणक्य अत्यंत निरपेक्ष व निःस्पृह । तो आपण होऊन कोठें जावयाचा नाहीं । अर्थातच तो चंद्रगुप्तास घेऊन आपल्याकडेस येणार नाहीं । म्हणून ही पत्रिका आपल्याकडे पाठविली आहे । चंद्रगुप्त आपला आहे असें समजून त्यावर दृष्टि ठेवावी. इति शम् । लेखन मर्यादा । "

ही पत्रिका वाचून अमात्य राक्षस अत्यंत चकित झाला. प्रद्युम्नदेव आपल्यास अशा आदरानें पत्र पाठवील, हें त्यांच्या स्वप्नींही नव्हतें. आणि क्षणार्धापूर्वींच आपण असा विचार केला होता कीं, चंद्रगुप्त हा खरा

कोणाचा कोण हें पहाण्यास एक हेर पाठवावा; परंतु आतां हेराची जरूरी काय ? हा धूलि-धूसर भिल्ल त्याच्याकडून पत्रिका घेऊन आला, तेव्हां आतां त्याच्याबद्दल शंका काय ? चंद्र-गुप्ताच्या आणि मुरादेवीच्या रूपांत साम्य दिसलें, तें बरोबरच. आतां त्याबद्दल आश्चर्य वाटण्यास कारण नाहीं. असो; प्रद्युम्नदेवानें आपणास असें नम्रतेनें लिहावें आणि आपण त्याचा कांहींच आदर करूं नये, हें बरें नव्हे. किती केलें तरी तोही राजा आहे, त्यानें असें आदरानें लिहिलें आहे, तर आपणही त्याच्या लिहिण्यास मान देऊन याच्या मुलाकडे पहावें. आपल्यास जी शंका होती, ती दूर झाली. तेव्हां आतां त्याबद्दल कांहींच विचार नको. असा विचार करून त्यानें त्या पत्राचें उत्तर फार नम्रता व विनय यांनीं युक्त असें लिहिलें व त्या भिल्लास जेवणखाण घालून लावून द्यावें, असा हुकूम केला. भिल्ल तेथून निघून गेला.

थोड्याच वेळांत हिरण्यगुप्त आला. हिरण्यगुप्त हा अमात्य राक्षसाच्या अत्यंत विश्वासांतल्या सेवकांपैकीं एक होता. जे काय चार राक्षसाच्या आज्ञेनें कामें करीत, ते सर्व कोण आहेत, काय आहेत याची माहिती हिरण्यगुप्तासच काय ती होती, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. हिरण्यगुप्त आंत येण्याबरोबर दार लावण्यास सांगून अमात्य राक्षस त्यास म्हणाला, " हिरण्यगुप्ता, ज्या एका कारणाकरितां आतां तुला बोलावलं होतं, तें काम झालं; तेव्हां त्याबद्दल आतां कांहीं बोलायचं नाहीं; परंतु वृंदमालेच्या-संबंधानं काय व्यवस्था केलीस ? "

" स्वामिन्, " हिरण्यगुप्त उत्तर करितो, " वृंदमालेला मी स्वतः भेटून अमात्यांनीं तुला एकदां बोलावलं आहे, असं सांगितलं, त्याबरोबर ती फार भ्याल्यासारखी दिसली. त्यांतून तुझी भेट त्यांना गुप्तपणें पाहिजे आहे, असं सांगितल्यावर तर ती फारच घाबरली; परंतु तुझं व तुझ्या स्वामिनीचं कल्याण करण्याच्या हेतूनं तुला त्यांनीं बोलावलं आहे, तुला भिण्याचं कारण नाहीं, असं तिला नानाप्रकारांनीं सांगितलं, तेव्हां तिनं आज येण्याचं कबूल केलं आहे. " हिरण्यगुप्ताचें बोलणें ऐकून राक्षसानें असंतुष्टपणाचा आविर्भाव करून म्हटलें, " हिरण्यगुप्ता, तूं इतकीं वर्षे मजजवळ आहेस, परंतु तुला अजून कांहीं समजत नाहीं असंच म्हटलें पाहिजे. अरे वेड्या, तिनं येण्याविषयींचं बोलणं प्रथमतः तुं आपल्या पत्नीकडून करायचं तें न करितां हें काय केलंस ? हिरण्यगुप्त वृंदमालेला भेटला होता, एवढं जर मुरादेवीला कळलं, तर तिला संशय यायचा आणि तिच्यावरला तिचा विश्वास उडायचा. तो तिच्यावरला विश्वास उडाला, तर आपल्याला तिचा उपयोग काय ? असो; वृंदमाला जर आज आली, तर नाइलाज आहे; आज जर न आली, तर तुझ्या पत्नीनं जाऊन तिला तुझ्या स्वामिनीकडे म्हणून आणावं आणि मग त्या निमित्तानं ती इथें आली कीं, मी तिची भेट घेईन; म्हणजे ती इथें का आली, कशी आली, याबद्दल कोणी विशेष चौकशी करायला कारण राहणार नाहीं. हिरण्यगुप्ता, या बाबतींत फार जपावं लागतं बाबा ! " हिरण्यगुप्त मुकाट्यानें ऐकून घेत होता. राक्षसाचें बोलणें संपल्यावर तो म्हणाला, " मला हें सुचलं नाहीं; पण ती बहुतकरून आज इथें येईल. न आली, तर आपण आज्ञा करितां तशी तजवीज करितों." परंतु हिरण्यगुप्ताचें हें बोलणें त्याच्या तोंडांतून पुरतें निघालें असेल नसेल, तोंच प्रतीहारी आंत येऊन विनंति करतो, " स्वामिन्, कोणी एक दासी आपण बोलावल्यावरून आलें आहें असें म्हणते. कोण, कोणाची,

असं विचारतां अमात्यश्रेष्ठांना सर्व ठाऊक आहे, त्यांनींच बोलावल्यावरून आलें आहें, एवढंच उत्तर देते. दुसरं कांहीं बोलत नाहीं. मग जशी स्वामींची आज्ञा ! "

तें ऐकून राक्षस म्हणाला, " पाहिलंस, हिरण्यगुप्ता ! बहुतकरून तीच असावी; परंतु थोडीशी शहाणी दिसते. नाहीं तर पट्कन् मी अमक्याची अमुक आणखी अमुक माझं नांव असं सांगती. ठीक आहे; तिला म्हणावं, आंत ये. तिला आणून पोंचव आणखी मग तूं जाईपर्यंत इकडे फिरकूं नकोस. "

प्रतीहारी " जशी स्वामींची आज्ञा, " असें म्हणून तेथून निघून गेला. थोड्याच वेळांत ती दासी आंत आली. अमात्य राक्षसानें तिला अगदीं अभ्युत्थापन देऊन म्हटलें, " या वृंदमालाबाई, आपली प्रकृति बरी आहेना ? " ती दासी किंचित् हंसली आणि म्हणते, " अमात्यराज, माझ्यासारख्या यःकश्चित् दासीचा इतका कसला आदरसत्कार ! काय आज्ञा असेल ती दासीला सांगावी म्हणजे झालं. "

" वृंदमालाबाई, दासी झाली म्हणून काय झालं ? तिला जर आपण आपल्या कामासाठीं बोलावलं आहे, तर तिचा मान अगदीं योग्य तऱ्हेनं ठेवला पाहिजे. बरं, तें असो; पण आपल्या स्वामिनीचं कुशल आहेना ? तुम्ही काय किंवा आम्ही काय, आपल्या स्वामींचं व स्वामिनींचं कुशल असलं, तर आपलं कुशल, नाहीं तर आपलं कुशल असलं काय आणि नसलं काय सारखंच. खरं कीं नाहीं मी म्हणतों तें ? " असें म्हणून अमात्यानें हास्य करून त्या दासीकडे पाहिलें.

दासी मुरकत मुरकत म्हणते, " हें काय बाई, आपली आणखी माझ्यासारख्या कवडीमोल दासीची गोष्ट सारखीच कशी करावी ? अमात्यांनीं आज्ञा केली तर ...... "

" वृंदमालाबाई, आज्ञा कसली करायची, महाराज हल्लीं तिकडे आपल्या स्वामिनीच्याच मंदिरांत असतात, त्यांची कुशलवार्ता आम्हाला सायंत कांहीं कळत नाहीं. एवढ्याकरितां म्हटलं आपली भेट घेऊन अधिकाउणं कांहीं असलं तर कळवून घ्यावं. शिवाय, आपली आपल्या स्वामिनीच्या ठिकाणीं विलक्षण निष्ठा आहे असं ऐकलं तेव्हां म्हटलं त्या गुणासाठीं आपल्याला कांहीं पारितोषिक द्यावं. तुम्हांला ठाऊकच असेल कीं, स्वामिनिष्ठ माणसं मला फार आवडतात ? "

" कसचं ? कसचं ? आम्हीं दिलेल्या वस्त्राच्या नी घातलेल्या अन्नाच्या ! आमची स्वामिनिष्ठा कसली आली आहे ? आणखी मला गरीब दासीला पारितोषिक तें काय करायचं ? "

" आम्हीं आपण होऊन दिलं असतां काय हरकत आहे आपल्याला घ्यायला. घ्या. " असें म्हणून त्यांनीं आपल्या बसण्याच्या आसनाखालून दोन सुवर्णकंकणें काढलीं आणि तिच्या हातावर टाकलीं. तिनेंही किंचित् ऊं ऊं करीत तीं घेतलीं.

नंतर अमात्य राक्षस तिला म्हणाला, " वृंदमालाबाई, तुम्ही अगदीं संकोच करूं नका. माझी विनंति तुम्हांला एवढीच आहे कीं, आपल्या तिकडली सगळी बातमी आम्हाला कळत असावी. आपल्याला स्वतःलाच नको कांहीं इकडे यायला. हा हिरण्यगुप्त येत जाईल. त्याच्याजवळ जरी आपण कांहीं नवलविशेष असेल तें सांगितलं तरी चालेल. जेव्हां तुम्हींच येण्याजोगं कांहीं असेल. तेव्हा मी स्वतः तुम्हाला निरोप पाठवीन किंवा हिरण्यगुप्ताबरोबर तुम्हीं मला निरोप पाठवा, कीं मी अमुक वेळीं येईन; म्हणजे आपण आल्याबरोबर आंत मजकडे आपल्याला घेऊन येण्याची तजवीज मी करीन. आपण

करायचं म्हणजे एवढंच कीं, सगळं जें काय रोज घडेल, तें आपलं मला सांगायाचं; दुसरं कांहीं नाहीं. त्यांत कांहीं महत्वाचं असो नसो.........."

"मी गरीब बापडी, मला हरकत काय आहे? मी अगदीं रोज यांना काय घडेल तें सांगत जाईन. आणखी जेव्हां आपलं पाचारण होईल तेव्हां येत जाईन. मला काय दासीला, आपली आज्ञा होईल तसं वागायचं."

"पण वृंदमालाबाई, तुम्हांला मी असं बोलवून कांहीं विचरतों किंवा माझ्याकडून रोज तुमच्याकडे कोणी येऊन विचारीत असतो, असं कोणाला कळवतां उपयोगी नाहीं."

"नाहीं कळणार. पण बाई, मी मघांपासून एक सांगणार होतें. आपण मला वृंदमाला म्हटलं म्हणजे माझ्या अगदीं जिभेवर येतं, इतक्यांत आपल्या बोलण्यांत विसरून जातें. मी कांहीं वृंदमाला नव्हे. वृंदमालेच्या बरोबर आपल्या स्वामिनीची सेवा करणारी, वृंदमालेची जिवलग मैत्रीण आहें. वृंदमालेला आपल्या स्वामिनीपासून क्षणभरसुद्धां दूर होतां येत नाहीं, म्हणून तिनें मला सांगितलं, 'सखे सुमतिके, अमात्यराजाकडून असं असं मला पाचारण आलं आहे, आणखी मला तर कांहीं जातां येत नाहीं. पण तूं आणखी मी कांहीं दोन नाहीं, तर माझ्या जागीं तूं जा. आणखी अशा अशा कारणानं मला यायला झालें नाहीं म्हणून तुला—म्हणजे मला (सुमतिकेला) पाठवली आहे. मी आणखी ती एकच आहों. तेव्हां जी आज्ञा मला करायची असेल ती हिच्याजवळ सांगितली, म्हणजे मला समजेलच'— आल्याबरोबर मी हें अमात्यांच्या चरणांपाशीं सांगणार होतें; परंतु बोलायला अवसरच मिळेना काय करूं? आतां शेवटीं बोललें."

अमात्यास, तें ऐकून फार चमत्कारिक झालें, त्यानें हिरण्यगुप्ताकडे चमत्कारिक नजरेनें पाहिलेंही; परंतु विशेष कांहीं न बोलतां तो तिला म्हणतो, "कांहीं हरकत नाहीं. तूं काय किंवा ती काय? ती जर तुझी मैत्रीण आहे, तर तिनं तुला पाठविलं यांत कांहीं वावगं नाहीं. कोणीकडून सांगितल्याप्रमाणें करा म्हणजे झालं."

"हो हो. करीन यांत संशय नको. आतां आज्ञा घेतें."

अमात्यानें तिला आज्ञा दिली. ती तेथून निघाली ती मुरादेवीच्या मंदिराकडे न जातां गंगातीराकडे गेली.

# प्रकरण १८ वें.

## अपराधी कोण ?

अमात्य राक्षस याप्रमाणें दोनही कामांत आपल्याला पाहिजे तसेंच घडून आलें, असें पाहून अत्यंत संतुष्ट झाला. चंद्रगुप्त हा खरोखर कोण याबद्दल त्याला जो संशय होता, तोही दूर झाला, आणि मुरादेवीच्या अंतःपुरांत आपल्यास कोणीच चार नव्हता, तेथें काय चाललें आहे हें अगदींच कांहीं समजत नव्हतें, तें अगदीं खडानूखडा समजण्याला आतां चांगलाच मार्ग झाला. मुरादेवीच्या अगदीं संनिध असणारी तिची दासीच आतां आपल्याला पूर्णपणें अनुकूल झाली. आतां आणखी काय पाहिजे ? शिवाय चंद्रगुप्ताच्या बापानें इतक्या नम्रपणानें आपल्याला पत्र लिहून विनविलें आहे, तर आपणही त्या निमित्तानें त्याच्यावर नजर ठेविली असतां त्याच्या पत्राप्रमाणें केलेंसें होऊन सर्व योजना ठीक होईल. असा एकंदर विचार राक्षसाच्या मनांत चालला असतां त्याचा चोपदार येऊन त्यास पुनः विनंति करतो कीं, " स्वामिन्, बाहेर कोणी एक राजपुत्र आला असून त्याचा प्रतिहारी सांगतो कीं, किरातराज प्रद्युम्नराय यांचे पुत्र कुमार चंद्रगुप्त आपल्या भेटीसाठीं आले आहेत म्हणून सांग. त्याप्रमाणें मी आलों आहें. " तें ऐकतांच अमात्य गर्दीगर्दीनें उठला, चंद्रगुप्तास सामोरा जाऊन त्यानें त्यास उच्चस्थानीं आणून बसविलें आणि आज इतके दिवसांनीं इकडे कोणीकडे येणें केलें म्हणून विचारिलें. तेव्हां कुमार चंद्रगुप्त म्हणाला, " अमात्यराज, तात प्रद्युम्नदेव यांची कालच पत्रिका येऊन त्यांनीं मला अशी आज्ञा केली आहे कीं, आपल्या भेटीस जाऊन आपल्या अनुमतानें असावें. म्हणून आलों आहें. " तें ऐकतांच अमात्यही किंचित् संतुष्ट होऊन म्हणतो, " कुमारा, मलाही प्रद्युम्नदेवाचें आज्ञापत्र आलें आहे. आपण येथें असेपर्यंत जी काय सेवा माझ्या हातून होण्याजोगी असेल, ती बेलाशक मला कळवावी, मी करायला तयार आहें. प्रद्युम्नदेवाकडून पत्र येण्याची तरी आपण वाट काय म्हणून पाहिली ? केव्हांही आपण मला कांहीं आज्ञा केली असती, तरी मी सिद्धच होतों. आपली सर्व मंडळी कुशल आहेना ? "

कुमार चंद्रगुप्तानें, " होय. बाबांच्या पत्रांत सर्वांचें कुशल लिहिलें आहे, " असें सांगितलें आणि थोड्या वेळानें तो राक्षसाचा निरोप घेऊन निघून गेला. राक्षस आपल्या ठिकाणीं अधिकच संतुष्ट झाला.

परंतु चंद्रगुप्तास पाहिल्यापासून पुनः त्याच्या मनावर कांहीं चमत्कारिक परिणाम झाला. मुरादेवीच्या आणि या कुमाराच्या चर्येंत असणारें विलक्षण साम्य त्याच्या मनांत उभ राहन, इतकें विलक्षण साम्य कसें, असें

मनांत आलें, आणि पुनः एकदां त्यानें आपल्या मनाचें समाधान केलें कीं, प्रद्युम्नराय मुरादेवीचा प्रत्यक्ष भाऊच, तेव्हां तिच्या आणि तिच्या भाच्याच्या चर्येत साम्य असलें तर नवल काय? तो पितृमुखी असेल.

अशा प्रकारें अगदीं मनाजोग्या गोष्टी घडून राक्षसाचे कांहीं संशय त्या दिवशीं दूर झाले, आणि तो अगदीं निश्चिंत झाला. त्याला आतां चिंता काय ती एकच होती. ती ही कीं, राजा धनानंद राज्यकारभारांत अगदीं मन घालीत नाहीं हें बरें नव्हे. त्याचें चित्त मुरादेवीकडून काढून पुनः राज्यकारभारांत कसें आणावें? तसें तें आणल्याखेरीज इलाज नाहीं, आणि आपल्याला तर आतांशा त्याच्याजवळ प्रवेशसुद्धां नाहीं; तथापि आतां मुरेची दासीच जर आपल्यास फितली आहे व आपली बातमीदार झाली आहे, तर आपल्याला कांहींना कांहीं तरी युक्ति काढून राजाचें चित्त वळवितां येईल, एक वेळ राजाचें व आपलें दर्शन झालें म्हणजे तें सहज होणार आहे. तेव्हां आपण त्याच्याबद्दल आतां विशेष काळजी करण्याचें प्रयोजन नाहीं, असें म्हणून तो उठून आपल्या अन्य कार्यांच्या व्यवस्थेला लागला.

त्याच्या सांगण्याप्रमाणें हिरण्यगुप्त रोज गुप्तपणें सुमतिकेस भेटण्यास जात असे. सुमतिकाही त्याला तो विचारील तें, व न विचारील तें, हवें तसें सांगत असे, आणि हिरण्यगुप्त तो सर्व वृत्तांत राक्षसाजवळ सांगे. त्या त्या वृत्तांतांत मुरादेवीच्या विरुद्ध पुष्कळशा गोष्टी असत. एके दिवशीं तर सुमतिकेनें अमात्यश्रेष्ठास स्वतः येऊन भेटण्याची इच्छा दर्शविली आणि त्याप्रमाणें अमात्यांचे घरीं येऊन तिनें राक्षसास एकांतीं असें सुचविलें कीं, मुरादेवीचे मनांतून कांहीं तरी फार मोठें कृष्ण कृत्य करावयाचें आहे. 'काय तें मात्र तिला सांगतां येईना. अधिक नजर ठेवून विशेष कांहीं घडलें, तर तत्काळ आपल्यास कळवीन असें तिनें सांगितलें. व तोंपर्यंत झाल्या गोष्टीबद्दल कोठें कांहीं बोलूं नये असें विनाविलें. मुरादेवीच्या मनांत अमुक एक भयंकर कृत्य करावयाचें आहे, असें तर ती सांगेना; कारण ती म्हणे आपल्याला अजून सांगण्यासारखें कांहीं नाहीं. फक्त संशय आला तेवढा आपल्याला सांगितला. राक्षस तिला खोदून खोदून विचारूं लागला असतां तिचें उत्तर एकच कीं, आपल्याला आजमित्तीला अमुक एक होणार असें खात्रीनें कांहीं सांगतां येत नाहीं; परंतु सांगण्याजोगें कांहीं झालें कीं, ताबडतोब आपणास कळवीन. शेवटीं राक्षसानें, तिच्या मर्जीप्रमाणेंच घेतलें पाहिजे, असें मनांत म्हणून तिला जाऊं दिलें. राक्षसाच्या दुसऱ्या एखाद्या हेरानें जर आपल्या संशयाचीं कारणें न सांगतां असें मोघम कांहीं येऊन सांगितलें असतें, तर राक्षसानें त्यास तत्काळ कांहीं दंड केला असता; परंतु सुमतिकेपासून पुष्कळ काम व्हावयाचें होतें, आणि तिला दंड करणें निव्वळ त्याच्या हातींही नव्हतें. तेव्हां अशा स्थितींत तिला दंड करणें तर काय, परंतु नुसतें तिला त्रासून बोलणें सुद्धां इष्ट नव्हतें. अर्थातच राक्षसानें तिला शांतपणें जाऊं दिलें. मात्र हिरण्यगुप्तास बजावून सांगितलें कीं, तिजवर नजर ठेव व रोज नित्य नियमानें तिला भेटून काय जें ती सांगेल तें मला येऊन सांगत जा. सुमतिका गेल्या वेळेपासून राक्षसास विशेष चिंता उत्पन्न झाली हें सांगणें नकोच.

मुरादेवी भयंकर कृत्य करणार म्हणजे काय? ती कोणास तरी विष घालणार कीं काय? कोणाला तरी म्हणजे अर्थातच राजा धनानंदासच विष घालणार कीं काय? हा

संशय त्याच्या मनांत एकदम आला. आणि तो संशय मनांत येण्याबरोबर त्याचें मन विशेषच चिंतामय झालें. जर आपला संशय खरा असेल–आणि मुरादेवीनें दुसरें कांहीं करणें राक्षसास शक्यच दिसलें नाहीं–तर हें भयंकर कृत्य टाळण्यास आपण काय योजना करावी हें त्यास कांहींच सुचेना. आपण राजाची भेट घेण्याचा यत्न करून भेट घेऊन त्यास स्पष्टपणें जागृत करावें एवढा एकच उपाय राक्षसास शक्य दिसला. आणि भेट घेण्याचा उपाय म्हणजे कांहीं तरी महत्वाचें, राजकारण आहे असेंच सांगितलें पाहिजे. अशानेंच वर्दी जर थेट-पर्यंत पोहोंचली, तर पोंचणार आणि गांठ पडणार व आपण त्यास सावध करूं शकणार. नाहींपेक्षां राजावर काय प्रसंग येईल आणि काय नाहीं ! अशा स्थितींत काय महत्त्वाचें राजकारण काढावें म्हणजे राजा तावडतोब आपली भेट घेईल ? त्याच्या जीवाला कांहीं तरी अपघात होणार आहे हें जर आपल्याला कळलें आहे, तर त्याला सावध करणें आणि आपल्या सावध करण्यानेंही तो सावध झाला नाहीं तरी आपण कांहीं उपाय योजून त्याचा बचाव करणें, हें आपलें कर्तव्य आहे. असा वि-चार करून त्यानें नानाप्रकारच्या युक्त्या मनांत आणल्या; परंतु एकही युक्ति अगदीं रामबाण अशी त्यास वाटेना. कोणतेंही महत्वाचें काम म्हटलें तरी तें तुमचें तुम्हीं करा, तुम्हांला मुखत्यारी आहे, असें महाराजांचें त्यास आजपर्यंत कितीकदां निरोप आले होते. तेव्हां आतां गांठ घेण्याला शेवटली अगदीं अमोघ अशी युक्ति त्याला एकच दिसली. कांहीं तरी परचक्र येण्याच्यासंबंधाची बातमी हेरांनीं आणली आहे. ती प्रत्यक्ष कळवून आज्ञा घेणें आहे, असा निरोप पाठविला, तर राजाचें चित्त कांहीं जागृत होऊन त्यानें आपली भेट घेतली, तर होणार आहे; नाहींपेक्षां दुस उपाय नाहीं ! आतां ही युक्ति करावयाची, परंतु कशी करावयाची ? आपला यासंबं-धाचा निरोप तरी पोंचवावयाचा तो किंवा पत्रिका पोंचवावयाची ती कोणाच्या हस्तें ? आपल्या नव्या हेराखेरीज या कामीं उपयोगी पडणारें दुसरें कोणी दिसत नाहीं. हें जाणून त्यानें हिरण्यगुप्ताकडून सुमतिकेला बोलाव-ण्याची तजवीज केली. सुमतिका योग्य वेळीं आली. तेव्हां राक्षसानें तिला, " आतां एक फार महत्त्वाचं काम तुला केलं पाहिजे; तें करशील, तर तुला फार मोलवान् असं पारि-तोषिक मिळेल, " असें सांगितलें.

" आपण काय आज्ञा कराल, ती पार पाडण्यास मी अगदीं एका पायावर तयार आहें. मला पारितोषिकाची किंवा कसलीही अपेक्षा नाहीं. आपल्यासारख्या स्वामिनिष्ठ अमात्यवरांची आज्ञा शिरसा वंद्य करून ती मीं पार पाडली म्हणजे जें मला समाधान होईल, तेंच माझं मोठं पारितोषिक आहे. " असें मोठें युक्तीचें व चतुरपणाचें तिनें उत्तर दिलें. तें ऐकून राक्षसही अगदीं गार झाला, तथापि पुनः तिला मोठ्या पारितोषिकाची आशा दाखवून म्हणतो, " काम कांहीं वि-शेष नाहीं. हें पत्र एवढं अतिशय गुप्तपणें–अगदीं कानाच्या कोंपऱ्यासही न कळूं देतां –खुद्द मुरादेवीलाही न कळूं देतां–महारा-जांच्या हातीं पावतं करशील तर पहा. तसं केलंस आणि त्यांनीं पत्र वाचून मला बोला-वून घेतलं कीं, मग लागलींच तुझं बक्षीस तुला मिळेल. त्याबद्दल अगदींसुद्धां कसर होणार नाहीं. काम असं आहे कीं, तूं सहज करशील..."

" अमात्यराज, आपली आज्ञा शिरसा वंद्य आहे असं मीं मघाशींच विनविलं आहे. तेव्हां ती पार पाडण्यासाठीं मी अगदीं

आपले प्राणसुद्धां खर्ची घालीन; परंतु आपण समजतां इतकं सहज होण्याजोगं मात्र हें काम नाहीं, एवढं आपण लक्ष्यांत घ्यावं. एक घटका तर काय, पण एक क्षणभरसुद्धां मुरादेवी महाराजांपासून दूर होत नाहीं. आणखी तिला चोरून कांहीं महाराजांपाशीं बोलूं म्हटलं तर तें होणं शक्यच नाहीं. ती जवळ नाहीं असा वेळ, एक तर कधीं येत नाहीं; आणि यदाकदाचित् तो तसा आला, तरी देवीच्या दुसऱ्या दासींपैकीं कोणीना कोणी तरी दासी महाराजांजवळ असतेच असते. इतक्याहीं उप्पर यदाकदाचित् महाराजांजवळ कांहीं बोलावयाला सवड होऊन कोणीं बोललं, तर महाराज तें सारं देवीला, ती येतांक्षणींच सांगून टाकतात ! मी आपल्याला हें सारं सांगतें एवढ्याचसाठीं कीं, आपल्याला जितक्या गोष्टी सोप्या वाटतात तितक्या त्या नाहींत. प्रयत्न करून पाहण्याचं काम माझं आहे. सिद्धि मिळणं त्या एका कैलासनाथाच्या आधीन आहे. ”

इतकें बोलून सुमतिका स्वस्थ बसली. अमात्यराक्षसानें तिला पुनः, “ कसंही करून एवढी पत्रिका महाराजांच्या हातीं पावती कर. मग पुढचं पुढें आम्ही पाहून घेऊं, ” असें म्हटलें व तिला लावून दिलें.

ती पत्रिका घेऊन सुमतिका राक्षसाच्या घरून निघाली ती तडक मुरादेवीच्या मंदिराकडे गेली नाहीं. आणखी कोठें तरी गेली, तेथें कांहीं वेळ बसली आणि मग तेथून उठून मुरादेवीच्या मंदिराकडे गेली. हिरण्यगुप्त तिला वाटेंत भेटला, तेव्हां त्यानें तिला सहज विचारलें कीं, “ अमात्यांनीं दिलेली पत्रिका घेऊन आपल्या स्वामिनीच्या मंदिराकडे जाण्याचं सोडून दुसऱ्या कोठें गेली होतीस ? त्यावर सुमतिकेनें हंसत हंसत उत्तर दिलें, “ हिरण्यगुप्ता, तूं अमात्याचा मुख्य गुप्त हेर म्हणवितोस आणि असा प्रश्न विचारतोस याचं मला मोठं नवल वाटतं. अरे अमात्यांच्या घरीं गेलें आणि तेथून तडक जर मंदिरांत परत गेलें, तर अमात्यांकडेच माझं कांहीं काम होतं आणि तें गुप्त काम करून मी चोरून चाललें असं कोणालाही वाटणार नाहीं काय ? यापेक्षां अमात्यांचे घरून हलकेच निघून आणखी दोन ठिकाणीं गेलें, आणि कैलासनाथाच्या मंदिरांत गेलें, तर कांहीं कारणानं हिंडत असेल कोठें तरी, असं ह्मणून कोणाला विशेष प्रकारचा संशय येणार नाहीं. एकूण मी कोठें जातें, काय करतें यावर तुझी गुप्त नजर आहेच. असं जर असेल, तर मी पुनः तुमच्याकडे येणार नाहीं. मला गरज नाहीं. अमात्यांबद्दल माझ्या मनांत फार भक्ति, अतिशय आदर, ते जें करतील तें महाराजांच्या आणि युवराजांच्या हिताचंच असणार, ह्मणून मीं तरी त्यांचा असा हेरपणा पत्करिला, नाहीं तर माझं काय अडलं होतं ? कोणतंही कार्य काय, विश्वासानं होत असतं; असा त्यांचा आणखी तुझा जर मजवर विश्वास नसेल, तर ही आपली पत्रिका घ्या आणखी अमात्यांजवळ नेऊन द्या. ” असें म्हणून तिनें अमात्यांनीं तिला दिलेलें पत्र बाहेर काढून त्याच्यापुढें धरलं. या वेळीं तिनें असा कांहीं रागाचा आविर्भाव आणला कीं, हिरण्यगुप्त अगदीं चपापून गेला व तिला त्यानें ‘ हो हो ’ करून स्थिरस्थावर केलें. आणि तिला कसें तरी लावून दिलें. सुमतिका त्याच्या नजरेआड होईपर्यंत तशीच रागांत होती; परंतु तो दृष्टीआड झाल्यावर आपल्याशीं हंसली आणि मागें पहात पहात पुढें आपल्या स्वामिनीच्या मंदिराकडे गेली. तिनें काय युक्ति केली असेल, ती तिची तिला ठाऊक; परंतु दुसरे दिवशीं महाराजा धनानंदाकडून अमा-

त्यास अमुक वेळीं भेटीस यावें म्हणून निरोप गेला. तो निरोप जातांच, सुमतिका मोठी वस्ताद दिसते, तिनें आपण म्हटल्याप्रमाणें ताबडतोब पत्र दाखल करून आपल्यास निरोप आणला. तेव्हां ही सुमतिका म्हणजे आपणांस एक मोठीच मदत मुरादेवीच्या मंदिरांत मिळाली आहे, असें वाटून राक्षसास आनंद झाला. आणि दुसरे दिवशीं आपण महाराजांस भेटलों म्हणजे काय बोलावें आणि आपल्या जीवावर कांहीं संकट येण्याचा संभव आहे, तर त्याबद्दल जागृत राहण्याविषयीं त्यांस कसें सुचवावें याबद्दल तो विचार करीत बसला.

दुसरे दिवशीं योग्य वेळीं महाराजांनीं अमात्याची भेट घेतली, तेव्हां प्रथमतः अमात्यांना महाराजांनीं हा प्रश्न केला कीं, "आपण परचक्राच्या भीतीविषयीं पत्रीं लिहिलं, ती भीति कोणाकडून उत्पन्न झाली आहे? कोणाचा मृत्यु इतक्या जवळ आला आहे कीं, त्याला मगधदेशाकडे वक्रदृष्टीनं पाहण्याची दुर्बुद्धि झाली?"

आपण केवळ महाराजांची भेट घेण्यासाठीं जें लिहिलें, त्याबद्दल महाराज आपल्याला विचारतीलच आणि आपल्याला सांगायला तर कांहीं नाहीं; आपली भेट दुर्घट झाली होती, ती साध्य करून घेण्याकरितां कांहीं तरी युक्ति केली, असें सांगतां येणार नाहीं. तेव्हां काय उत्तर द्यावयाचें तें त्यानें ठरवून टाकलेंच होतें. तेव्हां महाराजांचा प्रश्न येतांक्षणींच तो एकदम म्हणतो, "महाराज, मगधदेशाकडे वक्रदृष्टीनं पहाणारा कोण आहे या भरतखंडावर? पण म्लेंच्छाधिपति पर्वतेश्वर नेहमीं पुष्पपुरीला वेढा देण्यासंबंधानं बडबडत असतो—आणखी अलीकडे तर त्याची ती बडबड फारच वाढत चालली आहे. थोडी बहुत तसली तयारीही त्यानं चालविली आहे, असं मी ऐकतों. माझ्या हेरांनीं मला ही बातमी येऊन सांगितली ती महाराजांच्या कानावर घालून ठेवावी म्हणून लिहून कळविलं. बाकी पर्वतेश्वराची खोड मोडण्याची पाळी आपल्याला कधींना कधीं तरी येणार खचित. तो दिवसानुदिवस अधिकाधिक उद्दाम होत चालला आहे. या वर्षाच्या करभाराच्या वेळीं स्वारी बहुतकरून कांहीं तरी गडबड करणार असं दिसतं. परंतु महाराज, मी मुख्यतः आलों तो या परचक्राच्या भीतीबद्दल बोलायला आलों नाहीं. मा अंतःशत्रूबद्दल बोलायला आलों आहें!"

"अंतःशत्रु! अंतःशत्रु आपल्याला कोण उत्पन्न आहे?" महाराजांनीं हंसत हंसत विचारलें.

"कोण तो कांहीं मला आजच सांगतां येत नाहीं; परंतु आपण अतिशय सावधगिरीनं राहण्याची फार जरूरी आहे."

"होय. मलाही त्याची थोडीशी आवश्यकता वाटूं लागली आहे, आणि मी जागरूक आहें."

"महाराज जागरूक असल्यावर आणखी काय पाहिजे? मग भिण्याचं कारणच नाहीं."

"मी अगदीं चांगला जागरूक आहें. आणखी माझ्यावरावर माझ्याचसाठीं आणखीही कित्येक मंडळी जागरूक आहेत. मला तसा प्रत्यक्ष अनुभवच आला, तेव्हां आतां शंका कसली?"

"काय महाराजांना अनुभव येऊन महाराजांनीं क्षमा केली?"

"होय. चोर पकडायचा तो अगदीं चोरीच्या वस्तूसह पकडला पाहिजे म्हणून!"

"पण महाराज, शत्रु अतिशय निकटचा आहे तेव्हां त्याला दूर केला नाहीं, आणि क्षमा करून डोळे झांकले, तर तेव्हांच नक-

कळत घात व्हायचा, म्हणून म्हणतों कीं, क्षमा होऊं नये. ”

“ डोळे झांकले, तर घात व्हायचाना ? पण दोहोंच्या जागीं चार डोळे जागृत असले, तर मग कसा घात होणार ? ”

“ शत्रु अगदीं जवळचा आहे, हेंही महाराजांना विदित आहे तर मग ? ”

“ हो हो. पूर्णपणें विदित आहे. आणखी विदित आहे कीं नाहीं हें तुम्हांला लवकर दिसेलही. ”

महाराजांनीं इतुकी तरी वाट कां पहावी ? जर संशय आला आहे, तर संशयावरून त्या व्यक्तीला दूर तरी करावें. ”

“ नुसत्या संशयावरून दूर करण्याचा परिणाम बरा होत नाहीं असाही अनुभव आहे. तेव्हां एकदां झालेला प्रमाद पुनः होऊं नये अशी फार इच्छा आहे. शिवाय, ज्यांनीं अपराध्यास दंड करण्याबद्दल त्वरा करावी, तीच मंडळी त्वरा न करण्याविषयीं वारंवार आग्रह करीत आहे. ”

“ महाराज आज्ञा करितील, तर हा सेवक तत्काळ अपराध्यास दूर करील. ”

“ आपल्या हातून दूर व्हावी अशी मंडळी नाहीं. अस्तु. अमात्यराज, प्रिय मुरेपासून वियुक्त असा मी फार वेळ राहिलों, आणखी कांहीं जर कार्य नसलें तर आपण आतां निरोप घ्यावा. माझ्या घाताला कांहीं निकटची मंडळी उद्युक्त होत आहेत हें आपल्याही कानांपर्यंत आलें आहे, हें ऐकून प्रिय मुरेलाही फार समाधान होईल. सर्वांची खात्री झाल्याखेरीज अशा थोर व निकटच्या अपराध्याला दंड करूं नये असा तिचा फार आग्रह, आणि म्हणूनच तर मीं घाई केली नाहीं. अमात्यराज, आपण भलत्या संशयांत पडून नवरत्नांची माला गारगोटयांची माळ म्हणून फेंकून दिली होती; पण तिची खरी किंमत काय ती आतां कळली. शिव शिव ! आपल्या हातून केव्हां केव्हां केवढे प्रमाद होतात ! माझ्या हातून झालेल्या प्रमादाची दुरुस्ती करण्याचा मला प्रसंग मिळाला, म्हणून मी परमेश्वराची केवढी कृपा मानतों ! त्यानें खरोखर झाल्या कर्माबद्दल मला चांगलंच प्रायश्चित्त द्यायचं तें न देतां मला अंतीं पुनः सुख दिलं. आणखी काय चमत्कार पहा ! ज्या आपण नवरत्नांच्या माला म्हणून समजत आलों, त्या शेवटीं गारगोटयांचे सर म्हणून अनुभवानें ठरल्या. त्यांनीं माझ्या हातून बालहत्त्या घडविली—स्वतःच्या पुत्राची हत्या घडविली, आणि स्त्रीहत्त्या—संततीहत्त्या घडविण्याचाही प्रसंग आणला. आणि केल्या कर्माबद्दल मी आतां पश्चात्ताप पावून थोडीशी दुरुस्ती करणार, तों त्यांनीं माझीही हत्त्या करण्याचा घाट घातला !

तें ऐकून राक्षस अत्यंत चकित झाला व वेड्यासारखा महाराजांकडे पाहूं लागला.

# प्रकरण १९ वें.

## उपक्रम.

**से**नापतीचें आणि चाणक्याचें काय भाषण झालें असेल, आणि सेनापतीस चाणक्यापासून काय नवीन माहिती मिळाली असेल, तें कांहीं सांगतां येत नाहीं; परंतु संगमाच्या परतीरावर जाऊन त्या दोघांचीं गुप्त भाषणें झाल्या वेळेपासून भागुरायणाची चित्तवृत्ति कांहीं चमत्कारिक होऊन गेली, आणि चाणक्याविषयींचा त्याचा आदर पहिल्यापेक्षां दसपट वाढला असावा असें दिसलें. चाणक्य एकदां भागुरायणाजवळ भाषण करतां करतां सहज म्हणाला होता कीं राक्षस हा स्वामिनिष्ठ आहे यांत शंका नाहीं: परंतु तो सत्यनिष्ठ आहे कीं नाहीं याबद्दल शंका आहे. तें चाणक्याचें बोलणें भागुरायणास आतांशा वारंवार आठवत असावें, कारण त्यानें किती वेळां तरी चाणक्याजवळ असे उद्गार काढले कीं, " आपण म्हणतां तें मला अक्षरशः खरं वाटतं. अमात्य स्वामिनिष्ठ आहे, सत्यनिष्ठ नाहीं, आणि जो सत्यनिष्ठ नाहीं, तो सन्निष्ठही नाहीं, असं म्हणायाला मुळींच प्रत्यवाय नाहीं. तेव्हां सत्पक्षासाठीं त्याच्याशीं कपट केलं, तरी हरकत नाहीं. "

भागुरायण असें बोलला कीं, चाणक्यास मनापासून आनंद होत असे. भागुरायण आपल्या हातीं सांपडला, हा आपल्याला केवढा तरी मोठा आधार झाला. सगळा पुढचा व्यूह ज्या पायावर रचावयाचा, तो पायाच अतोनात भक्कम झाला. आणखी काय पाहिजे ? परंतु पुढील उपक्रम जितक्या लवकर सुरू करावयाचा तितक्या लवकर भागुरायण करीत नाहीं हें पाहून मात्र चाणक्यास थोडेंसें वाईट वाटलें. राजनीतीचें तत्त्वच हें कीं, ज्या गोष्टी धीटपणानें, कुठारप्रहारानें करावयाच्या, त्या करण्याचे कामीं दिवसगति होऊं देतां कामा नये. आपलें गुप्त कारस्थान किती दिवस गुप्त राहील, आणि किती दिवस राहणार नाहीं याचा नेम नसतो. त्याचा जोंपर्यंत स्फोट झाला नाहीं, तोंपर्यंतच त्यांत सिद्धि येण्याचा विशेष संभव असतो. एकदां स्फोट होऊन शत्रु त्यासंबंधांत सावध झाला म्हणजे मग काय राहिलें ? मग सिद्धि लाभण्याची अर्धी आशा सोडावी लागते. हे सर्व विचार चाणक्यानें भागुरायणाला उच्चारूनही दाखविले; परंतु कपटरचनेनेंही परशत्रूला आपल्या राज्यांत बोलावण्यासंबंधानें अद्यापि भागुरायणास फार शंका होती. परशत्रूच्या शक्तीचा फायदा करून घेत असतां त्याचे पाय खोचूं नयेत म्हणून आपण केलेले प्रयत्न सर्व व्यर्थ गेले, तर त्यांत काय राहिलें ? सर्वेच कारस्थान भलत्या दिशेस जावयाचें. शिवाय, चंद्रगुप्ताला राज्य देण्यांत धनानंदाला दूर कर-

ण्याचा प्रसंग आला तरी तें मी करण्याला तयार आहें, असें जरी भागुरायणानें चाणक्यास प्रथम बोलून दाखविलें होतें, तरी तें आपल्या हातून घडावें अशी त्याची मनापासून इच्छा नव्हती. या दोन गोष्टी कशा जुळाव्या याच्या विचारांतच तो असल्यामुळें त्याच्या हातून एकदम एक घाव दोन तुकडे असें वर्तन होईना. चाणक्यास हें बरें वाटेना. तथापि ज्याच्या हातून एखादें कार्य करून घ्यावयाचें त्याला फार नेट लावला असतां तो त्रासून, ' मला कांहींच करायचं नाहीं. आहे तें ठीक आहे, ' असें उत्तर देण्याचा संभव असतो. एवढ्याकरितां ज्याच्या त्याच्या तंत्रानेंच घ्यावें असा विचार करून चाणक्य काळ कंठीत व आपल्या इतर उलाढाली चालवीत होता. धनानंदास राज्यावरून दूर करण्याची तर काय, परंतु त्याला व त्याच्या इतर सर्व पुत्रांना नष्ट करून टाकण्याची ज्याची उत्कट इच्छा, सर्व नंदांचा उच्छेद करून चंद्रगुप्ताला मगधदेशाच्या सिंहासनावर बसवीन अशी ज्याची प्रतिज्ञा, त्याला कोणताही उपाय किंवा कोणतेंही कृत्य अयोग्य नव्हतें. योग्य संधि आणि योग्य साधन हीं दोन एकत्र मिळालीं, कीं कार्य झालेंच, अशा बाण्याचा चाणक्य होता. भागुरायण, किती झालें तरी आजपर्यंत धनानंदाला तो आपला राजा, तो आपला स्वामी म्हणून मानीत आला; तेव्हां त्याला एकदम दूर करून चंद्रगुप्ताला सिंहासनावर कसें बसावावें असें त्याच्या मनांत वारंवार आल्याखेरीज राहीना हें उघडच आहे.

एके दिवशीं तर त्याच्या मनांत एक नवीनच विचार आला व तो विचार चाणक्यास फार चांगला वाटेल असें पक्के मनांत वाटून तो चाणक्याकडे येऊन त्यास म्हणाला, " मुने चाणक्य, मला आज एक विचार सुचला आहे. आपल्याला तो पसंत झाला, कीं मग आपलं इष्ट कार्य एका क्षणांत झालंच म्हणून समजावं. आणखी मला तर अगदीं पक्की खात्री वाटते कीं, आपल्याला तो विचार सर्वथा मान्य होणार. कारण माझ्या दृष्टीनं त्या विचाराप्रमाणें केल्यास सर्व कांहीं साधतं. "

" सेनापते, " चाणक्य स्मित करून म्हणतो, " आपल्या मनांत येणारे विचार तसेच कांहीं तरी अमोघ असायचे, याचा काय मला अनुभव नाहीं ? काय विचार आला आहे तो त्वरित सांगा. मी तो ऐकायला फार उत्सुक झालों आहें. "

भागुरायण तें चाणक्याचें भाषण ऐकून लागलींच म्हणतो, " विचार म्हणून एवढाच कीं, आपण जें गौप्य मला सांगितलं, तें महाराजांच्या कानांवर घालावं. महाराजांचं प्रेमसर्वस्व आजकाल मुरादेवीवर आहे. ही गोष्ट तर जगद्विख्यातच आहे. तेव्हां त्यांना ही चंद्रगुप्ताची पीठिका समजल्याबरोबर अर्थातच अत्यंत आनंद होऊन ते सुमाल्याला दूर सारून याला नव्यानं यौवराज्याभिषेक करतील. असं झालं म्हणजे परकी लोकांना आंत आणण्याचं कारण नाहीं, आणि त्यांपासून कदाचित् उत्पन्न होणारं भयही नाहीं. "

भागुरायण बोलत असतां चाणक्याच्या कपाळावर आंठ्या चढल्या, त्याच्या भ्रुकुटी संकोचल्या व डोळे किंचित् बारीक करून त्यानें एकीकडे पाहिलें. परंतु हें सर्व इतक्या थोड्या अवकाशांत झालें कीं, आपल्या बोलण्याच्या भरांत असलेल्या व आपला विचार फार पसंत आहे असें आपलें आपल्यालाच वाटून खुष झालेल्या भागुरायणाच्या तें मुळींच लक्ष्यांत आलें नाहीं. चाणक्यानेंही त्याचें बोलणें संपण्यापूर्वीच हंसतमुख करून व आनंददर्शक टाळी वाजवून म्हटलें, " वाहवा ! सेनापते, तुम्ही फार नीतिविशारद. राक्ष-

साच्या स्थानीं तुम्ही पाहिजे होतां असं जें मला वारंवार वाटतं, तें काय उगीच वाटतं ! आपला विचार फार चांगला. मात्र तो पार पाडण्यांत मोठी सावधगिरी ठेविली पाहिजे, हें आपण जाणतांच आहां. सावधगिरी जर का नाहीं राहिली, तर भलतंच कांहीं तरी व्हायचं. पण सेनापते, राक्षस या आपल्या कार्याला विघ्न आणणार नाहीं असं आपल्याला वाटतं ? सुमाल्याच्या ठिकाणीं राक्षसाची अनंतानंत भक्ति, त्याला दूर सारून राजानं चंद्रगुप्ताला—राक्षसाच्या दृष्टीनं वृषलाला—सिंहासनावर बसविलं, तर राक्षस स्वस्थपणें व स्वसंतोषानं त्याची सेवा करूं लागेल ? तें जर शक्य असतं, तर प्रथमच त्यानं त्याला जगांतून नाहींसा करण्याची योजना कां केली असती ? राक्षसानं चंद्रगुप्तपक्ष न धरण्याला आणखी एक कारण आहे. चंद्रगुप्त सुमाल्यासारखा गरीब व मूर्ख नाहीं. तो आपल्या मताप्रमाणें राज्यकारभार करील, आणि राजाचं त्याच्यावर प्रेम असल्यामुळें राजा त्याचाच पक्ष धरून आपला उपमर्द करील, अशी भीति राक्षसाला वाटल्याखेरीज राहील काय ? राक्षस स्वामिनिष्ठ आहे खरा; परंतु आपलं आतां कांहीं चालत नाहीं असं त्याला दिसूं लागल्यावर त्याची स्वामिनिष्ठा कोणीकडे जाईल, कीं जेथल्या तेथें राहील हें सांगणं मोठं कठीण आहे. आपल्याला जें काय मुख्यतः साधायचं आहे, तें हें कीं, राक्षसाचं महत्त्व कमी व्हावं व त्याच्याबद्दल महाराजांच्या व जमल्यास लोकांच्याही मनांत अप्रीति उत्पन्न व्हावी. ती जोंपर्यंत झाली नाहीं, तोंपर्यंत आपले सगळे प्रयत्न व्यर्थ आहेत. अंतीं आपण राक्षसाला आपल्या पक्षाला आणूंच; परंतु ज्याप्रमाणें मी, त्याप्रमाणें सेनापति भागुरायणही पुरा नीतिशास्त्रज्ञ स्वामिनिष्ठ आहे अशी राक्षसाची खात्री झाल्याखेरीज, तो आपल्याला कधींही वश होणार नाहीं. आपल्या नीतिपाटवाची त्याला तरी एकदां थोडी चुणुक दिसूं द्या. ”

चाणक्याचें हें बोलणें ऐकून भागुरायण अगदीं स्वस्थ बसला. राक्षस आपला बेत सिद्धीस जाऊं द्यावयाचा नाही. आपलें कारस्थान चाललें आहे असें त्याला समजतांच तो कधींही स्वस्थ बसायाचा नाहीं. तेव्हां तो स्वस्थ आहे, तोंपर्यंतच आपण कांहीं तरी यत्न करून त्याला चकित करून सोडलें पाहिजे. त्याचे डोळे अद्यापि उघडले नाहींत, तोंच त्याच्या त्या आंधळेपणाचा उपयोग करून घेतला पाहिजे, अशा अर्थाचा उपदेश चाणक्यानें आजपर्यंत किती वेळां तरी भागुरायणास केला होता, व त्याचा त्याच्या मनावर परिणामही बराच झाला होता; परंतु आपण जें करूं तें राजद्रोहासारखें होईल काय, असें भागुरायणाच्या कोंवळ्या मनाला मधून मधून वाटून तो निराळ्या प्रकारानें विचार करी, त्यांपैकींच वर सांगितलेला, त्याचा विचार होता. आपलें बोलणें ऐकून भागुरायण स्वस्थ व सचिंत बसला, असें पाहून चाणक्यानें आणखीही पुष्कळ गोष्टी त्याला सांगून त्याच्या मनाची अशी खात्री करून दिली कीं, राक्षसाविषयीं लोकांच्या व महाराजांच्याही मनांत अप्रीति—निदान संशय तरी उत्पन्न केल्याखेरीज, आपलें कोणतेंही कार्य निर्विघ्नपणें तडीस जाणार नाहीं. तें एकदां तडीस गेलें म्हणजे मग राक्षसाला आपल्या पक्षाकडे फिरविण्यास, निदान त्याला निराश करून स्वस्थ बसविण्यास तरी अडचण पडणार नाही. चाणक्याच्या बोलण्याची अशी हातोटी होती कीं, हा सर्व विचार चाणक्य आपल्या मनांत भरवून देत नाहीं, तर आपला आपल्याला सहजगत्या सुचतो आहे असें भागुरायणास वाटावें; आणि त्या दिवसाच्या त्याच्या भाषणानें भागुरायणाच्या मनाचा असा पक्का निश्चय

झाला कीं, आपलें कार्य साधण्याला राक्षसाला गोत्यांत घालणें व त्यामुळें त्याच्याविषयीं राजाच्या व लोकांच्या मनांत संशय उत्पन्न करणें अत्यंत अवश्य आहे. आतां भागुरायणाच्या हातून कांहीं तरी करविल्याखेरीज उपयोग नाहीं; त्याला स्वस्थ बसूं दिलें, तर उद्यां कदाचित् दुसरा विचार उत्पन्न होऊन त्याचें चित्त अस्थिर होईल; जें काय करावयाचें त्याचा पहिला प्रस्ताव केला, म्हणजे मग त्याला मागें घेतां येणार नाहीं. तर आतां त्याच्याकडून त्वरित कार्यारंभच करावा, असा चाणक्यानें निश्चय केला व तो लागलींच भागुरायणास म्हणतोः—

" सेनापते, जातो दिवस तो एकच जातो; परंतु एक एक करतां करतां किती दिवस वायां गेले याचा विचार केला म्हणजे एकदम आपले डोळे उघडतात. शिवाय आपण जी संधि शोधीत असतों, ती संधिही नाहींशी होण्याचा संभव असतोः आपल्यासारख्या बुद्धिमान् पुरुषाला विचार हे काय घटकोघटकीं सुचायचेच आणि त्या विचारांत आणखी नानाप्रकारचे विचार सुचायचे; पण कार्यकर्त्या पुरुषानें विचारांना कुठें तरी मर्यादा घालून कार्यारंभ केला पाहिजे. आपली अनुमति असली, तर मी आजच कार्यारंभ करायला मुहूर्त करतों. अमात्याचा अत्यंत अत्यंत विश्वासू सेवक—त्याच्या हेरांपैकी मुख्य जो हिरण्यगुप्त तो सुद्धां आतां फुटला आहे. ...... "

" काय ? हिरण्यगुप्त फुटला आहे ? " भागुरायण फार आश्चर्यानें मध्येंच म्हणतो; " हिरण्यगुप्त फुटला म्हणजे एक फारच विलक्षण गोष्ट घडून आली म्हणायची. तो म्हणजे अमात्याच्या अगदीं विश्वासूंतला विश्वासू. तो फुटला ? त्याला आपण फोडला ? "

" सेनापते, या हलक्या माणसांना फोडायला तसल्याच प्रकारचीं हत्यारें लागतात, तीं योजिलीं कीं तेव्हांच काम होत असतें. मुरादेवीच्या अंतर्गृहांतल्या बातम्या काढण्याकरितां अमात्यानें सुमतिकेला फोडण्याचा यत्न केला, परंतु ती फुटायच्याऐवजीं सुमतिकेनें त्या हिरण्यगुप्तालाच फोडलें. तो आतां तिच्या आणि तिच्यामुळें माझ्या असा भजनीं लागला आहे कीं, ज्याचें नांव तें ! मी जें सांगेन तें सुमतिका त्याच्याकडून करवील. कनक आणि कांता कोण्या मनुष्याच्या हातून काय गोष्टी घडवितील, याचा मुळींच नेम नाहीं. हिरण्यगुप्ताला सुमतिकेनें इतका लुब्ध केला आहे कीं, कांहीं पुसूं नये. कुत्र्यासारखा तो तिच्या जवळ जवळ असतो ! राक्षसाचीं सर्व पत्रें तो लिहीत असतो, आणि राक्षसाची मुद्राही त्याच्याचजवळ असते. पर्वतेश्वराच्या नांवचें—राक्षसानें त्याला लिहिलेलें—पत्र त्याच्याकडून तयार करवीन, त्याच्याखालीं राक्षसाची मुद्राही तोच ठोकून देईल. तें माझ्याकडे लागलें. त्याचप्रमाणें तें गुप्तपणें पर्वतेश्वराकडे जाईल अशाबद्दलही व्यवस्था मी करतों. आपल्या अनुमतीचाच काय तो आतां अवकाश. सेनापते, हिरण्यगुप्तासारखीं माणसें अनुकूल आहेत, तोंपर्यंतच आपल्याला हें शक्य आहेः परंतु तीं एकसारखीं अनुकूल राहतील असा नेम काय सांगावा ? तेव्हां जें काय करायचें, तें त्वरित करावें तें चांगलें. सुमतिकेकडून जो दुसरा व्यूह रचविला, त्यामुळें राक्षस अगदीं अंध झाला आहे. त्याला महाराजांच्या जिवावर येणाऱ्या काल्पनिक संकटाखेरीज व तें निवारण करण्याला उपाययोजना काय करावी या विचाराखेरीज दुसरें कांहीं दिसत नाहीं. आपल्या या कारस्थानाचा जर का एकवार अणुरेणुमात्र सुगावा त्याला लागला, तर सर्वच फसेल. तेव्हां, तो अंधळा आहे तोंपर्यंतच काय जी अघाडी मारायची असेल, ती मारली पाहिजे. हिर-

ण्यगुप्त आजामितीस तरी निदान आपल्याला इतका अनुकूल आहे कीं, आपण सांगूं तें पत्र लिहून त्यावर राक्षसाची मुद्रा ठोकून देईल. त्या मुद्रेनं युक्त अशी पत्रिका पर्वतेश्वराकडे गेली, म्हणजे मग तो तर काय नुसता आनंद-तांडव करूं लागेल. बोला, आज याप्रमाणें सर्व घडवून आणूं ? आपली अनुमति असली, आपण जो सत्पक्षाभिमान धरला आहे तो जागृत असला, तर मी पुढला उपक्रम करतों. नाहीं-पक्षीं मी निरपेक्ष ब्राह्मण ! स्वस्थ आपल्या आश्रमांत बसेन आणि त्या शंकराचं ध्यान करीन; पण आपल्या नीतिज्ञतेच्या घमेंडींत असणाऱ्या राक्षसाला तोड देऊन स्वामिनिष्ठा, सत्यनिष्ठा व सत्पक्षपात हीं जगास दाखविण्याचा प्रसंग आपण वायां जाऊं देऊं नये असा माझा तर मनोदय आहे....”

“ आर्या चाणक्या, आपला मनोदय आहे आणि माझा नाहीं काय ? आपला मी शिष्य, ‘आपण जें सांगाल तें मी आजपासून करीन, असं मी आपल्याला त्या दिवशीं—ज्या दिवशीं आपण मला परतरीवर नेऊन चंद्रगुप्ताबद्दल सांगितलंत त्याच दिवशीं चविनविलं. मनांत नाना विचार येतात ते आपल्याजवळ ओकून टाकले म्हणजे बरं वाटतं; म्हणूनच मीं आपल्याजवळ आजही महाराजांना सर्व सांगून त्यांना वश करून घेण्याचा विचार सांगितला: परंतु त्याला आपण सांगतां त्या अडचणी आहेत खऱ्या. आतां तो विचारच सोडूं. आपण काय करणार तें करा. मी आपल्या विचाराबाहेर अणुभरही नाहीं. ”

भागुरायण हें सर्व फार आतुरतेनें व मनःपूर्वक बोलला. तें पाहून आर्य चाणक्यास फार संतोष झाला व या भागुरायणाच्या मनःस्थितीचा ताबडतोब फायदा घेतला तरच ठीक. एकदां पाऊल घालून हा पुरुष गुंतला गला, म्हणजे मग त्याला मागें सरतां येणार नाहीं. असा विचार करून त्याच दिवशीं त्यानें हिरण्यगुप्तास बोलावून भागुरायणाच्या देखत राक्षसानें लिहिल्यासारखें पर्वतेश्वराच्या नांवचें पत्र लिहून घेतलें. तें आपल्या एका फार विश्वासू अशा मित्राबरोबर—सिद्धार्थकाबरोबरच -पर्वतेश्वराकडे पाठवून दिलें.

हें पत्र पाठविल्या दिवसापासून अर्थातच ुढ काय होतें आणि काय नाहीं, पर्वतेश्वराचें राक्षसास उत्तर काय येतें आणि एकंदर पुढला प्रकार काय होतो, इकडे दोघांचें लक्ष्य लागलें. पत्रामध्यें असेंच लिहिलें होतें कीं, पत्रोत्तर पाठवावयाचें झाल्यास हें पत्र घेऊन येणाराबरोबरच पाठवावें. आपला स्वतःचा दुसरा कोणी हेर पाठवूं नये. कारण आपलेकडून मजकडे हेर येतात हें अगदींसुद्धां कोणास कळतां कामा नये. या गोष्टी किती नाजूक आहेत, हें आपण जाणतच आहां. मी हें पत्र मुद्दाम एका श्रमणकाबरोबर पाठवितों आहें, याचा हेतु हाच कीं, हे बौद्धभिक्षु वाटेल तेथें जातात, येतात, त्यांचा कांहीं राज्यकारस्थानांत संबंध असेल, आणि ते हेरपणा करीत असतील असें कोणास वाटावयाचें सुद्धां नाहीं. या सिद्धार्थकाखेरीज दुसऱ्या कोणाबरोबर कांहीं आलें तर तें अगदीं उपयोगी नाहीं. सिद्धार्थक फार विश्वासू आहे, तेव्हां त्याचा आपण बिलकुल संशय घेऊं नका .........”

पाठविलेल्या जासुदाबद्दल व त्याच्याबरोबर पत्रोत्तर वगैरे पाठवावें अशाबद्दल स्वच्छपणें लिहून मग पुढें काय लिहावयाचें तें लिहिलें होतें. यामुळें भागुरायण आतां रोज चाणक्याकडे येऊन आपलें पत्र पोंचलें असेल काय, पोंचलें असलें, तर पर्वतेश्वर त्याच्याबद्दल काय म्हणत असेल, त्याला तें सर्व खरें वाटून तो आपल्या म्हणण्याप्रमाणें लढाई करावयाला येईल कीं नाहीं, आणि आपल्या अजमासाप्रमाणें आला, तर राक्षसाच्या नांवाचा जिकडे

तिकडे बोभाटा करतां येईल कीं नाहीं, वगैरे अनेक गोष्टी बोलत असे. आतां एकदां आपण समुद्रांत जहाज ढकललें. आतां तें कडेला लावलेंच पाहिजे, आणि त्यांत आपण न बुडतां आपलें कार्य तर करून घेतलें पाहिजे, अशाविषयीं भागुरायणास साहजिक अभिमान उत्पन्न झाला. भागुरायण चाणक्याचा एका दृष्टीनें अंकित झाला.

परंतु चाणक्याला एवढा एकच हेतु साधावयाचा नव्हता. मुरादेवीकडून तिची प्रतिज्ञा-नंदराजाला मारण्याची-खरी करावयाची होती. आणि राक्षसास नेहमीं कांहींना कांहीं तरी चिंतेंत निमग्न ठेवावयाचें होतें. आपल्यास कोणी तरी फसवतो आहे, असें जर त्याला एकवार वाटलें आणि तो जागृत झाला, तर सगळा व्यूह ढांसळेल; एवढ्याकरितां त्याचें मन नेहमीं व्यापृत आणि विश्वस्त ठेवणें हें त्याला फार अवश्य होतें. मुरादेवीची प्रतिज्ञा चाणक्यानें भागुरायणास अद्यापि कळूं दिली नव्हती. त्याचप्रमाणें आपण कोण आणि येथें कां आलों हेंही समजूं दिलें नव्हतें. चंद्रगुप्त वस्तुतः कोण आणि तो आपण येथें कां आणला, हें भागुरायणास सांगितल्याखेरीज भागुरायणला वळवून घेणें शक्यच नव्हतें. मगधराजाचा सेनापति किंवा अमात्य या दोहोंपैकीं एक तरी आपल्याला अनुकूल झाल्याखेरीज आपल्या व्यूहाचा पाया रचण्यास साधन नाहीं हें तो जाणून होता. नंदांचा उत्खात करण्यास अमात्य कधींही तयार होणार नाहीं. कारण तो पक्का स्वामिनिष्ठ. तेव्हां त्याला आपल्या बाजूला वळवून घेण्याची आशा करून या प्रयत्नास लागणें, म्हणजे मृगजळानें तहान भागविण्यासाठीं तें प्राप्त करून घेण्याच्या प्रयत्नास लागण्यासारखेंच होय. तेव्हां चाणक्यानें तो विचारही आपल्या मनांत येऊं दिला नाहीं. दोन अधिकाऱ्यांत स्पर्धेचा प्रादुर्भाव करून एकाला दुसऱ्याच्या विरुद्ध उठविणें हें अगदीं सहज व अमोघ साधन होय, तेव्हां तें साधन प्राप्त करून घ्यावें असा दूरवर विचार करून, आणि मुरादेवीच्या पुत्राचा पक्ष घेण्यास सेनापति फार लवकर सिद्ध होईल हें जाणून, त्यानें भागुरायणास वश करून घेण्याचा यत्न केला तो त्याचा यत्न कितपत सिद्धीस गेला हें वाचकांस माहीत आहेच.

---

# प्रकरण २० वें.

## अमात्याच्या गांवींही नाहीं !

आपल्याविरुद्ध दुसरीकडे केवढें काहूर रचलें जात आहे, याची बिचाऱ्या अमात्य राक्षसास माहितीही नाहीं. अमात्य अतिशय चतुरस्र खरा, त्याचप्रमाणें मोठा जागरूकही खरा; परंतु मनुष्यावर कित्येक वर्षांत कोठूनही कांहीं संकट आलें नसलें म्हणजे त्यास थोडासा गाफिलपणा येतो, तशाच प्रकारचा गाफिलपणा अगदीं साहजिकपणें, अगदीं नकळत, राक्षसास आला होता. त्यास अलीकडे चिंता काय ती एक धनानंदाच्या वर्तणुकीबद्दलच होती. धनानंद राज्यव्यवस्थेकडे पहात नाहीं याचेंही त्याला

इतकें कांहीं वाटत नव्हतें; परंतु तो अष्टौप्रहर केवळ विलासांत आणि मुरेच्या मंदिरांत असतो, याचें त्यास वाईट वाटे. कोणत्याही परराजाकडून पाटलिपुत्रावर कांहीं संकट ओढवेल, ही कल्पनासुद्धां त्याचे मनांत आली नाहीं. राक्षस कुसुमपुरांत जिवंत असतां कोणीही परकीय राजा त्या नगराकडे वक्रदृष्टि करून पाहील हें स्वप्नांतसुद्धां आणावयास नको, असें त्यास पूर्णपणें वाटे. त्याचप्रमाणें आपण जागरूक असतां पुरांतल्या पुरांत किंवा राज्यांतही कोठें कोणी डोकें वर उचलील, किंवा घरांतल्या घरांत कांहीं संकट उपस्थित होईल, याचाही कधीं त्यास संभव वाटत नसे. अशा स्थितींत सुमतिकेनें अगदीं मोघम रीतीनें त्याच्या कानांत जेव्हां सांगितलें कीं, मुरादेवीकडून राजाच्या जीवाला कांहीं तरी अपाय करण्याचा खटाटोप चालला आहे, तेव्हां त्याची चित्तवृत्ति एकदम कशी उद्‌बुद्ध झाली असेल, याची कल्पनाच करावी. त्यांतून तो राजाची भेट घेण्यास गेला असतां त्या दोघांचें जें भाषण झालें, त्यानें तर त्याला चांगलेंच धक्का देऊन जागें केलें; आपण राजास मुरादेवीच्या कापट्याविषयीं जागृत करीत असतां राजा दुसऱ्याच मंडळीचा संशय घेतो हें पाहून तर त्यास फार आश्चर्य वाटलें; परंतु हें आश्चर्य फार वेळ टिकलें नाहीं. आपण काय करतों हें राजाच्या लक्ष्यांत येऊं नये व तो तत्संबंधानें अगदीं अज्ञानांतच राहवा, या हेतूनें राजास मुरादेवी फसवीत नसेलना? व आपल्यावरला संशय दुसऱ्यावर जाऊन त्यांच्याविषयीं राजाच्या मनांत तिटकारा उत्पन्न व्हावा अशासाठीं तर तिचा प्रयत्न चालू नसेलना? जर असेल तर तिला त्या प्रयत्नांत चांगलेंच यश आलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं असेंही त्याच्या मनास वाटूं लागलें, आणि त्याकरितां त्यानें तिकडे विशेष लक्ष्य पुरविण्याचें योजिलें. बाकी कोणीकडेही लक्ष्य देण्याची जरूर नव्हती. चंद्रगुप्त कोण, काय, याविषयीं शंका होती, तिचें यथायोग्य निराकरण झालें. चंद्रगुप्त राज्यांत असल्यानें सुमाल्याला एक प्रकारचा सहाय्यायोच होईल. किराताधिपतीनें इतक्या नम्रपणें आपल्यास लिहिलें आहे, तर त्याला दूर करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं, असूं द्यावें. त्याची चौकशी करण्याचें किंवा त्याच्यावर नजर ठेवण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं, असेंच राक्षसानें मनांत ठरविलें आणि लक्ष्य दिलें नाहीं. उलट सुमाल्याची व चंद्रगुप्ताची मैत्री जडली, तर त्यापासून पुढेंमागें म्लेच्छ लोकांना दंड करण्यास सहाय्यच मिळेल, असें त्याच्या मनानें घेतलें. यामुळें अर्थातच त्या राजपुत्राकडे त्यानें विशेष लक्ष्य परविलें नाहीं. परचक्राचें भय तर त्याच्या स्वप्नस्वप्नांतरीसुद्धां नाहीं. कुसुमपुराकडे बुभुक्षित नेत्रांनीं नुसतें पहावयाचेंसुद्धां कोणा आसमंतांतल्या राजाला शक्य नव्हतें. तेव्हां आतां फक्त या मुरेच्या हातून राजाला सोडविण्यासाठींच काय तें आपण केलें पाहिजे, असें त्याच्या मनानें पूर्णपणें घेतलें आणि तेवढ्यासाठीं त्यानें आतां कांहीं तरी उपक्रम करण्याचें ठरविलें.

अमुक एक अपाय होत आहे, असें वेळींच कळलें तर उपाययोजना करावी, असा बेत करणें फार सोपें असतें; परंतु काय उपाय काढावा आणि तो अंमलांत कसा आणावा त्याचीच मोठी पंचाईत असते. दुसरी एखादी प्रजाजनापैकीं व्यक्ति असती, तर त्यास पंचाईत पडली नसती. त्या माणसाला धरून आणून एकदम चांगलें झाडून टाकलें किंवा कारागृहांत चार दिवस पाठविलें म्हणजे झालें; परंतु या प्रसंगीं तसें कांहींच करतां येणें शक्य नव्हतें. यामुळें त्यास मोठी चिंता पडली. राजाला मुरेचें किती वेड लागलें आहे, हें

त्यानें प्रत्यक्ष पाहिलें होतें. तेव्हां तिनें त्याजवर कांहीं तरी मोहनीमंत्र टाकला आहे, तो काढून टाकण्याचा प्रयत्न करणारा पंचाक्षरी पहावयाला पाहिजे, अशा विचारांत राक्षस असतां सुमतिका आली, अशी वर्दी आली. हिला आपल्या मुठींत ठेवणें हें काम पहिलें, असें मनांत येऊन त्यानें तिला तत्काल आंत बोलाविलें. तिनें कांहीं तरी नवीन बातमी आणली असेल अशी त्याची कल्पना होणें अगदीं साहजिक होतें. सुमतिका आंत आली आणि रीतीप्रमाणें राक्षसास वंदन वगैरे न करितां घाबऱ्या आवाजानें म्हणते, "आर्यश्रेष्ठा, माझं संरक्षण करा. माझी आतां धडगत नाहीं."

अमात्य राक्षसास सुमतिकेच्या घाबरण्याचा आणि तिच्या त्या कावऱ्या बावऱ्या दृष्टिक्षेपांचा कांहींच अर्थ कळेना. पाठीमागें लागलेल्या व्याघ्रापासून रक्षण करून घेण्यासाठीं वेलींच्या जाळींत शिरलेली हरिणी ज्याप्रमाणें अगदीं चकित दृष्टीनें पाहत राहाते व तिचा श्वासोच्छ्वास मोठ्यानें चालतो, त्याप्रमाणेंच हुबेहूब तिची या वेळीं स्थिति झाली होती. राक्षसानें तिला "सुमतिकाबाई, घाबरूं नका. काय झालं तें मला सांगा. राक्षसाच्या घरांत तुम्ही अगदीं सुरक्षित आहां." असें आश्वासनपर बोलून तिच्याकडे पाहिलें; तथापि त्या जणूं काय थरथर कांपणाऱ्या सुमतिकेच्या उरांतली धडकी राहिली नाहीं. किती वेळ झाला, तरी तिच्या तोंडून कांहीं केल्या शब्द उमटेना. तेव्हां इला स्वस्थ बसूं दिल्याखेरीज ही उत्तर यावयाची नाहीं, हें जाणून अमात्य राक्षस नुसता तिच्या चर्येकडे पहात राहिला. तिला इतकें घाबरण्याचें कारण तरी काय झालें, आणि ही आपल्याला "रक्षण करा" म्हणते, तें कशावरून, याची त्याला कल्पना होईना. थोडा वेळ गेला. सुमतिका अमळ शांत झाली, आणि म्हणते, "आर्यश्रेष्ठा, माझी धडगत दिसत नाहीं. मीं आपली आपल्या मंदिरांतील बातम्या आपल्याकडे येऊन सांगण्याची कामगिरी पतकरली आहे, हें माझ्या स्वामिनीच्या कानावर गेलं आहे. मग तें कोणीं सांगितलं असेल, तें असो. एका हिरण्यगुप्ताखेरीज आपल्याकडल्या कोणाही माणसाशीं मी कधीं बोललें नाहीं. आणि हिरण्यगुप्त तर कधीं असं कांहीं बोलणार नाहीं. मुरादेवीची आणखी त्याची भेटही झालेली नाहीं. मग देवीच्या कानावर ही गोष्ट गेली कशी, आणखी ऐन प्रसंगीं—ज्या वेळेला संशय यायला नको होता, अशा वेळीं कींहो हा संशय आला! ही वेळ म्हणजे अगदीं आणीबाणीची वेळ आहे. देवीनं महाराजांचा घात करण्याला जी योजना केली आहे, ती मला अगदीं इत्थंभूत कळण्याच्या बेतांत होती. अशा वेळीं हें विघ्न आलं. मी बाहेर जाऊन—आपल्याकडे येऊन तिच्या मंदिरांतली अगदीं इत्थंभूत माहिती देतें, असं तिला कळलं आहे. आणि तिनं माझ्या पदरांत माप घालून मला चांगली कडक शिक्षा देण्याचा निश्चय केला आहे. ती शिक्षा आजच होणार असंही पण माझ्या कानीं आलं आहे, इतकंच नाहीं, तर मला जाळ्यांत धरण्याकरितां तिनं काय योजना केली आहे, तीही पण मला समजली आहे. म्हणूनच मी प्राण वचावून पळून आलें. महाराजांच्या जिवावर कशा प्रकारानं ती अवदसा घाला घालणार याची बित्तंबातमी आतां अगदीं समजणार, मी देवीला गोड बोलून व तिच्या पुढें पुढें करून तिच्या पोटांत शिरणार, तोंच हें असलं विघ्न आलं. आतां काय करावं? एका स्वामीचा द्रोह करून दुसऱ्याची मनधरणी ज्यानं सुरू केली, त्याला हा असाच शासनलाभ व्हायचा. मी जर आपल्या आमंत्रणावरून आलें नसतें, आपल्या

स्वामिनीच्या चुगल्या सांगण्याचं नीच काम पतकरलं नसतें, तर हा प्रसंग मजवर कशाला आला असता ? आतां मुरादेवी ती. मी जरी त्रिभुवनांत कोठेंही असलें तरी ती मला शोधून काढून माझा प्राण घेईल; तथापि तिच्या विरुद्ध आपली सेवा पतकरल्यामुळें सहजच असं वाटलं कीं, आपल्या चरणाखेरीज आतां त्राण नाहीं. ”

“ तुला आतां तुझ्या जीवाची भीति नको. तूं अगदीं निश्चिंत ऐस; पण सुमतिके, महाराजांच्या जीवाला जो अपाय केला जाणार आहे, त्याबद्दल तुला काय कळलं आहे तें थोडं सांग तर खरी. सुमतिके, महाराजांचा जीव वांचविण्याकरितां उपाय केल्याखेरीज कसं चालणार ? तुला जें काय अर्धवट कळलं असेल तेंच मला सांग. मी दुसरी कांहीं योजना करीन. ”

“ अमात्यराज, महाराजांच्या जीवाकरितां मीच पुनः नाहीं का आपला जीव धोक्यांत घालणार ? त्यांच्या जीवापेक्षां माझा जीव मला अधिक प्रिय आहे असं नाहीं. त्यांच्या जीवावर तर आम्हां प्रजाजनांच्या उड्या. मला अजून इतका उत्साह खचित आहे कीं, मी पुनः माझ्या स्वामिनीचा क्रोध शांत करून पुनः तिची कृपा संपादीन; परंतु त्यांत हीं अशीं विघ्नं येऊं लागलीं, तर काय उपयोग ? आपण दुसरी योजना करूं म्हणतां, परंतु त्याला अवधि सांपडेल तर ना ? माझी समजूत—नव्हे माझी खात्री आहे कीं, एक दोन दिवसांतच बहुशः— ” इतकें बोलून ती अर्ध्या वाक्यांतच थांबली, व स्पष्टपणें दिसतील अशा प्रकारें तिनें अंगावर शहारे आल्याचा आविर्भाव केला.

राक्षसानें तो आविर्भाव पाहून मोठ्या चिंतायुक्त आतुरक्यानें तिला म्हटलें, “काय, काय? एक दोन दिवसांतच काय ? ”

“काय सांगूं आर्यश्रेष्ठा, ही मुरादेवी वैधव्यासाठीं जशी काय उत्सुक झाली आहे. एखादी उपवर कुमारी विवाहासाठींसुद्धां इतकी उत्सुक होत नसेल, अशी उत्सुकता मुरादेवीला वैधव्यासाठीं वाटत आहे. ”

‘ काय, ह्मणतेस तरी काय ?’ सुमतिके, अशीं अर्धवट बोलणीं बोलूं नको. स्पष्ट बोल.”

“ काय स्पष्ट बोलूं ? स्पष्ट बोलण्याजोगी स्थिति येण्याच्यापूर्वींच जर विघ्नं आलीं, तर स्पष्ट बोलूं कशी ? ”

“ सुमतिके, महाराजांच्या ठिकाणीं जर तुझी खरी खरी भक्ति आहे, तर काय वाटेल तें होऊं दे. तूं पुनः परत जा, आपल्या स्वामिनीच्या क्रोधाची शांति कर आणि पुनः तिच्या विश्वासांत शिरून काय भयंकर प्रकार आहे तो मला सांग. ”

सुमतिका पुनः घाबरल्या आवाजानें म्हणते, “आर्या, आपण म्हणतां त्याप्रमाणें मी जाईन; पण आतां इतकं करायला अवधि आहे कोठें. जें काय भयंकर व्हायचं तें दोन तीन दिवसांतच होणार. मी गेलें, तर मी पुनः चुगल्या करीन अशा समजुतीनं मला लागलींच कारागृहांत टाकतील, कधीं सोडणार नाहींत. आपल्याला जर कांहीं उपाय करायचा असेल तर तो त्वरितच झाला पाहिजे, म्हणून मी आपल्याकडे आलें. कांहीं तरी भयंकर प्रकार होणार हें मागं सांगितलंच होतं. आतां तें सारं अगदीं जवळ आलं आहे इतकं सांगायला तरी मी आलें हेंच माझं दैव. ”

ही असें धरसोडीचें भाषण करते आहे तरी कां, हें राक्षसास समजेना. आली ती घाबरीघाबरीशीच येऊन, “रक्षण करा, रक्षण करा” असें म्हणत आली, पुढें हिरण्यगुप्तामुळें हें सर्व झालें असें म्हणूं लागली. नंतर आपण परत जाऊं, जीव धोक्यांत घालूं असेंही म्हणूं लागली. जा म्हणून सांगितलें, तर कांकूं करते. तेव्हां खरा प्रकार तरी काय, असें वाटून राक्षस विचारांत पडला.

# प्रकरण २१ वें.

## अमात्यानें काय केलें ?

सुमतिका याप्रमाणें राक्षसाच्या मनाची चलबिचल करून टाकीत होती. राजाच्या जीवावर कांहीं तरी मोठें संकट येत आहे, आणि तें स्वतः मुरादेवीच आणीत आहे; शिवाय तें अगदीं लवकर एक दोन दिवसांतच येणार, इतकें नुसतें कळून काय उपयोग ? कांहीं तरी नक्की बातमी पाहिजे. मोघम बातम्यांत अर्थ काय ? असें वाटून तो एकसारखा तिला प्रश्न विचारीत होता. आणि ती अगदीं भांबावल्या-घाबरल्यासारखी होऊन कांहीं तरी उत्तरें देत होती. आपण इतके दूरदर्शी, मोठे मुत्सद्दी, सगळ्या त्रिभुवनांत कोठें काय चाललें आहे त्याच्याबद्दल बातम्या आणवून जिकडे तिकडे बंदोबस्त करण्याच्या खटाटोपांत आपण नेहमीं दंग होऊन गेलेलों असतों, आणि आज आपल्या राजाच्या जीवावर कांहीं तरी संकट येणार हें धडधडीत दिसत असून त्याच्यासंबंधाची कांहीं माहिती आपणाला लागू नये किंवा आपण कांहीं करण्याला असमर्थ व्हावें, हें मनांत येऊन अमात्य फारच विषादला. त्याला कांहीं सुचेना. शेवटीं त्यानें निराश होऊन सुमतिकेस म्हटलें, " सुमतिके, तें कसंही असो, आपल्या स्वामीच्या जीवाकरितां तूं आपला जीव धोक्यांत घालायला मागं पुढं पाहूं नकोस. वाटेल तें कर, परंतु काय आहे आणि काय चाललं आहे, याचा तपास करून मला कळवायला ये. अगदींसुद्धां यावेळीं मागेंपुढें करूं नको. तुझ्या जीवाचं संरक्षण होईल, अशाबद्दल मी काळजी घेईन; परंतु हें सगळं अर्धवट ठेऊं नको. जा कशी. "

" अमात्यराज, आपण आज्ञा करतां, तर मी जाईन. पण काय जी बातमी मला लागेल, मी सांगायला मी परत येईन असा भरंवसा नाहीं. मुरादेवीला माझ्याबद्दल पक्का संशय आला आहे. तो संशय ती बोलून दाखवायची नाहीं; पण ती तिच्या दृष्टीस पडतांक्षणींच ती मला जीवें मारील, कीं कोठें कोंडून टाकील याचा नेम नाहीं. तेव्हां माझं आपण ऐकाल— मीं यः— कश्चित् दासीनं आपल्याला कांहीं युक्ति सुचवावी असं नाहीं; लहान तोंडीं मोठा घांस घेतल्याप्रमाणेंच होणार आहे; परंतु आतां दुसरा उपाय नाहीं म्हणून आपली सुचवितें कीं, आपण पुनः एकदां कांहीं तरी निमित्त काढून महाराजांच्या दर्शनाला जावं आणि स्पष्टपणें बोलून किंवा दुसरी कांहीं तरी युक्ति करून त्यांना त्या महालांतून काढून न्यावं. तेंही जर आजच्या आज किंवा फार झालं तर उद्यां संध्याकाळच्या आंत झालं तर ठीक. मग महाराजांचा जीव बचावला असं समजावं. पण उद्यांची संध्याकाळ उलटली कीं मग कांहीं आपल्या हातीं राहणार नाहीं, हें आपण ध्यानांत धरावं. महाराज मुरादेवीच्या रंगमहालांतून निघून गेले, तरच आतां कांहीं त्यांचा जीव सुरक्षित राहण्याचा संभव आहे.

नाहीं तर आपल्या या पाटलिपुत्राला अनाथ होण्याची पाळी आली म्हणून समजावं. दुसरं काय मी आतां आपल्याला सुचवूं ? आपण आज्ञा करतांच आहां तर आतां मी जाऊन आणखी कांहीं बातमी लागली तर पहातें; पण मी आतां परत येईन आणखी आपल्याला कांहीं सांगूं शकेन असं मला तर कांहीं वाटत नाहीं. याउप्पर माझं नशीब ! ”

सुमतिका काय बोलते आहे इकडे राक्षसाचें लक्ष्य पूर्णपणें होतें असें दिसलें नाहीं. ती वर सांगितलेलें भाषण करून तडक निघूनच गेली. अमात्यास नुसतें जातें म्हणून सुद्धां तिनें सांगितलें नाहीं. राक्षसाचें मन अर्धें स्वतःच्या विचारांत आणि अर्धें सुमतिका काय बोलत होती तिकडे होतें. तेव्हां ती आपलें बोलणें थांबवून तेथून निघून गेली हें लक्ष्यांत येण्यालाच त्याला थोडासा वेळ लागला; परंतु तें लक्ष्यांत येण्याबरोबर त्याला तिच्या एकाएकीं न विचारतां न सवरतां निघून जाण्याबद्दल आश्चर्य वाटलें आणि त्यानें एकदम द्वारपालास हांक मारून सुमतिका गेली काय, म्हणून विचारलें. होय म्हणून उत्तर येतांच अधिक कांहीं न बोलतां तो आपल्याला विचारांत निमग्न झाला.

आपल्या या आजपर्यंत सुखी म्हणून नाणावलेल्या मगधराज्यावर कांहीं तरी संकट येणार असें एकाएकीं त्यास वाटूं लागलें. नंदवंश उत्तम प्रकारें रहावा म्हणून आपण शूद्री-वृषली राजमहिषी होऊं दिली नाहीं, राजापासून तिच्या पोटीं पुत्र उत्पन्न झाला असतांही तो पुढेंमागें या शुद्ध वंशाच्या गादीवर बसेल, म्हणून त्याचा नाश होईल अशी तजवीज केली, त्याच पोराची माता, तीच वृषली आज राजाचा निःश्वास होऊन बसून आपल्यासही जड झाली आहे. आपलें आणि राजाचें फार वेळ भाषण तर राहूंच द्या, पण त्याचें दर्शन सुद्धां होऊं देईना. इतका प्रकार झाला असूनही अजून आपल्या हातून कांहीं उपाययोजना होत नाहीं हीं सगळ्यांत विलक्षण गोष्ट आहे. पण काय करावें ? परवां महाराजांचें दर्शन घेण्याला युक्ति योजली कीं, परचक्र येण्याचा संभव आहे, तेव्हां एकवार भेट घ्यावी. त्याप्रमाणें भेट झाली. पण आतां काय करावें म्हणजे पुनः आपली भेट होईल ? भेट घेऊन स्पष्टपणें सांगून त्यांस सावध रहाण्याबद्दल विनवीन पण भेट तर झाली पाहिजे. मुख्य अमात्य आणि राजा यांच्या भेटीला देखील ज्या राज्यांत अडचण पडूं लागली, त्या राज्याचें आतां नष्टचर्येच ओढवलें. असो; पण आपण आपल्याकडून जें कांहीं होईल तें करून सोडावें, असें म्हणून राक्षस उठला व एकदम त्यानें एक पत्र लिहून महाराजांकडे आपल्या एका अत्यंत विश्वासाच्या माणसाबरोबर तें मुरादेवीच्या महालांत पाठविलें.

काय चमत्कार असेल तो असो; राक्षसाचें पत्र येतांक्षणींच तें महाराजांपर्यंत जाऊन पोहोंचण्याची जणूं काय तेथें पूर्वव्यवस्थाच केलेली होती. तें पत्र लागलींच महाराजांचे हातीं गेलें. मुरादेवी तेथें बसलेलीच होती. महाराजांनीं तें पत्र फोडून वाचण्याला सुरुवात केल्याबरोबर तिनें त्यांस म्हटलें, “ कोणाचं एवढं जरूरीचं पत्र ? ”

राजाः—अमात्य राक्षसाचं आहे.

देवीः—अमात्यराजांचीं अलीकडे फार फार पत्रं यायला लागलीं ! प्रत्यक्ष भेटीला येण्याचा कंटाळा येऊं लागला आहे वाटतं त्यांना ? माझ्यावर आपलं जरी प्रेम पुनः जडलं, तरी त्यांचा द्वेष कांहीं कमी होत नाहीं. माझ्या अंतःपुरांत येण्याचे प्रसंग टाळावे म्हणून पत्रं लिहिण्याची युक्ति काढली वाटतं !

राजाः—प्रत्यक्ष आलं, तर गांठ पडायला

अडचण पडे, दाद लागत नाहीं, असं त्याचं म्हणणं दिसतं आहे.

देवी मुराः—अमात्यांची दाद लागत नाहीं ? मनांत येण्याचं नसलं म्हणजे वाटतील त्या सबबी काढतां येतात. बरं पण लिहून विचारलं आहे तरी काय ?

राजाः—पुनः एकवार अगदीं एकांतीं भेट व्हावी, फार मोठं राजकारण आहे, तर आज्ञा व्हावी, असं लिहिलं आहे.

देवी मुराः—मागलंच राजकारण असेल. आतां कोणतं परचक्र येणार म्हणून सांगणार आहेत ? ते मोठे स्वामिभक्त, यामुळें आपल्या सुरक्षितपणाविषयीं मला वाटतं त्यांना नेहमीं संशय येतो. मी कांहीं तरी आपल्या जीवाला करीन असा तर नाहींना त्यांना संशय येत ? मला कीं नाहीं, कां तें कांहीं सांगतां येत नाहीं, परंतु आतांशा असं वाटूं लागलं आहे कीं, माझ्याचविषयीं त्यांच्या मनांत भलताच संशय आलेला आहे. मी त्या भानगडींत पडत नाहीं. आपल्या पायांखेरीज दुसऱ्या कशाकडे लक्ष्य द्यायला मला अगदीं वेळच होत नाहीं आणि इच्छाही नाहीं. नाहीं तर त्यांच्या मनांत काय आहे, आणखी काय नाहीं हें सगळं काढलं असतं; परंतु आपलं मन जोंपर्यंत माझ्यासंबंधानं अगदीं निर्मळ आहे, तोंपर्यंत मी अगदीं निःशंक आहे. दुसऱ्या कोणाला माझ्याबद्दल काय संशय आहे आणखी कोण माझ्याबद्दल काय म्हणतं, याबद्दलची चौकशी करण्याचा किंवा दुसरा कसला विचारसुद्धां माझ्या मनांत येत नाहीं. आपल्या चरणांच्या आधारावर मी अगदीं निःशंक, निर्भय आणखी निश्चित आहें. बरं पण अमात्यांनीं एवढं लिहिलं आहे तरी काय ?

राजाः—कांहीं फार महत्त्वाचं राजकारण आहे, तर कृपा करून पुनः एकदां जितक्या त्वरित होईल तितक्या त्वरित दर्शन घ्यावं, आणखी विनंति करीन त्याप्रमाणें ऐकून घ्यावं, असं लिहिलं आहे, दुसरं काय ? मला तर आतां तुझ्याखेरीज एक क्षणभरही होत नाहीं, आणखी यांचीं हीं राजकारणं निघतात. सुमाल्य आहे, त्याच्या नांवानं तुम्हाला काय वाटेल तें करा. मी बाबांप्रमाणें राज्यकारभार टाकून अरण्यवास करायाला गेलों आहें असं समज ! असं सांगितलं तर तें कांहीं त्यांना मानवत नाहीं. तेव्हा काय करावं ?

देवी मुराः—आर्यपुत्रा, माझ्याकरितां आपलीं राजकार्यें रखडावीं किंवा माझ्यामुळें आपण राजकार्यांकडे दुर्लक्ष्य करतां असं प्रजाजनांना वाटणं हें अगदीं चांगलं नाहीं. तसं एकदां त्यांना वाटूं लागलं, म्हणजे माझा द्वेष सर्वच लोक करूं लागतील. आजमित्तीला अमात्यासारख्या थोड्यांनाच काय माझा द्वेष असेल तो असेल; पण मोठमोठ्या राजकारणांकरितां भेट द्या, असं म्हटलं असतांही आपण माझ्या नादीं लागल्याकारणानं भेट सुद्धां घेत नाहीं असं कोणाला वाटूं नये. तर आपण त्यांना अगदीं अवश्य बोलावून आणून काय त्यांचं सांगणं असेल तें ऐकून घ्यावं.

राजाः—उगीच असेल कांहीं तरी. आणखी कांहीं महत्त्वाचं असलंच तर तें पत्रद्वारानं नाहीं का त्यांना मला कळवतां येणार ? तें कांहीं नाहीं. मी त्याला लिहितोंकीं......."

"छे, छे, छे, आर्यपुत्रा," मुरादेवी लागलीच त्यास म्हणते; "असं आपण करूं नका. आपल्या मनांत नसलं तरी मी विनवितें म्हणून आपण त्यांना भेट द्यावी आणि शांतपणानं त्यांचं काय म्हणणं असेल तें ऐकून घेऊन राजकारणांत लक्ष्य घालावं. अमक्या राज्यांतला राजा राजकारणांत पहातही नाहीं, असं एकदां जर का कोणा परराजाला कळलं, तर न जाणों खरोखरीच

सकट ओढवायचं. एवढ्याकरितां इथें राहूनच कां होईना, पण आपण अमात्यांना वारंवार बोलावून राजकारणांत मन घालीत जावं. माझा आग्रहाची विनंति एवढीच कीं, आपण येथून कोठें जाऊं नये. मला आपल्या जीवाची फार चिंता आहे. बाहेर शत्रु फार आहेत. अपूप म्हणून काय पाठविलं होतं तें आपण प्रत्यक्षच पाहिलं म्हणून एवढी विनंति. अपूप पाठवून येथल्या येथें कांहीं साधलं नाहीं, मी अतिशय जागरूक, कधीं फसायची नाहीं, तेव्हां आतां आपल्याला येथून दुसरीकडे कोठें तरी नेण्याचा प्रयत्न होणार हें उघड आहे. तेव्हां तेवढं आपण संभाळावं आणखी तेवढं संभाळण्याकरितां माझ्या जीवाचं काय वाटेल तें झालं तरी मी करीन. आर्यपुत्रा, आपण सुरक्षित तरच माझं वैभव. आपल्या जिवाला जर कांहीं झालं, तर माझी काय दुःस्थिति होईल कांहीं सांगवत नाहीं. मला माझे शत्रु जिवंतपणीं जाळतील कीं गिधाडांकडून तोड-तोडून खाववतील कांहीं सांगवत नाहीं.

राजाः—देवी मुरे, हें काय हें तेस ! इतका विलक्षण अनुभव आला असून, मी बेसावधपणें कोठेंही जाईना कसा ? मी जाणार नाही. मला ज्यांचा संशय आहे, त्यांना मी आतां बोलावून आणून देहांत शासन केलं असतं; पण तूं अतिशय कोमल हृदयाची. एव्हां कांहीं करूं नका, घाईनें कांहीं करणं चांगल नाहीं, असं म्हणून माझं निवारण करतेस म्हणूनच केवळ मी तसं - करीत नाही - नाहीं तर केव्हांच मी त्याबद्दल यथायोग्य शासनं करून टाकलीं असतीं. बरं, मग काय म्हणतेस ? अमात्यांना बोलावून आणून त्यांचं म्हणणं काय तें ऐकून घ्यावं ? ठीक आहे. कोण आहेरे तिकडे ? अमात्यांचा कोण माणूस आहे त्याला म्हणावं, अमात्यांना सांग कीं, आपण यावं, मी आपल्याला भेटायला सिद्ध आहे.

अमात्यांचें पत्र घेऊन आलेला दूत परत तोंडीं निरोप घेऊन गेला. थोड्या वेळानें अमात्यांची स्वारी आली. महाराजांनीं त्यांचें योग्य स्वागत केलें आणि नंतर त्यांस ' सर्व व्यवस्था ठीक आहेना ' म्हणून "विचारलें. तेव्हां राक्षसानें उचित उत्तरें दिलीं. व मग हळूच म्हटलें, " महाराज, एक विज्ञप्ति करायची आहे, ती कृपा करून ऐकून घेतली तर...... "

" हो, हो, " राजा धनानंद एकदम मध्येंच म्हणाला, " कांहीं आडवेढे न घेतां एकदम काय आपल्याला बोलायचं असेल तें बोलावं. संकोच का धरतां ? माझीच आवश्यकता ज्या राजकार्यांत असेल, तें ऐकून घ्यायला माझ्याकडून मुळींच हयगय होणार नाहीं; परंतु माझ्यावांचून जें होईल, तें मात्र उगीच मजपर्यंत आणूं नये. बोला काय तुम्हांला बोलायचं असेल तें. "

" महाराज ! " राक्षस त्यावर म्हणाला, " विज्ञप्ति म्हणून एवढीच कीं, आपण राजसभेंत येत नाहीं, कांहीं राज्यकारभार पहात नाहीं, यामुळें मगधदेशाच्या शत्रूंना असं वाटायला लागलं आहे कीं, या राज्यांत आतां अंदाधुंदी सुरू झाली आहे. लोकांतही अशाच प्रकारचा समज आहे. करितां कृपा करून आपण प्रत्यहीं आपल्या प्रजाजनांच्या दृष्टीस एकवार तरी पडून त्यांचीं काय गाऱ्हाणीं असतील तीं ऐकून घ्यावीं. आज आणि उदईक मुहूर्त फार उत्तम आहेत. करितां उदईक किंवा आज आपला मनोदय झाला, तर फारच उत्तम—आपण राजसभेंत-निदान त्या सभागृहांत असणाऱ्या आपल्या सिंहासनावर दोन घटिकांपर्यंत येऊन बसावं, म्हणजे सर्व कांहीं ठीक होणार आहे. "

राक्षसाच्या मनांतून महाराजा धनाधंदानें कसेंही करून अल्पकाळपर्यंत तरी एक दोन

दिवसांत या मुरादेवीच्या रंगमहालांतून बाहेर पडावें म्हणजे पुढली सर्व कांहीं व्यवस्था होणार आहे असें येऊन त्यानें हा वरील बहाणा केला होता. तो साध्य झाला तर ठीक, नाहीं तर दुसरी युक्ति करतां येईल; परंतु राजास या महालाच्या बाहेर काढून एकवार राजसभेंत नेलें, म्हणजे मग पुढलें काय तें बोलण्यालाही ठीक पडेल असेंही त्यास वाटलें. राजानें त्याचें तें बोलणें ऐकतांच हास्य केलें आणि म्हटलें, " मी आपला राज्यकारभार तुम्हांवर आणि सुमाल्यावर टाकून स्वस्थ विश्रांति घेण्यासाठीं बसलों असतां तुम्ही अशा बारीकसारीक गोष्टीं-करितां मला त्रास देतां तेव्हां काय म्हणावं ? तुम्हांला मीं कधींच सांगितलं कीं, अगदीं महत्त्वाचंच कार्य असलं तर तुम्ही मला त्रास द्यायला या, नाहींपेक्षां तिकडच्या तिकडेच तुम्ही आपली व्यवस्था लावा. आतां तुमच्या म्हणण्याप्रमाणें रोज राजसभेंत येऊन बसण्याचं मला कांहीं जुळायचं नाहीं. मला आतां स्वस्थपणा पाहिजे. "

" महाराज, आपल्याला स्वस्थपणा पाहिजे हें हा आपला सेवक जाणून आहे. स्वस्थपणा आपण अवश्य घ्यावा; परंतु दिवसांतून एक-वार दोन घटिका कृपा करून आपण राज-सभेंत आल्यानें फार मोठं कार्य होणार आहे. म्हणून आपल्याला विज्ञप्ति केली. निदान आपण उदईक तरी यावं. "

" अमात्यश्रेष्ठा, आपण म्हणतांच, तर मी उद्यां येण्याचा विचार करीन; परंतु वारं-वार किंवा प्रत्यहीं येण्याचा आतां मला ताप नको. मी प्रिये मुरेला विचारून सांगून पाठवीन. "

इतक्यांत आड बसलेली मुरादेवी मोठ्यानें म्हणते, " राजकार्यांत मी कशी आड येईन ? आपण उद्यांच काय, परंतु प्रत्यहीं आपल्या कार्याकडे लक्ष्य पुरवावं असं कितीदां तरी मीं सांगितलं आहे. "

तें ऐकून राजा हंसला व म्हणतो, तो, "आहे बोआ अनुज्ञा. तर आता उद्यां खचित येतों. "

तें ऐकून राक्षस आनंदला; परंतु दुसरे दिवशीं राक्षसास आनंदाला कारण झालें कीं दुःखाला कारण झालें तें पुढें कळेल !

# प्रकरण २२ वें.

## मुरादेवीचें कारस्थान.

आपल्या विनंतीला मान देऊन राजानें उदईक राजसभेंत येण्याचें मान्य केलें हें पाहून अमात्य राक्षसास अत्यंत आनंद झाला. राजा धनानंदास एक-वार त्या मुरादेवीच्या अंतरंगांतून बाहेर काढलें, म्हणजे आपल्या पुढील कार्याचा मोठाच भाग झाला. मुरादेवीपासून दूर झालेला राजा क्षणभर जरी आपल्याला एकांतीं भेटला तरी त्याच्याजवळ आपल्या वक्तृत्वशक्तीचा उप-योग करून, किंवा त्याच्यापुढें अतोनात मह-त्त्वाचीं कामें ठेवून आपण त्यास कांहीं काळ-पर्यंत मुरादेवीच्या अंतःपुरांत जाऊं देणार नाहीं, आणि जोंपर्यंत तो असा दूर राहील,

तोंपर्यंत त्याच्या कानीं मुरादेवीच्या विरुद्ध गोष्टी भरवून त्यानें तिकडे पुनः जाऊंच नये अशी तजवाजही करूं, अशी राक्षसास मोठी उमेद होती. राजानें राजसभेंत येण्याचें कबूल केलें, हें अर्धें अधिक काम झालें असें वाटून तो फार उल्हसित झाला. त्यास आपण फार मोठें कार्य केलें असें वाटलें.

राक्षस उठून गेल्यानंतर मुरादेवी मोठ्या प्रेमानें हंसत व डोळे मुरडीत राजाजवळ आली व म्हणते, "काय बाई तरी चमत्कार एखाद्याला वाटेल कीं, जसं कांहीं मीच आपल्याला इथून बाहेर जाऊं देत नाहीं. राजकार्य करायला-सुद्धां जाऊं नका, असं का मी म्हणतें? लोकांचा असा समज झाला आहे, आणखी लोक असं म्हणतात, हें माझ्या कानींही पण आलं आहे."

"लोक खोटं का बोलतात?" राजानें मोठ्या प्रेमानें तिच्या त्या सुंदर व केतकी-वर्ण कपोलाला बोटानें प्रहार करून हास्य करीत म्हटलें.

त्या राजाच्या प्रेमप्रहारानें आनंदित होऊन परंतु मिथ्या क्रोध दाखवून नेत्रकटाक्ष फेंकीत भुंवया आकुंचित करून मुरादेवी म्हणते, "आपणसुद्धां असंच का म्हणायला लागलां? मग बाई लोक म्हणतील, तर त्यांत नवल काय? काय, मीं आपल्याला राजसभेंत जाऊं नका म्हणतें? राजकार्यांकडे पाहूं नका म्हणतें? मीं असं कधी म्हटलं?"

"एकदां सोडून दहादां म्हटलंस. एकदांच म्हटलं असतंस तर अमुक वेळीं म्हटलंस म्हणून चटकन् सांगितलं असतं. पण दहादां नाहीं, असंख्य वेळां जें भाषण झालं, त्याची वेळ काय सांगायची आहे?"

मुरादेवीनें तें ऐकून जास्तीच आविर्भाव करून म्हटलें, "बरं, सांगितलं; आपण बाहेर जाणं मला फार धाक्याचं वाटत म्हणून मीं म्हटलं. आणखी जोंपर्यंत माझ्या श्वेतांबरीचा मृत्यु कशामुळें झाला हें माझ्या मनांतून गेलं नाहीं, तोंपर्यंत मला असं वाटणारच. अमात्य-राजांच्या मनांत कांहीं सुद्धां नसेल; पण इतर मंडळी खचित आपल्या जीवाला कांहींना कांहीं तरी अपाय करण्याच्या योजनेंत आहेत, असं मला पक्कं पक्कं वाटतं. अशा स्थितींत आपल्याला......"

परंतु मुरादेवीचा कंठ इतका दाटून आला आणखी डोळे इतके भरून आले कीं, तिच्या-नें पुढें बोलवेचना. सुमतिका जवळच पली-कडे उभी होती. ती तें पाहून एकदम म्हणते, "बाईसाहेब, हें काय हें? आपण ज्या स्थितींत आहांत, त्या स्थितींत आतां कधीं रडूं नये, आनंदित असावं, असं कालच धात्रे-यिकेनं सांगितलंना! आणखी आपण आज आपल्याच मुखानं तो आनंदाचा प्रकार महा-राजांच्या कानीं घालणार होतांना? तो ऐकला म्हणजे महाराजांना किती आनंद होईल!"

"सुमतिके, तुला कोणी मधें बोलायला सांगितलं? भारी बाई चावट तूं!"

"बाईसाहेब, एकादां आनंदाचा प्रकार झाला, तो महाराजांच्या चरणापाशीं निवेदन करण्याची आठवण केली, तर त्यांत चावट-पणा तो काय झाला? अन् असा खरा खरा चावटपणा जर केला, तर महाराज रागाव-ण्याच्याऐवजीं मला गरिबाला बक्षीसच देतील."

"सुमतिके, गप्प बैस म्हटलंना? किती बोहोचकपणा करशील!", मुरादेवी चोरून राजाकडे नेत्रकटाक्ष फेंकीत व तर्जनी (आंग-ठ्याजवळचें बोट) नाकावर ठेवून तिला दटा-वीत म्हणाली. तेव्हां ती लुब्री पुनः म्हणते, "मी एक गप्प बसेन; परंतु हे क्षणोक्षणीं पांडुर होत चाललेले गाल, आणखी आतांशा

आपल्याला येत चाललेलं आलस्य, आणखी झटलं ... हीं नाहीं का महाराजांना सांगणार ?

"दम धर हो, तुझी ती लवलव करणारी जीभच कापून टाकतें ........ " असें म्हणून देवी मुरा कृत्रिम क्रोधानें सुमतिकेच्या अंगावर चाल करण्यास उठली. तेव्हां राजानें तिला मागें ओढून म्हटलें, " सुमतिके, कायग आहे हा तुमचा वाद ? माझ्यापासून ही काय लपवूं पहाते आहे ? "

" महाराज, " सुमतिका फार आनंदानें व प्रेमाच्या आविर्भावानें म्हणाली, "आम्हीं जरी किती लपवलं, तरी देवी वीरप्रसू होणार, हें आपल्यापासून कसं लपून राहणार ? "

तें सुमतिकेचें भाषण ऐकतांच राजास परम विस्मय व आनंद झाला व तो एकदम म्हणतो, " काय म्हणतेस सुमतिके, देवी वीरप्रसू होणार फार उत्तम बातमी तूं आज मला सांगितलीस. त्याबद्दल आज हिला काय बरं बक्षीस द्यावं ?" असें बोलून त्यानें मुरादेवीकडे पाहिलें. तो मुरा देवीची दृष्टि अगदीं अश्रुपूर्ण झालेली त्यास दिसली. तेव्हां एकदम तो तिला म्हणतो, " प्रिये मुरे, तूं वीरप्रसू होणार हें ऐकून आम्हांला आनंद झाला, आणखी तूं अश्रु ढाळतेस, हें काय बरं ? हा उत्सव करण्याचा प्रसंग कीं शोक करण्याचा ? "

परंतु मुरादेवी त्यास कांहींच उत्तर देईना. तिच्या नेत्रांतून एकसारखे अश्रु वाहूं लागले होते आणि ती ते पदरानें एकसारखे पुशीत होती. जों जों अश्रूंचा प्रवाह अधिक अधिक होऊं लागला, तों तों राजाचें चित्त अधिक अधिक खिन्न होऊं लागलें व तिचा शोक शांत होण्याकरितां तो अधिकाधिकच तिची मनधरणी करूं लागला:—"प्रिये, तूं वीरप्रसू होणार असं ऐकल्याबरोबर अशी एकदम रडायला कां लागलीस ? तुला काय वाटलं ? मला सांग. अगदीं मन मोकळं करून सांग. तूं तें सांगितल्याखेरीज माझं कधीं समाधान व्हायचं नाहीं. तूं वीरप्रसू होणार-आपल्या त्या आधींच दृढ असलेल्या प्रेमाला अधिक दृढ करण्याकरितां ही अपत्यरूप ग्रंथि बांधली जाणार, हें ऐकून मला तर मोठा आनंद झाला; परंतु तुझ्याकडे पहातों, तों तूं अशी शोक करते आहेस. आनंदाश्रूंच्या जागीं दुःखाश्रु तुझ्या नेत्रांतून येताहेत आणखी मी मघांपासून तुझ्या विनवण्या करून कारण विचारतों, तर उत्तर देत नाहींस. असं काय बरं ? तुला अशी शोकाविष्ट पाहिली, म्हणजे माझं मन अगदीं उद्विग्न होतं. बोल. दोन शब्द बोलून तरी मला आपल्या शोकाचं कारण सांग. काय ग सुमतिके, तुझ्या स्वामिनीला रडण्याचं काय बरं कारण ? "

" महाराज, दुसरं काय कारण असायचं ! देवीला असं वाटतं कीं, ज्याप्रमाणें..." परंतु मुरादेवीनें सुमतिकेला मध्येंच दटावून थांबविलें:—" गप्प बस. सुमतिके, कांहीं तरी आचरटपणाचं बोलणं बोलून उगीच लुब्रेपणा करूं नको. "

तें ऐकण्याबरोबर सुमतिका एकदम थांबली. परंतु राजा धनानंद देवीकडे वळून म्हणतो, " वा ! आपण सांगायचं नाहीं आणखी दुसरं कोणी सांगत असलं, तर त्यालाही सांगूं द्यायचं नाहीं. याला काय म्हणावं ! ती चांगलं मला सांगत होती, तर त्यांत आपण कशाला मध्येंच मोडता घातलात ! सुमतिके, तूं अगदीं निश्चिंतपणें सांग ग काय आहे तें. अगदींसुद्धां शंका धरूं नको, माझी आज्ञा आहे तुला. "

" अगबाई ! माझी आतां विलक्षणच स्थिति झाली. इकडे महाराजांची आज्ञा, इकडे महाराणीची आज्ञा. मोडूं कोणाची ? आणखी पाळूं कोणाची ? तथापि महाराज, मी आपल्या आज्ञेचं उल्लंघन करायला अगदीं

असमर्थ आहें. महाराणीला असं वाटतं कीं, वीरप्रसू होऊन तरी काय उपयोग ? तें मूल रानावनांत पाठविलं जाऊन मारेकऱ्यांकडून त्याचा घातच व्हायचा कीं नाहीं ? ..."

परंतु सुमतिकेला पुढें थांबावेंच लागलें. कारण महाराणीस तिचा शोक अगदीं आवरेनासा होऊन ती आतां ओक्साबोक्शीं रडूं लागली. आणि तें ऐकून महाराजांचें चित्त अगदीं उडून गेलें. त्यांनीं एकदम तिला आपल्या पोटाशीं धरलें, व अत्यंत प्रेमानें, "प्रिये मुरे, हें काय हें ? जी गोष्ट झाली, ती विसरून जायची असंना तुझं आमचं ठरलं होतं ? मग आतां हें काय हें आरंभलं आहेस ? कांहीं कारण नसतां हा शोक कां ?"

"आर्यपुत्रा, 'कारण नसतां' असं कां बरं म्हणतां ? जसा मागल्या वेळेस प्रसंग झाला, तसाच आजही येऊन ठेपला आहे. आपण उद्यां आतां इथून जाणार. अमात्य राक्षसाचं कौटिल्य काय मी जाणून नाहीं ? आपल्याला एकवार माझ्यापासून चार घटका तरी दूर करावं, म्हणजे आपलं मन वळवून आपल्याला परत इकडे येऊं नये असं वाटवायचं असा त्यांचा निश्चय दिसतो. आपण इथेंच आहांत, ते येतात तेव्हां मी आपल्यापासून चार हातांपलीकडेच असतें, यामुळें आपल्याजवळ माझ्याबद्दल वाटेल तें बोलणं त्यांना अगदीं अशक्य आहे: पण एकदां का माझ्यापासून आपण दूर झालां, कीं मग काय विचारतां ? वाटेल तें सांगून आपलं मन माझ्याविषयीं अगदीं कलुषित करून टाकायला त्यांना अगदीं पुरती मोकळीकच झाली. तेव्हां मला रडूं नाहीं येणार तर काय होईल ? आपण एकदां इथून गेलां म्हणजे इकडे माझे काय हाल होतील आणखी काय नाहीं हें काय सांगावं ! सोळा वर्षांपूर्वींचा सगळा प्रकार पुनः जस्यत डोळ्यांपुढें उभा राहतो. देवा ! कशाला रे मला जन्माला घातलीस ? आणखी माझ्या कपाळकरंटीमुळें बालहत्याही होतात !"

असें म्हणून मुरादेवी अपरंपार शोक करूं लागली. राजाला समाधानाचे शब्द बोलण्याला अवकाशच सांपडेना. शेवटीं तो तिला म्हणाला, "मी जातच नाहीं, मग तर झालं ? काय काम करायचं तें इथेंच सभा भरवून करूं, बस् ठरलं !"

"छे. छे. छे." मुरादेवी डोळे पुसून व शोक आवरून म्हणते, "असं कसं करावं ? ठरल्याप्रमाणें आपण अवश्य राजसभेंत जावं; मात्र परत इथें येण्याबद्दल खबरदारी बाळगावी; पण बाई तो अमात्य आपल्याला बंदींत सुद्धां टाकील कीं काय असं वाटून जीवाचा थरकांप होतो."

"मला बंदींत टाकील ? काय तूं वेडी तर नाहींसना ?" धनानंदानें हंसून म्हटलें.

"काय नेम सांगावा ? आपल्या जीवावरसुद्धां जर प्रयोग झाला, तर इथून एकवार आपण सुटून त्यांच्या ताब्यांत गेलां असं त्यांना वाटलं, म्हणजे आपल्याला इकडे पुनः येण्याची बंदी करणं त्यांना केवळ अशक्य आहे, किंवा ते तसं करायला मागेंपुढें पहातील, असं मला कांहीं बाई वाटत नाहीं. आपण जाऊं नये असं मला म्हणवत नाहीं. आणखी गेलां तर काय होईल याचं फार भय वाटतं. मागच्या खेपेला माझ्या पोराला मारून मला बंदिखान्यांत टाकली. आतां या खेपेला तसं करायचा प्रसंग आला, तर मलासुद्धां मारून टाकावी एवढीच चरणांपाशीं विनंति आहे." असें बोलून मुरादेवीनें राजाचे चरणावर लोळण घेतल्याप्रमाणें करून मोठ्यानें आक्रंदन चालविलें. राजा अगदीं गोंधळून गेला. त्यास काय बोलावें तें सुचेना. शेवटीं

तो तिला म्हणाला, " असं असेल, तर मी जातच नाहीं मग ? "

" छे. छे. छे. " मुरादेवी एकदम वर डोकें करून ह्मणते, " असं करण्यांत काय अर्थ आहे ? अमात्याच्या जवळ कबूल केलं आहे, त्याप्रमाणें आपण आतां केलं नाहीं, तर, तें खापर माझ्याच डोक्यावर फुटेल. त्यांच्या देखत मीं आपल्याला जाण्याविषयीं सांगितलं आणि आतां आपण गेलां नाहीं ह्मणजे ते असंच ह्मणणार कीं, मी लबाड आहें, पाठीमागून आपलं मन बदलविलं. तसं कांहीं दिसूं नये. आपण कबूल केलं आहे, तर सभागृहांत उद्यां तरी निदान जावंच. माझ्याविषयीं प्रेम जागृत ठेवतों इतकं मला आश्वासन दिलं, ह्मणजे माझं कांहीं ह्मणणं नाहीं. मला माझी स्वतःची मुळींच काळजी नाहीं. मला आपल्या जीवाची काळजी......"

मुरादेवी इतक्या कांहीं कळकळीचा आविर्भाव आणून हें सर्व बोलली कीं, राजास तिच्याबद्दल अतोनात प्रेमाचा उमाळा येऊन त्यानें तिला दृढ आलिंगन दिलें. नंतर असें निक्षून सांगितलें कीं, " तूं मुळींसुद्धां काळजी करूं नको. तूं जा म्हणतेसच ह्मणून मी उद्यां जाऊन घटकाभर बसून लागलींच त्याच पावलीं परत येतों. "

आपल्यापासून हिच्या पोटीं पुत्र पुनः होणार हें समजल्यापासून त्याला फार आनंद झाला. आणि तिच्या ठिकाणचें त्याचें, प्रेम फारच वृद्धिंगत पावलें. तो त्याबद्दल तिच्याजवळ बोलूं लागला. तिला वारंवार तुझे डोहाळे काय आहेत म्हणून विचारूं लागला. तुझ्या इच्छा काय असतील, त्या मी तृप्त करीन, तूं त्या मला सांग म्हणून, तिला वारंवार आग्रह करूं लागला, तेव्हां " आपलं प्रेम अखंडित राहून आपल्या अंकावर तो पुत्र खेळूं लागला म्हणजे मला सर्व कांहीं पावलं. सर्व कांहीं इच्छा तृप्त झाल्या, " असें तिनें म्हटलें, म्हणजे राजास अतोनात आनंद होई. असा प्रकार चालला असतां थोड्या वेळानें राजाचा डोळा लागला, मग तो सहजगत्या लागला, कीं कांहीं मादक औषधामुळें लागला हें सांगणें मोठें कठिण आहे.

तसा डोळा लागल्याबरोबर मुरादेवी व सुमतिका दोघांही एकमेकींकडे हास्यमुख करून पाहूं लागल्या. एखाद्या माणसास कपटजालांत पकडण्याच्या हेतूनें कोणीं दोघांनीं खटपट केली असतां त्यांत यश आलें म्हणजे त्या यशाच्या आनंदानें व अभिमानानें एकमेकांकडे त्या दोघानीं पहावें, त्याप्रमाणेंच त्या दोघींनीं एकमेकींकडे पाहिलें, नंतर मुरादेवी सुमतिकेस म्हणते, " सुमतिके, तूं जर मला असं साहाय्य न करतीस, तर माझा सगळा व्यूह कधींच ढांसळून गेला असता. ती वृंदमाला अगदीं वेडी भोळी. तिला माझं हें करणं अगदीं आवडेना. पण माझ्या ठिकाणची तिची भक्ति फार दृढ, तेव्हां ती माझ्याबद्दल दुसऱ्या कोठें कांहीं बोलणार नाहीं. ती आठ पंधरा दिवसांत बहुतकरून बुद्धधर्मांत शिरून जोगीण बनणार. तिचा सगळा ओढा त्या जातीकडे आहे. बरं तें असो; पण आतां आर्य चाणक्य केव्हां येणार ? "

आर्य चाणक्याचें नांव तिच्या तोंडून निघण्याला आणि ते आल्याबद्दल दासीनें येऊन वर्दी देण्याला एकच गांठ पडली. तेव्हां तिला अत्यंत आनंद झाला.

आर्य चाणक्य आतां मुरादेवीचा मुख्य उपदेष्टा-गुरुश्रेष्ठ झाला होता.. सुमतिका दोघांचे निरोप एकमेकांस कळवीत असे. सुमतिका तर आर्य चाणक्याची अत्यंत एकनिष्ठ अशी भक्तीणच झाली होती. आर्य चाणक्यानीं आज्ञा केली कीं, ती तिला शिरसा-

वंद्य. ती कशी करूं आणि कशी न करूं, असा प्रश्नच तिच्या मनांत कधीं आला नाहीं. तेव्हां त्यास पहातांच दोघींनाही मोठा आनंद झाला. चाणक्यास जेथें बसण्यास सांगितलें होतें, तेथें गेल्याबरोबर मुरादेवी त्यास म्हणते, " आर्यश्रेष्ठा, आपली आम्ही मार्गप्रतीक्षाच करीत आहोंत. आपण आलांत फार चांगलं झालं. सुमतिकेनं पुनः वाटेल तसा बहाणा करून फुसलावून राक्षसाला इथें आणलं. त्यानं कसेंही करून महाराजांनी इथून बाहेर पडावें अशा हेतूकरितां उद्यां सभागृहांत जाऊन लोकांना दर्शन द्यावं असा महाराजांस आग्रह केला. ते प्रथम, नाहीं नाहीं, होय होय, असं करीत होते, मला सोडून कसं जावं असं त्यांना वाटत होतं; परंतु मींच मधें बोलून त्यांच्याकडून राक्षसाला अभिवचन देवविलं आणि आपल्याकडे निरोप पाठविला. आतां पुढली तयारी आहेना ? "

" हो. हो. आहे म्हणजे काय ? मीं सर्व तयारी करून ठेवली आहे. राक्षसाचा मित्र चंदनदास याचा वाडा राजप्रसादापासून अगदीं जवळ आहे. त्या वाड्यांतून राजप्रासादाच्या द्वारापर्यंत भुयार खणून द्वारापाशीं कृत्रिम तोरण केलं आहे. दारुकर्मा नांवाचा कुशल कारागीर त्या कामावर योजिला आहे. दारुकर्म्याला काय करायचं तें सर्व सांगून ठेवलं आहे. शिवाय त्याच तोरणाच्या खालच्या बाजूसही सर्व तयारी यथास्थित केली आहे. आतां त्यांत कांहींसुद्धां करायचं राहिलं नाहीं. सर्व तजवीज जशी व्हायला पाहिजे तशी होऊन आपला कार्यभाग सिद्ध होईल. तुला काळजी नको. "

" गुरुश्रेष्ठा, जें आपण कराल, त्यांत कमीपणा कधीच होणार नाहीं, हे काय मीं जाणून नाहीं ? मला त्याच्याबद्दल तशी काळजा नाहींच; परंतु जो कार्यभाग आरंभला तो निर्विघ्नपणानं पार पडला म्हणजे सर्व कांहीं यथास्थित होईल. पण जर त्यांत कांहीं विघ्नं आलीं, आणि सर्व भांडवल बाहेर पडलं, तर आपला सर्वांचा चक्काचूर उडून जाईल म्हणून विचारलं. "

" वत्से मुरादेवी, या चाणक्यानं जो व्यूह रचला, त्यांत कधींच अपसिद्धि येणार नाहीं हें तूं अगदा पक्कें समज. तो व्यूह सिद्ध झालाच. दारुकर्मा कुशल कारागीर, म्हणून त्याला कामाला लावायला चंदनदासाचा मित्र भूरिवसु याला सांगितलं. भूरिवसु मला पूर्ण वश. त्याच्याचकडून चंदनदास वश केला आहे. चंदनदास राक्षसाचा मोठा स्नेही. दारुकर्म्याच्या हातून राजद्वारापाशीं काय दारुण कर्म करून घ्यायचं आहे, हें चंदनदासाला मुळींच कळूं दिलेलं नाहीं. तेव्हां तिकडून कांहीं बातमी फुटेल हें संभवनीयच नाहीं. दोन बार भरून ठेविले आहेत. दोन्ही जर सिद्ध झाले, तर सगळा नंदवंश नष्ट होईल. मग इतरांकरितां दुसरा कांहीं तरी उपाय योजूं. मिळून उद्यां धनानंद आपल्या कुळासह, किंवा एकटा तरी नष्ट होणार म्हणून समज. " असें म्हणून आर्य चाणक्य स्वस्थ बसला. मुरादेवी तें ऐकून किंचित् चिंतातुर झाली व म्हणते, " ठीक. पण गुरुवर्या, महाराजांचा घात न होतां बाकाच्यांचा नाश होईल असं करतां येणार नाही काय ? तो कारटा सुमाल्य मेला नाहीं आणि महाराजांचा मात्र घात झाला तर त्याच्या नांवानं राक्षस राज्यकारभार चालवून महाराजांच्या मृत्यूचं कारण शोधून काढील आणि मग आपले सर्वांचे हाल कुत्राही खाणार नाही. " मुरादेवीचें हें भाषण ऐकून चाणक्य गदगदां हंसला व तिला म्हणतो:—

"देवि मुरे, मी तुला मोठी कार्यदक्ष आणखी नीतिज्ञ समजत होतों, पण पाहिलं तों तुझी बुद्धि इतर बायकांसारखीच अगदीं कोती दिसते. बरें, धनानंदाचा नाश झाला, तर तो राक्षसानेंच करविला, त्यानेंच दारुकर्म्याला सांगून सर्व युक्ति रचिली, असा लोकापवाद उठविण्याची तजवीज केल्याशिवाय मी राहीन काय? तीही सर्व तयारी आहे. जें काय अरिष्ट येईल, तें यानेंच आणलं, आणि राज्यकारभाराच्या लोभानं सर्व कांहीं उद्योग करविला, असं सर्वत्र करून देतों. राजाला मुद्दाम आग्रह करून राजसभेंत आणलं. आपला मित्र चंदनदास याच्या घरांतून भुयार खणून राजद्वाराजवळ तोरण बांधविलं. हा सर्व उपक्रम राक्षसानं मुद्दाम करविला, असं ज्याच्या त्याच्या मुखीं होईल अशी तजवीज होणार आहे. आणि तशी स्थिति झाली कीं, तुझा भाचा चंद्रगुप्त याला पुढें सारून सिंहासनावर बसवून तुझी प्रतिज्ञा खरी केलीच म्हणून समज. तुला ही काय भलतीच काळजी पडली आहे?" मुरादेवीनें तें भाषण ऐकल्यावर तिला अर्धवट समाधान झालें. आतां आपल्या इच्छेला सिद्धि प्राप्त होण्याला फक्त एका रात्रीचाच काय तो अवकाश राहिला असें तिला वाटून ती आनंदली. तिनें चाणक्यास निरोप दिला.

परंतु रात्र पडते न पडते तों तिच्या मनाची दुसरीच कांहीं स्थिति झाली. कितीही केलें, तरी स्त्रीजात. तिची निसर्गकोमलता तिच्या इच्छेआड आली!

# प्रकरण २३ वें.

## मनाची चंचलता.

चाणक्य गेल्यानंतर मुरादेवीस प्रथम कांहीं वेळ बरें वाटलें. आज इतके दिवस जी महत्वाकांक्षा—नव्हे वैरनिर्यातनेच्छा—सूड घेण्याची इच्छा— आपण धरली होती ती आतां तृप्त होणार. आपल्या पोटीं झालेल्या पोराचा नाश करून आपल्यास केवळ अन्यायानें कैदेंत टाकणाऱ्या या राजाला प्रायश्चित्त मिळणार व आपल्या माहेरच्या वंशांतील पुरुषास आतां हें राज्य मिळणार हें तिच्या मनांत येऊन तिला अत्यंत आनंद झाला. आर्य चाणक्यानें ज्याप्रमाणें पाटलिपुत्रांत राहून हळू हळू आपल्या नानाप्रकारच्या युक्त्यांनीं एकेका माणसास वश करून घेतलें, त्याचप्रमाणें मुरादेवीचेंही मन त्यानें वश करून तिला आपली शिष्यीण बनविलें. प्रथमतः तो कोणत्या मिषानें व रूपानें तिजकडे गेला, आणि तिला त्यानें हळू हळू आपल्या कह्यांत कसें आणलें, हें सांगण्याची जरूरीच नाहीं. जी इच्छा आपण करीत आहोंत, तीच इच्छा या राजमहिषीलाही आहे, एवढें त्यास एकवार समजून आल्यावर आणखी काय पाहिजे होतें? चाणक्या-

च्या भाषणांतच एक प्रकारचा असा कांहीं गुण होता कीं, त्या गुणामुळें, जो कोणी त्याच्या वाक्पाशांत एकवार सांपडेल तो त्यांतून कधीं निघावयाचाच नाहीं. उलट अधिकाधिकच त्यांत गुरफटून जावयाचा. इतकेंच नव्हे, तर त्यांतून निघावें असें त्याला वाटावयाचें नाहीं. मुरादेवीची सूड उगवून घेण्याची इच्छा अनिवार आणि चाणक्य हा एक ती इच्छा तृप्त करून घेण्यास फार उत्कृष्ट साधन होय, असें तिला वाटूं लागलें. तेव्हां अर्थातच त्याचें वर्चस्व तिच्या मनावर विशेष होऊं लागलें. त्यांत आतां या प्रसंगीं त्यानें तिची इच्छा तृप्त करण्याची वेळ अगदीं जवळ आणली. तेव्हां मग काय विचारतां ? परंतु ती वेळ आतां अगदीं नजीक आली, असें पहातांच तिला कसेंसेंच होऊं लागलें. चाणक्य गेल्याबरोबर कांहीं वेळ इकडे तिकडे करून ती पुनः आपल्या शयनगृहांत गेली. राजा धनानंद अद्यापि, कशामुळें असेल तें असो, पण स्वस्थ निजला होता. त्याचे शेजारीं ती पलीकडे पडली. तिला कांहीं केल्या चैन पडेना. आर्य चाणक्यानें राजाच्या वधाकरितां केलेल्या सर्व तयारीचें ती एकसारखें चिंतन करूं लागली. आणि तशांत तिच्या मनांत ‘ आपला मुलगा जर आजमितीला असता, जर यानें दुसऱ्यांच्या नादीं लागून मजवर गैरविश्वास करून माझ्या त्या तान्ह्याचा वध करविला नसता, तर हा प्रसंग याच्यावर कशाला आला असता ? आज सुमाल्याच्या जागीं तोच सिंहासनावर असता, इत्यादि विचार सारखे येत होते.

इतक्यांत राजा धनानंद कांहीं तरी बोलतो आहे असें तिला वाटलें; म्हणून ती लक्ष्य देऊन ऐकूं लागली, तों पुढील शब्द तिच्या कानीं पडले:— “ प्रिये मुरे, तुला किती वेळां मी सांगूं, कीं मागल्या गोष्टींची अगदीं आठवण काढूं नको म्हणून ? तो मुलगा जिवंत असून अमुक ठिकाणीं आहे असं मला कळूं दे. तो असेल तिथून आणून मी त्याला यौवराज्याभिषेक करीन. पण आतां तूं त्या आठवणी काढून माझ्यावर रागावूं नको. आतां मी तुझ्या आज्ञेबाहेर तिळमात्र जाणार नाहीं. क्षमा कर... ” सुसंगतपणें कानीं आलेले एवढेच शब्द होते. तिला अधिक कांहीं ऐकूं आलें, परंतु त्यांत विसंगतपणा फार होता. हे शब्द राजानें आज पहिल्यानेंच उच्चारले आणि तिच्या कानीं पडले असें नव्हे. याच्यापूर्वींही तिनें असे शब्द राजाच्या तोंडून अनेक वेळां ऐकले होते. परंतु काय चमत्कार आहे ! राजाच्या त्या शब्दांचा आज तिच्या मनावर कांहीं विलक्षण परिणाम झाला. राजाच्या ध्यानींमनींस्वप्नींही निरंतर आपण आहों. जें काय मागें झालें त्याबद्दल विचार करूं नको, म्हणून आजपर्यंत तिला त्यानें अनेक वेळां सांगितलें असेल; परंतु आज गाढ झोंपेंत असतांना स्वप्न पडूनही त्यांत तो आपणास “ क्षमा कर ” असें म्हणत आहे, हें ऐकतांच तिच्या मनाची कांहीं चमत्कारिक स्थिति झाली. आपण बंदिशाळेंतून बाहेर पडतांक्षणीं काय काय युक्त्या केल्या आणि राजाचें चित्त आपल्याकडे ओढून घेतलें, त्यास आपला विश्वास दाखविला, येथपर्यंत ठीक झालें. परंतु आतां आपण करतों आहोंत हें चांगलें काय ? स्वप्नांतसुद्धां ज्याच्या मनांत आपल्याविषयीं कांहीं वावगें आलेलें दिसत नाहीं, स्वप्नांतसुद्धां जो आपल्यास यापुढें तुला माझ्याकडून त्रास होणार नाहीं असें आश्वासन देतो, त्याचा आपण विश्वासघात करावा काय ? आपल्याला जो कायावाचमनानें रोज एकवार तरी ‘ झाल्या गोष्टीची क्षमा कर ’ असें म्हणतो आहे, त्याला आपण होऊन जाणून बुजून काळाच्या

जबड्यांत यावें काय ? असे प्रश्न तिच्या मनांत उभे राहून तिचें चित्त अत्यंत चंचळ झालें. मागील प्रकरणाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें तिच्या मनाची निसर्गकोमलता जागृत झाली आणि ती एकदम अंथरुणावर उठून बसून कावऱ्याबावऱ्याप्रमाणें आपल्यासभोंवार पाहूं लागली. दुसरे दिवशीं जो भयंकर प्रसंग घडून येणार होता, तो तिच्या नेत्रांपुढें दिसूं लागला. त्याच्यायोगानें ती फारच घाबरली. कांहीं वेळाच्यापूर्वीं जो प्रसंग उदयिक घडणार म्हणून तिला अत्यंत आनंद व समाधान वाटत होतें, तो प्रसंग आतां तिच्या डोळ्यांपुढें दिसूं लागून ती फार फार अस्वस्थ झाली. त्या मंदिरांत कोणी नव्हतें. एकच दिवा असून तो अगदीं मंद करून ठेविला होता. इतकेंच नव्हे, तर त्याच्या प्रकाशाचा त्रास होऊं नये, महाराजांचा निद्राभंग होऊं नये, म्हणून त्याचेआड एक पडदा ओढून ठेविला होता, यामुळें त्या ठिकाणीं अंधकाराच्या चमत्कारिक छाया पडल्या होत्या. त्या छायेचेंही आतां तिला फार भय वाटूं लागलें. मनुष्याच्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक असते. त्यांतून स्त्रियांच्या मनाची तर स्थिति फार चमत्कारिक. आजपर्यंत जितक्या उत्कटतेनें तिला असें वाटत होतें कीं, आपण राजा धनानंदाला या पृथ्वीवरून नाहींसा करून टाकूं, तितक्याच उत्कटतेनें आतां तिला असें वाटूं लागलें कीं, तो विचार अगदीं वेडेपणाचा, दुष्टपणाचा, अधमपणाचा होय. सूड उगवावयाचाच, तर तो राजावर काय म्हणून ? ज्यांनीं आपल्याबद्दल खोट्यानाट्या गोष्टी त्याला सांगितल्या आणि त्याचें मन कलुषित केलें, त्यांच्यावर उगवला पाहिजे. तें सोडून देऊन आपण स्वतः महाराजांवरच प्रसंग आणला ही केवढा आपली चुकी ! महाराजांचा त्यांत काय दोष ? महाराजांनीं आपलें पाणिग्रहण करून आपल्याठायीं पुत्रही झाला. त्याचा मत्सर इतरांनीं करून महाराजांचें मन आपल्याविषयीं कलुषित केलें. त्यांचा यांत कांहीं अपराध असेल, तर तो एवढाच कीं, अशा लोकांवर त्यांनीं विश्वास ठेवून विशेष चौकशी न करतां आपल्यास बंदींत टाकलें. तेव्हां आपण त्यांजवर इतकें शस्त्र कां धरावें ? आपण हा विचार कधींच करावयास पाहिजे होता. पण केला नाहीं हें बरें नव्हे. तसा विचार आपण केला असता, तर आतां उद्यां जो प्रसंग यांचे जीवावर गुदरणार तो गुदरला नसता आणि तो टाळण्याकरितां आपण आतां काय करावें, असें जें आपल्याला वाटतें आहे, तें वाटण्याला कारण झालें नसतें. असे विचार तिच्या मनांत येऊन तिचें मन एकाएकीं फिरूं लागलें. काय ? आपण आपल्या हातानें—आपल्या अनुमतीनें आपल्या स्वतःच्या पतीच्या जीवावर उठावें ? आपण आपल्या स्वतःच्या हातानें आपलें सौभाग्य नष्ट करून घ्यावें ? हा अत्यंत क्रूरपणाचा, अधमपणाचा विचार आपल्या मनांत आला तरी कसा ? याचेंच जणूं काय तिला आश्चर्य वाटूं लागलें असा भयंकर प्रसंग आपल्यावर गुदरवून घेऊन. लाभ तरी काय होणार ? तर आपल्या भाच्याला सिंहासन मिळणार ? पण भाच्याला सिंहासन मिळालें काय आणि न मिळालें काय, आपल्याला त्यापासून काय लाभ ? प्रत्यक्ष पतीची प्राणहानि करावयाची आणि सगळ्या त्रिभुवनांत पतिघ्नी म्हणून दुर्लौकिक करून घ्यावयाचा, यापलीकडे आपणास कांहींसुद्धां लाभ नाहीं. तेव्हां आतां आपण काय करावें, कीं जेणेंकरून हा उद्यांचा दुर्धर प्रसंग टळेल ? याप्रमाणें विचारावर विचार, विचारावर विचार तिच्या मनांत उठून तिला अगदीं गोंधळल्याप्रमाणें झालें. उदईक घडून येणारा प्रसंग टळला तर पाहिजेच, असें तर तिच्या मनानें

आतां पूर्णपणें घेतलें. जें वैधव्य आलें तरी हरकत नाहीं, पण माझा छळ झाला, माझें पोर ठार मारलें म्हणून मीं सूड घेण्याची प्रतिज्ञा केली आहे ती पार पाडीन, असें तिला आजपर्यंत वाटत होतें, तें आज मनांतून पार निघून जाऊन तिला असें झालें कीं, आपणच उठविलेल्या या संकटांतून आपण पार कसें पडूं ? महाराजांचा जीव कसा वाचवूं ? राजहत्या व पतिहत्या आपल्या हातून घडते आहे, ती आपण दूर कशी सारूं ? असे अनेकविध प्रश्न तिच्या मनांत उभे राहिले आणि तिच्या मनाला तळमळ लागली. स्त्रियांना अगदीं अनुचित असे विचार आजपर्यंत आपल्या मनांत आले कसे, याचेंच तिला आतां आश्चर्य वाटूं लागलें असें दिसलें. जोंपर्यंत एखादें दुष्कृत्य आपल्यापासून दूर असतें, तोंपर्यंत तें करण्याविषयीं जी उत्सुकता असते, ती उत्सुकता तें कृत्य अगदीं जवळ आलें म्हणजे रहात नाहीं. तें मग फार भयंकर दिसूं लागतें. त्याचें स्वरूप फारच चमत्कारिक होतें. आणि शेवटीं कित्येक त्या दुष्कृत्यापासून दूर पळून जातात. मुरादेवीच्या मनाची स्थिति अगदीं हुबेहूब अशीच झाली. आपल्या नवऱ्याचा खून करविण्याचें भयंकर कृत्य जोंपर्यंत करूं, करवूं, असें तिला नुसतें वाटत होतें, तेव्हांचें तिचें मन आतां तें दुष्कृत्य खचित घडतें असें पहातांच अगदीं बदललें आणि ती तें टाळण्यास युक्ति शोधूं लागली. पहिल्या प्रथम तिच्या मनांत सहजच असें आलें कीं, राजास आपण आतां जागृत करून सर्व हकीकत सांगून टाकावी; परंतु हा विचार फार वेळ कसचा टिकणार ? लागलींच तिच्या मनांत असें भय उत्पन्न झालें कीं, न जाणों आपण हें सगळें सांगितलें कीं, राजा आपल्याला ताबडतोब सुळीं देण्याचा—निदान बंदिशाळेंत पुनः टाकून देण्याचा—हुकूम करावयाचा. ती स्थिति तर कांहीं आतां इष्ट नव्हती. तेव्हां दुसरा उपाय म्हणजे राजाला उद्ईक आपल्या महालांतून जाऊंच देऊं नये हा होय. तो उपाय तिला अगदीं सोपा वाटला. आपल्या ठिकाणीं त्याची इतकी भक्ति आहे, तर तो आपलें खचित ऐकेल. आणि आपण आयत्या वेळीं एकदम कांहीं तरी आजारीपणाचें सोंग आणून, किंवा आपल्याला भयंकर स्वप्न पडलें असून त्यावरून आज कांहीं तरी विपरीत होणार असें वाटत आहे, म्हणून त्यानें न जाण्याचा आग्रह धरावा आणि तो तडीस न्यावा. हाच एक उपाय तिला योग्य दिसला; तथापि पुनः तिच्या मनांत आलें कीं, न जाणों, राजा न जातां, दुसरा कोणी तशाच थाटानें त्या तोरणाखालून गेला, आणि अपघात झाला म्हणजे एकंदर सगळा भयंकर प्रकार बाहेर पडेल. त्यापेक्षां चाणक्याला बोलावून आणून मुकाट्यानें ती व्यवस्थाच काढून टाकावी, आणि राजाला जाऊन येऊं द्यावें हें तिला अधिक बरें वाटलें; दारुकर्म्याकडून चाणक्यानें जी घातक युक्ति करविली आहे, तिचें निराकरण झालें म्हणजे सगळ्याच गोष्टींचा उत्तम उलगडा होईल, आणि सर्व विघ्नें टळतील असें तिला वाटलें आणि राजाला न जाऊं देण्यापेक्षां तो रचलेला व्यूहच बदलून टाकला, तर फार उत्तम असें तिच्या मनानें घेतलें; परंतु 'चाणक्य ऐकेल काय ? त्यानें केलेली तयारी तो दूर सारून ठेवील काय ? तो या कुटिल नीतींतून अलिप्त राहील काय ? ' असे प्रश्नही तिच्या मनांत येऊं लागले. आणि शेवटीं एकाही प्रकारें तिच्या मनाचा निश्चय होईना. तिचें मन चंचल झालें. तिचा जीव घालमेल घालूं लागला. इतक्यांत रात्रीचा एक प्रहर उलटून चारपांच घटकांनीं महाराज जागे झाले. मुरादेवी जागीच आहे हें त्यांच्या नजरेस

आलें आणि त्यांनीं तिला हांक मारिली. मुरादेवीनें ओ देऊन त्यांचे चरण चुरण्यास प्रारंभ केला. ' तूं आज जागी कां ? ' असा प्रश्न त्यांनीं केला. त्यावरोबर तिला इच्छा झाली कीं, आपण सर्व कांहीं या वेळीं सांगावें. परंतु लागलींच दुसरें मन तसें नको म्हणून सांगूं लागलें. कारण राजाचा जीव जरी आपण वांचविला, तरी आपला जीव राजा वांचवील व आपल्याला क्षमा करील हें तिला संभवनीय वाटेना; म्हणून तिनें नुसतें त्यास म्हटलें, " काय करूं, मला आज कांहीं केल्या झोंप येत नाहीं. मन कसंसंच झालं आहे. "

राजाः—कां ? मनाला काय झालं ? मी उद्यां एक क्षणभर तुझ्या महालांतून राजसभेंत जाणार म्हणून तें अस्वस्थ झालं वाटतं?

मुरा०ः—हो. कांहीं अंशांनीं तसं म्हटलं तरी हरकत नाहीं. आपण उद्यां जाणार म्हणून बाई कसंसंच झालं आहे. किती यत्न केला, तरी कांहीं केल्या झोंप येत नाहीं. पण आपण गेलंच पाहिजे का आज ?

राजाः—गेलंच पाहिजे असं काय आहे ? पण जर आम्हीं कबूल केलं आहे येतों म्हणून तर जावं तें चांगलं.

मुरा०ः—माझ्या जीवाला फार हुरहुर लागली आहे. मनाला असं वाटतं आहे कीं, आज कांहीं तरी भयंकर होणार आहे.

राजाः—काय आश्चर्य आहे बोआ ! तुझ्या मनाला तशी हुरहुर लागली आहे, आणखी मला आतां फारच विलक्षण स्वप्न पडलं.

मुरादेवीः—तें काय ? आपण कांहीं बोलत होतां खरे. झोंपेंत मला कांहीं अगदीं पुरतं ऐकायला नाहीं आलं.—पण कांहीं चाललं होतं बोलणं.

राजा ( हंसून ) :—स्वप्नांत जें कांहीं विलक्षण पाहिलं त्याच्याचबद्दल असेल; दुसरं काय असायचं आहे ! विलक्षणच स्वप्न पण !

मुरादेवीः—पण काय तें एवढं विलक्षण ! मला सांगायचं नाहीं का ?

राजाः—तुला सांगावं कीं नाहीं याचाच विचार करतों आहें. सांगावं असं वाटतं, आणखी नये सांगूं असंही वाटतं. मग काय करावं आतां ?

मुरादेवीः—सांगावं झालं. दुसरं काय करायचं आतां ? जें काय असेल तें सांगावं !

राजाः—पण तें ऐकून तुला कदाचित् वाईट वाटेल आणखी तूं रागावशील.

मुरादेवीः—मी आपल्यावर रागावेन ? काय ही आपली विलक्षण कल्पना ?

राजाः—कल्पना कसली ! तूं ऐकलंस म्हणजे खचित रागावशील.

मुरादेवीः—खचित नाहीं रागावणार. अगदीं खचित सांगतें. मग तर झालं ?

राजाः—सांगतों तर मग ऐक. मला एक अगदीं विलक्षण स्वप्न पडलं.

मुरादेवीः—हें तर आपण मघांशींच सांगितलं. पण स्वप्न काय पडलं ?

राजाः—पण नाहीं सांगितलं मीं, आणखी नाहीं ऐकलंस तूं, तर काय होईल ?

मुरादेवीः—माझ्या जीवाला एकसारखी हुरहुर लागून राहील, दुसरं काय ?

राजाः—मला असं स्वप्न पडलं, कीं, आपण दोघंच दोघं अगदीं घोर अशा एका रानांत गेलों आहोंत, आणखी तिथें खूप अंधार पडला आहे.

मुरादेवीः—अगबाई ! घोर अरण्यांत ? आणखी आपण दोघंच दोघं ?

राजाः—हो. अगदीं दोघंच दोघं. तिसरं कोणीसुद्धां नाहीं. अगदीं कोणी नाहीं.

मुरादेवीः—चमत्कारिक खरंच हो स्वप्न ! बरं मग पुढें ? पुढें काय झालं ?

राजाः—पुढं ...काय बोआ आतां तूं आग्रहच करतेस म्हणून सांगतों पण—

मुरादेवीः—पणबिण तें कशाला आतां? आतां सांगावंच. अगदीं लवकर सांगावं.

राजाः—बरं सांगतों. तिथें आपण उभे आहोंत. इतक्यांत काय चमत्कार झाला कीं, तूं सहज लीलेलीलेंत माझं धनुष्यबाण आणि खड्ग माझ्या हातांतून काढून घेतलंस. इतक्यांत एक अक्राळविक्राळ व्याघ्र आपली शेंपटी हापटीत आणखी मोठमोठ्यानं डुरकण्या फोडीत माझ्या अंगावर धांवून आला. काय त्याचं तें अक्राळविक्राळ स्वरूप !

मुरादेवी तें ऐकून एकदम घाबरून महाराजांच्या अगदीं जवळ खेटून बसली व त्यांस म्हणते, "महाराज, माझं रक्षण करा. तें व्याघ्राचं नांव काढल्याबरोबर माझ्या जीवाचा थरकांप झाला आहे. जसा कांहीं आतां माझ्या पुढेंच तो व्याघ्र दिसतो आहे असं मला झालं आहे बर मग पुढं काय झालं ? भय वाटतं आणखी ऐकावं असंही वाटतं.

राजाः—वा ! भय वाटत असलं, तर मग आणखी कशाला सांगूं ? "

मुरादेवीः—मीं म्हटलंना आधींच, कीं भय वाटतं आणखी ऐकावंसंही वाटतं ?

राजाः—सांगतों बापडा. पण पुढें ऐकण्याचा आग्रह न धरशील तर बरं.

मुरादेवीः—तें कां ? आतां तर मला अतिशयच उत्कंठा झाली आहे. आपला आश्रय असल्यास भय असं किती वेळ राहणार आहे ? स्पर्श होतांक्षणींच पळाल तें पुढें ?

राजा—पुढें असं झालं कीं, त्या वाघानं माझ्या अंगावर झांप टाकून मला......

मुरादेवीः—अग बाईग ! महाराज, हें ऐकून मला तर मूर्च्छाच येतेसं वाटतं.

राजाः—घाबरूं नकोस हें सगळं खरं नव्हे. स्वप्नांतलं आहे.

मुरादेवीः—खरंच; मी तें अगदींच विसरून गेलें. मग पुढें काय झालं, महाराज ?

राजाः—तेंच तर सांगायचं आतां कठिण वाटतं आहे मला. तें ऐकल्याबरोबर तूं काय म्हणशील आणखी काय नाहीं, म्हणून मी जरा मागें घेतों आहे.

मुरादेवीः—असं आहे तरी काय बाई तें ? मी कांहीं म्हणत नाहीं न् सबरत नाहीं.

राजाः—त्या वाघानं माझ्या अंगावर उडी टाकली, तेव्हां मी तुझ्याजवळ माझा खड्ग मागूं लागलों; पण तो तूं न देतां उलट दूरदूर पळूं लागलीस.

मुरादेवीः—हें काय हें भलतंच बोलावं ? मी आपला प्राण वांचवायला धांवेन का दूर पळेन ? कायग बाई तरी स्वप्न ! आपल्याला खरोखरी वाटतं तेंच नाहींना पण स्वप्नांत आलं ?

राजाः—हा वेडे, हें काय बोलतेस हें ? आणखी पुढें ऐकशील तर काय म्हणशील ?

मुरादेवीः—काय म्हणायचं आहे ? पण काय तें सांगावं एकदां. आतां मला फारच ऐकावंसं वाटूं लागलं आहे. काय झालं मग पुढें ?

राजाः—तूं पळूं लागलीस तों तों मी तुझ्या विनवण्या करूं लागलों. 'तूं या वेळीं खड्ग दिला नाहींस, तर मला हा व्याघ्र खाऊन टाकतो,' असं तुला सांगूं लागलों; पण तूं ऐकनास, उलट मला म्हणालीस, "खाईना ! माझ्या पोराला वाघानं कसं खाल्लं असेल तें तरी तुम्हाला समजून येईल. माझी मुळीं इच्छाच आहे कीं, तुम्हाला त्यानं खावं." हें तुझं बोलणं ऐकतांच मी अगदीं चकित झालों.

आणि त्याचें तें स्वप्न ऐकून मुरादेवी नुसती चकित झाली इतकेंच नव्हे, तर काळीठिक्कर पडली.

# प्रकरण २४ वें.

## निश्चय डळमळला.

राजाचें तें स्वप्न ऐकून मुरादेवीच्या अंगाला दरदरून घाम सुटला. राजास आपलें सगळें कृष्णकारस्थान कळून चुकलें असून आपली परीक्षा पाहण्यासाठीं तर तो स्वप्नाचा बनावट वृत्तांत करून कांहीं बोलत नाहींना, असाही संशय तिच्या मनांत आला. तिचा ऊर एकदम धडधड करूं लागला. तिची नजर कावरीबावरी झाली. तिचा श्वासोच्छ्वास एकदम बंद झाल्याप्रमाणें तिला झालें. आणि आपल्याला एकदम ओक्साबोक्शीं रडूं येतें कीं काय असें तिला वाटूं लागलें. ती राजाला अगदीं लगटून बसली होती. तिच्या उरांत भरलेल्या धडकीमुळें चाललेलें धडधडणें त्याला ऐकूं आलें आणि त्यानें तिची चर्या एकदम ओळखली; परंतु तिच्या घाबरण्याचें कारण त्याला फार निराळेंच वाटलें व तो एकदम तिला म्हणतो, "प्रिय मुरे, नुसती स्वप्नांतली कथा तुला सांगितली, तर तूं इतकी घाबरलीस. आणि प्रत्यक्ष तुझ्या देखत जर माझ्या अंगावर वाघानें उडी मारली, तर मग तुझी स्थिति काय होईल ?"

हा राजाचा प्रश्न ऐकून मुरादेवीस किंचित धीर आल्यासारखें झालें व ती लागलीच त्यास म्हणते,

"तसा प्रसंग आला, तर माझा बसल्या ठिकाणींच प्राण जाईल. पण आर्यपुत्रा, आपण अशा प्रसंगीं तलवार मागतां आहां आणखी मी देत नाहीं, हें स्वप्नांत पाहून आपण पुनः माझा त्याग तर करणार नाहींना? आपण स्वप्न सांगितल्या क्षणापासून माझ्या मनाला तें भय वाटूं लागलं आहे."

इतकें बोलून तिनें त्याला घट्ट मिठी मारून एकसारखें रडणें सुरू केलें. राजानें तिला पोटाशीं घट्ट धरलें व तो तिला म्हणाला, "हा वेडे ! स्वप्नांत पाहिलेल्या गोष्टी खऱ्या धरून त्यावरून मी तुझा त्याग करीन इतका का मी मूर्ख आहें ? फार तर काय, पण तुझ्याबद्दल माझ्या मनाची इतकी खात्री झाली आहे कीं, जागेपणीं प्रत्यक्ष मीं आपल्या डोळ्यांदेखत तसा प्रकार पाहिला किंवा ऐकला, तरीसुद्धां मला आतां तो खरा वाटायचा नाहीं. स्वप्नांतच मी हें कांहीं तरी पहातों आहें असं मला वाटेल, आणखी काय सांगूं ?"

"आर्यपुत्रा ही गोष्ट अगदीं खरीना पण ? नाहींना आपण आतां माझा विनाकारण संशय घेणार ? एक वेळ मी पोळलें आहें म्हणून पुनः पुनः विचारतें आहें, दुसरं कांहीं नाहीं. मी अगदीं निराधार निराश्रित आहें. आपल्यावांचून मला कोणीसुद्धां या जगांत नाहीं. देवा ! काय हें स्वप्न पाडलंस ?"

" प्रिये मुरे, आतां कां उगीच अशी रड-तेस ? तुला सांगितलंना आतांच कीं, माझ्या मनांत प्रेमाखेरीज—अत्यंत गाढ प्रेमाखेरीज—आतां दुसऱ्या कशालाही जागा नाहीं म्हणून? मग आतां कां उगीच असा व्यर्थ शोक कर-तेस ? मी काय करूं म्हणजे तुझी खात्री

मुरा एकदम त्यास म्हणते, " माझी खात्री होय ? माझी खात्री करायला...पण महाराज—आर्यपुत्र, उद्यां आपण माझ्या मंदि-रांतून जाणारच ? "

" तूंचना अमात्य राक्षसाच्या देखत मला जायला सांगितलंस ? तुझ्या अनुमताखेरीज मी त्याला हो म्हणणार नव्हतों. पण तूंचना ' मी का नाहीं म्हणतें ? ' असं म्हणून मला जाण्याला हरकत नाहीं असं सांगितलंस ? "

" असं मीं म्हटलं खरं; पण आतां जर नाहीं गेलं तर नाहीं का चालणार ? "

" हो, चालेल तर काय झालं ? पण न जाण्याला कारण काय ? "

" कारण ? " मुरा पुढें बोलण्यास गुट-मळली. तिच्या मनांत काय बोलावयाचें होतें तें बोलूं कीं नको असें तिला वाटल. नयेच बोलूं, असा तिचा निश्चय झाला. मग पुढें म्हणते, " कारण इतकेंच कीं, आपण जाऊं नये असं मला वाटतं. त्या वेळीं मीं अनु-मोदन दिलं, पण आतां असं वाटतं कीं... "

" समजलें, समजलें ! " राजा धना-नंद हंसत हंसत तिला म्हणतो, " आतां तुला असं वाटतं कीं, मी एकदां गेलों म्हणजे परत येईन कीं नाहीं कोणास कळे ! तुम्ही बायका मोठ्या सशया. तुला असं वाटतं कीं, मी इतके दिवस इथें राहलों, म्हणूनच माझं तुझ्या ठिकाणी प्रेम राहिलें आहे; आणखी इथून एकदां बाहेर गेलों, कीं दुसरा कोणी कांहीं तरी मला सांगेल, नाहीं तर माझ्या दृष्टीस कोणी पडेल आणि माझं चित्त तुझ्या ठिकाणाहून उडेल, असंचना ? "

" असेंच कांहीं केवळ नाहीं, " मुरेनें अडखळत उत्तर दिलें. आतांपर्यंत आपण काय दुष्ट हेतु धरून उद्योग केला, कोणाच्या साह्यानें कसा व्यूह रचिला, हें सर्व सांगून राजाचे पाय धरून क्षमा मागावी, व दुसरे दिवशीं त्यास जाऊं देऊं नये, असें तिला वाटलें; परंतु लागलीच हाही विचार तिच्या मनांत आला कीं, राजा तें ऐकून घेऊन क्षमा करीलच म्हणून कशावरून ? कांहीं तरी भयंकर असें पारिपत्य करणार नाहीं म्हणून कशावरून ? असें मनांत येऊन तिनें तें तित-केंच ठेविलें व त्यानें जाऊं नये असें कर-ण्याला काय युक्ति करावी, याचाच विचार ती करावयास लागली. ती " असेंच केवळ नाहीं, " असें शब्द अडखळत बोलून स्तब्ध झाली, हें पाहून राजा तिला म्हणतो:—

" असंच केवळ नाहीं तर कसं ? पुढें कां बोलत नाहींस ? थांबलीस कां ? "

" कांहीं नाहीं उगीच. मला बाई कां तें कारण सांगतां येत नाहीं. पण असं वाटतं कीं आपण उद्यां—उद्यां कसचं आतां ! आजच —इथून जाऊं नये. "

" कारण सांगतां येत नाहीं कां म्हणतेस ? सांगवत नाहीं किंवा सांगायची इच्छा नाहीं असं म्हण. इच्छा असली तर सांगतां येईल. आणखी मला कळलंही पण आहे. मी सांगूं?" राजानें हंसून तिच्या हनुवटीला हात लावून विचारलें.

ती कांहीं बोलली नाहीं. तेव्हां राजा पुढें म्हणतो:—

" मी इथून गेलों, कीं पुनः येणार नाहीं, असं तुला फार भय वाटतं आहे हेंच कारण. हें भय घालवावं म्हणूनच मी आतां तुझं न ऐकतां जाऊन येणार म्हणजे तुझं भय कमी

होईल, त्याखेरीज तुझं भय जाणार नाहीं. तुला फार दिवस हें भय वाटत आहे, तेव्हां आतां आजचा प्रसंग साधून तें अगदीं काढून टाकलं पाहिजे. झाला निश्चय. आतां तूं कांहीं सांगितलंस, कांहीं म्हणालीस, तरी जाण्याचा निश्चय मीं कायम केला. चल, आतां अधिक कांहीं बोलूं नको. पहाटेची साखरझोंप मला घेऊं दे. आणखी तूंही घे. आतां अगदीं बोलूं नको. ''

असें म्हणून राजा दुसऱ्या कुशीस वळला. थोड्याच वेळांत त्याला झोंप लागली. या वेळीं प्रभातकाळाला दहा अकरा घटका अवकाश होता. मुरादेवीला मात्र झोंप लागेना. तिनें नानाप्रकारें यत्न केला, परंतु डोळा मिटेचना म्हटलें तरी चालेल. राजानें जाऊं नये, असें करण्यास काय युक्ति करावी हा विचार तिच्या मस्तकांत एकसारखा भ्रमण करीत राहिला. शेवटीं तिचें तिला कांहीं सुचेना. दुसऱ्या कोणाला तरी आपलें मन उकलून सांगून युक्ति विचारावी असें तिला वाटलें; पण विचारावें कोणाला ? तिच्या अगदीं मोठ्या जीवश्चकंठश्च दासी आणि सख्या दोन. एक वृंदमाला व दुसरी सुमतिका. वृंदमाला आपल्या सर्व कार्यांत व कारस्थानांत सहाय्य करीत नाहीं; तिला कपटनाटक मुळींच आवडत नाहीं, आणि आपलें कर्तृत्वसर्वस्व तर कपटनाटकांत. तेव्हां तिला आपल्या विश्वासांत घेण्यांत अर्थ नाहीं; त्यापासून कार्यभाग साधण्यापेक्षां कार्यहानि मात्र व्हावयाची; हें जाणून तिनें वृंदमालेस पुढें पुढें आपल्या कारस्थानांतून वगळलें इतकेंच नव्हे, तर तिनें आपलें पहिलें सारें बदललें. आपण राजाशीं प्रेमानें वागतों, कपटप्रतिज्ञा सोडून दिली. असें तिनें तिला भासविण्याचा प्रयत्न चालविला. आणि सुमतिका आपल्यास फार उपयोगी पडणारी, कोणतेंही कपटनाटक नांदीपासून भरतवाक्यापर्यंत पार नेण्याला समर्थ अशी आहे. असें जाणून तिला आपल्या विश्वासांत घेतलें. चाणक्याकडे जाण्यायेण्यास, निरोप पोहोंचविण्यास तीच साधन झाली. तिला आतांपर्यंतचा सर्व कपटसमारंभ ठाऊक. तेव्हां त्या समारंभाचा प्रतीकार करण्यास तिचेंच साहाय्य घेतल्यास आपल्यास ठीक पडणार, असें जाणून ती हलकेच उठली आणि बाहेर गेली. महाराजांस गाढ झोंप लागली होती, हें तिच्या अगदीं पथ्यावर पडलें. सुमतिका जेथें निजत असे, तेथें जातांना तिला असें वाटलें कीं, कोणाचीं तरी पावलें वाजलीं, तीं दडदड धांवत जातांना वाजलीं असावीं, पण तिला संशय आला, म्हणून तिनें दारांतून बाहेर जातांच इकडे तिकडे पाहिलें. तों कोठेंही कोणी नाहीं. ती सुमतिकेच्या निजण्याच्या दालनांत गेली. तों सुमतिका अगदीं सर्वांग गुरफटवून घेऊन गाढ निजलेली. मुरादेवीनें किती हांका मारल्या, तरी ती उठेना. तिच्या शेजारीं दुसरी एक दासी निजलेली होती; ती खडबडून जागी झाली व उठून उभी राहिली. " काय आज्ञा आहे ? " असें तिनें विचारलें, तर " सुमतिकेला चांगली हलवून उठव; काय ही झोंप का राक्षसझोंप ! " असें मुरादेवीनें म्हटलें. तेव्हां त्या दुसऱ्या स्वर्णलता दासीनें सुमतिकेला हलवून उठविलें. तेव्हां जसें एखादें माणूस एकाएकीं घाबरून उठावें, तशी ती सुमतिका उठली व मुरादेवीला न पाहूनच म्हणते, " कायग स्वर्णलते, असं काय एखाद्या माणसाला धसक फसक करतेस ? " नंतर एकदम तिची नजर मुरादेवीकडे गेलीसें दिसल, आणि ती म्हणते, " अगबाई ! हें काय ? महाराणीसाहेब, क्षमा असावी. मला कांहीं चांगलं आनंदाचं स्वप्न पडत होतं, आणखी त्या अर्ध्या स्वप्नांतच मला इनें जागी केली, म्हणून...पण देवि,

मीं आपलंच काय गुन्हाळ लावलं आहे ? आपली काय आज्ञा आहे ? ”

“ आहे. कांहीं तुला सांगायचं आहे. स्वर्णलते, तूं अंमळ बाहेर जा कशी. आणखी दार लावून अगदीं दूर उभी रहा. आमचीं बोलणीं ऐकूं नकोस. जा. दुसरं कोणी या वेळीं इकडे यायचं नाहींच; पण आलं तरी तिथें दूरच थांबव व मला येऊन सांगूंसुद्धां नकोस. माझें बोलणें संपलं म्हणजे मग तुला मी बोलावीन, जा. ”

अशी मुरादेवीची आज्ञा होतांच स्वर्णलता तेथून निघून गेली आणि आतां मुरादेवी आपलें हृद्गत सुमतिकेला सांगणार, तोंच तिच्या चित्ताची पुनः कांहीं चलबिचल झाली आणि ती एकदम आपल्या मनांत म्हणते, “ सुमतिका पहिल्यापासूनच आपल्या या कपटनाटकाला अनुकूल. तिला आपला हा आयत्या वेळीं बदललेला बेत जर सांगितला, तर समाधान वाटेल आणि ती आपल्याला योग्य सल्ला देईल म्हणून तरी कशावरून ? कदाचित् तिला तें न रुचून आपलें मन कायम करण्यालाच ती कारण होईल. ती दुष्ट कामाला, कपटनाटकालाच उपयोगी जर आपल्याला आतां कपटनाटकाचा बीमोड करून सत्कृत्य करावयाचें आहे, आपला आतां-पर्यंतचा उपक्रम महाराजांस न कळतां व आपलें कांहीं अहित न होतां, जर महाराजांचा प्राण वांचवावयाचा आहे, तर हिला आतां आपलें मन कळूं देतां उपयोगी नाहीं. हिला कांहीं तरी सांगून तशाच समजुतींत राहूं द्यावें. माझें मन बदललेलें जर हिला आवडलें नाहीं, आणि मांझ्याशींच हिनें कपटनाटक केलें तर ! ” असा विचार तिच्या मनांत एकदम येऊन तिनें सुमतिकेचा सल्ला या कामीं घ्याव-याचा नाहीं, ती नांवानें सुमतिका परंतु कृतीनें कुमतिका होय, असा तिच्या मनाचा विचार झाला. वृंदमालाच या कामीं बरी. तिचा सल्ला घ्यावा असा तिचा निश्चय झाला. आणि सुमतिकेला ती म्हणाली, “ सुमतिके, मला आज रात्रभर कशी ती झोंप नाहीं. आपला हा कार्यभाग सिद्धीस जाणार असें तुला वाटतें का ? शेवटास जर गेला नाहीं, तर तुझें नी माझें काय होणार ? ” सुमतिका खरो-खरच फार चतुर होती. राणीसाहेब आप-ल्याला उठविण्याला आल्या त्या केवळ एव-ढ्याचकरितां आल्या नाहींत, असें तिनें ताडलें, आणि म्हणते, “ देवि, आपल्याला त्याबद्दल अगदीं मुद्दां शंका नको. आर्य चाणक्य असा तसा पुरुष नव्हे बरं. त्यानं जो व्यूह रचला, तो कधीं विफल म्हणून होणारच नाहीं. आप-ल्याला या विचारामुळेंच का झोंप आली नाहीं ती ? मी म्हटलं काय झालं इतकं झोंप न यायला ? चाणक्यगुरूचा व्यूह सिद्ध होणार, आणखी आपल्या इच्छेप्रमाणें आपल्या भाच्याला राज्यप्राप्ति होणार...... ”

“ छुत् छुत् छुत्, सुमतिके, ” मुरादेवी एकदम तिच्या तोंडावर हात ठेवून तिला म्हणाली, “ अग, मोठ्यानं बोलूं नको. भिंती-लासुद्धां या वेळीं कान फुटतील. आतां थो-ड्यावर आलं आहे. रिकामा घोंटाळा करूं नको. ”

इतकें बोलून मुरादेवी पुनः अगदीं स्तब्ध झाली. पुनः तिला असें वाटलें कीं, आतां-पर्यंत रचलेल्या व्यूहांतून आपण निभावून निघून महाराजांसही निभावण्याची युक्ति जर कोणी सांगूं शकेल, तर ती सुमतिकाच सांगेल. तेव्हां आपलें मन तिच्यापाशीं मोकळें करावें. वृंदमालेला अजूनपर्यंत यांतला गंध-सुद्धां नाहीं. तिला आपण आतां हें सर्व सांग-णार, आणि नंतर तिचा सल्ला घेणार. अशा स्थितींत ती सल्ला तरी काय देणार ? पुनः मनाची चलबिचल झाली आणि आतां पुनः

विचार करावयाला अवकाश नाहीं, म्हणूनच काय ती एकदम सुमतिकेस म्हणतेः—

" सुमतिके, माझ्या भाच्याला राज्य मिळून मला काय करायचं आहे? त्यापेक्षां महाराज चिरायु होऊन त्यांच्या प्रेमछत्राखालीं मी जर सुख भोगीत राहिलें, तर काय वाईट? मला इतके दिवस तुरुंगांत टाकलं, माझ्या पोराला ठार केलं, या त्वेषानं मी कांहीं तरी बोललें आणखी कांहीं तरी प्रतिज्ञा करून भलभलतेच व्यूह रचविले; पण मला आतां तें कांहीं घडूं देऊं नये असं वाटतं. जा तर चाणक्य गुरूला सांग कीं, आपला सगळा व्यूह बंद ठेवून आपण आतांच्या आतां चंद्रगुप्ताला घेऊन जा. महाराजांनीं आज इथून जाऊं नये अशाबद्दल मी पुष्कळ खटाटोप करणार आहें. पण शेवटीं त्यांनीं नाहींच ऐकलं, तर सर्व गोष्टी महाराजांपाशीं कबूल करून त्यांची क्षमा मागणार आहें. त्यांनीं क्षमा केली तर ठीकच, नाहीं तर काय शासन करतील तेंही सोशीन; पण अगदीं विनाकारण त्यांचा घात होऊं देणार नाहीं. सुमतिके, आपलं नाटक अगदींसुद्धां बाहेर पडूं न देतां महाराजांचे प्राण वांचवायाला युक्ति सांगत असलीस तर सांग; नाहीं तर आतां म्हटलं त्याप्रमाण मी करणारच समजलीस? "

मुरादेवी एकदां वरीलप्रमाणें बोलूं लागली आणि मग तिला असें दिसलें कीं, आपल्या मनांतलें सगळें एकदां कसें ओकून टाकूं असें तिला झालें असलें पाहिजे. तिचें तें बोलणें ऐकून सुमतिका फारच चकित झाली. आपण ऐकतों आहोंत हें मुरादेवीच बोलते आहे काय? आपण जागृतावस्थेंत ऐकतों आहोंतना? स्वप्नांत तर नव्हेना? असें तिला वाटलें. आणि ती एकदम आपल्या यजमानणीस म्हणते, " देवि, आपलं मन असं एकाएकीं बदलायला काय कारण झालं? आम्ही काय, आपण सांगाल त्या आज्ञेच्या. आतां म्हणाल, तर आत्तां आर्य चाणक्याकडे जाऊन त्यांना बोलावून आणतें. "

" जा तर जाच. माझा निश्चय झाला. महाराजांच्या कानावर सर्व मजकूर घातला, म्हणजे त्या बिचाऱ्या ब्राह्मणाच्या जिवास धका पोंचेल. करितां त्याला आधींच सावध करून पळून जायला सांगावं तें बरं. जा. जा. आतां अगदीं उभी राहूं नको. ही वेळ निघून गेली कीं, पुढें काय होईल तें कांहीं सांगतां येत नाहीं. माझं मन क्षणोक्षणीं बदलतं आहे. जा. "

सुमतिकेसही वाटलें कीं, या वेळीं आर्य चाणक्य आला तरच ठीक. म्हणून ती गेली व थोड्या वेळानें त्यास घेऊन आली.

आर्य चाणक्य व मुरादेवी यांचा त्या वेळीं झालेला संवाद फारच विलक्षण होता. तो वाचकांस पुढील प्रकरणीं कळेल.

# प्रकरण २५ वें.

## भाचा कीं मुलगा ?

आपल्यास कां बोलावलें आहे, नवीन प्रकार काय झाला आहे, हें सर्व सुमतिकेनें चाणक्यास मार्गानें येतां-येतांच सांगितलें होतें. मुरेच्या आजपर्यंतच्या वर्तनावरून तिचें आयत्या वेळीं मन बदलेल, आणि भलताच प्रसंग ओढवेल, असें चाणक्यास आतांपर्यंत वाटलें नव्हतें असें नाहीं. तो बेसावध नव्हता. वेळ प्रसंग आहे, त्यांतून स्त्रीजात आहे, कोण्या वेळीं मुरेच्या मनाची काय स्थिति होईल याचा कांहीं नेम नाहीं. आपल्या दायादांशीं युद्ध करावयास सिद्ध झालेल्या अर्जुनाचीसुद्धां आयत्या वेळीं काय स्थिति झाली, असें मनांत येऊन तसा प्रसंग आलाच, तर कशा तऱ्हेनें वागावयाचें त्याचा निश्चय त्या दूरदर्शी चाणक्यानें करून ठेवलाच होता. ज्या कार्यास हात घातला, त्या कार्याचा पुरा शेवट लावल्याखेरीज कधीं राहणार नाहीं, अशा स्वभावाच्या माणसांत अगदीं अग्रस्थानीं शोभेल असा चाणक्य होता, हें नव्यानें सांगावयास पाहिजे असें नाहीं. त्यानें पहिल्यापासून सर्व गोष्टींचा विचार करून ठेवला होता. सुमतिकेनें नवीन काय प्रकार झाला तें सांगितल्याबरोबर त्यानें पुढें काय बोलावयाचें, काय करावयाचें याचा निश्चय करून टाकला. सुमतिकेनें त्यास यज्ञशाळेंत नेऊन बसविलें. तो आला हें कळतांच मुरादेवी तेथें आली व तिच्यापुढें येऊन तो उभा राहिला. इतकेंच नव्हे, तर लागलींच तिला म्हणाला, " देवि मुरे, मला इतक्या तांतडीनें कां बोलावलेंस ? आपला हेतु सिद्ध होण्यांत कांहीं विघ्न येण्याचा संभव आहे, असें वाटून बोलावलेंस काय ? तसें असेल तर बोल लवकर. मी त्वरित काय शक्य तें करून तें विघ्न टाळतों. "

" विप्रश्रेष्ठा, " मुरादेवी एकदम त्यास म्हणाली, " आपण आरंभलेलं कार्य करायचंच, शेवटाला न्यायचंच असं म्हटलं, तर विघ्न कांहीं नाहीं; पण असलं प्राणघाताचं कार्य घडवून आणूंच नये, असं मला वाटायला लागलं आहे. आणखी तेवढ्याकरितां तुम्हांला बोलावून आणलं आहे. आपला व्यूह मोडून टाका. तें शक्य नसेल, तर मी महाराज आज जाणारच नाहींत असं करून टाकतें, जायचंच असा त्यांनीं आग्रह धरिला, तर सगळं काय आपण केलं आहे, तें त्यांच्यापाशीं कबूल करून क्षमा मागतें. आपण त्या चंद्रगुप्ताला घेऊन आतांच्या आतां निघून जा. नाहीं तर आपल्या प्राणांवर बेतायचीं. "

तें ऐकून चाणक्य हंसला व म्हणतो, ' देवि मुरे, आपला सगळा बेत बदलायला वेळ मात्र फार नामी काढलीस ! मी ब्राह्मण, केवळ यजनयाजन, पठनपाठन करून असणारा, त्या मला या घोंटाळ्यांत उगीच घातलेंस.

तुझी प्रतिज्ञा पुरी करायची ह्मणून मी चंद्रगुप्ताला इथें घेऊन आलों. त्याला राज्य मिळण्याची सगळी सिद्धता झाली, आणखी आयत्या वेळीं असं बोलूं लागलीस, याला ह्मणावं तरी काय ? पण वेडे, तूं आतां आपलं मन बदलून... ”

हें बोलतांना आर्य चाणक्याचा आवाज फार मोठा झाला. तेव्हां मुरादेवी त्यास ह्मणते, “विप्रश्रेष्ठा, तूं मोठ्यानं बोलूं लागलास, तर घटकाभऱ्यानं येणारं संकट आतांच उभं राहील. नव्हे, तूं आतां मुकाट्यानं पाटलिपुत्राच्या बाहेर निघून गेलास, तर तुझा जीव वांचेल; पण आतां तुझं हें मोठ्यानं बोलणं ऐकून जर महाराज जागे झाले किंवा दुसऱ्या कोणीं कांहीं ऐकून त्यांच्या कानीं घातलं, तर काय होईल बरं ! आतां उगीच बोलण्याबिलण्याचा भरीस न पडतां आपला व चंद्रगुप्ताचा जीव वांचवाल, तें बरं ! माझा तर अगदीं पक्का निश्चय झाला. कांहीं तरी बोलून महाराजांनीं जाण्याचा बेत रहित करावा, असं मी करणार, नाहींपेक्षां आपली खरी हकीकत— हें सगळं कारस्थान सांगून त्यांना सावध करणार; पण त्यांचा घात होऊं देणार नाहीं. ”

“ त्यांचा घात नको होऊं देऊं; पण तूं आपल्या पोटच्या पोराचा घात करणार काय ! ” चाणक्यानें तिच्या पुढें होऊन तिला म्हटलें.

“ माझ्या पोटच्या पोराचा घात ! आणखी मी करणार ! कोठचा पोरगा ! तुह्मी बोलतां काय ! ” मुरादेवी आश्चर्यचकित होऊन विचारूं लागली. चाणक्याच्या बोलण्याचा तिला अर्थच तिला समजेना. तेव्हां चाणक्य पुनः तिला म्हणतो, “ आपल्या पोटच्या पोराचा घात करणारला शासन करीन, आणखी आपल्याला वृषली म्हटल्याबद्दल आपल्या माहेरच्या कोणाला तरी पाटलिपुत्राच्या सिंहासनावर बसवीन अशी तूं प्रतिज्ञा केलीस, आणखी आतां पहातों तों तिचा भंग करून आपल्या पोटच्या पोराचा तूं स्वतःच घात करायला निघाली आहेस, याचा अर्थ काय ? ”

“ आर्या, तुझ्या चित्ताला भ्रम तर झाला नाहींना ? माझ्या पोटच्या पोराचा घात करायला पहातें आहें, असं तीनतीनदां म्हणतोस, याचा अर्थ तरी काय ? मी गर्भवती आहे, असं खोटंच सांगितलं, तें तुझ्या कानीं येऊन त्यावरून तर तूं असं कांहीं बोलत नाहींसना ? राजाजवळ आपला अपराध कबूल केला, म्हणजे राजा मला देहांत शासन करील आणि त्यानं तसं शासन केलं म्हणजे मात्र माझ्या हातून पोटच्या पोराचा घात होईल; पण मी गर्भवती नाहीं. आपला तसा भ्रम असला, तर तो अगदीं दूर करा. ”

“ देवि, मी तर कांहीं भ्रमांत नाहीं; पण तूं मात्र आजपर्यंत भ्रमांत आहेस खरी. राजानं तुझ्या पोटच्या पोराचा घात करण्याचा यत्न केला; पण तो सिद्ध झाला नाहीं. आतां तूं मात्र आपल्या हातानं त्याचा घात करविण्याची सगळी सिद्धता करते आहेस. ”

तें बोलणें ऐकून मुरा अगदीं भांबावल्याप्रमाणें झाली आणि आश्चर्यपूरित व पृच्छाप्रेरित मुद्रेनें चाणक्याकडे पाहूं लागली. परंतु तिच्या तोंडून कांहीं शब्द निघेना. काय बोलावें, तें तिला सुचेना.

चाणक्यास हीच स्थिति पाहिजे होती. तो तिला पुढें म्हणाला, “ देवि, तुला फार वेळ भ्रमांत ठेवीत नाहीं. तूं जननी. तुला तुझ्या पुत्राची तेव्हांच ओळख पटायला पाहिजे होती, परंतु पटली नाहीं; पण मी आज ती पटवून देतों. उगीच लांबणीवर टाकीत नाहीं. मी लौकरच कधीं तरी हें करणार होतों. पण

तूं आजच त्याची अवश्यकता केलास. देवि, तुझा मुलगा जिवंत आहे. ”

“ माझा मुलगा जिवंत ? ” मुरादेवीनें एकदम त्याच्यापुढें जाऊन मोठ्यानें विचारलें. आपण कोठें आहोंत, काय करतों आहोंत याचें तिला भानच राहिलें नाहीं.

“ होय, तुझा मुलगा जिवंत. ” आर्य चाणक्य किंचित् हंसून तिला म्हणाला.

“ आर्या, आपण माझा विनोद तर करीत नाहींना ? ” मुरादेवीनें विचारलें.

“ ही विनोदाची वेळ नव्हे. आणि यावज्जन्मात मीं कधीं कोणाचा विनोद केला नाहीं. ”

“ तर मग काय माझ्या मुलाचा त्या वेळीं घात झाला नाहीं ? ”

“ नाहीं. घात न होतां तो जगला असं सिद्ध करून द्यायला मी सिद्ध आहें. ”

मुरादेवी आश्चर्यस्तब्ध झाली. चाणक्य काय बोलतो आहे याचें ज्ञानच तिला झालें नाहीं असें दिसलें. नंतर पुनः म्हणते, “ कुठें आहे तो आतां ? ”

“ या घटकेस पाटलिपुत्रांत, तुझ्या अगदीं सन्निध आहे. तोच तुझा...... ”

“ काय म्हणतां माझा मुलगा मेला नाहीं ? तो पाटलिपुत्रांत आहे ? आर्या चाणक्या, मला अशी संदेहांत ठेवूं नका. काय जें सांगायचं असेल तें अगदीं स्पष्टपणें सांगा.”

“ देवि मुरे, आतां आणखी स्पष्ट स्पष्ट तें काय सांगूं ? अजून तुला तर्क होईना ? ”

“ मला तर्क झाला आहे; परंतु तो तर्क खरा असं कसं समजावं ? ”

“ आपला तर्क खरा कीं खोटा, याला प्रत्यंतर आपलं मनच असतं. ”

“ आजपर्यंत त्या मनानं नाहीं कोठें मला प्रतीति दिली ! ”

“ प्रतीति पाहण्याला यत्न केल्याखेरीज प्रतीति यावी कशी ! ”

“ तर मग काय चंद्रगुप्त माझा पुत्र म्हणतां ? ज्याला जन्म देतांच मला बंदिवास झाला, आणखी ज्याचा नाश करण्याची महाराजांनीं आज्ञा केली तो माझा पुत्र जिवंत आहे म्हणतां ? तोच हा चंद्रगुप्त ? आर्या चाणक्या, मला फसवीत तर नाहींना ! मीं तुमच्या बेताला अनुकूल रहावं म्हणून हें आयत्या वेळीं कांहीं तरी बनवून मला सांगत नाहींना ? हा चंद्रगुप्त माझा मुलगा ? ”

“ होय, होय ! ज्याला धनानंदानं ठार मारण्यासाठीं मारेकऱ्यांच्या स्वाधीन केलं नसतं, तर जो आज या पाटलिपुत्रांत यौवराज्यसुखाचा अनुभव घेत असता, तोच हा तुझा पुत्र चंद्रगुप्त. देवि मुरे, तुझ्या आणखी त्याच्या स्वरूपांतलं साम्य तुला दिसलं नाहीं काय ? त्याला पाहून तुझ्या मनांत कधीं पुत्रवात्सल्य उभं राहिलं नाहीं काय ? यापूर्वी तूंच मला याच्यासंबंधानें किती तरी प्रश्न विचारावेस; पण, तुला विचारायला अवसर देऊं नये, म्हणून मीं, ‘ हा तुझा भाचा ’ असं सांगितलं. कारण भाचा म्हटला, म्हणजे त्याच्या आणखी तुझ्या स्वरूपांत एवढं साम्य कां याचं आश्चर्य कोणाला वाटण्याला जागाच राहूं नये; परंतु माझ्या नुसत्या सांगण्यावरून तूं सुद्धां फसशील असं मला वाटलं नव्हतं; तथापि जे दिवशीं तूं शंका घेशील, ते दिवशीं वस्तुस्थिति तुला सांगण्याचा माझा बेत होता; पण आजपर्यंत कारणच पडलं नाहीं. ”

मुरादेवी चाणक्याचें बोलणें ऐकत होती कीं नाहीं याबद्दल शंकाच होती. कारण तिचें चित्त त्याच्या बोलण्याकडे असावें असें दिसलें नाहीं. चाणक्य सांगतो ही गोष्ट खरी असेल काय ? चंद्रगुप्त आपला पुत्र असेल काय ? कीं आपण या वेळीं आपला आतांचा

घेत सोडून देऊन चाणक्याला अनुकूल होऊन रहावें म्हणून हा आपल्याला कांहीं तरी सांगत आहे ? अशी शंका तिला आली व ती एकदम मध्येंच चाणक्यास म्हणते, " हा माझा मुलगा म्हणतां, पण हें आपलं म्हणणं सिद्ध करायला आधार काय ? "

" आधार होय ? त्याचं स्वरूप आणखी तुझं स्वरूप यांतील साम्य. "

" हा कांहीं मोठा अमोघ असा आधार नव्हे. याहून विशेष असा कांहीं असला तर सांगा. "

" देवि मुरे, असे आधार मागत बसण्याची ही वेळ आहे का ! "

" वेळ कशी असली, तरी माझ्या मनाची या वेळीं फार चमत्कारिक स्थिति झाली आहे, तेव्हां आधार विचारूं नको तर काय करूं ? "

" तुला आधार पाहिजे, तर हें काय आहे तें पहा. हें त्या नवजात मुलाच्या मणिबंधावर होतं. तें मूल हिमाचलाच्या पठारावर रानांत टाकलेलं होतं आणि तेथल्या गोपालांना ऐन चांदण्या रात्रीं सांपडलं. भगवान् चंद्रमा आपल्या शीतकरांनीं जणूं काय त्या तान्ह्या मुलाचं संरक्षण–गोपन करीत होता. म्हणून त्या गोपांनीं याचं नांव चंद्रगुप्त ठेवलं. "

आर्य चाणक्यानें याप्रमाणें बोलून तें रक्षाबंधन पुढें केलें. तें पहातांक्षणींच अंधारांत चांचपडत असलेल्या एखाद्या माणसास एकदम दिव्याचा प्रकाश दिसावा आणि त्यामुळें सगळें कांहीं चक दिसूं लागावें, तशीच मुरादेवीची स्थिति झाली. इतका वेळ संशयतमानें ग्रासलेल्या तिला तें रक्षाबंधन केवळ उज्ज्वल दीपाप्रमाणेंच झालें. आणि ती आश्चर्य, हर्ष व किंचित् खेद या तीन विकारांच्या उद्रेगानें अगदीं स्तब्ध झाली. तिच्या तोंडावाटे एक शब्दसुद्धां निघेना. बराच वेळ झाला. तिला कांहीं वेळ स्तब्ध बसूं देणेंच या वेळीं श्रेयस्कर, असें समजून चाणक्यही स्तब्ध बसला. नंतर कांहीं वेळानें ती म्हणतेः—

" आर्य, चंद्रगुप्त माझा मुलगा असं आपण सांगितल्यापासून...... "

" सांगितल्यापासून असं कां म्हणतेस ? तुझी खात्री करून दिलीना आतां ? "

" बरं तसं कां होईना; पण हें समजल्यापासून माझ्या मनाची स्थिति अतिशय चमत्कारिक झाली आहे. तर आतां मी काय करूं ! महाराजांना जाऊं देऊं ? त्यांचा घात होऊं देऊं ? काय, करूं तरी काय ? मला तर बाई कांहीं सुचत नाहीं. "

" यांत सुचायचं काय आहे ? तुझ्या मुलाला राज्य मिळावं असं असेल, तर गप्प बस. त्या वेळीं तुझ्या मुलाचा घात झाला नाहीं; तो आतां करून घ्यायचा असेल, तर राजाला सगळ्या गोष्टी सांग. मला तूं त्याला घेऊन पळून जायला सांगतेस, पण मी तसा जाणार नाहीं. ' त्याला या नंदाच्या सिंहासनावर बसवीन; नाहीं तर मी आपला प्राण देईन, ' अशी माझी प्रतिज्ञा आहे. माझा व्यूह सिद्ध झाला, तर माझी प्रतिज्ञा सिद्ध झाली. माझा व्यूह तुझ्या या आयत्या वेळच्या भित्रेपणामुळें फसला, तर राजा माझा प्राण घेईल, आणखी चंद्रगुप्ताचा घात करील. मला दोनही सारखींच. प्रतिज्ञा सिद्ध होत नाहीं, तर माझा प्राण देण्याचा निश्चय, तो राजा घेईल, घेईना ! तूं आपल्या मुलाच्या प्राणाची तर काळजी करशील ? कर आतां तुला जें योग्य दिसेल तें. मुलाचा प्राण घेवीव किंवा त्याला राज्य देवीव. गप्प बसलीस, तर त्याला राज्य मिळालेंच. बातमी फोडलीस तर राजानें त्याला ठार केलंच असं समज. मी आतां जातों. जें काय करणं तें स्वस्थपणें कर. मी आतां थांबत नाहीं. माझा वेळातिक्रम

झाला. असें म्हणून चाणक्य तेथून खरो-खरीच निघून गेला.

आपण आतां जें बोललों, त्याचा पूर्ण परिणाम होणार. आतां राज्यलोभासाठीं जरी नाहीं, तरी पुत्राच्या प्राणलोभानें तरी ही अगदीं स्तब्ध गप्प बसणार, अशी चाणक्याच्या मनाची पक्की खात्री झाली. तो अगदीं निश्चितपणें निघून गेला. इकडे मुरेच्या मनाला पक्की चिंता लागली. चंद्रगुप्त आपला पुत्र, त्याला तत्काळ राज्यलाभ होणार; पण पतीचा प्राण वांचविण्याचा प्रयत्न करावयाचा, तर कांहीं स्पष्ट सांगून त्याच्या चांगुलपणावर सर्व सोडून देणें जरूर. याखेरीज दुसरा मार्ग नाहीं. आपण आपल्याकडून असा यत्न करावा, कीं त्यानें मुळींच जाऊं नये; पण तो यत्न सफल झाला नाहीं म्हणजे काय करणार? जसें एखाद्या मनुष्यास वेड लागावें, त्याच्या डोक्यांत नानाप्रकारच्या विचारांचें भ्रमण होऊं लागावें, तसेंच तिला झालें. मन त्रिविध झालें एक एक प्रकारचा उपदेश करी, दुसरें दुसऱ्याच प्रकारचा, तिसरें तिसऱ्याच प्रकारचा, अशी स्थिति झाली. आतां करावें काय अशा विवंचनेंत ती असतां राजा धनानंद जागा झाला व त्यानें तिला हांक मारिली.

राजा धनानंद फार वेळ प्रहर दिवस होऊन जाईपर्यंत निजला होता. रात्रीं इतकें जागरण असतांही मुरा केव्हांच उठून गेली, हें पाहून त्यास आश्चर्य वाटलें. तेव्हां तो तिला म्हणतो, "मी आज जाणार म्हणून तुला झोंप नाहीं आली वाटतं! तुला अजून वाटतं ना कीं, मी एकदां इथून गेलों म्हणजे परत येणार नाहीं म्हणून? अगदीं वेडी आहेस तूं. पण तुझी खात्रीच करून देणार आज मी."

"नका महाराज, आज आपण जाऊं नये. उद्यां पाहिजे तर जा."

"उद्यां काय जास्त आहे? आणखी आज काय कमी आहे? तें कांहीं नाहीं. तूं आतां तयारीला लाग. मी आपला जाणार. राक्षसानें सगळी तयारी केली असेल. तो आतां येईल मला घेऊन जायला."

"पण सरकार, माझा उजवा डोळा लवतो आहे. मला फार भय वाटतं आहे."

"तुझं भय संध्याकाळीं जाईल. मी परत आलों, कीं गेलं भय!"

# प्रकरण २६ वें.

## पति कीं पुत्र ?

महाराजांचें मन बदलावें, त्यांनीं त्या दिवशीं राजसभेंत जाण्याचा बेत रहित करावा म्हणून मुरादेवीनें नानाप्रकारांनीं त्यांस सांगून पाहिलें; परंतु महाराज धनानंद कांहीं केल्या ऐकेनात. त्यांनीं एकच बोलणें धरून ठेविलें:– "मी एकदां इथून गेलों, म्हणजे दुसऱ्या कोणाच्या यत्नांनी किंवा माझं माझंच मन बदलल्यानं पुनः इकडे परत येणार नाहीं, असं तुझ्या मनानं घेतलं आहे, असं तुझ्या मनाला भय वाटतं आहे, म्हणूनच तूं मला असा आग्रह करते आहेस; पण मीं एवढ्या बाबतींत तुझं अगदीं ऐकायचं नाहीं असा निश्चय केला आहे. क्षणभर–नव्हे प्रहर दीड-प्रहरपर्यंत–तुला वाईट वाटेल. कारण मला परत यायला इतका वेळ लागणारच; पण एकदां परत आलों, म्हणजे तुझं तें भय कायमचं नाहींसं होईल. एवढ्याचकरितां मी जाणार. तुझ्या विनंतीकडे, आर्जवांकडे दुर्लक्ष्य करणार. तुझी आज्ञा मोडणार. आतां या बाबतींत अगदीं कांहीं बोलूं नको. जा माझी जाण्याची तयारी कर. नाहीं तर तूं माझ्या-बरोबर चल. तूं एका हत्तीवर बसून ये. चल. म्हणजे कोणी माझं मन हिसकावून नेऊं लागलं, तर तें परत आणायला तूं आपली अगदीं जवळ असशील. येतेस? तशी तुझी व्यवस्था करायला सांगतों." राजा धनानंद अशा प्रकारें कांहीं विनोदानें व कांहीं मनःपूर्वक असें बोलत होता; परंतु त्या सगळ्या बोलण्यावरून एक गोष्ट मात्र मुरादेवीच्या मनावर पक्की ठसली कीं, राजा कांहीं केल्या आपल्या म्हणण्याप्रमाणें करीत नाहीं. तो आपला आज राजसभेंत जाण्याचा बेत कांहीं बदलीत नाहीं. राजा अर्धवट विनोदानें बोलत होता; परंतु तसा विनोद ऐकून आनंदून त्यावर विनोदपर प्रत्युत्तर देण्याजोगी तिची मनःस्थिति नव्हती हें सांगावयास नकोच. तिचें चित्त अगदीं बावरल्यासारखें झालें होतें. आपण या वेळीं मुकाट्यानें बसलों, तर मुलाला राज्य मिळेल, आपली प्रतिज्ञा खरी होईल; परंतु पतीची हत्त्या केल्याचें महापातक आपल्या माथीं येऊन आपणास चिरकाल रौरवनरकांत पडावें लागेल. मुलाला राज्यावर बसलेला पाहून आनंद होण्याचें एका बाजूसच राहून प्रत्येक वेळीं पतीचें रूप आपल्यापुढें उभें राहील. पतिहत्त्येचें पातक अहोरात्र आपल्या मनाला छळील. तेव्हां तसें आपण करूं नये. मुकाट्यानें बसूं नये. आतांपर्यंत जें काय कारस्थान केलें आहे, जो काय व्यूह रचला आहे, तो सगळा पतीजवळ सांगावा; मग आपलें काय जें व्हावयाचें असेल, आपलें जें काय तो करील, तें मुकाट्यानें सहन करावें.

येऊन जाऊन काय करील? आपणास पुनः कारागृहांत टाकील इतकेंच कीं नाहीं? कारागृहाची आपणास संवयच आहे. फार तर आपला वध करवील: पण छे, आपल्यास कारागृहांत टाकील, किंवा आपला वध करील, एवढ्यावरच भागावयाचें नाहीं. ज्याचा लहानपणीं— नव्हे जन्म झाल्याबरोबरच—घात केला म्हणून आपण सूड घेण्याची प्रतिज्ञा केली, तो माझा पुत्र आज इतक्या दिवसांनीं माझ्या दृष्टीस पडतो आहे, त्याला राज्य मिळण्याची आशा उत्पन्न झाली आहे, त्याची काय वाट होईल? इतके दिवस नानाप्रकारचीं कारस्थानें करून शेवटीं आपणच व्यूह फसवतों, म्हणून संतापलेला आर्य चाणक्य सर्व कांहीं ओकून टाकील. आणि तसें झालें म्हणजे राजा चंद्रगुप्तालाही ठार मारील. हा मुलगा आपला नव्हे, असें आम्ही सांगून ज्याला मारून टाकण्याकरितां मारेकऱ्यांच्या स्वाधीन केलें, तो त्या वेळीं मारला गेला नाहीं, यामुळें हा केवढा प्रसंग आपल्यावर गुदरला पहा, तोच मुलगा आपलें राज्य घेण्यासाठीं आपल्या जीवावर उठला वगैरे बोलून मंडळी राजाला चिडविल्याखेरीज रहाणार नाहीं. आणि तशा भाषणांनीं एकदां तो चिडला कीं, मग काय करील आणि काय नाहीं याचा नेम नाहीं. चंद्रगुप्त हा आपला पुत्र असें मनांत सुद्धां आणणार नाहीं. त्यास उभा जाळीलसुद्धां. तेव्हां आपण आतां काय करावें? काय? आपणच आपल्या मुलाचा प्राणघात करावा? आणि तो झालेला पहावा? छे. छे. हा विचार तिच्या मनांत क्षणभरसुद्धां ठरेना. पति कीं पुत्र? पति कीं पुत्र? तिची अनावर इच्छा कीं, दोघेही वांचावे. दोघांच्याही जीवास धक्का लागूं नये. आपला मुलगा जिवंत आहे, असें आतां आपल्यास कळलें आहे, तर सुमाल्याला सिंहासन न मिळतां त्याला मिळावें अशाबद्दल पुढें आपल्याला वाटतील त्या खटपटी करितां येतील. पतिहत्या आज टाळतां आली, आणि आपल्या मुलाच्या जीवावरही कांहीं यावयाचें नाहीं अशी व्यवस्था करतां आली, तर पुढेंमागें महाराजांचें मन वळवूं, आणखी त्यांच्याचकडून आपण आपल्या पुत्राला राज्याभिषेक करवूं. तेवढ्याकरितां त्यांचा प्राणघात करण्याची इच्छा धरण्याचें कांहीं कारण नाहीं. काय आपण वेड्यासारख्या त्या कारस्थानी ब्राह्मणाच्या नादीं लागलों! आपलें दुष्ट कार्य करण्यासाठीं त्यानें आपल्याला हाताशीं धरलें, आणि आपणही त्याच्याबरोबर वहावत गेलों. आतां जर आपण गप्प बसलों नाहीं, जर का आपण त्याचा सगळा व्यूह फसवितों आहोंत अशी त्याला शंका आली, तर तो आपल्या स्वतःच्या जीवावर उदार होऊन माझ्या जीवावर उठेल, आणखी माझ्या इतक्या वर्षांनीं लाभलेल्या मुलाच्याही जीवावर उठेल. तो ब्राह्मण आहे म्हणून धनानंद कदाचित् त्याची हत्या करणार नाहीं. मी स्त्री म्हणून कदाचित् माझीही हत्या करणार नाहीं; परंतु आपल्या पित्यापासून राज्य हिसकावून घेण्यासाठीं त्याची हत्या करणाऱ्या पुत्राला कधींही कोणी क्षमा करणार नाहीं. मग काय? पोराचा शिरच्छेद होऊं देऊं? छे छे. मग मी करूं तरी काय? पतीची हत्या होते आहे, हें मनांत येतांच मला कसेंसेंच होतें आहे. ती होऊं न दिली तर पुत्राची हत्या खचित होणार. ती कशी होऊं देऊं? तें कांहीं नाहीं. यांतून पार पडण्यास—दोहोंतून कांहींही न होऊं देण्यास— उपाय काय योजावा? कांहीं नाहीं. स्वस्थ बसावें. पण स्वस्थ बसावें? स्वस्थ बसणें म्हणजेच पतीची हत्या होऊं देणें. ती होऊं देऊं नये म्हणून तर सगळी धडपड, नाहीं तर काय? असले विचार तिच्या मनांत एकसारखे

चालले होते. ते विचार चालले असतांच ती महाराजांची सेवा करीत होती. अर्थातच ती जें काय करीत होती तें अगदीं भ्रांतचित्तानें करीत होती. तिच्या चित्ताचें तें भ्रांतत्व राजाला दिसून आलेंच; परंतु ती नको म्हणत असतां आपण जाण्याचा निश्चय कायम केला; यामुळें तिच्या मनाची अशी स्थिति झाली आहे, आपण एकवार जाऊन संध्याकाळीं परत आलों म्हणजे हा भ्रम पार नाहींसा होईल, आणि मग द्विगुणित उल्हास होईल. तेव्हां परत येईपर्यंत आपण आतां कांहींच बोलूं नये. असा विचार करून राजा त्यासंबंधांत पुनः कांहींही बोलला नाहीं. त्यानें आपली तयारी चालविली. स्नानसंध्यादि कर्में झालीं. उपाहार झाला. इतक्या सुमारास मुरादेवीनें पुनः एकदां असें मनांत आणलें कीं, आपण एकदां राजास अखेरची विनंति करावी कीं, आपण जाऊं नये. ती जर त्यानें ऐकिली, तर ठीकच, नाहीं तर जें झालें तें सर्व त्यास निवेदन करून काय होईल तें होऊं द्यावें. परमेश्वरावर सगळा भार घालून आपण स्वस्थ बसावें. आपल्याला, आपल्या मुलाला, आणखी त्या ब्राह्मणालाही क्षमा करण्याविषयीं विनंति करावी. केली तरी ठीक, नाहीं तरी ठीकच. असा निश्चय करून डोळ्यांत आसवें आणून तिनें हात जोडले आणखी अत्यंत केविलवाणें तोंड करून महाराजांस पुनः एकदा अगदीं शेवटली म्हणून विनंति केली कीं, "आपण कांहीं झालं तरी आज जाऊं नये." परंतु राजानेंही तिला अगदीं निक्षून सांगितलें कीं, "त्यासंबंधांत मी तुझें ऐकणार नाहीं." असें म्हणून राजा आपल्या वस्त्रालंकारादिकांच्या तयारीस लागला. इतकें होईपर्यंत मध्यान्हीला सुमारें तीन घटका अवकाश राहिला. तेव्हां ती अगदीं हताश झाली व आपला दुसरा निश्चय आतां पार पाडावा, आपल्या कारस्थानाची सर्व हकीकत त्यास निवेदन करावी, असा विचार करून ती वाऱ्यानें एकदम पडणाऱ्या केळीप्रमाणें त्याच्यापुढें पडून, "महाराज, माझें तें ऐकत नाहीं आपण, तर आतां मला आणखी एकवार. ............... "

परंतु तिचा तो निश्चय सिद्धीस जावयाचा नव्हता. ती त्याप्रमाणे शब्द उच्चारीत आहे तोंच "महाराजांचा जयजयकार असो !" असे सुमारें दहाजणांनीं एकदम उच्चारलेले शब्द तिच्या कानीं पडले. हे एकदम इतक्या जणांचा शब्द काठून आला म्हणून ती वर पहाते, तों एकाहून एक लहान असे नऊ कुमार व अमात्य राक्षस अशी दहा मंडळी राजाचा वरीलप्रमाणें "जयजयकार" करीत उभी राहिली आहे असें दिसलें. त्या नवांत सुमाल्य असून त्याच्याजवळ आपला मुलगा चंद्रगुप्तही उभा आहे, असें तिनें पाहिलें. चंद्रगुप्त हा आपला पुत्र असें तिला कळल्यानंतर त्याची व तिची ही पहिलीच भेट. अर्थातच त्याला पहातांक्षणींच तिच्या चित्तांत पुनः मोह उत्पन्न झाला. त्याचें तें राजबिंडें स्वरूप पाहतांक्षणींच तिचें चित्त त्याच्याकडे ओढलें. त्याच्या व आपल्या स्वरूपांतलें साम्य मनांत येतांच आपला हा मुलगा खरा असें तिच्या मनांत आलें, आणि इतके दिवस मृत म्हणून त्याच्याबद्दल प्रेम वाटत होतें, तो आपल्यापुढें जिवंत उभा राहिलेला पाहून याला राज्य मिळण्याच्या आड आपण येतों हा आपला केवढा मूर्खपणा, असेंही तिच्या मनांत आलें. सुमाल्याकडे दृष्टि जातांच त्याच्याविषयींचा द्वेष तिच्या मनांत एकदम जागृत झाला. जसें याचें पाळणपोषण केलें, तसेंच आपल्या पोराचें पाळणपोषण केलें असतें, या अमात्य राक्षसाच्या मूर्खपणाच्या गोष्टी ऐकून जर आपल्या पोरास मृत्युमुखीं लोटण्यास हा राजा धनानंद सिद्ध झाला नसता तर आपल्यावर हा प्रसंग आलाच नसता !

परंतु आतां ज्या अर्थी तो आला आहे, नव्हे परमेश्वरानेंच आणला आहे, त्या अर्थी या राजाचा नाश व्हावा, आणि आपल्या पुत्राला—या सुंदर राजबिंड्या चंद्रगुप्तालाच राज्य मिळावें, असा त्याचा नेमानेम दिसतो. आपण उगीच त्याच्या आड येऊं नये. जें काय होणें असेल तें होऊं द्यावें, झालें. असें तिच्या मनानें घेतलें. सुमाल्य आणि अमात्य राक्षस जर त्या वेळीं एक क्षणभर उशीरानें आले असते, तर तिनें महाराजांच्या कानीं सर्व गोष्टी घातल्या असत्या; परंतु ती मंडळी पाहतांच तिचा त्या दोघांविषयींचा द्वेष एकदम जागृत झाला आणि सर्व पारडें फिरलें. आपण महाराजांच्या पुढें दंडवत घालीत असतां यांच्या दृष्टीस पडलों, तशा स्थितींत ही मंडळी आली, याचाच तिला अतोनात संताप आला. आणि ती एकदम उठून उभी राहून दूर झाली. नंतर "आर्यपुत्रा, ही मंडळी आपल्याला नण्याकरितां आली आहे, आतां मी जातें; आपण सुरक्षितपणें राजकार्य करून यावें." असें म्हणून ती तेथून निघून गेली. जातां जातां तिनें एकवार आपल्या पुत्राकडे प्रेमदृष्टीनें पाहिलें.

इकडे राजाची सर्व तयारी झाली. त्याची स्वारी निघण्याचा सर्व समारंभ खालीं त्या मंदिरासमोर झालाच होता. राजाचा बसण्याचा हत्ती सिद्ध होता. राजा खालीं जाऊन त्या हत्तीवरील अंबारींत आरूढ झाला. त्याच्यापुढें ढक्कापणहादि अनेक रणवाद्यें व भेरीशृंगादि समारंभवाद्यें एकदम वाजूं लागलीं. ध्वज फडकत होते. राजाच्या हत्तीच्या उजव्या बाजूस त्याचा युवराज एका हत्तीवर आरूढ झाला. डाव्या बाजूस अमात्यराज एका हत्तीवर आरूढ होऊन चालला. राजाचे दुसरे सात पुत्र घोड्यांवर आरूढ होऊन चालले होते. चंद्रगुप्त मात्र एकटाच त्या वाद्यवाल्यांच्या मागें व राजाच्या हत्तीच्या पुढें चालला होता, आणि अशा थाटानें स्वारी चालू झाली. अमात्य राक्षसास फार आनंद झाला असें दिसलें; परंतु नगरांतील लोकांनीं गर्दी करूं नये म्हणून सैन्यांतील कांहीं लोक राजाच्या व राजपुत्राच्या हत्तीच्या पुढें व मागें गराडा घालून त्यांस अगदीं अंतरावर ठेवीत होते.

मुरादेवीचें मंदिर खुद्द राजगृहापासून लांब होतें. तिला बंदींत ठेविल्यापासून या मंदिरांत ठेविलें होतें व बंदमुक्त झाल्यावरही ती आग्रहानें येथेंच राहिली होती. असो. वर सांगितल्याप्रमाणें मोठ्या थाटानें तो समारंभ राजगृहाकडे चालला होता. वाटेनें ठिकठिकाणीं प्रजाजनांनीं तोरणें उभीं केलीं होतीं व त्या तोरणांच्या खालून राजाची स्वारी चालली होती. दुतर्फा असलेल्या घरांतील गवाक्षांतून राजावर व राजपुत्रांवर एकसारखी पुष्पवृष्टि होतच होती. जणूं काय राजाची स्वारी फार वर्षांनीं किंवा अगदीं नव्यानेंच पाटलिपुत्रांतून चालली आहे, यामुळें लोक हा उत्सव करीत आहेत असें दिसलें.

अशा थाटानें स्वारी चालली असतां समोरून एकाएकीं एक घोडेस्वार फार जोरानें घोडा फेंकीत आला. हा कोण आणि अशा वेगानें कां येतो आहे याची चौकशी लोक करताहेत, तों तो घोडेस्वार राक्षसाच्या हत्तीजवळ जाऊन थबकून त्यानें आपल्या हातच्या भाल्याच्या टोंकाला एक पत्रिका टोंचून ती राक्षसाच्या अंबारीजवळ नेली. हें काय आहे तें पाहण्यासाठीं अमात्यानें ती पत्रिका घेतली, आणि वाचून पहातो, तों त्याचें तोंड खरेंकन् उतरलें. बरें झालें कीं, महाराजांचें लक्ष्य त्या वेळीं त्याच्याकडे नव्हतें—निदान तें नव्हतें असें पाहून त्यास संतोष झाला असावा, असें राक्षसाच्या चर्येवरून खचित दिसलें. त्यानें

एकवार महाराजांकडे पाहिलें. नंतर हळूच त्यांचे हत्तीला खेटून आपला हत्ती नेऊन महाराजांस म्हटलें, " महाराज, इतका वेळ मी आपल्याबरोबर चाललों, आतां मला निराळ्या वाटेनें अंमळ पुढें राजसभेंत जाण्याची आज्ञा असावी. पुढें जाऊन कांहीं सिद्धता करायची आहे, ती करतों. "

इतकें बोलून राजाची अनुमति मिळते आहे कीं नाहीं याची वाट न पाहतां त्यानें आपला हत्ती दुसरीकडे वळवलाही. राजानेंही त्या वेळीं तिकडे लक्ष्य दिलें नाहीं, किंवा त्याचें लक्ष्य गेलें नाहीं असें म्हटलें तरी चालेल. त्याचें सर्व लक्ष्य सभोंवतालून आपल्या अंगावर पुष्पवृष्टि करणाऱ्या युवतिजनांकडे होतें. होतां होता ती सर्व स्वारी चाणक्यानें राजगृहाच्या द्वाराजवळ ज्या विवक्षित स्थानाखालीं पोंखरून ठेविलें होतें, तेथें आली. चंद्रगुप्त तेथें अलीकडेच क्षणभर उभा राहिला. ज्या ठिकाणून जाण्यास धोका नव्हता तेथून जाण्यासाठीं पूर्वसंकेताप्रमाणें आपल्या धोड्यास त्यानें किंचित् एकीकडे वळविलें.

इकडे राजाची स्वारी आपल्या मंदिरांतून निघून गेली, असें पहातांच पुनः मुरादेवीची चित्तवृत्ति चमत्कारिक झाली. पुनः " पति कीं, पुत्र ? " असा प्रश्न तिच्या मनास दुःख देऊं लागला. आपण पुत्राला राज्यप्राप्ति व्हावी म्हणून पतिहत्या घडूं देतों, हा अत्यंत नीचपणा आहे. आपलें सौभाग्य नष्ट करून घेऊन—आपल्याच हातानें नष्ट करून घेऊन—पुत्राच्या मस्तकावर राजमुकुट पाहूं इच्छितों हें फार वाईट, अत्यंत निंद्य ! या आर्यावर्तांत अशी दुष्ट स्त्री याच्यापूर्वी जन्मली नसेल, आणि याच्यापुढें जन्मणारही नाहीं, असे विचार तिच्या मनांत येऊं लागले. अजून, अजून आपण शिबिकेंत आरूढ होऊन त्या समारंभाच्या पाठोपाठ जाऊन राजास जागृत करावें; अजून त्याचा प्राण वांचवावा असें तिनें मनांत योजिलें. आणि सुमतिकेला सांगितलें तर ती कदाचित् आपलें ऐकणार नाहीं असें वाटून तिनें वृंदमालेला बोलावून आणून तिला आपल्याकरितां एक शिबिका सिद्ध करून आणण्यास सांगितलें. या वेळीं आपली यजमानीण कोठें जाणार, असें वाटून वृंदमाला क्षणभर तटस्थ उभी राहिली, तों मुरादेवी खसकन् तिच्या अंगावर येऊन तिला म्हणाली, " काय ? माझ्या हातून पतिहत्या व्हावी असा तुमचा साऱ्यांचाच निश्चय झाला आहे काय ? जा. जा. एका क्षणाचा विलंब करशील तर महाराज गेले, सगळं कांहीं नष्ट झालं म्हणून समज. जा. जा. "

तें ऐकतांच बिचारी वृंदमाला फारच भांबावली आणि वेड्यासारखी पळत सुटली. तिनें आपल्याकडून शक्य तितकी जलदी केली आणि शिबिका आणली; परंतु तो थोडा वेळही मुरादेवीला आतोनात वाटून ती संतापली. शेवटीं शिबिकेंत बसून वाहकांस, " महाराजांच्या स्वारींत मला घेऊन चला, " अशी तिनें आज्ञा केली. वाहक आपल्याकडून अति जलद जलद चालले होते; परंतु ही त्यांना आंतून " जलदी चला, पाय उचला, " असें ओरडून सांगतच होती; परंतु इतक्यांत फार विलक्षण असा हाहाकार तिच्या कानीं पडला.

# प्रकरण २७ वें

## स्वतःचा स्वाहाकार.

तो हाहाकार त्या वेळीं मुरादेवीस कल्पांताचाच हाहाकार वाटला. तिला मोठी आशा होती कीं, आपण वेळींच जाऊन पोहोंचूनें आपल्या पतीचें जीवित व आपलें सौभाग्य अगदीं ऐन वेळीं रक्षण करूं. परंतु तो हाहाकार ऐकण्याबरोबर तिची ती आशा पार नष्ट झाली. आपल्या हातांनीं आपण आपलें कपाळ फोडून घेतलें. ज्या वेळीं खरोखर सर्वांचें संरक्षण झालें असतें, जें करणें आपल्या हातांत होतें, त्या वेळीं आपण तें केलें नाहीं आणि आतां अगदीं ऐन वेळीं धावलों म्हणून काय झालें ? जें व्हावयाचें तें होऊन गेलें. त्याखेरीज हा एवढा हाहाकार उठावयाचा नाहीं, असें वाटून ती अगदीं वेड्यासारखी झाली. पुढें जावें, कीं परत जावें आणि आपल्या हातानें आपला प्राण घ्यावा, याबद्दल तिच्या मनाचा निश्चय होईना. इतक्यांत ती शिबिका आणखी पुढें गेली आणि तिच्या कानीं पुढील शब्द पडले. "अमात्य राक्षसाचा जयजयकार !" "अमात्य राक्षसाचा जयजयकार !" ते शब्द ऐकून मुरादेवीला फार आश्चर्य वाटलें, आणि ती विशेष लक्ष्य लावून ऐकूं लागली. तों पुनः तोच ध्वनि—"अमात्य राक्षसाचा जयजयकार असो" ते शब्द ऐकण्याबरोबर प्रथम जें आश्चर्य वाटलें होतें, त्यांत आतां आनंदाची छटा दिसूं लागली. व ती त्या आनंदाच्या भरांत एकदम आपल्याशींच म्हणाली, "एकूण त्या दुष्ट चाणक्याच्या सर्व युक्त्या आणि व्यूह जाणून घेऊन अमात्य राक्षसानें आपला जयजयकार होईल अशा प्रकारचें वर्तन केलें अं ! महाराजांचा जीव वांचविला ! धन्य धन्य अमात्य राक्षसा ! तूं खरोखर धन्य आहेस ! नाहीं तर- मी, प्रत्यक्ष ज्यांनीं माझें पाणिग्रहण केलें, त्यांचा मी द्वेष आरंभला, त्यांच्या जीवावर उठलें, आर्यावर्तांत कोणीं असें कृत्य केलें नसेल-नाहींच-तें कृत्य मीं केलें; परंतु त्यांतून तूं महाराजांचें संरक्षण केलेंस, चाणक्याचे सर्व व्यूह ढांसळून टाकलेस ! ठीक आहे. आतां माझ्या या कृत्याबद्दल मी स्वतःच प्रायश्चित्त घेतें. आतां जीवत्यागाखेरीज दुसरें प्रायश्चित्तच नाहीं. मग आतां मी पुढें तरी कशाला जाऊं ? अशीच इकडच्या इकडे प्राणत्याग करून घेतें म्हणजे सगळ्या पातकांचा आपोआप झाडा दिल्याप्रमाणें होईल. राक्षसानें महाराजांचे आणि इतर सर्वांचे प्राण रक्षण केले असले पाहिजेत आणि म्हणूनच त्याच्या नांवानें एवढा जयजयकार चालला आहे. नाहीं तर त्याच्या नांवाचा जयजयकार कां ? त्या दुष्ट चाणक्याचें तें कपटनाटक आतां बाहेर पडलें

असेल. तो चांडाळ आतां चांगला सांपडला असेल, त्याला शिक्षा झाली, त्याचे प्राण जर महाराजांनीं घेतले, तर त्यांना ब्रह्महत्त्येचें पातक लागण्याऐवजीं एका अत्यंत दुष्ट अशा ब्राह्मणरूपधारी दैत्याचें निर्दलन केल्याचें पुण्यच लागेल. तो माझें नांव घेईल. घेईना. मलाही देहांत प्रायश्चित्त हवेंच आहे. त्या दुष्टाच्या दृष्टीस मी ज्या वेळीं पडलें, त्याच्या मोहमय भाषणांत सांपडून ज्या वेळीं मी आपल्या पतीच्या जीवावर उठलें, त्याच-वेळीं मी महापातकी बनलें, आणि त्याच वेळीं मला देहांत प्रायश्चित्त द्यावयाला पाहिजे होतें; परंतु माझ्या पातकाचे घडे तेव्हां भरले नव्हते. आतां भरले. आतां तरी एकदां प्रायश्चित्त मिळावें, म्हणजे पुनः यांतला अंश राहणार नाहीं." असे नानाप्रकारचे विचार तिच्या मनांत फारच थोड्या अवकाशांत आले. ते येथें वर्णन करून सांगण्यास जितका अवधि लागला, त्याच्या शतांशसुद्धां अवधि ते विचार तिच्या मनांत येऊन जाण्यास लागला नसेल. आतां जलद चालण्याविषयीं त्या शिबिकावाहकांस ती आंतून प्रेरणा करीत नसल्यामुळें ते धीरे धीरे चालले होते; तथापि ते पुढें गेले व तो भयंकर गलबा आणि मधून मधून ते अमात्य राक्षसाच्या जयजयकाराचे शब्द कानीं पडले, तेव्हां साहजिकच प्रथम हाहाकार कसला? आणि आतां अमात्य राक्षसाचा जयजयकार कां? असें वाटून त्यांस जिज्ञासा उत्पन्न झाली व तिनें प्रेरित होऊन ते फार जलद चालूं लागले.

थोडेसे पुढें जातात, तोंच मोठा हाहाकार करीत समोरून पळत पळत येणारे लोक त्यांच्या दृष्टीस पडले. दृष्टीस पडले म्हणण्यापेक्षां अंगास लागले म्हटलें तर विशेष शोभेल. कारण त्या लोकांचा एक लोटचा लोटच येऊन त्या शिबिकावाहकांच्या अंगावर आदळला. बरें तर बरें, ती शिबिकाच उलथून पडावयाची; परंतु ते वाहक खंबीर असल्याकारणानें त्यांनीं तसें होऊं दिलें नाहीं. नुसती शिबिका खालीं ठेवून तिच्या संरक्षणार्थ उभे राहिले; कारण आतां पुढें जाणें त्यांस शक्य नव्हतें, इतका जनसंमर्द त्यांच्या अंगावर येत होता. त्या जनसंमर्दाच्या धक्क्यामुळें मुरादेवी जणूं काय आपल्या विचारभ्रमणांतून एकदम शुद्धीवर आली व त्या शिबिकावाहकांस, शिबिका खालीं कां ठेवलीत म्हणून विचारणार, तोंच एक शिबिकवाहक तिच्याजवळ येऊन तिला म्हणतो, "देवि, इथून पुढें शिबिका नेणं केवळ अशक्य. एखाद्या महासागराप्रमाणें अगदीं क्षुब्ध झालेला हा—जनसंमर्द, त्याच महासागराच्या लाटांप्रमाणें आपल्या अंगावर उसळून येतो आहे. काय झालं म्हणून विचारतां कोणीही उत्तर देत नाहीं. कोणी राक्षसाला शिव्या देत आहेत, कोणी 'काय हा भयंकर संहार!' असं ओरडत आहेत. खरोखर काय आहे कांहींच समजत नाहीं. शिबिका घेऊन पुढें पाऊल घालण्याची कांहीं सोय नाहीं. आपली आज्ञा असली, तर मी पुढें जाऊन काय आहे तें पाहून येतों." 'राक्षसाला शिव्या देताहेत' आणि 'काय हा भयंकर संहार!' हे दोन उद्गार ऐकण्याबरोबर पुनः मुरादेवीला फार चमत्कार वाटला. लोक ज्याअर्थी 'काय हा भयंकर संहार!' असे उद्गार काढीत आहेत, त्याअर्थी चाणक्याच्या व्यूहाप्रमाणें संहार झाला असला पाहिजे. पण मग 'राक्षसाचा जयजयकार,' आपण मघाशीं ऐकला तो कसला? काय करावें! कांहींच समजत नाहीं. "जा, जारे. तूं स्वतः जाऊन काय झालं आहे तें प्रत्यक्ष पाहून मला येऊन सांग. तोंपर्यंत ही शिबिका

येथेंच राहूं दे. तुझे हे सोबती माझं संरक्षण करतील. जा लवकर." असें म्हणून तिनें त्याला लावून दिलें; परंतु तिच्या मनाला आतां कसला विलक्षण अधीरपणा आला होता! तो शिबिकावाहक तेथून सुमारें पन्नास किंवा फार तर शंभर पावलें गेला असेल नसेल, तोंच तो अजून परत कां येत नाहीं, असें वाटून तिनें दुसऱ्या वाहकास, "तो अजून कां आला नाहीं? तूं तरी जाऊन त्याचा शोध काढ आणखी तिकडे काय चाललं आहे तें पाहून ये," असें सांगण्याची सुरुवात केली. "देवि, तो माठा चपलगति आहे, आतां येईल, आपण त्याची चिंता करूं नये," असें त्यानें तिला उत्तर दिलें. परंतु ती कसची ऐकते? "तो आला तरी पण तूंही आणखी जा," असं तिनें त्याला निक्षून सांगितलें. तेव्हां बाकीच्या दोघास, देवीच्या आज्ञेप्रमाणें, 'तुम्हीं आतां दोघेच आहां, तर काळजीनें शिबिका संभाळा,' असें सांगून तोही निघून गेला.

मुरादेवीच्या मनाची चंचलता व अधीरता या वेळीं इतकी कांहीं अतिरेकास गेली होती कीं, तिला आतां आपण करतों आहोंत काय, आणखी बोलतों आहोंत काय, याचें भान मुळींच राहिलें नाहीं. थोडा अवधि झाला नाहीं तोंच ती पुनः त्या आपल्या संरक्षणासाठीं उभ्या राहिलेल्या दोघां वाहकांस म्हणतेः—"आला कारे कोणी? आतां कोणी आला नाहीं, तर मी स्वतःच जाईन. तुम्हीं दोघे माझ्या दोन्ही बाजूंस चालून मला या गर्दीतून काढून न्या म्हणजे झालं. पहा आला का कोणी, नाहीं तर चला ही मी उतरतें. चला." असें म्हणून खरोखरीच ती खालीं उतरली आणि त्यांच्या पाठीमागें लागली कीं, मला या संमर्दांतून घेऊन चला. "आपण या भानगडींत पडूं नका. राजमंदिरांत केवळ मृदुपुष्पांच्या अस्तरणावरून उगीच या खोलींतून त्या खोलींत जाणाऱ्या आपण कोणीकडे, आणखी हा, भयंकर झंझावातानें प्रक्षुब्ध झालेल्या महासागराच्या लाटांसारखा वेगानें येणारा संमर्द कोणीकडे? आपण यांतून पायानें कशा जाणार! कोठें जाणार? तिकडे काय प्रसंग झाला आहे, तो समजूं तरी द्या!"

परंतु नाहीं, मुरादेवी यत्किंचितही ऐकेना. "मी याहूनही भयंकर अशा जनसंमर्दांतून जाईन. तुम्ही नुसते माझ्याबरोबर असा," असें म्हणून ती बाहेर पडली. तिच्या मनांत काय भयंकर विचार चालले होते, याचें आतां वर्णन करून सांगण्यांत मुळींच अर्थ नाहीं. सूर्यास्ताचे वेळीं क्षितिजाजवळ असलेल्या ढगावर त्या अस्तमान होणाऱ्या सूर्याचे किरण पडून जसे त्या आकाशभागाचे रंग क्षणोक्षणीं पालटत जातात, तसेच या वेळीं अनेकविध विकारांनीं तिच्या मनाचे रंग पालटत होते आणि खरोखर मोठ्या उत्सुकतेनें ती चालली होती. तिच्याबरोबरचे शिबिकावाहक तिला सुरक्षितपणें नेण्यास आपणाकडून अत्यंत प्रयत्न करीत होते; तथापि तिला मधून मधून गर्दीचा लोट आला म्हणजे त्रास होतच असे. इतर कोणत्या वेळीं जर मुरादेवी नगरवीथींतून अशी जाती, तर लोकांनीं आपण होऊन दूर दूर होऊन तिला मार्ग काढून दिला असता; परंतु आज दुसरीकडे जो काय प्रकार झाला होता, त्यानें आतां ती सर्व मंडळी केवळ अंधच झाली होती म्हटलें तर चालेल. त्यांच्या तोंडून दुःखाचे, उद्वेगाचे, निराशेचे असे अनेक उद्गार निघत होते, आणि जणूं काय त्या भयंकर देखाव्याच्या जागेपासून जितक्या लवकर आणि जितक्या दूर जावयास सांपडेल, तितकें बरें असें वाटून ते पळत होते. अशा

वेळीं कोणाच्या लक्ष्यांत कोण येणार आहे ? शिवाय मुरादेवी कांहीं मोठ्या थाटानें किंवा लवाजम्यानेंही जात नव्हती.

जातां जातां ती अशा एका जागीं आली कीं, जेथें फारच गर्दी झाली होती. त्या तिच्या दोघां परिचारकांनीं तिला, " महाराज्ञि, येथून पुढें अगदीं पाऊलसुद्धां टाकण्याची सोय नाहीं. तेव्हां आपण परत चला. त्याखेरीज उपयोग नाहीं, " असें विनविलें. परंतु जातां जातां लोकांच्या तोंडून जे उद्गार तिनें ऐकले होते, त्या उद्गारांवरून तिकडे काय भयंकर प्रकार झाला असावा त्याबद्दलचा तिनें तर्क केला होता. त्या तर्काप्रमाणें जर सगळें झालें असेल, तर आपणही त्या गर्तेंत जाऊन पडूं असा तिनें निश्चय केला आणि त्या दोघां वाहकांस मोठीं बक्षिसें कबूल करून असें विनविलें कीं, " मला या जनसंमर्दाच्या पार घेऊन चला. जेथें कांहीं घडलें असेल तेथपर्यंत कसेंही करून घेऊन चला. आतां देऊं केलें आहे त्याच्या दसपट मोठें बक्षिस मी तुम्हांला देईन. अगदीं मुद्दां हयगय करूं नका " असें बजावलें, आणि किंचित् विलोभन दाखविलें, त्यामुळें व त्यांचीही जिज्ञासा अधिकाधिक जागृत झालीच होती, यामुळें त्यांनीं विशेष अवसान धरून तिला पुढें नेऊन पोंचविण्याचें मनावर घेतलें. दोघेही दोहों बाजूंस चालूं लागून व कोपरखळ्यांनीं लोकांस एकीकडे सारीत त्यांनीं तिला पार राजगृहाच्या द्वारापर्यंत नेलें. तों काय भयंकर प्रकार तिच्या नजरेस पडला ! एक मोठी थोरली गर्ता असून तींत कित्येक प्रेतें पडलीं आहेत; व त्यांतून रक्ताचा पूर चालला आहे. त्या गर्तेच्या सभोंवतालीं सैन्यांतील सैनिकांचा पहारा असून कित्येक मोठमोठ्यानें ओरडत लोकांच्या अंगावर धांवून जाऊन त्यांना तेथून घालवून लावीत आहेत. त्या गर्तेंत शवें पडलेलीं पाहण्यावरोबर मुरेचें अंतःकरण पार फाटलें; आणि तिचें सर्वांग थरथर कांपूं लागलें. तिला धड उभें राहवतें कीं नाहीं याची शंका वाटूं लागली. एकदम चक्कर आल्याप्रमाणें झालें. इतक्यांत तिच्याजवळ कोणी आलें आणि तिच्या कानांत एवढेंच कुजबुजलें, " असे देखावे पाहण्यासाठीं स्त्रियांनीं येऊं नये; देवि, तूं फारच धृष्ट ! असा संहार करण्यासाठीं व्यूह रचण्यानंच तुझं समाधान झालं नाहीं. आपण रचलेला व्यूह बरोबर सिद्धीस गेला कीं नाहीं, हें दृष्टीनं पहायला आलीस ! कांहीं हरकत नाहीं. पहा ! तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व गोष्टी झाल्या आहेत. आणखी मौज ही कीं, हा सर्व प्रकार अमात्य राक्षसानं घडवून आणला असाच सगळ्यांचा समज झाला आहे. ऐन गर्तेवर महाराजांचा छबीना येणार तोंच त्यानं तेथून निघून जाण्यासाठीं जी युक्ति योजली, ती फारच उपयोगीं पडली. आतां तूं इथें उभी राहूं नको. आणि मीही राहत नाहीं. "

देवी मुरा अवगुंठनयुक्त होती, तथापि चाणक्यानें तिला ओळखली. ती बहुतकरून तेथें येईल असा त्यानें आपल्या नेहमींच्या चातुर्यानें तर्क केला होता, यामुळें त्यानें तिला त्वरित ओळखलें असावें. तसें ओळखलें म्हणूनच तो तिच्या अगदीं जवळ गेला. आपण जेथें आहोंत, त्या स्थानाच्या जवळपास लोक असतील त्यांना खूप दूर करण्यास तेथील पहारेकऱ्यांस खूण करून तो तिच्याजवळ गेला आणि वर सांगितल्याप्रमाणें तिच्या कानांशीं कुजबुजला. चाणक्य आपल्याकडून अगदीं हळूच कुजबुजला; परंतु त्याचा आवाज तिनें ओळखला व तिला एकदम संताप आला. ती लाल झाली. तिला तो आपला संताप बिलकुल आवरेनासा होऊन त्याच्या अंगावर खस्कन् येऊन त्याला म्हणते, " दुष्टा, आजपर्यंत आर्य स्त्रीनं जें

पातक मनांतसुद्धां आणलं नाहीं, तें तूं माझ्या हातून करवलंस. आतां वेहेत्तर आहे माझं आणि माझ्या पुत्राचं कांहीं झालं तरी; पण मी खरा प्रकार मोठ्यानं आरडून सगळ्या जगाला सांगतें आणि मीही या गर्तेंत उडी घालून प्राण देतें. हीच मला शिक्षा, हेंच मला प्रायश्चित्त, आणि लोकांना खरा ार कळला, म्हणजे तुला आणखी ज्याला तूं हातीं धरला आहेस त्या माझ्या पुत्रालाही ते योग्य शासन करतील. आणि तसं त्याला शासन झालं, म्हणजे माझ्या दुष्टेच्या पोटीं आल्यानं घडलेल्या त्याच्या पातकाचं क्षालन होईल. "

इतकें बोलून तिनें आपल्या मुखावरून अवगुंठण काढलें. त्या वेळीं ती एखाद्या क्रूर देवतेप्रमाणें दिसली आणि एकदम तार स्वर काढून म्हणते, " लोकहो ऐका ! हा अत्यंत अत्यंत दुष्ट प्रकार अमात्य राक्षसाकडून झालेला........."

परंतु आर्य चाणक्यानें खूण केल्याकारणानें म्हणा किंवा तेथल्या पहारेकऱ्यालाच त्यांत कांहीं तरी भयंकर वाटलें म्हणून म्हणा, तिला मागें हटविण्यासाठीं तो तिच्या अंगावर चालून गेला. ती मागें हटेना, तोंही ऐकेना. इतक्यांत तिनें असें पाहिलें कीं, आपल्यास तेथून उचलून नेण्याची खूण चाणक्यानें केल्यावरून दोन चार भिल्ल त्या गर्दीतून आपल्या अंगावर धांवून येत आहेत. आपल्यास जर का यांनीं आतां धरून कोठें नेलें, तर आपण पुन: मोहांत गुंतूं, चाणक्याच्यापुढें आपलें कांहीं चालावयाचें नाहीं, त्यापेक्षां या वेळीं आपल्या हातून झालेल्या अत्यंत गर्ह्य अशा पातकाचें क्षालन करण्यासाठीं आपण या गर्तेंत उडी टाकून प्राण द्यावा तेंच चांगलें. तेंच खरें प्रायश्चित्त. असा विचार करून ती एकदम त्या गर्तेच्या कांठावर गेली, आणि " दुष्टा चाणक्या, या पातकामुळें तूं जन्मोजन्मीं दुःख होशील. मी तर सतीचं वाण घेऊनच या गर्तेत उडी घालतें, " असें म्हणून तिनें उडी टाकली.

गर्ता फार खोल होती आणि वरून जो कोणी खालीं पडेल त्याचा निकाल लावण्यास चाणक्यानें आंत भिल्ल ठेविलेले होते; तथापि मुरादेवीला गतप्राण करण्यास कोणाचीही जरूर लागली नाहीं. तिचा देहांतप्रायश्चित्त घेण्याचा निश्चय पाहून परमेश्वरानेंच तो पार पाडला.

वरील हाहाकार होण्याच्यापूर्वी थोडा वेळ अमात्य राक्षस एकाएकीं निघून गेला, हें वाचकांच्या लक्ष्यांत आहेच. त्यास जी कोणीं चिठ्ठी आणून दिली होती, तींत एवढेंच लिहिलेलें होतें कीं, " आपण या समारंभांत गुंतलां आहां, परंतु नगराला पर्वतेश्वरानें वेढा दिला त्याची काय वाट ? " ती पत्रिका वाचतांच हें काय लचांड आहे तें आधीं पाहिलें पाहिजे; महाराजांची स्वारी आतां चालली आहे, तेव्हां ती राजसभेंत पोंचेलच असा साहजिक विचार राक्षसाच्या मनांत येऊन तो तेथून पर्वतेश्वर केव्हां आला, कसा आला याच्या शोधाकरितां गेला. राक्षस जाऊन पाव किंवा अर्धी घटका झाली असेल नसेल तोंच राजगृहाच्या द्वाराजवळ केलेल्या तोरणाचे खालीं व चंदनदासाच्या घरांतून खणीत खणीत आणून तयार करून ठेविलेल्या गर्तेच्या मुखावर स्वारी येऊन दाखल झाली. दोनही हत्तींसकट सर्व नंद त्या गर्तेत गेले. तेथें चाणक्यानें आधींच तयार करून ठेविलेल्या भिल्लांनीं ते नऊही नंद आपल्या हातच्या तलवारींनीं कापले, त्यांची कत्तल केली आणि चाणक्यानें शिकविल्याप्रमाणें, ताडानें " अमात्य राक्षसाचा जयजयकार असो " असें ते ओरडूं लागले. गर्तेच्या सभोंवतीं आणखी तसेच भिल्ल होते,

त्यांनींही त्याच जयजयकाराचा प्रतिध्वनि केला. अर्थातच हा सर्व कृष्णव्यूह अमात्य राक्षसानें केला असला पाहिजे, आणि आपण त्यांत नाहीं असें दाखविण्याकरितां तो तेथून अर्धी घटका आधींच निघून गेला असें लोकांच्या मनानें घेतलें. ज्यांस असें ठाऊक होतें कीं, राक्षसानेंच राजास मुरादेवीच्या मंदिरांतून बाहेर काढलें, त्याच्याच आग्रहावरून राजा बाहेर पडला, त्यांच्या मनानें तर असें पक्कें घेतलें कीं, राजघाताचें व हें राजकुलाच्या घाताचें कृष्णकारस्थान राक्षसाचेंच होय. असें व्हावें एवढ्याच हेतूनें चाणक्यानें खोटी पत्रिका राक्षसाच्या हातीं पोहोंचवून त्यास त्या वेळीं तेथून काढून नेलें आणि गर्तेत पडलेल्या नंदवंशाची कत्तल करणाऱ्या भिल्लांस राक्षसाचा जयजयकार करण्यास सांगितलें होतें; परंतु राक्षसावर हा वृथारोप घातल्यानें चाणक्याचा कार्यभाग होत नव्हता; त्याला जो कार्यभाग साधावयाचा तो पुढेंच होता. तो कार्यभाग हा कीं, राक्षसानें पर्वतेश्वराला पाटलिपुत्राचें राज्य देण्यासाठीं नंदवंशाचा घात केला व पाटलिपुत्रास पर्वतेश्वराकडून वेढा देवविला; परंतु चंद्रगुप्तानें तें अरिष्ट टाळण्यासाठीं जीवापाड श्रम केले. नंदवंशाचे इतर पुरुष-नऊचे नऊही पुरुष मृत्युमुखीं पडले, तरी त्यानें त्या वंशाची लाज राखिली. त्यानें पर्वतेश्वराला पराभूत केला आणि पाटलिपुत्राचें रक्षण केलें. असें लोकांस वाटावें हें साध्य व्हावें म्हणून चाणक्यानें आपल्या भिल्लांची दुसरी एक टोळी शस्त्रास्त्रांनीं युक्त अशी सिद्ध करून ठेविली होती, तिला असें सांगून ठेविलें होतें कीं, गर्तेत पडलेल्या लोकांचा संहार होत आला म्हणजे " कुमार चंद्रगुप्ताचा जयजयकार असो ! " अशी गर्जना करीत वरच्या भिल्लांनीं त्या गर्तेत उड्या मारून आंतल्या भिल्ल लोकांपैकीं कांहींना जखमी करावें व कांहींना पळावयास लावावें. असें झालें म्हणजे चंद्रगुप्तानेंच या वेळीं बाजू राखिली, नाहीं तर राक्षसाच्या गुप्त कृष्णकारस्थानानें सर्व पाटलिपुत्राचा संहार झाला असता असें लोकांस वाटावें.

चाणक्याचा हा हेतु कसा काय सिद्ध झाला हें पुढें कळेल.

# प्रकरण २८ वें.

## पर्वतेश्वरास पकडलें.

पर्वतेश्वरास राक्षसाचें–म्हणजे राक्षसाच्या मुद्रेचें–पहिलें पत्र गेल्यापासून तो अगदीं आनंदित झाला होता. ग्रीक यवनांचा बादशाहा शिकंदर यानें हिंदुस्थानांत स्वाऱ्या करून ज्या राजांस पादाक्रांत केलें व पुढें आपलें मांडलिक म्हणून त्यांचें जुनें राज्य त्यांस करूं दिलें, अशा राजांपैकीं हा एक मुख्य राजा होता. अर्थातच पाटलिपुत्राचे नंदराजे याचा फार द्वेष करीत. म्लेच्छांचा–यवनांचा मांडलिक, आणि त्याच्या सैन्यांत म्लेच्छ, यवन वगैरे लोक होते, म्हणून त्यासही नंदराजे म्लेच्छच समजत. हे सर्व राजे म्लेच्छांचे मांडलिक झाले, परंतु आपण अद्यापि स्वतंत्र राहिलों आणि आर्यांचें आर्यत्व-श्रेष्ठत्व-राखिलें याबद्दल नंदराजांस मोठा अभिमान वाटत असे. या अभिमानाचा परिणाम अर्थातच असा झाला कीं, पर्वतेश्वरासारखे राजे त्यांचा अत्यंत द्वेष करूं लागले, त्यांना त्यांचा मत्सर वाटूं लागला. कांहीं तरी प्रसंग होऊन आपण या नंदांचा–यांच्या आर्यत्वाबद्दलच्या अभिमानाचा नक्षा उतरला पाहिजे, ही आकांक्षा त्यांना झाली. अशा स्थितींत राक्षसासारखा अमात्यश्रेष्ठ आपण होऊन फितुर झाल्यानंतर आणखी काय पाहिजे ? पर्वतेश्वराचा आनंद गगनांत माईना. त्यानें राक्षसास कांहीं उत्तर पाठविलें, पुनः त्याचें उत्तर आलें, आणि पुनः एक पत्र येऊन त्या पत्रांत स्पष्टपणें असें लिहिलें होतें कीं, "अमुक दिवशीं अमक्या वेळेच्या सुमारास आपण थोड्या सैन्यानिशीं येऊन पाटलिपुत्राला वेढा दिला म्हणजे झालें. आपण फार सैन्य आणूं नये. मगधाच्या हद्दींत आल्यानंतर लोक घाबरतील, एवढ्याकरितां असें सांगावें कीं, आम्ही राजा धनानंदाच्या आमंत्रणावरून चार दिवस जात आहों. आपल्याबरोबर सैन्य थोडें असलें, आणि त्या सैन्यानें मार्गांतील मगध प्रजेस कांहीं उपसर्ग केला नाहीं, म्हणजे लोक निःशंक राहतील. इकडे माझें सर्व सैन्य तयार आहेच; सेनापति भागुरायण आपल्याला पूर्णपणें अनुकूल आहे. हां हां म्हणतां आपण आंत येऊन सिंहासन स्वाधीन करून घ्याल अशी योजना झाली आहे. नंदाचा वंशवृक्ष समूळ, सशाख, सांकुर उन्मळून पडेल–नष्ट होईल–एका क्षणांच नष्ट होईल अशी उत्तम व्यवस्था केली आहे. अधिक लिहिण्यास या वेळीं अवसर नाहीं. ही वेळ फार मोलाची आहे. आपण घालविली, तर माझा नाश होईल आणि आपला लाभ जाईल. साधली तर मी आपलें–गुणग्राहक अशा चक्रवर्ती राजाचें–साचिव्य करायला सिद्ध आहेंच आणि मगध देशाच्या प्रजाजनांला धनानंदाच्या त्रासांतून सोडविल्याचं श्रेय मिळून आपण चक्रवर्तित्व पावाल. ही लेखनमर्यादा !"

नंदाची मानहानि करून मगधाचें चक्रवर्तित्व मिळवूं इच्छिणारा पर्वतेश्वर अर्थातच फार आनंदला, आणि त्याला या दुसऱ्या पत्राच्या सत्यतेची शंका सुद्धां न वाटतां त्यानें एकदम राक्षसाच्या पत्रीं लिहिल्याप्रमाणें करण्याचा निश्चय केला. शिवाय पत्र अशा बेतानें त्यास पोंचलें होतें कीं, तर्कवितर्क किंवा शंकाविशंका काढीत बसून वेळ व्यर्थ घालविण्यास अवधिच नव्हता. त्वरा केल्यास राज्यप्राप्ति-अर्थात् इतक्या वर्षांचा मनांतील हेतु सिद्ध होणार. न केल्यास संधि जाणार. अशा प्रसंगीं त्वरा करण्याखेरीज तो दुसरें काय करणार ? राक्षसानें लिहिलेंच होतें कीं, मगधाचें सैन्य व सेनाधिपति भागुरायण आपल्यास पूर्णपणें अनुकूल आहे. तेव्हां आपण आपल्याबरोबर फार सैन्य नेलें पाहिजे असें नाहीं. आंतील लोकांना धा.. बसेल इतक्या बेताचें सन्य नेलें म्हणजे झालें. भागुरायणाच्या साहाय्यानें आपला कार्यभाग सहज होईल. प्रजा ही काय अगदीं गाईप्रमाणेंच असते. एका धन्यानें सोडून दिल्यावर दुसरा धनी बांधीपर्यंत काय धडपड करील तेवढीच. असा मोठा पोक्त विचार करून पर्वतेश्वरानें आपल्याबरोबर फारसा फौजफांटाही घेतला नाहीं. पाटलिपुत्रांत येऊन पोंचपर्यंतच्या मगध प्रांतांतील लोकांस त्यानें असें सांगितलें कीं, कांहीं सल्याच्या गोष्टी करण्याकरितां धनानंदमहाराजांनीं बोलावल्यावरून आपण थोडें सैन्य घेऊन जात आहों. मार्गांत लोकांस मुळींच त्रास झाला नाहीं, यामुळें अर्थातच लोकांस कसलीच शंका आली नाहीं. पर्वतेश्वरास त्वरित व निर्विघ्नपणें येण्यास सांपडलें.

ज्या पत्राच्यायोगानें मूढ पर्वतेश्वर एवढ्या त्वरेनें धांवत येऊन पाटलिपुत्राला वेढा देऊन बसला, तें पत्रही आर्य चाणक्यानेंच राक्षसाच्या नांवानें तयार करून पाठविलें होतें, हें चतुर वाचकांनीं ताडलेंच असेल. पत्रावर पूर्वींप्रमाणेंच राक्षसाची मुद्रा वगैरे सर्व प्रकार होता आणि पर्वतेश्वराचे हातीं तें अशा वेळीं आलें कीं, त्यास रिकाम्या शंका काढून वेळ घालविण्यास फुरसत नव्हती. एक पत्राप्रमाणें करावयाचें तरी किंवा संधि दवडावयाची तरी; परंतु फार दिवसांची मनीषा तृप्त होण्याची वेळ आली असतां ती कोण वायां जाऊं देईल ? पर्वतेश्वरानें वर सांगितल्याप्रमाणें ससैन्य येऊन पाटलिपुत्रास वेढा दिला आणि भागुरायण आंतून सैन्य घेऊन येऊन आपल्यास पाटलिपुत्रांत घेऊन जाईल व राक्षस आणि तो आपला जयजयकार करीत आपल्याला सिंहासनावर नेऊन बसवितील अशी वाट पहात बसला. बिचाऱ्यास मोठी आशा लागून राहिली होती; परंतु त्याची एकदम मोठी निराशा झाली. पाटलिपुत्राच्या तटांवरून त्याच्या सैन्यावर एकदम मारा सुरू झाला. आपल्यास साहाय्य म्हणून सैन्य येण्याचें एके बाजूसच राहून पाटलिपुत्राच्या तटांवरून आपल्यावर, बाणांचा, शतघ्नींचा, भुशुंडींचा, त्याचप्रमाणें यंत्रें आणि महायंत्रें यांच्यापासून विमुक्त झालेल्या अश्मवृष्टीचा एकसारखा मारा सुरू झालेला पाहून पर्वतेश्वर व त्याचे लोक पार गांगरून गेले. अमात्य राक्षसानें आपल्यास विश्वास देऊन असा घात केला काय ? मी त्याच्या राजाचा द्वेष करतों व मगधाचें राज्य घेऊं इच्छितों, म्हणून त्यानें अशा तऱ्हेनें मजवर सूड उगवला काय ? असें मनांत येऊन पर्वतेश्वरास आपल्या भोळेपणाबद्दल फार वाईट वाटलें. अमात्य राक्षस म्हणजे मोठा स्वामिभक्त ! तो आपण होऊन एकाएकीं स्वामिद्रोह करूं लागला आणि त्यानें आपल्यास अशा तऱ्हेनें आमंत्रण पाठविलें, तेव्हांच शंका यावयास पाहिजे होती. ती शंका दूर करण्यासाठीं आपण

वाटेल ते प्रयत्न करून आपले हेर पाठवून खरा प्रकार काय आहे तो जाणायला पाहिजे होता; परंतु तो आपण जाणून घेण्याचा कांहीं सुद्धां प्रयत्न केला नाहीं, हा आपला केवढा उथळपणा! राक्षसासारखा खरा स्वामिभक्त एक तर असलीं पत्रें लिहील काय? त्यानें तीं लिहिलीं तरी खरीं का, असें मनांत येऊन आपण आपल्या मनाची खात्री करून घ्यावयास पाहिजे होती; परंतु आपल्यास कांहीं शंका आली नाहीं. थोडीबहुत आली ती आपण मूर्खपणाची म्हणून दूर सारून दिली. एतावता ठरल्याप्रमाणें करून आपण हें विलक्षण संकट आपल्या हातानें आपल्यावर ओढून आणलें. याला काय म्हणावें? असे पश्चात्तापाचे अनेक विचार मनांत येऊन पर्वतेश्वरास फार वाईट वाटलें. त्यांतून त्याला विशेष वाईट वाटण्याला कारण हें कीं, तो अपुऱ्या सैन्यानिशीं आला होता. कारण पाटलिपुत्रांतून आपल्याला साहाय्य येणार अशी त्याची पूर्ण अपेक्षा होती. तो जर लढाईच्या तयारीनें, मगध सैन्याशीं झुंजण्याच्या तयारीनें आला असता, तर फार निराळ्या प्रकारच्या तयारीनें आला असता. परंतु तो आला तो केवळ अशा भरंवशावर आला कीं, आपण पाटलिपुत्राला वेढा देण्याचें नुसतें सोंग करावयाचें, लागलींच आपला जयजयकार होत, पाटलिपुत्राच्या—मगध देशाच्या—सिंहासनावर आपली स्थापना होऊन आपण मगधमहाराजाधिराज होणार! तें सर्व एकीकडे राहून वर सांगितल्याप्रमाणें अगदीं अनपेक्षित असा शस्त्रास्त्रांचा भडिमार सोसण्याचा, नव्हे सोशीत पळून जाण्याचा अत्यंत दुर्धर व लज्जेचा प्रसंग आला. प्रथम कांहीं वेळ कांहीं भ्रांति असेल, लवकरच हा भडिमार बंद होईल, असें समजून त्यानें आपल्या सैन्यास धीर देऊन तोंड दिलें; परंतु तसें तोंड कोठपर्यंत टिकणार? लागलींच पाठी फिरवून सैन्यानें आपले प्राण वांचविण्याचा उद्योग आरंभिला. जोंपर्यंत कोणत्याही पक्षाचें सैन्य पाठ फिरवून पळूं लागलें नाहीं, तोंपर्यंत त्याची कांहीं तरी रया रहाते; परंतु एकदां का एकानें आपल्या प्रतिपक्ष्याला पाठ दाखविली; कीं मग त्या पळपुट्या पक्षाचे हाल कुत्रेंसुद्धां खाईनासे होतात. तशीच स्थिति पर्वतेश्वराच्या सैन्याची व त्याची स्वतःची झाली. सैन्यानें पाठ फिरवून पलायनास सुरुवात केली मात्र, तों पाटलिपुत्राच्या वेशीचे दरवाजे खडाखड उघडून त्यांतून भागुरायणाचें सैन्य बाहेर पडून पर्वतेश्वराच्या सैन्याच्या पाठीमागें लागलें. या सैन्याच्या अगदीं पुढें तोंडावर चंद्रगुप्त होता आणि तो मोठ्या वीरश्रीनें आपल्या सैन्यास शत्रूंचा पाठलाग करण्यास हुकूम करीत होता. चंद्रगुप्त या वेळीं फारच विलक्षण दिसत होता. त्याचें सर्वांग—नव्हे रोमरोमांच म्हटलें तरी चालेल—वीरश्रीनें स्फुरण पावत होतें. त्याची दृष्टि इतकी चंचल झाली होती कीं, ती जणूं काय सर्वव्यापी होण्यास प्रयत्न करीत आहे. शत्रु कोणत्या बाजूनें पळत आहे आणि आपण त्यास अडविण्यास कोणत्या बाजूनें प्रयत्न केला पाहिजे याचा जणूं काय क्षणार्धांत—एकवार आपले ते विशाल व तेजस्वी नेत्र सर्वत्र फिरवून त्यानें निश्चय केला, आणि आपल्या सैन्यास हुकूम सोडला. त्याबरोबर सर्व सैन्य त्याच्या आज्ञेप्रमाणें शत्रूचा पाठलाग करूं लागलें. पाठलाग होता होतां शत्रु अगदीं हताश होऊन थोडे थोडे कैद करतां येऊं लागले. थोड्या अवधींत पर्वतेश्वराच्या सैन्याचा बराचसा भाग चंद्रगुप्ताच्या व भागुरायणाच्या ताब्यांत सांपडला. परंतु पर्वतेश्वरास स्वतःस कैद केल्याखेरीज चंद्रगुप्तास मुळींसुद्धां संतोष होणें शक्य नव्हतें. अर्थातच बाकीच्या सैन्याचा समाचार

घेण्यास भागुरायणास सांगून चंद्रगुप्तानें स्वतः पर्वतेश्वराचा पाठलाग चालविला. एवढ्या राजास तूं पकडून आणशील, तर तुझी पाटलिपुत्राच्या सिंहासनावर अगदीं पक्की प्रतिष्ठापना झाली म्हणून समज; आणि पर्वतेश्वराला धरून आणशील तरच मला पुनः तोंड दाखवायला ये, नाहींपेक्षां येऊं नको, असें चाणक्यानें चंद्रगुप्तास निक्षून सांगितलें होतें. अर्थातच चंद्रगुप्तास विलक्षण अवसान आलें होतें.

अगदीं अकस्मात् नंदाचा नाश झाला, त्यांच्या वंशवृक्षाचा एकही अंकुर राहिला नाहीं, हें पाहून चवताळलेले लोक, राक्षसाचा संशय घेऊन कितीही संतापले, तरी चंद्रगुप्तासारख्या अगदीं त्रयस्थ राजकुमाराला एकदम सिंहासनावर अधिष्ठित होऊं देणार नाहींत. या वेळीं त्याच्या हातून कांहीं तरी अलैकिक कृत्य करवूनच त्याला नगरांत आणलें पाहिजे आणि मगधांचा पूर्ण वैरी. जो मगध देश आक्रांत करण्यासाठीं आला होता, त्याला कैदी करून आणण्याहून आणखी अलैकिक कृत्य तें कोणतें असणार ? तेंच चंद्रगुप्ताच्या हातून करविण्यासाठीं एवढा थोरला-पर्वतेश्वराला राक्षसाच्या नांवावर खोटीं पत्रें पाठवून— खटाटोप केला आणि चंद्रगुप्तास निक्षून बजावून पाठविलें. भागुरायणाचें त्यास साहाय्य होतेंच. आणि चंद्रगुप्ताची महत्त्वाकांक्षा पूर्णपणें उद्दीप्त झाली होती. यामुळें त्यानेंही आपल्याकडून शत्रूचा पाठलाग करण्याची शिकस्त केली. शेवटीं मगधदेशाच्या व पर्वतेश्वराच्या राज्याच्या सरहद्दीच्या थोडें अलीकडे पर्वतेश्वरास चंद्रगुप्तानें गांठलें आणि दोघांच्याही सैन्याची चकमक उडाली. या चकमकींत चंद्रगुप्तानें फार विलक्षण शौर्य व चातुर्य दाखवून आपल्या शत्रूचा पराभव केला आणि त्यास कैद केलें. पर्वतेश्वरानें पुष्कळ खंडणी देण्याचें कबूल केलें, तहाचें बोलणें चालविलें, परंतु व्यर्थ ! चंद्रगुप्तास त्याला सोडणें मुळींच इष्ट नव्हतें. आपल्या गुरूला जणूं काय पहिलीच गुरुदक्षिणा म्हणून पर्वतेश्वरास त्याच्यापुढें नेऊन उभा करावयाचा होता. शिवाय राक्षसास फितुर करून ज्यानें सर्व नंदांचा संहार केला, तो हा म्लेच्छ राजा पहा मी धरून आणून तुमच्या नगरांतून तुमच्या समोरून हिंडवतों आहें, असें मगधांतल्या लोकांस दाखवावयाचें होतें. तेव्हां तो पर्वतेश्वराच्या खंडणीच्या किंवा तहाच्या बोलण्यास थोडाच मान्य होणार होता ! त्यानें त्याचें बोलणें मुळींच न ऐकतां त्याला आपल्याबरोबर पाटलिपुत्राकडे चालविलें.

पर्वतेश्वर अत्यंत लाचार झाला. अर्थातच मुकाट्यानें शत्रूच्या सैन्यांतील कांहीं शिपायांच्या पहाऱ्यांतून स्वारी चालू झाली. या वेळीं त्याच्या मनास किती प्रकारें पश्चात्ताप झाला. आपण विश्वासानें-विचार न करितां केवळ अंधविश्वासानें-राक्षसाचें लिहिणें खरें मानून पाटलिपुत्रावर चालून गेलों. राक्षसानें आपल्यास फुसलावून आपला विश्वासघात करण्याकरितां तर आपल्याला त्या पत्रांनीं भुरळ घातली नसेलना, असें आपल्या मनांतसुद्धां कसें आलें नाहीं ? दुष्टा राक्षसा, तुझ्याबद्दल माझ्या मनांत फार मान, फार पूज्यभाव म्हणूनच मी फसलों. पण त्याच्याबद्दल मान कां ? तो फार मोठा स्वामिनिष्ठ म्हणूनना ? तो स्वामिनिष्ठ म्हणून जर इतका मान, तर त्यानें स्वामिद्रोहाचीं पत्रें लिहिलेलीं पाहून तो मान राहिला कसा ? अर्थात् माझ्या मूर्खपणाच्या लोभामुळें, दुसरें कांहीं नाहीं. मला हा फाजील लोभ नसता, तर मी असा फसतोंना. पण आतां त्याचा काय विचार ? असें आपल्या स्वतःलाच प्रश्न करीत व उत्तरें देत तो मुकाट्यानें चालला होता. परंतु त्याल

मग्येच अशी इच्छा झाली कीं, चंद्रगुप्तास एकवार प्रश्न विचारून आपल्यास असें फसविण्यांत राक्षसाचा हेतु काय, हें विचारावें; त्याप्रमाणें त्यानें विचारलें. परंतु चंद्रगुप्तानें त्यास एवढच शिताफीनें उत्तर दिलें कीं, " राक्षस फार चतुर व स्वामिभक्त मुत्सद्दी. त्याचे विचार आह्मांला काय समजणार ? " आणि तेंही उत्तर अशा प्रकारानें दिलें कीं, पर्वतेश्वरानें आणखी कांहीं प्रश्न म्हणून विचारूं नयेत. त्यास कांहीं प्रश्न विचारण्यास उत्साहच वाटूं नये. चंद्रगुप्तानें तसें उत्तर देण्याचें कारण त्यास खरें तर बोलावयाचें नव्हतें. खरें बोलावयाचें म्हणजे, " तुला येथें आणण्यांत राक्षसाचें अंग कांहीं नव्हतें, तुला दुसऱ्यानेंच फसवलें, " असें सांगणें जरूर होतें. परंतु असें त्याला कळूं देणें मुळींच इष्ट नव्हतें. बरें, सर्व कांहीं राक्षसानें केलें असें बोलून त्याला आणखी फसविण्याचें चंद्रगुप्ताच्या मनांत येईना. चाणक्य आपला गुरु, त्यानें आपल्यास आपल्या जनकजननीप्रमाणेंच वाढविलें व आपलें पूर्ण कल्याण होऊन आपल्याला राज्यावर बसवावें या हेतूनेंच त्यानें सर्व कारस्थानें चालविलीं आहेत, हें त्यास ठाऊक होतें; परंतु त्याच्या त्या कारस्थानांचें अत्यंत कृष्णत्व त्यास अगदीं सुद्धां बरें वाटत नव्हतें. तथापि एखादा बाप जीं कांहीं कृत्यें करतो तीं मुलास मुळींच आवडत नाहींत; परंतु बापाच्या विरुद्ध ' ब्र ' सुद्धां काढण्याचें त्याच्या मनांत येत नाहीं, किंवा तसें विरुद्ध बोलणें म्हणजे पितृद्रोहाप्रमाणेंच होणार आहे, असें त्यास वाटतें, तशीच या वेळीं चंद्रगुप्ताची स्थिति होती. चांगलें काय आणि वाईट काय हें पाहण्याचें त्याचें काम नव्हे. चाणक्य सांगेल त्याप्रमाणें वागावयाचें हें त्याचें काम. चाणक्य अशाच प्रकारें त्यास वागवी आणि चंद्रगुप्तही अशाच प्रकारें वागे. पर्वतेश्वरास पकडून आणलेंस म्हणजे त्याच्याजवळ कांहींएक बोलूं नकोस; त्यानें कांहीं प्रश्न विचारले, तर उडवाउडवीचीं उत्तरें दे, असें चाणक्यानें चंद्रगुप्तास बजाविलें होतें, आणि चंद्रगुप्त त्याप्रमाणेंच वागला.

चंद्रगुप्त पर्वतेश्वरास कैद करून आणतो कीं काय इकडे चाणक्याचे डोळे लागले होते. आणि त्याच्या हेरांनीं येऊन ती सुवार्ता त्यास सांगतांच त्याच्या आनंदास अगदीं पारावार नाहींसा झाला. त्याला मोठी धन्यता वाटली. आणि तो एकदम उठला व आतां चंद्रगुप्तास मोठा जयघोष करीत पाटलिपुत्रांत आणण्यास आणि त्याच्या नांवाची द्वाही पिटविण्यास काय काय योजना करावी या विचारास लागला.

---

# प्रकरण २९ वें.

## राक्षस चकित होतो.

पर्वतेश्वरास चंद्रगुप्तानें पकडलें, आणि कैद करून आणलें, यायोगानें आतां आपले सर्व हेतु उत्तम प्रकारानें साधून आपण कृतकृत्य झाला असें चाणक्यास वाटलें व पुढें आतां काय व्यवस्था करावयाची त्यासंबंधानें तो विचार करूं लागला, हें मागील प्रकरणीं सांगितलेंच आहे. चंद्रगुप्ताला मोठ्या थाटामाटानें कुसुमपुरांत आणावयाचा व त्याच्यापुढें त्या कैद केलेल्या पर्वतेश्वरास मिरवावयाचा, हें तर त्यानें ठरविलेंच होतें. त्याप्रमाणें सर्व नगरांत त्यानें चंद्रगुप्ताच्या नांवाचा जयजयकार करवून उद्घोषकांकडून असा मजकूर जाहीर करविला कीं, " महाराज धनानंदांचा व त्यांच्या पुत्रांचा कोणा दुष्टानें घात करविला, आणि ती संधि साधून पर्वतेश्वर ससैन्य येऊन पाटलिपुत्रास वेढा देऊन नगरावर हल्ला करण्याच्या तयारींत होता. इतक्यांत चंद्रगुप्तानें आपल्या पित्याच्या व बंधूंच्या मरणाचा सूड उगविण्याची प्रतिज्ञा करून सेनापति भागुरायणाच्या साहाय्यावांचून पर्वतेश्वरावर हल्ला केला व त्या हल्ल्याच्या तडाख्यानें भेदरून गेलेला पर्वतेश्वर आपल्या लोकांसकट पळून जात असतां त्यास पकडून खेंचून कैद करून आज कुसुमपुरांत येणार आहे. पर्वतेश्वर हा ग्रीक यवनांचा मांडलिक. मूळचा आर्य असून त्यानें त्या लोकांची गुलामगिरी पत्करिली आहे इतकेंच नव्हे, तर आपण जसें आपलें स्वातंत्र्य गमावून म्लेच्छांची गुलामगिरी पतकरिली, तशीच नंदांनीं आपली गुलामगिरी पत्करावी, म्हणजे म्लेच्छांच्या गुलामांचे गुलाम व्हावें, या दुष्ट बुद्धीनेंच त्यानें कुसुमपुरांत फंदफितुरी करून नंदांचा एकदम घात करण्याचा व या आपल्या दिव्य नगरावर घाला घालण्याचा कावा केला. त्या त्याच्या काव्याबद्दल त्याला काय शिक्षा करावयाची, ती राजाधिराज चंद्रगुप्त महाराज तर करतीलच; परंतु त्याला या नगरांतून कोण फितुर झाला, याबद्दल पूर्ण चौकशी करून त्या फितुरालाही योग्य–म्हणजे देहांत–प्रायश्चित्तच देण्याचा त्यांनीं अगदीं निश्चय केला आहे. तरी एवढें शौर्य करून व नंदांच्या अकालमृत्यूबद्दल सूड उगवून आलेल्या राजपुत्राचें–आतां महाराजांचें–सर्वांनीं मोठ्या जयघोषानें स्वागत करावें. " उद्घोषकांकडून असा उद्घोष करविला, आणि कारागिरांकडून ठिकठिकाणीं तोरणें उभारविलीं. शिवाय अनेक लोकांकडून गुढ्या उभारविण्याचीही तजवीज केली. ' गतानुगतिको लोकः ' या न्यायानें अर्थातच गुढ्या उभारण्याचें कार्य संगळ्या नगरभर सहजगत्या झालें. परंतु ह्या समारंभाची तयारी करण्यास व चंद्रगुप्तास नगरांत प्रवेश करण्यास अवकाश आहे, तों-

पर्यंत आपण अमात्य राक्षसाची हालहवाल काय आहे ती पाहूं.

तो धनानंदाच्या स्वारीबरोबर चालला असतां त्याला एकाएकीं वाटेंत कोणी चिठ्ठी आणून दिली. ती पहाण्याबरोबर राक्षस तेथून एकदम निघून गेला, हें वाचकांस आठवत असेलच. पर्वतेश्वर पाटलिपुत्राला एकदम वेढा घालतो, याचा अर्थ काय? इतका धीटपणा त्याच्या अंगीं एकदम कसा आला? आपण आपल्याकडून अगदीं विश्वस्तपणें महाराजांच्या स्वारीच्या व्यवस्थेंत, आणि त्यांना एकदां मुरेच्या महालांतून काढलें या आनंदांत असतां एकाएकीं हा भयंकर प्रकार झाला याचा अर्थ काय? आपण सर्व त्रिभुवनांतील बातमी काढण्यांत चतुर असा बाणा बाळगीत असतां आपल्या कानीं यांतलें एक अक्षरसुद्धां कसें आलें नाहीं! याबद्दल तो आश्चर्यचकित होऊन जितक्या लवकर चालवेल तितक्या लवकर चालून, काय आहे त्याचा शोध करीत होता. तों त्याला असें कळलें कीं, आपली सर्व सेना पर्वतेश्वराच्या अंगावर तुटून पडण्यासाठींच कीं काय अगदीं सज्ज होऊन बसली आहे. तें ऐकून अर्थातच राक्षसास फार समाधान झालें. आपल्याकडून आपण जरी या बाबतींत अगदीं गाफल असल्याप्रमाणें होतों, तरी भागुरायणानें सेना अगदीं सज्ज करून ठेविली आहे हें फार उत्तम आहे, असें त्यास वाटलें. भागुरायण सेनेच्या स्थानांत नव्हता, म्हणून त्यानें त्याच्या हाताखालच्या अधिकाऱ्यास बोलावणें पाठविलें; परंतु, कोण्यावेळीं भागुरायणाकडून काय आज्ञा येईल याचा नेम नाहीं, तेव्हां मला आपलें स्थान सोडतां येत नाहीं, असा त्यानें परत निरोप पाठविला. राक्षसास तो निरोप ऐकून फार आश्चर्य वाटलें. तरी गैरसमजानें हा निरोप आला असेल, कोणीं बोलावलें आहे हें कळलें नसल्यामुळें त्यानें असें उत्तर दिलें असेल, असें समजून त्यानें त्या अधिकाऱ्यास पुनः बोलावणें पाठवलें. परंतु त्याही बोलावण्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां राक्षस फार संतप्त झाला. पाटलिपुत्रांत आपल्याला अशीं उत्तरें कोणी देईल, आपली अशी अवज्ञा कोणी करील, हें राक्षसाच्या स्वप्नींही आलें नाहीं; परंतु प्रत्यक्ष अनुभव आल्यावर मग काय विचारतां? राक्षस एकदम त्या अधिकाऱ्याच्या स्थानांत गेला व "तूं माझी अवज्ञा केलीस; परंतु या वेळीं मी तुला त्याबद्दल कांहीं बोलत नाहीं. पाटलिपुत्राला पर्वतेश्वरानें वेढा दिला आहे, त्याला हाकून देण्यासाठीं आतांच्या आतां सैन्यासह नीघ," असें त्यानें त्यास निक्षून सांगितलें; परंतु त्या अधिकाऱ्यानें अगदीं शांतपणें उत्तर दिलें, "भागुरायण सेनाधिपति आहेत, त्यांची आज्ञा अशी आहे कीं, माझ्याखेरीज दुसऱ्या कोणाचीही आज्ञा ऐकावयाची नाहीं. तेव्हां त्यांची आज्ञा येईपर्यंत सेनेंतला एकही सैनिक इकडचा तिकडे होणार नाहीं. बाकी सैन्य शस्त्रास्त्रं सज्ज करून अगदीं सिद्ध आहे." तें भाषण ऐकून राक्षस फारच चकित झाला. त्याचे नेत्र प्रस्फुरत झाले. त्यास संतापही आला आणि त्यानें, "पण मीं भागुरायणाहूनही श्रेष्ठ असा अधिकारी आहेंना?" असा जोरानें प्रश्न केला.

त्या अधिकाऱ्यानें त्यास उत्तर म्हणून नुसतें स्मित केलें, त्यामुळें राक्षसाचा संताप अधिकच वाढला आणि त्या संतापाच्या भरांत तो आणखी कांहीं बोलणार तोंच दूर मोठा थोरळा कोलाहल झालेला त्याच्या कानीं पडला. हा कोलाहल म्हणजे पर्वतेश्वराचें सैन्य पाटलिपुत्रांत शिरल्यामुळेंच झाला असावा असें वाटून "काय? पर्वतेश्वर नगरांत शिरून प्रजेला पीडा देऊं लागला,

तरी सुद्धां तूं आपलं सैन्य घेऊन जागचा हालत नाहींस ? " असें राक्षस एकदम त्या अधिकाऱ्यास म्हणाला. आणि त्याच्याकडे संतापानें आरक्त झालेल्या नेत्रांनीं पाहूं लागला. त्यास असें झालें कीं, काय करूं आणि काय न करूं. इतक्यांत तो अधिकारी अगदीं शांतपणें त्यास म्हणतो, " सेनापति भागुरायण यांची आज्ञा होईपर्यंत कोणी आपल्या धनुष्याला मौर्वी लागणार नाहीं कीं कोशांतून खड्ग उपसणार नाहीं. त्यांची आज्ञा पाहिजे. "

तेव्हां राक्षस एकदम उद्गारलाः---

" तर मग एकूण भागुरायणानं पर्वतेश्वराला फितूर होऊनच ही सर्व व्यवस्था केली असली पाहिजे. आः सेनापते भागुरायणा, तूं राजघाताला—या पाटलिपुत्राच्या नाशाला कारण होतो आहेस काय ? "

वास्तविक पाहतां राक्षसाच्या ह्या मोठ्यानें उच्चारलेल्या परंतु आपल्यासच उद्देशिलेल्या प्रश्नाला उत्तर पाहिजे होतें असें नाहीं. त्यानें मुळींच उत्तर अपेक्षिलेलें नव्हतें; परंतु पुष्कळ वेळां अगदीं अनपेक्षित अशा गोष्टी घडतात त्याचप्रमाणें याही वेळीं झालें.

" आः सेनापते भागुरायणा, तूं राजघाताला—या पाटलिपुत्राच्या नाशाला कारण होतो आहेस काय ? " हा प्रश्न राक्षसाच्या तोंडून बाहेर पडतो न पडतो तोंच पुढील उत्तर त्यास मिळालें:—

" अमात्या—पण आतां तुला अमात्य तरी कसं म्हणावं ?—राजघाताला आणखी पाटलिपुत्राच्या नाशाला कारण कोण, हें आतां सगळ्या जगाला चांगलं कळलं आहे. तूं केलेल्या राजघाताचा तर कांहीं प्रतिकार आतां शक्य नाहीं; परंतु पाटलिपुत्राचा नाश मात्र मी खचित होऊं देत नाहीं. तुझ्या कृष्णकृत्यांबद्दल तुझं पारिपत्य करणारे योग्य वेळीं तें करतीलच. " असे अगदीं धीरगंभीर वाणीनें उच्चारलेले शब्द राक्षसाच्या कानीं पडले. कोण बोलतं आहे तें पहाण्यासाठीं राक्षस वर पहातो तों भागुरायण त्याच्या नजरेस पडला; परंतु ते शब्द भागुरायणानेंच उच्चारले असतील हें त्यास मुळींच संभवनीय वाटेना. भागुरायणानें तेवढें बोलून पुढें त्याच्याकडे हिलेंही नाहीं, आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्याकडे वळून एकदम, " पर्वतेश्वरानं नगरास वेढा दिला आहे; तटावरून त्याच्या सैन्यावर मारा चालवा. " असा हुकूम सोडला. आणि जणूं काय राक्षस तेथें नाहींच अशा प्रकारानें त्यानें आपलें काम चालविलें.

राक्षसास त्याच्या बोलण्याचा आणि वागणुकीचा कांहींच उलगडा होईना. इतक्यांत आणखी मोठा कोलहाल त्याच्या कानीं पडला. तेव्हां आतां आपण अधिक वेळ येथेंच बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असें वाटून राक्षस हा सर्व प्रकार काय आहे याबद्दल विचार करीत तेथून बाहेर पडला. आपल्या पश्चात् दुसरीकडे काय प्रसंग गुदरला आहे याचें त्यास स्वप्नही नाहीं. भागुरायण शत्रूचा समाचार घेतो आहे, तर सध्यां आपण त्याच्याशीं तंडत न बसतां पुढें काय तें करतां येईल. सध्यां महाराजांची हालहवाल पहावी. ते बहुतकरून आतां सभामंदिरांत पोंचले असतील. पर्वतेश्वराचा हा धृष्टपणा त्यांच्या कानीं गेल्यास तेही स्वतः शत्रूवर चालून जातील. तर तिकडे जावें. असें मनांत योजून, परंतु भागुरायणाच्या भाषणानें व वर्तनानें अत्यंत विषण्ण होत्साता तो त्या सेनास्थानांतून बाहेर पडला. परंतु जिकडे पहावें तिकडे हाहाकार करीतच लोकांचे समुदाय सैरावैरा धांवत आहेत, त्याच्या भाषणांचा इतका कांहीं गोंधळ व गोंगाट उडून गेलेला दिसला, कीं

कोण काय बोलत आहे याचा त्यास कांहींच उमज पडेना. मधून मधून आपल्या नांवाचा उच्चार होत आहे एवढेंच वरीक त्याच्या कानीं आलें. इतक्यांत त्याच्या पाठीमागून कोणी येऊन त्याच्या बाहूस कोणीं स्पर्श केला. त्यामुळें त्यानें मागें वळून पाहिलें, तों त्यांचा प्रतीहारी त्यास दिसला. त्यानें चट्कन् त्यास विज्ञापिलें, " अमात्यराज, या वेळीं आपण कोठें तरी लपून बसाल तर फार चांगलं होईल. महाराजांचा प्रयाणसमारंभ पहाण्यासाठीं जमलेला जनसमूह, झालेल्या प्रकारानं अतिशय संतप्त झाला आहे आणि आपलं नांव घेऊन अद्वातद्वा बोलत हिंडत आहे. अजून आपण कोणाच्या दृष्टीस पडलां नाहीं, तोंच जिवानिशीं सुटण्याची शक्यता आहे. नाहीं तर तो संतप्त जनसंघ काय करील आणि काय नाहीं याचा मुळींच नेम नाहीं. चला. "

" स्वारी कोठपर्यंत आली आहे ? "

" सभामंदिरापर्यंत पोंचली नाहीं काय ? "

राक्षसाचे ते प्रश्न ऐकून प्रतीहारी अगदीं स्तब्ध राहिला. पुनः राक्षसानें त्याला तोच प्रश्न केला. तेव्हां तो हलकेंच म्हणतो, " अमात्यराज, स्वारीला जेथें आपण पाठविण्याची तजवीज केली होती, तेथें पुत्रांसह जाऊन पोंचली. आणि त्यामुळेंच आपण माझ्या गरिबाच्या... "

" प्रतीहारी, तूं काय म्हणतो आहेस, याचा मला कांहीं उमज पडत नाहीं. काय म्हणतोस ? संतप्त झालेला जनसंघ माझं नांव घेत ओरडत हिंडतो आहे ? तो काय म्हणून ? आणि झाला प्रकार तो पाहून म्हणजे काय ? "

" महाराजांचा......... आपल्यावर सर्व जनांचा राग.... "

" काय ? त्या कपटी मुरेच्या मोहपाशांतून महाराजांस काढून पुनः राज्यकारभार पहाण्यास लाविलें यामुळें मजवर राग ! अरे तूं म्हणतो आहेस तरी काय ? या समारंभाच्या आनंदोत्सवांत तूं अधिकउणें मदिरापान तर केलें नाहींसना ? बोल, बोल लवकर, नाहीं तर......... "

" अमात्यराज, आपल्या सुरक्षितपणासाठीं मी बोलतों आहें. कृपा करून येथून चला. मग मी सर्व कांहीं आपल्याला सांगतों. आपण कांहीं केलं असलं तरी माझी आपल्या ठिकाणीं पूर्ण भक्ति आहे, ती मनांत आणून तरी आपण सध्यां माझ्या विनंतीप्रमाणें कोठें तरी लपून बसण्यास चला. नाहीं तर महाराजांच्या आकस्मिक घातानं खवळलेले लोक काय करतील आणि काय नाहीं याचा नेम नाहीं. "

" काय ? महाराजांचा आकस्मिक घात ! कसला घात ? कोणाचा घात ? हें आहे काय ? तूं भ्रमिष्ट झाला आहेस का मी ? "

" कोणीही भ्रमिष्ट असो; परंतु, आपण आपल्या मंदिरांत न जातां माझ्याबरोबर येऊन कोठें तरी लपून बसा. मग आपल्याला सर्व कांहीं कळवितों. "

" काय म्हणतोस ? मी आपल्या मंदिरांत न जातां कोठें तरी लपून बसूं ? मी कोणी चोर आहें काय ? का मला वेड लावण्याचं तूं योजलं आहेस ? प्रतीहारी, तूं माझा फार जुना सेवक, म्हणूनच मी तुला अधिकउणं बोलत नाहीं. परंतु मला तुझा या वेळीं फार राग आला आहे. "

" अमात्यराज, आतां अशा वेळीं भर रस्त्यावर मी आपल्याला काय सांगूं ! जातो हा क्षण फार महत्वाचा आहे; अद्यापि कोणी या बाजूला आले नाहींत. अमात्यराज, ज्या गर्तेंत महाराज व त्यांचे पुत्र पडले, ती गर्ता आपण मुद्दाम केलेली असून महाराजांच्या घाताकरितांच आपण उद्युक्त झालां होतां.

आणि आपल्यावर येऊं नये, किंवा आपण सुरक्षित रहावं म्हणूनच आपण आयत्यावेळीं तेथून कांहीं तरी निमित्त काढून निघून आलां असं ज्याला त्याला वाटत आहे. आणखी.........”

“अरे, गर्ता कसली आणि हें आहे काय ? मला तुझ्या बोलण्याचा कांहीं अर्थच समजत नाहीं. नीट सगळं सांग...”

“ही जागा नव्हे तें सांगण्याची. आपण मजबरोबर एका बाजूला याल तर सांगतों.”

राक्षसानें त्या बोलण्यावरून ताडलें कीं, कांहीं तरी भयंकर प्रकार झालेला असून त्याच्याबद्दल आपल्यावर लोकांचा संशय आहे. भागुरायणही थोडया वेळापूर्वी सेनास्थानांत आपल्यास काय बोलला तें त्यास आठवलें, आणि एकंदर प्रकार अत्यंत विलक्षण वाटून तो आश्चर्यचकित झाला. काय झालें काय नाहीं तें नीट समजल्याखेरीज आतां स्वस्थ बसतां उपयोगी नाहीं, असें वाटून त्यानें मुकाट्यानें प्रतीहारीबरोबर जाण्याचें कबूल केलें. प्रतीहारीनेंही त्यास पुष्पपुरींत एके बाजूस राहणाऱ्या अशा आपल्या एका मित्राच्या येथें नेऊन सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून राक्षस फारच दुःखित झाला. ज्यांची सेवा आपण कायावाचामनानें आज इतके दिवस करीत आलों, त्याच महाराजांच्या जीवाला अपाय करण्याचा व्यूह कोणी तरी दुष्टबुद्धि रचीत असतां आपल्यास कांहींसुद्धां त्याचा गंध असूं नये ? आजपर्यंत आपण आपल्या चारचक्षुत्वाबद्दल जी घमेंड मारीत होतों ती कसली ? दुसरी एखादी लहानसान गोष्ट असती, तर असो; पण प्रत्यक्ष महाराजांच्या जीवावर बेतलेली गोष्ट आपल्याला कळूं नये, इतका गाफीलपणा आपल्या हातून झाला कसा, याबद्दलच त्यास अत्यंत आश्चर्य, खेद व उद्वेग झाला. त्यांत आणखी जेव्हां त्यास कळलें कीं, आपणच हें सर्व घडवून आणलें, अशी लोकांची समजूत झालेली आहे, तेव्हां तर त्यास फार फार वाईट वाटलें. आपला सर्व शहाणपणा, आपलें दूरदर्शित्व, आपली नीतिविशारदता, हीं सारीं कोठें नष्ट झालीं ? आपले डोळे कोठें गेले ? कोणा तरी प्रचंड शत्रूनेंच हा सगळा व्यूह फार शहाणपणानें रचला असला पाहिजे हें तर उघडच आहे. तो शत्रु सेनापति भागुरायण तर नसेलना ? त्यानेंच हा सगळा भयंकर प्रकार घडवून आणला नसेलना ? तोच पर्वतेश्वराला मिळाला नसेलना ? अमुक दिवशीं अमुक वेळीं महाराजांचा व त्यांच्या सर्व पुत्रांचा मी नाश करणार आहें, तेव्हां त्या दिवशीं तूं येऊन पाटलिपुत्रावर चाल कर म्हणजे मी आपल्या सैन्याचीही मदत तुला देईन आणि राज्य तुझ्या स्वाधीन करीन, असें त्यानें पर्वतेश्वरास कळवून तर त्याला आमंत्रण दिलें नसेलना ? अगदीं असेंच कांहीं तरी असलें पाहिजे. त्याखेरीज आजच पर्वतेश्वर येथें येऊन नगराला वेढा देऊन बसताना. काय ? सेनापति भागुरायणानें इतका अधमपणा केला असेल अं ? धिक्कार असो, धिक्कार असो, भागुरायणा, तुला सर्वस्वी धिक्कार असो कीं, तूं हा अशा प्रकारचा नीच व्यूह रचावास ! तुला महाराजांचें साचिव्य पाहिजे होतें तर मीं तें सोडून देऊन तुझ्या स्वाधीन केलें असतें; परंतु तूं असें करावेंस ! कांहीं हरकत नाहीं. याही संकटांतून निघन मी नंदवंशाची सेवा करीन. मग तुझें काय होतें तें पहातों. हीच माझी प्रतिज्ञा. हाच माझा निश्चय ! आतां हेंच माझें व्रत !

राक्षसाचें हें व्रत कसें काय चाललें तें पुढें कळेल.

# प्रकरण ३० वें.

## चंद्रगुप्ताची स्वारी.

चंद्रगुप्तास फार मोठ्या थाटानें नगरींत आणावयाचा, त्याच्यापुढें त्यानें कैद करून आणलेल्या पर्वतेश्वरास चालवावयाचें, ही आर्यचाणक्याची मोठी महत्त्वाकांक्षा. ती तृप्त करून घेण्याकरतां जितकी म्हणून कांहीं याजना करणें जरूर होतें तितकी त्यानें केली, आणि मग चंद्रगुप्तास मोठ्या समारंभानें नगरांत आणलें. लोकांचीं क्षुब्ध झालेलीं मनें शांत व्हावीं म्हणून आधीं पर्वतेश्वराला चंद्रगुप्तानें जेरीस आणून कैद करून आणला आहे ही बातमी सर्व नगरभर मुद्दाम पसरवून दिली, आणि त्यानें आज पुष्पपुर म्लेच्छांच्या तडाक्यांतून वांचविलें म्हणून त्याच्या नांवाचा ठिकठिकाणीं जयजयकार चालविला. त्याचप्रमाणें सेनापति भागुरायण हाही फार मोठा रणधीर. त्यानें जर आपलें सैन्य अगदीं सिद्ध ठेवलें नसतें, तर या वेळीं आपल्या नगरावर काय प्रसंग ओढवला असता आणि काय नाहीं याचा नेम नाहीं. म्हणून त्याचीही चतुरता व राजनिष्ठा यांबद्दल जितकें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे, अशाही प्रकारचीं भाषणें ठिकठिकाणीं चालतील अशी तजवीज करून टाकली होती. सगळें राजकुल, राजा धनानंदाच्या व इतर नंदवंशीय अंकुरांच्या आकस्मिक नाशामुळें अगदीं शोकाकुल झालेलें असतां आपण चंद्रगुप्ताच्यासंबंधानें विशेष समारंभ करूं नये हें जाणूनच चाणक्यानें सर्व योजना करून ठेविली होती. त्याला थाटाचा समारंभ करण्यांत विषेश कांहींच लाभ नव्हता. त्याची इच्छा फक्त लोकांच्या मनांत चंद्रगुप्ताविषयीं भक्ति उत्पन्न व्हावी, तो उगीच कोणीं तरी गादी बळकावण्यास आला आहे असें वाटूं नये, एवढीच होती.

त्या योजनेप्रमाणें चंद्रगुप्तानें समारंभानें नगरांत प्रवेश केला. पर्वतेश्वराचें काय तें मुख्य प्रदर्शन. तेव्हां त्याच्याकडून अंजलिपुट बद्ध करून त्याचा घोडा चंद्रगुप्ताच्या घोड्याच्या किंचित् पुढें चालविला होता. चंद्रगुप्ताचा पोषाख रणांगणांतीलच होता. लोकांची वृत्ति आणि वणवा हीं दोन्हीही सारखींच. एकदां पेटून पसरत चाललीं कीं सारखीं चालावयाचीं. चाणक्यास जें पाहिजे होतें तें बरोबर झालें. चंद्रगुप्ताचा व भागुरायणाचा जयजयकार जिकडे तिकडे दुमदुमूं ल.. ला, आणि लोक जणूं काय नंदांचा झालेला घात अगदीं विसरून गेले.

लोकमताची क्षणभंगुरता चाणक्य पूर्णपणें जाणून होता. चंद्रगुप्ताचा पक्का जम बसेपर्यंत

त्यास फार वेळ लोकांच्या डोळ्यांपुढें ठेवण्यांत तात्पर्य नाहीं. सर्व नंदांचा घात झाला आहे, तेव्हां कोण काय शंका घेईल आणि काय प्रसंग ओढवेल याचा नेम नाहीं. एवढ्याकरितां एकदम त्यास वाड्यांत नेऊन राज्याभिषेक करवन सिंहासनावर बसवून त्याच्या नांवाची द्वाही फिरवावी, असा चाणक्यानें बेत केला. कोण्या वेळीं काय प्रसंग होईल याचा नेम नसतो अशा वेळीं वेळ जाऊं देऊं नये, यांतच काय तो खरा चतुरपणा व दूरदर्शीपणा असतो. तेव्हां जितक्या लवकर आतां आपण हा समारंभ उरकूं तितकें चांगलें, असा विचार करून त्यानें स्वारी राजवाड्यांत जातांच पर्वतेश्वरास नजरकैदेंत ठेवण्याची तजवीज करून भागुरायणास व चंद्रगुप्तास एके बाजूस नेऊन पुढचा विचार चालविला. भागुरायणानें अर्थातच राक्षस कोठें आहे आणि काय करतो आहे याबद्दल चौकशी ठेविली पाहिजे म्हणून सुचविलें. तेव्हां चाणक्य हंसून म्हणाला, " अशा वेळीं मी त्याच्यावरून एक क्षणभर तरी नजर दूर करीन काय? धनानंदाच्या स्वारींतून तो निघून गेल्या वेळेपासून त्याच्यावर एक चार ठेविला आहे. राक्षस कांहीं सामान्य पुरुष नव्हे. झालं एवढ्यानं तो निराश होऊन बसणारा माणूस नव्हे. त्याच्याबद्दल जपलं पाहिजे तें आतांच. त्याला पाटलिपुत्राच्या बाहेर पडूं देतां उपयोगी नाहीं. तो आपल्या हातून जर का निसटला, तर काय करील आणि काय नाहीं, याचा नेम नाहीं. एवढ्याकरितां पुनः त्याला साचिव्य स्वीकारण्याला लावण्यांत आतां काय तें सर्व चातुर्य योजलं पाहिजे; पण साचिव्य देण्यापूर्वी आधीं राजा तर कायम झाला पाहिजे. तो कर. आतां तें सगळं तुझ्या हातीं आहे. वेळ अगदीं घालवितां उपयोगी नाहीं. या घटकेस द्वाही फिरव. रीतीप्रमाणें चार श्रेष्ठी, चार महाजन, सर्व क्षत्रिय वीर यांची परिषद जमव आणि त्यांत असं सांग कीं, झालेला घात कसा झाला, याबद्दल पूर्ण चौकशी करून त्या घातकांस व पाटलिपुत्रावर स्वारी करून तें आपल्या स्वाधीन करून घेऊन यावनी अंमल तेथें सुरू करण्यास उद्युक्त झालेल्या पर्वतेश्वराला शिक्षा करण्याचा अधिकार कोणास तरी पाहिजे. एवढ्याकरितां चंद्रगुप्ताची खरी हकीकत त्या लोकांस—जितकी पाहिजे. तितकीच—कळवून आपलं कार्य करून घे. राक्षसाच्यासंबंधानं पुढें काय करायचं तें मी यथावकाश सांगेन. "

चाणक्यानें सुचविल्याप्रमाणें भागुरायणानें सर्व करण्याचें ठरविलें, आणि लागलीच वजनदार पुरुषांपैकीं बहुतेकांना एकदम बोलावून आणून व झालेला सर्व प्रकार त्यांना समजावून सांगून चंद्रगुप्ताच्या शौर्यवीर्याची स्तुति करून त्यांजकडून बसल्या बैठकीस रुकार घेतला. एक दोघांनीं राक्षसाचें नांव काढलें असतां चंद्रगुप्त, " त्याचं नांव या पाटलिपुत्रांत न निघेल तर बरं; मी असं म्हणतों याचीं कारणं अनेक आहेत तीं लवकरच कळतील, " असं म्हणाला व एकदम आपण आतां पुढं काय करणार याबद्दल बोलूं लागला. नुसती चंद्रगुप्ताला राज्यावर बसविण्याचीच द्वाही फिरावण्यापेक्षां नंदांच्या घातास कोण व कसकसे कारण झाले याबद्दल चंद्रगुप्तानें मोठ्या जारीनें चौकशी चालविली असून खरे अपराधी लवकरच बाहेर पडतील, असेंही त्याच वेळीं जगास जाहीर करण्याचें चाणक्यानें ठरविलें होतें. त्याप्रमाणें सर्वत्र द्वाही फिरविल्यावर लागलीच शुभमुहूर्त पाहून चंद्रगुप्ताचा राज्याभिषेकही उरकून घेण्याचा ठराव झाला.

इकडे पर्वतेश्वरास चंद्रगुप्तानें—म्हणजे चाणक्यानेंच—आपल्या समोर आणून भागुराय-

णाच्या—चाणक्याच्या समोर प्रश्न विचारले; परंतु प्रथमतः तो त्यास कांहींच उत्तरें देईना. शेवटीं फारच वाटाघाट झाली, तेव्हां त्यानें आपल्यास राक्षसाचीं पत्रें आलीं यामुळें आपण पाटलिपुत्रावर हल्ला केला असें सांगितलें. परंतु तेवढ्यानें चाणक्याचें समाधान थोडेंच होतें! राक्षसाचीं तीं पत्रें कोठें आहेत, म्हणून त्यास उलट प्रश्न झालाच. नाहीं, होय, म्हणत पर्वतेश्वरानें तीं पत्रें काढून दिलीं. त्या पत्रांत नंदांचा नाश करण्याला काय युक्ति केली हें जरी लिहिलें लिहिलें नव्हतें, तरी पण आपण कांहीं युक्ति केली आहे असें स्पष्ट लिहिलें होतें. पर्वतेश्वरानें जीं जीं उत्तरें दिलीं तीं तीं कायस्थाकडून त्यांनीं अगदीं सविस्तरपणें उतरून घेवविलीं. नंतर आपल्या एकंदर कारस्थानाची फार उत्तम प्रकारें सफलता झाली हें पाहून त्यास फार आनंद झालासें दिसलें. नंतर भागुरायणाला एके बाजूस घेऊन त्यानें सांगितलें, “ सेनापते, आतां एक गोष्ट कर. अमात्य राक्षस हातचा जाऊं देतां उपयोगी नाहीं, हें तर उघड आहे. तेव्हां तूं युक्तीनं त्याची भेट घे आणि त्याला आपल्याला मिळण्याविषयीं विनंति कर. तो काय म्हणतो तें पहा आणि मला येऊन सांग. पर्वतेश्वरानं काय सांगितलं आणि आपल्याजवळ काय दिलं, याची त्यास प्रथम ओळखही देऊं नको. झाली गोष्ट ती झाली, कोण जो घात करणारा असेल त्याचा आपण सर्वजण मिळून शोध लावूं आणि त्याचं पारिपत्य करूं असं म्हण. सारांश, त्याचं मन जेणें करून आपल्या पक्ष्याकडे येईल असं कर. ” भागुरायणानें तें ऐकून घेतलें; परंतु चाणक्यानें सांगितलेली कामगिरी आपल्या हातून होणार नाहीं, अशी त्याच्या मनाची खात्री होती. त्याच्या हातून ती कामगिरी होईल, राक्षस त्याच्या म्हणण्यास रुकार देईल, असें चाणक्यासही मुळींच वाटलें नाहीं; परंतु दुसरा कांहीं बेत परिपक्व होईपर्यंत राक्षसाच्या मनांत हल्लीं काय विचार चालले आहेत हें काढून घ्यावें एवढाच त्याचा हेतु होता. सेनास्थानांत जाऊन तो काय काय भाषणें करून आला व भागुरायणाच्यासंबंधानें त्यानें काय काय उद्गार काढले, हें चाणक्याचे कानीं गेलेंच होतें. तेव्हां आतां भागुरायण प्रत्यक्ष भेटून असें कांहीं विचारूं लागला, म्हणजे अर्थातच स्वारी संतापून जाऊन त्याच्यावर भडिमार करील व आपण पुढें काय करणार याबद्दलही बढाया मारील, हें त्यास उघड दिसलें. त्या त्याच्या बढाया आपल्या कानीं आल्या, म्हणजे आपल्याला पुढें काय करावयाचें त्याचा विचार करण्यास ठीक पडेल. अशा विचारानें भागुरायणास चाणक्यानें राक्षसाकडे जाण्यास सांगितलें.

आपल्यासंबंधानें राक्षसाच्या मनांत काय आलें आहे आणि त्यानें काय बोलून दाखविलें, हें अद्यापि भागुरायणास कांहींच कळलें नव्हतें. तें कळलें असतें तर भागुरायणानें जाण्याचें कबूल केलें असतें कीं नाहीं याची फार शंका होती. असो; परंतु भागुरायण तेवढें कबूल करून राक्षस कोठें भेटेल याचा शोध करीत चालला.

इकडे राक्षस आतां आपण पुढें काय करावें याच्या विचारांत निमग्न झाला होता. त्यास आतां आपला असें म्हणावें कोणास, याचीच शंका वाटूं लागली. कारण राज्यांत कांहीं तरी जंगी फितूर होऊनच हें सर्व प्रचंड कारस्थान झालें असावें, असं त्यानें उघड उघड जाणलें. अद्यापि त्यास सगळें कारस्थान काय होतें हें कळलें नव्हतें; तथापि जेथें कांहीं तरी कारस्थान आहे असें वाटतें, तेथें लबाडी कोठें असेल याबद्दल शंका सर्व

ठिकाणींच येते. ती शंका आल्याकारणानें त्याचें मन गोंधळून गेलें. लोक आपली शंका घेतात हें ऐकून तर त्यास असें पक्केंच वाटलें कीं, कोणीं तरी फार विलक्षण तऱ्हेचें कारस्थान फार चातुर्यानें रचिलें असावें; त्याखेरीज हा सगळा प्रकार झाला नाहीं. आतां याच्या मुळाशीं आपण गेल्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं. पण मुळाशीं जाण्याला मार्ग कोणता, ह्याचीच त्यास पंचाईत पडली. प्रतीहारीनें राक्षसास सांगितलेली हकीकत अर्थांतच लोकदृष्टीनें जी बाहेर दिसली तेवढीच होती. अंतःस्थ कारस्थानें काय होतीं याची त्या बिचाऱ्यास काय माहिती ? राक्षसाच्याबद्दल लोक संशय घेतात तो व्यर्थ होय, असें त्याच्या मनानें घेतलेलें. अमात्य आपल्या स्वामीचा अशा भयंकर तऱ्हेनें घात करण्यास कधींच प्रवृत्त व्हावयाचा नाहीं, अशी त्याच्या मनाची पक्की खात्री. कारण त्याच्या स्वामिनिष्ठेबद्दल त्यास मुळींसुद्धां शंका नव्हती. या प्रतीहारीखेरीज राक्षसास आपल्या विश्वासांत घेण्याजोगें दुसरें कोणी दिसेना आणि या वेळीं कोणी तरी विश्वासू माणसाची तर त्यास फार जरूरी होती. इकडे भागुरायणानें त्याच्याकडे जाण्याची तयारी करून त्याचा शोध चालविला. तो शोध करतां करतां अर्थातच त्याच्या पाठीमागें असणाऱ्या चाणक्याच्या चाराच्या मदतीनें भागुरायणानें राक्षसास गांठलें.

पुढें काय झालें, हें फार मौजेचें आहे, तें पुढील प्रकरणांत कळेल.

# प्रकरण ३१ वें.

## राक्षसाची प्रतिज्ञा.

राक्षस अगदीं गोंधळून गेला होता. आतां आपण काय करावें हें त्याला कांहींच सुचेनासें झालें होतें. प्रतीहारीनें ज्या आपल्या मित्राच्या घरीं त्याला नेलें होतें, त्या घरांतून आतां बाहेर तरी कसें पडावें, याची सुद्धां त्याला शंका आली. किंबहुना भीति वाटली म्हटलें तरी चालेल. प्रतीहारीकडून त्यास असें कळलें कीं, आपणच हा सर्व राजकुलाचा घात करविला अशी सर्वांची समजूत आहे. जर अशी समजूत असेल तर लोकांचें मन आपल्यासंबंधानें अतोनात कलुषित झालें असलें पाहिजे हें उघड आहे. आणि आपण राजकुलघातक अशा दृष्टीनें हीं मंडळी आपल्याकडे पाहूं लागली म्हणजे आपल्यावर काय प्रसंग आणतील. कीं आपल्याला उभाच जाळून टाकतील, याचा नेम नाहीं. राक्षस नसा भ्याड नव्हता; चांगला शूर होता; परंतु सध्याचा प्रसंगच असा विलक्षण होता कीं, नुसत्या शूरत्वाचा कांहीं उपयोग झाला नसता. वणवा पेटल्याप्रमाणें, जेथें वाईट मत पसरलेलें तेथें तें सुधारण्याला त्याच्या एकट्याच्या हातून

काय होणार ? आजपर्यंत आपण इतक्या राजनिष्ठेनें वागलों, नंदांच्या राज्याचा यशोदुंदुभि सगळ्या पृथ्वीवर दुमदुमून राही असें केलें, या सगळ्याचें फळ आपणास हेंच मिळालें काय ? सर्व मंडळी—लहानापासून थोर अशा अधिकाऱ्यापर्यंत सर्व मंडळी—अगदीं आपल्या अंकित असें समजून आपण विश्वासपणानें राहिलों, त्याचें हें फळ काय ? सगळ्या भारतवर्षांत कोणत्या देशांत काय चाललें आहे, कोणत्या राजाचा काय विचार आहे, याचा शोध ठेवण्याविषयीं दक्ष असणारा मी—परंतु प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांपुढें काय चाललें आहे याची मला गंधवार्ता सुद्धां नाहीं ! अशा प्रकारचे कांहीं विचार करीत तो बिचारा जागच्या जागींच स्वस्थ बसला होता. इतक्यांत भागुरायण तेथें जाऊन पोंचला. ज्याच्या घरांत अमात्य जाऊन बसला होता, तो प्रथम कांहीं केल्या दारच उघडीना. कारण अमात्य राक्षस आपल्या घरांत आहे, हें कोणास कळूं नये अशी त्याची अर्थात् इच्छा होती. आणि त्याचा मित्र प्रतीहारी यानें त्याप्रमाणेंच त्यास सांगूनही ठेविलें होतें; परंतु भागुरायण सेनापति आले आहेत आणि अमात्य राक्षस येथें आहेत हें त्यांस पक्केपणें ठाऊक आहे, त्यांचीच त्यांना भेट घ्यावयाची आहे. तेव्हां दार उघडा, नाहीं तर दार उघडूनही प्रवेश केला जाईल, असें थोडेंसें दरडावणीचें भाषण झालें. तेव्हां तो बिचारा राक्षसाकडे जाऊन आपल्यावर काय संकट आलें आहे, तें सांगूं लागला. तें ऐकून राक्षसास फार चेव आला आणि त्यानें म्हटलें, " बेलाशक दार उघडून त्याला आंत येऊं दे; स्वतः फितूर होऊन लोकांवर नसते आरोप आणून त्यांचा घात करूं पाहणाऱ्या नीचाला मी भीत नाहीं. हें सर्व कृत्य त्या भागुरायणाचें आहे. या नंदवंशाचें साचिव्य आपल्याला मिळावें एवढी त्याची महत्त्वाकांक्षा. आणि ती तृप्त करण्याकरितां दुष्टानें राजकुलाचा घात केला. त्याला आंत आण. आण. माझें जें काय पुढें होणार असेल, तें पाहून घेतां येईल. "

राक्षसाचें असें बोलणें ऐकतांच त्या माणसानें जाऊन दार उघडलें. दार उघडल्याबरोबर भागुरायण सेनापति आंत शिरला आणि त्यानें त्या दार उघडणारास सौम्यपणेंच, परंतु, भलतेंसलतें उत्तर दिल्यानें आपली धडगत होणार नाहीं, हें पक्कें समजावें अशा स्वरानें, " अमात्य राक्षसांच्याकडे मला घेऊन चल, " असें म्हटलें. नाहीं होय म्हणण्याची तेथें सोय नव्हती हें उघडच आहे. आणि अमात्य राक्षसानेंच आतां त्यांस आंत आण असें सांगितल्यानंतर नाहीं होय म्हणण्याची तरी अवश्यकता काय ? त्यानें लागलींच त्यांस अमात्य राक्षसासमोर नेलें.

भागुरायण नुसता सेनाधिपति होता. उत्तम शिपाई; परंतु त्याला चातुर्याचीं आणि कपटाचीं भाषणें करणें मुळींच शक्य नव्हे. अमात्य राक्षसाला पाहीपर्यंत त्याला आपण असें बोलूं, तसें बोलूं, असें त्यानें आपल्या मनांत योजिलें होतें; परंतु अमात्याच्या समोर जाऊन उभें राहण्याबरोबर त्यांतलें अर्धें अधिक नाहींसें झालें.

इकडे भागुरायणास पाहतांक्षणींच अमात्य राक्षसाच्या अंगाचा तिळपापड उडाला. आणि एकदम त्यास, " भागुरायणा, राजकुलाचा घात करून आतां हें कृष्णवदन माझ्यापुढें आणतोस काय ? माझ्या अंधत्वामुळें तूं लोकदृष्टीनें मगधदेशाचा संरक्षक जरी बनला असलास, तरी तुझ्या स्वतःच्या दृष्टीनें आणि माझ्या दृष्टीनें तूं राजकुलघातकच आहेस; तो तूं माझ्यापुढें आपल्या दुष्कृत्याच्या बढाया मारण्यासाठीं आलास कीं काय ? नीचा,

सगळयांच्या नेत्रांत धूळ टाकून त्यांना आंधळें करशील, " असें म्हणण्याची त्याला इच्छा झाली; परंतु आपला तो संताप तसाच क्षणमात्र गिळून तो भागुरायणास विचारतो, " काय सेनापते, महाराजांना सुरक्षितपणें पोंचविलंतना ? "

या बोलण्याचा अर्थ भागुरायणाच्या अगदीं पूर्णपणें लक्ष्यांत आला हें सांगावयास पाहिजे असें नाहीं; परंतु त्याला समर्पक उत्तर जितक्या लवकर द्यावयास पाहिजे होतें तितक्या लवकर त्यास देतां आलें नाहीं. दुसरा एखादा असता तर त्यानें " आपण जशी इच्छा धरली होती तसंच सगळं झालं," असें उत्तर दिलें असतें; परंतु अधरोत्तरें करण्यांत भागुरायण मुळींच हुशार नव्हता हें वर सांगितलेंच आहे. तो क्षणमात्र कांहीं बोलला नाहीं. नंतर हळूच राक्षसास म्हणतो, " अमात्यराज, पर्वतेश्वराला चंद्रगुप्तानं आणि मीं जेरीस आणून पकडून आणलं आहे. आतां पुढें राज्यव्यवस्थेची तजवीज काय करायची एवढाच प्रश्न आहे. आणि आपल्याला भेटल्याखेरीज त्या प्रश्नाचा निकाल लागायचा नाहीं, म्हणून मला आपल्या शोधाकरितां इकडे यावं लागलं. आपल्या कोणालाच कांहीं बातमी लागली नसल्यामुळें पर्वतेश्वरानं जो काय घात करायचा, तो पूर्णपणें केला. आतां जो घात झाला तो कांहीं नाहींसा करतां येत नाहीं. पुढली व्यवस्था जी काय करायची तिचा विचार झाला पाहिजे, करितां कृपा करून आपण चला. सेनेनं जें काम करायचं तें केलं. आतां आपलं काम राहिलं आहे. मला चाण—चंद्रगुप्त महाराजांनीं मुद्दाम आपल्या शोधाकरितां पाठविलं आहे. "

भागुरायण हें बोलत असतां अमात्य राक्षसाच्या अंगाचा संताप झाला. त्यांतून चंद्रगुप्ताला " महाराज " ही पदवी लाविल्याचें ऐकून तर त्याचें भान नाहींसें होण्याची वेळ आली. भागुरायणानें "चाण–" असें अर्धवट बोलून पुनः जीभ चावून "चंद्रगुप्त महाराजांनीं "असें म्हटलें, तें कांहीं राक्षसाच्या विशेष लक्ष्यांत आलें नाहीं. तो लागलींच कांहीं संतापानें, उद्वेगानें व कपटानें म्हणतो, " चंद्रगुप्त महाराज ! चंद्रगुप्त महाराज मीं तर कधीं ऐकले नाहींत ! एकून त्या वृषलीच्या भाच्याला राज्यावर बसविण्याकरितां तूं असला नीचपणा केलास काय ? आः आतां माझ्या लक्ष्यांत सर्व गोष्टी आल्या. त्या वृषलीनंच शेवटीं आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें राजाचा घात करवून आपल्या भाच्याला या मगधाच्या सिंहासनावर बसविण्याचा घाट बनवून आणलाच अं ? शाबास ! शाबास ! ' अनृतं साहसं माया ' इत्यादि गुणांनीं युक्त असं हें स्त्रीरूप यंत्र त्रिभुवनाच्या घाताकरितांच उत्पन्न झालें आहे म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. आः चांडाळणी, ज्या वेळीं तुझ्या त्या कारट्याचा वध करविला, तेव्हांच महाराजांनीं तुझाही वध करविला असता, तर कांहींसुद्धां बावगं झालं नसतं. आज हा भयंकर प्रसंगच ओढावला नसता. आणखी सेनापते, तुझ्यासारख्या पुरुषानं तिच्या वाक्पाशांत सांपडून महाराजांचा सर्वस्वनाश करून घ्यावा अं: ! तुला जर अमात्य पदवी पाहिजे होती, तर मला सांगायचं होतंस. मीं ती तुला मोठ्या आनंदानं दिली असती. मी स्वस्थ घरीं बसलों असतों...... परंतु— परंतु तुला आतां बोलून काय उपयोग ! तुम्ही सर्वस्वघात करून बसलां; परंतु भागुरायणा, ज्यानं स्वामिघात केला, त्याचं कधीं बरं होणार नाहीं. " भागुरायणानें, तें मुकाट्यानें ऐकून घेतलें आणि थोडा वेळ थांबून तो त्यास म्हणतो, " ज्यानं स्वामिघात केला असेल त्याचं बरं व्हावं, अशी कोणी इच्छाही करणार नाहीं; परंतु स्वामि-

घात कोणीं केला असेल, असं संभवतही नाहीं. आपण मगधदेश आतां अकुतोभय झाला असं समजून स्वस्थ बसलां, त्यामुळें पर्वतेश्वराला संधि सांपडून त्यानं सगळी फितुरी करून हा घात केला. कुमार चंद्रगुप्तानं त्याचं पारिपत्य करून त्याला बद्ध करून आणलं, याबद्दल त्याची स्तुति करायची तें टाकून आपण त्यालाच दोष देतां ? मलाही दोष देतां ? याला काय म्हणावं ? आपण आतां येथं अज्ञातवासांत किती दिवस राहणार ? तो आकांत झाला ते दिवसापासून तुम्ही येथेंच आहां असं मला कळून मी आपला शोध करीत करीत आलों. आपल्या दुर्लक्ष्यामुळें एवढा अनर्थ झाला, तरी आर्य चाण–नव्हे, महाराज चंद्रगुप्त यांची मनापासून इच्छा आहे कीं, आपल्याच अनुमतानं यापुढची राज्यव्यवस्था व्हावी........."

"सेनापते," राक्षस एकदम मोठ्यानें म्हणतो, "का हें कपटनाक तुमचं ? तुमच्या दृष्टीनं तो वृषलीचा भाचा 'महाराज' असेल; परंतु माझ्या दृष्टीनं नाहीं. माझ्या या देहांत जोंपर्यंत प्राण आहे, तोंपर्यंत मी तर हरप्रयत्न करीन आणखी त्याला या मगधदेशांतून हद्दपार करवीन. नंदांच्या रक्तानं माखलेल्या हातांनीं तूं मला आपल्या वेंधेंत धरूं पाहतो आहेस; परंतु भागुरायणा, तूं अगदीं चुकतोस. मी त्या नंदकुलाचा ऋणकरी आहें. मी त्याची सेवा करणार. तुझ्या चंद्रगुप्तासारख्या भुरट्याच्या सेवेनं मी आपला देह किंवा बुद्धि कधींसुद्धां विटाळूं देणार नाहीं. जा. पुनः माझ्याशीं या बाबतींत मुळींसुद्धां भाषण करायला येऊं नकोस. माझ्या अंगांत कांहीं कर्तृत्व असलं, तर मी तें तुमच्या अनुभवाला आणून देईन. नाहीं तर, मी या मगधदेशांतून काळं करीन. जा. पुनः माझं व तुझं संभाषण म्हणून कधीं होणार नाहीं. तूं आपला नवा मार्ग आणखी नवा स्वामी हुडकून काढला आहेस. माझा मी जुनाच मार्ग ठेवीन. तुझ्या बोलण्यावरून तुमच्या पाठीमागें आणखीही कोणी तरी आहे. तुझ्या बोलण्यांत आतां आर्य चाणक्याचं नांव आलं होतं; परंतु तूं तें अर्धेच दाबून टाकून चंद्रगुप्ताचं घेतलंस, हें मीं आतां जाणलं. त्या ब्राह्मणानं तुला अगदीं मोहपाशांत घालून अंकित करून टाकलंसं दिसतं. त्या ब्राह्मणाचा तर हा सगळा खेळ नसेल ? चंद्रगुप्ताबरोबरच तो आला, तेव्हां त्याचंच हें कृत्य असेल. न जाणों, त्या व्याधराजानं त्याला मगधाचं राज्य घेण्यासाठींच इकडे कांहीं तरी मिषानं पाठविलं असेल. मी अत्यंत मूर्ख कीं डोळे झांकून बसलों. मला कांहीं म्हटल्या कांहीं सुद्धां वाटलं नाहीं, कीं असा कांहीं दुर्धर प्रसंग येऊन पडणार आहे ! राजमंत्र्यानं नेहमीं आपल्या देशावर परचक्र आलं आहे अशा तऱ्हेनं रहावं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं; परंतु मी आतां उगीच लांब लांब भाषणं करीत बसलों आहें, यांत काय अर्थ आहे ? भागुरायणा, जी गोष्ट तुम्हीं तिघांचौघांनीं केली, ती अगदीं अनुचित होय. आणि ती मीं केली म्हणून लोकांत भ्रम उत्पन्न करितां आहां, तें तर त्याहून अनुचित आहे. मी या पापाबद्दल तुम्हांला प्रायश्चित्त भोगायला लावीनच लावीन. तुमचं सगळं कपटनाटक काय आहे हें अजून मला समजलं नाहीं; पण एकदां सर्व समजून आलं म्हणजे तुमच्यापेक्षां हजारों तऱ्हेचीं कपटनाटकं मला करतां येतील आणि तसं मी करून तुमचा विध्वंस करीन. जा. पुनरपि या राक्षसाला भेटूं नकोस. हा राक्षस नंदांचा सेवक आहे. जोंपर्यंत नंद हें नांव पृथ्वीवर आहे, तोंपर्यंत तो दुसऱ्या कोणाचीही सेवा करणार नाहीं."

इतकें बोलून राक्षस भागुरायणाकडे पाठ फिरवून बसला. एक शब्दही बोलेना. भागुरायणाला काय बोलावें तें मुळींच सुचेना. आणि तेथें अधिक वेळ उगीच बसण्यांत अर्थ नाहीं असेंही पण त्याच्या मनांत आलें. तेव्हां, " आपली जशी इच्छा असेल तसं करायला आपण समर्थ आहां, " असें म्हणून तो तेथून निघून गेला. जो काय प्रकार झाला, यांतलें खरें कपट भलत्याचेंच असून तें बळेंच आपण राक्षसाच्या अंगावर घालावें, येथपर्यंत त्याच्या मनाची तयारी झाली नव्हती. किती झालें तरी राक्षसाच्या हाताखालीं त्यानें आज कित्येक वर्षे घालविलीं होतीं. तेव्हां त्याच्यावर एकदम एवढें काहूर घालावयाचें त्याच्या जीवावर आलें, यांत नवल नाहीं. भागुरायण तेथून निघून बाहेर पडला, तेव्हां त्यास आपण मोठ्या संकटांतून सुटलोंसें वाटलें. तो शिपाईगडी. कपटभाषणें बोलून दुसऱ्याचें मनांतील गोष्टी काढून घेणें त्याला केवळ अशक्य होतें. तेथून निघाल्यानंतर सरळपणें चाणक्याकडे जाऊन त्यानें झालेली हकीकत त्यास सांगितली. राक्षस निमूटपणें आपल्या तावडींत सांपडावयाचा नाहीं, हें चाणक्यास पूर्णपणें माहीत होतें; परंतु त्यानें आपल्या विरुद्ध कांहीं व्यूहरचना केली असल्यास तिचा सुगावा आपल्याला लागावा म्हणून चाणक्यानें भागुरायणास त्याचेकडे पाठविण्याची तजवीज केली होती. भागुरायण तिकडे गेल्यावर त्यानें ज्या काय दुसऱ्या योजना करावयाच्या होत्या, त्या सर्व करून ठेविल्या आणि चंद्रगुप्ताकडून राक्षसास पत्र लिहविलें कीं, पर्वतेश्वरास बद्ध करून येथें आणलें असल्याबद्दल सेनापति यांजकडून आपणास कळलेंच आहे. आतां पर्वतेश्वरानें जो हा भयंकर अपराध केला, त्याबद्दल त्याचा जबाब घेऊन त्याला कांहीं शिक्षा करावी किंवा त्याच्या पुत्रापासून कांहीं खंडणी घेऊन सोडून द्यावें, याबद्दलचा विचार करण्याकरितां अधिकरणिकाची योजना करावयाची आहे. आपण नंदकुलाचे फार मोठे सेवक आणि नंदांचा जो हा घात झाला आहे, त्याबद्दल अपराध्यास योग्य शिक्षा देण्याचा खरा अधिकार आपलाच. एवढ्याकरितां आपणच अधिकरणिकत्व स्वीकारून न्याय करावा. असें झाल्यानें लोकांचें कलुषित झालेलें मनही सुप्रसन्न होईल आणि खरे अपराधी कोण, कोणीं फितूर केला वगैरेसंबंधाची चौकशी आपण स्वतः केल्यानें सर्व शोध उत्तम प्रकारें लागेल. तेव्हां एवढें फार महत्त्वाचें कार्य आपण अंगाबाहेर टाकूं नये, एवढीच विनंति आहे. त्या विनंतीचा अनादर झाल्यास स्वामिकार्याचाच अनादर होणार आहे.

हें पत्र राक्षसाच्या त्वरित हातीं जाण्याचीही तजवीज झाली. पत्र कोणाकडून आलें आहे याची चौकशीकरितां चंद्रगुप्ताकडून आलें आहे, हें पाहण्याबरोबर तें तावडतोब फाडून टाकावें असें त्याच्या मनांत आलें; परंतु आंत काय लिहिलें आहे तें पाहतांच तो अगदीं आश्चर्यचकित झाला. पर्वतेश्वराची चौकशी करण्यास व खरे फितूर कोण आहेत, त्यांचा शोध लावून त्यांचें पारिपत्य करण्यास आपल्याला अधिकरणिकत्व देऊन तो आपल्यास तें स्वीकारण्याबद्दल लिहितो, हें पहातांच त्यास आश्चर्य वाटणें अगदीं साहजिक होय. त्यास नुसतें आश्चर्य वाटलें इतकेंच नव्हे, तर आपण काय करावें हें त्यास सुचेना, ह. अधिकरणिकाचा अधिकार आपण या वेळीं पतकरिला, तर आपण चंद्रगुप्ताची सेवा पतकरली, त्याला नंदांच्या सिंहासनावर बसविण्यांत अनुमति दाखविली, असें होतें. बरें न पतकरावा, तर आपलें कांहीं तरी अंग होतें म्हणून याला हा अधिकार देत असतां यानें तो पतकरिला नाहीं, असें जगांत करण्यास हे

लोक कधीं सोडणार नाहींत. तेव्हां आपण हा अधिकार पतकरिला, तर आपल्यास पर्वतेश्वरास वेडेवांकडे प्रश्न विचारून यांत या तिघांचें अंग किती आहे हें काढून घेऊन लोकांच्यापुढें मांडतां तरी येईल. याकरितां तो अधिकार पतकरावा आणि यांचे दांत यांच्यांच घशांत घालावे, म्हणजे मला हा अधिकार देण्यांत जर त्यांचा कांहीं कुत्सितपणा असला, तो बाहेर पडेल, याखेरीज आतां आपल्याला स्वतंत्रपणानें कांहीं करतां यावयाचें नाहीं. आपल्या पक्षाला आतां राहिलें आहे तरी कोण, हें समजणेंच आतां कठिण आहे. आपण एखाद्याचा विश्वास समजून एखाद्याला आपलें कांहीं गुप्त कार्य सांगितलें, आणि त्यानें तें आपल्या शत्रूस सांगितलें, म्हणजे मग काय राहिलें ? त्यापेक्षां त्यांनीं आपल्यास अधिकार देण्याचें योजिलें आहे, तोच अधिकार आपण स्वीकारून त्यांचे पाय त्यांच्या गळ्यांत घालावे. असा पूर्ण विचार करून राक्षसानें आपल्या प्रतीहारीबरोबर उत्तर पाठविलें तें असें:– " व्याधपति प्रद्युम्नदेवात्मज कुमार चंद्रगुप्त यांप्रति अमात्य राक्षसाचे अनेक आशीर्वाद वि. आपलें पत्र आलें त्याप्रमाणें पर्वतेश्वराच्या कृष्णकारस्थानांची चौकशी करण्याचें महत्कार्य मी करण्यास सिद्ध आहें. मात्र त्या चौकशींत ज्यांचे ज्यांचेवर अपराध लागू होईल, त्यांचें त्यांचें मी सांगेन तसें पारिपत्य व्हावें अशी व्यवस्था ठेविली पाहिजे. मग माझेकडून कांहींसुद्धां अनमान नाहीं. नंदवंशाचा घात करणाऱ्यांस योग्य तें पारिपत्य करण्यानेंच काय तीं आतां त्या नष्ट वंशाची शेवटची सेवा माझ्या हातून होणार. " तें पत्र वाचतांच चाणक्यास अत्यानंद झाला व आपल्या नीतिनैपुण्याचा आतां अगदीं कळस झाला असें मनांत येऊन आणि " अमात्या ! आतां तूं पक्का जाळ्यांत सांपडलास ! " असें आपल्याशींच म्हणून त्यानें एकदम टाळी वाजविली.

---

# प्रकरण ३२ वें.

## न्याय काय झाला ?

राक्षसाला अधिकरणिक नेमण्याच्या युक्तीचा चाणक्याचे मनांतला हेतु एवढाच कीं, त्यास एकवार त्याच्या अज्ञातवासांतून काढून बाहेर समरांगणांत आणावें आणि त्याची चांगली फजिती करून त्याला चंद्रगुप्तास सिंहासनावर बसविण्यांत पुढाकार घेण्यास लावावें. चाणक्य फार नीतिचतुर, मोठा कुटिल, आपल्या वैऱ्याचा पूर्णपणें नाश करण्याविषयीं अगदीं तत्पर, महाकोपिष्ठ इत्यादि सर्व होता; परंतु एक मोठा अवगुण त्याचे अंगा मुळींच नव्हता. तो यत्किंचितही लोभी नव्हता. स्वार्थ हा त्यास मुळींच ठाऊक नव्हता. त्याला

अधिकार नको होता, त्याला द्रव्य नको होतें. आपला अपमान झाला तो त्याला दुःसह होऊन त्यानें जी घनघोर प्रतिज्ञा केली होती, ती त्याला पार पाडावयाची होती. ती पार पाडण्यासाठीं त्यानें जे जे प्रकार करावयाचे ते सर्व केले. हिमाचलांतल्या व्याधादिकांना आपल्या औषधिज्ञानानें आपला उपयोग करवून देऊन त्यांची कृपा संपादन केली. धनुर्वेदासारखें शास्त्र व त्याचे प्रयोग यांत प्रवीणता मिळविली असल्यामुळें तेंही ज्ञान त्यांच्या मुलांबाळांस देऊन तीं तरुण मुलें आपल्या अंकित करून घेतलीं. सारांश, अगदीं कफल्लक, दरिद्री, परंतु केवळ आपल्या विद्याधनावर त्यानें हिमाचलांतील कित्येक व्याध, भिल्ल वगैरे लोकांच्या राजांवर व गोपाल, अजपाल वगैरे इतर लोकांवर आपली छाप बसविली. सारांश काय कीं, प्राचीन काळचे ऋषि जसे वागत, तसेंच त्यानें वागून त्या सर्वांस आपल्या अंकित करून ठेविलें. आणि त्यांच्या मुलांची तर त्याजवर अशी भक्ति बसली कीं, वा! मनुष्य अत्यंत विद्वान् आणि पूर्ण निरपेक्ष असा असल्यानंतर त्याची छाप कोठेंही काय सहज बसणार हें उघडच आहे. जे त्याचे गुण हिमाचलावर त्याच्या उपयोगीं पडले, तेच योग्य प्रकारें उपयोगिल्यानें पाटलिपुत्रांतही त्यास उपयोगीं पडले. त्याचें मोहक भाषण भागुरायणास वश करून घेण्यास फार उपयोगीं पडलें. त्याचप्रमाणें त्याचे मंत्र, तंत्र व औषधि-ज्ञान यानें आणि वसुभूतीनें त्यास आश्रय दिल्यामुळें पाटलिपुत्रांतील कित्येक श्रेष्ठींशीं त्याचा संबंध जडला व तो पुढें फार दृढ झाला. चंदनदासारखे राक्षसाचे स्नेहीही त्यास फार मानूं लागले. इतकें सगळें होतें, तरी हा ब्राह्मण अगदीं फटकून वागल्याप्रमाणेंच वागत असे. कधीं कोणाजवळ त्यानें एक कपर्दिकही मागितला नाहीं. कोणी प्रतिग्रह दिला, तरी तो आपण घेत नाहीं, म्हणून परत केला. इतकें सगळें असून त्यानें आपलें खरें स्वरूप कधींच कोणास कळूं दिलें नाहीं.

ज्या वसुभूतीमुळें त्याची पाटलिपुत्रांत सर्वत्र ओळख झाली, त्या वसुभूतीलाही त्यानें सोडलें नाहीं. त्याच्याशीं पहिल्याप्रमाणेंच आपलें वर्तन ठेविलें. मात्र सिद्धार्थकाला पूर्णपणें आपल्या भजनीं लावून घेतला. सिद्धार्थक कमी लटपट्या नव्हे; त्यानें चाणक्यास नानाप्रकारचें जें सहाय्य केलें, तें सर्व येथें सांगत बसण्याचें कारण नाहीं. परंतु निरपेक्ष, पण अत्यंत तेजस्वी व विद्वान् ब्राह्मण अगदीं एकाएकी असूनही केवळ आपल्या चातुर्यावर कितीं व्यूह रचून काय काय प्रकार करील याचा नेमच नाहीं; त्यांतही मुलांनीं यवनांपासून लुटलेलें द्रव्य त्याच्याजवळ असल्यामुळें द्रव्याची वाण त्यास पडलीच नाहीं. असा प्रकार झाल्यामुळें तो जें म्हणेल तें हां हां म्हणतां बनतच गेलें. आणि आतां सगळ्या गोष्टींचा अगदीं कळस करण्यापर्यंत पाळी आली. राक्षस हा केवळ सरळ व एकमार्गी पुरुष. त्याला आपलीं धोरणें मुळींच कधीं समजावयाचीं नाहींत, अशाबद्दल त्याची केव्हांच खात्री झाली. आपण इतकीं गुप्त कारस्थानें करीत असतां त्यास त्यांचा कांहीं संशय येऊं नये, आपण त्या व्याधराजाच्या पुत्राबरोबर आलेले कोणी दरिद्री बुभुक्षित ब्राह्मण एवढीच कल्पना घेऊन तो बसला, आणि भागुरायण सेनापति त्याच्या नादीं लागला आहे तेव्हां आपण त्याच्याकडे पाहूंही नये, आपल्या मोठेपणास तें उचित होणार नाहीं, असा त्यानें मनांत निर्धार केला, ही गोष्ट चाणक्यास अर्थातच फार श्रेयस्कर झाली. त्यास परस्पर वाटतील तशा गोष्टी करतां आल्या. सारांश, चाणक्याला जें जें कांहीं अनुकूल तें तें प्राप्त झालें. आतां जें

काय करावयाचें तें एवढेंच कीं, राक्षसाच्या अनुकूलतेनें चंद्रगुप्तास सिंहासनावर बसवून राक्षसास त्याचें साचिव्य करावयास लावावयाचें, आणि नंतर त्याच्याकडून ग्रीक यवनांचा एकवार चांगला पराभव करवून त्यांस मार्गे रेटीत आर्यावर्तांतून काढून लावावयाचें. एवढें झालें म्हणजे आपली इच्छा तृप्त झाली. आपण पुनः आपल्या हिमाचलांतल्या आश्रमांत जाऊन तपश्चर्या करीत बसावयाचें असा त्याचा विचार-नव्हे निश्चय होता. राक्षसास आतां अनुकूल करून घेण्यास, द्रव्य किंवा अधिकार यांची लालूच कांहीं उपयोगी नव्हती. आपल्या स्वामिकुलाचा ज्यांनीं विध्वंस केला, त्यांचीं कारस्थानें बाहेर काढून त्यांची लोकांत छीःथू करवून त्यांना देहांतप्रायश्चित्त जर मिळालें, तर तें आपल्या हातून मिळावें, आणि लोकांत आपला माथा उजळ व्हावा हेंच त्याला इष्ट होतें. तें आपल्या हातून होणार असें त्याला वाटूं लागलें, तरच तो पुढें येईल. नाहींपेक्षां तो पुढें न येतां कोठें तरी परकी राजाकडे जाऊन त्याची मदत घेऊन चंद्रगुप्तास त्रास देण्याची तयारी करील. एवढ्याकारितां त्याला अनुकूल करून घेतला पाहिजे. असा विचार करून त्यानें चंद्रगुप्ताकरवीं त्याला पत्र लिहिलें आणि त्याच्या अदमासाप्रमाणें राक्षसानें तें काम पतकरिलेंही. आपल्या चौकशींत आपणच अपराधी म्हणून पुढें येणार, असें त्याच्या स्वप्नींही आलें नाहीं. असो. त्यानें आपण न्यायाधीश होऊन न्याय करण्याचें पतकरल्यावर दुसरे दिवशींच न्यायासनासमोर न्याय होण्याचें ठरलें, आणि राक्षस न्यायासनावर अधिष्ठित होण्यासाठीं गेला. चंद्रगुप्ताची व त्याची गांठ पडण्याबरोबर चंद्रगुप्तानें त्यास सांगितलें. "अमात्य, प्रथमतः चौकशी गुप्तपणेंच व्हावी, तें चांगलें. न जाणों, आपण चौकशी करतों आहों असें जर त्या फितुरांच्या कानीं गेलें, तर ते पळून जातील, आणि मग आपल्याला त्यांना पकडून आणायला फार त्रास पडेल; किंवा सभोंवतालीं यवन अशा फितुरांना मिठ्या मारायला अगदीं सिद्धच आहेत, त्यांच्याकडे ते जातील. एवढ्याकरितां आपण पर्वतेश्वराला घेऊन त्याच्याजवळ सर्व विचारपूस करूं आणि त्या विचारपुशींत ज्यांचीं ज्यांचीं नांवें निघतील, त्यांना त्यांना एकदम धरून आणून आपण म्हणाल ती शिक्षा देऊं. मग तो कोणी कां असेना—एखादा महाविद्वान् श्रोत्रिय ब्राह्मण असो किंवा कोणी चांडाल असो."

चंद्रगुप्ताचें तें बोलणें राक्षसास बरें वाटलें आणि त्यानें त्याच्या म्हणण्यास रुकार दिला. राक्षसाच्या मनानें असें पक्कें घेतलेलें कीं, चंद्रगुप्त, चाणक्य आणि भागुरायण यांनींच हें सगळें कारस्थान रचलेलें आणि पर्वतेश्वर मध्येंच कांहीं तरी कारणानें चुकून पडला; किंवा त्याला यांनीं फसविलें. नक्की काय झालें आणि पर्वतेश्वर यांत कसा आला याचा तर्क करणें कठिण होतें. कांहीं असो; मी या सगळ्याच्या तळाशीं जाऊन, काय खरा प्रकार आहे तो काढीन आणि यांची पुरी फजिती उडवीन. यांनीं मला फसवून जाळ्यांत पकडण्यासाठीं न्याय करण्याला वगैरे बोलावलें आहे; पण मी त्यांचीं सगळीं कारस्थानें बाहेर काढून त्यांचे दांत त्यांच्याच घशांत घालून त्यांची खात्री खात्री करीन. असा विचार करून राक्षस न्यायासनाच्या स्थानीं गेला. तेव्हां तेथें चंद्रगुप्त आणि भागुरायण असे दोघेच बसले होते. त्या दोघांनींही तो येण्याबरोबर उठून उभें राहून त्याचा आदरसत्कार केला आणि त्यास मध्यस्थानीं बसविलें. भागुरायण आणि चंद्रगुप्त दोघेही लुच्चे आहेत; परंतु आतां आपण त्यांची लुच्चेगिरी बाहेर काढून त्यांच्या ढोंगाचा चांगलाच स्फोट करूं,

असें त्यानें योजिलें. हा विचार मनांत येतो न येतो, तो पुनः एकदम त्याला असें वाटलें कीं; या दोघांनीं आजमित्तीस सर्व अधिकार आक्रमण करून टाकला आहे. तेव्हां यांचें पारिपत्य आपण करणार कसे ? समजा कीं, आपल्या निदर्शनास असें आलें कीं, यांनींच पर्वतेश्वराकडून नंदकुलाचा घात करविला: तरी काय होणार ? हे लबाड काय कबूल करणार आहेत ? हे स्वतः आपल्यावरच उलटून कांहीं तरी बालंट घेणार नाहींत म्हणून कशावरून ? परंतु आतां हा विचार येथें अगदीं निरर्थक होतें. आतां त्या विचाराचा कांहीं एक उपयोग नव्हता. इतका वेळ सगळ्या गोष्टी कबूल करून आतां येथून निघून जाणें किंवा आतां मी पुढें न्याय करण्यास बसत नाहीं असें म्हणणें, म्हणजे केवळ संशयाला कारण होईल. आतां जें काय करण्याकरितां म्हणून आपण आलों, तें मुकाट्यानें करून घ्यावें. पुढचें पुढें पहातां येईल. असा विचार करून आपली शंका प्रतिशंका दूर सारून तो चंद्रगुप्तास म्हणाला, " किरात–राजकुमार चंद्रगुप्ता, नंदांचा वंश नष्ट होऊन आतां तूं त्यांच्या सिंहासनाची व्यवस्था पाहायला राहवंस काय ? काय घात ! केवढा घात ! हा घात करणाऱ्या नीच पुरुषांचें काळीज तरी काय असेल ! असो; तुझ्या हातून तरी आतां काय होतें तें पाहूं. न्याय करण्याला मी हा सिद्ध आहें. त्या दुष्ट पर्वतेश्वराचंच काय म्हणणं आहे तें पहिल्यानं ऐकून घ्यायचं आहे, तर त्याला घेऊन ये. "

राक्षसाचें हें भाषण ऐकून भागुरायण व चंद्रगुप्त एकमेकांकडे पाहूं लागले.

थोड्याच वेळांत चंद्रगुप्तानें पर्वतेश्वरास बोलावून आणण्याला सेवक पाठविला. पर्वतेश्वर बोलून चालून कैदी. त्याला बोलावतील तिकडे व तेव्हां जाणें भागच. तो लागलींच उठला आणि सेवकाबरोबर तेथें गेला. दारांतून आंत पाऊल घालतो न घालतो, तों त्याची दृष्टि राक्षसावर गेली, आणि मग मात्र त्याचा संताप त्याच्या पोटांत मावेना. त्याला एकदम उद्रेक आला. तो जर स्वतंत्र असता, तर त्यानें आपल्या तलवारीनें राक्षसाला ठारच केला असता, इतका त्याला त्या वेळीं संताप आला होता. तो राक्षसाला एकदम दरडावून म्हणाला, " अमात्य राक्षसा, तूं नांवाचाच नाहीं, पण खरोखर कृतीनंसुद्धां राक्षस आहेस ! नीचा, तुला आपल्या स्वामीचा आणखी त्याच्या कुळाचा नाश करायचा होता, तर त्यांत मला कशाला गुरफटून धेऊन फसवलंस ? मीं नीतीचे पुष्कळ मासले पाहिले; पण अशी विश्वासघाताची नीति कोठेंही कोणीं आजपर्यंत पाहिली नसेल. तुझ्या मुद्रा ठोकलेलीं पत्रें जर नसतीं, तर मीं कधींसुद्धां अशा पत्रांवर भरंवसा ठेवला नसता; परंतु माझं नष्टचर्यच ओढवलं, त्याला मी तरी काय करणार ! अत्यंत अधम तूं, यांत मुळींसुद्धां संशय नाहीं. आणखी मला आपल्यापुढें आणवून माझी विटंबना करण्याच्याच हेतूनं मला आतां बोलावलंस कीं नाहीं ?...... "

पर्वतेश्वराच्या मनांत आणखी पुष्कळ बोलावयाचें होतें; परंतु त्याच्या तोंडून कांहीं शब्द उमटेनात इतका त्याचा संताप वाढला.

इकडे राक्षस तर तें बोलणें ऐकून फारच आश्चर्यचकित झाला. आपली मुद्रा ठोकलेलीं पत्रें या पर्वतेश्वराला गेलीं, त्यामुळें आपण आलों, असें हा म्हणतो, याचा अर्थ तरी काय ?

पर्वतेश्वराच्या या बोलण्याला आपण उत्तर तरी काय देणार ? राक्षसाच्या मनाची ही स्थिति चंद्रगुप्तानें ताडली. किंबहुना असा प्रकार होणार हा तर्क त्यास झालाच होता. तेव्हां अगदीं शांतपणें तो पर्वतेश्वरास म्हणतो.

" पर्वतेश्वरा, उगीच कोणाचें तरी नांव घेऊन कांहीं तरी बडबड करण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. अमात्यराज राक्षस हे आतां अधिकरणिकाच्या स्थानीं बसले आहेत. एकंदर राजघात कसा झाला, काय झाला, तूं मगधावर स्वारी करायला येथवर कसा आलास, याबद्दल चौकशी करण्याचं काम त्यांनीं पतकरिलं असून अपराध्यांना शिक्षा देण्याचेंही त्यांचेकडेस सोंपविलं आहे. तेव्हां तूं असा उगाच संतापानं बोलून कांहीं कोणी ऐकणार नाहीं. तूं मोठा राजा आहेस. तुला आम्ही खंडणी घेऊन परत तुझ्या राज्यांत पोंचवावं हेंच विहित. परंतु तसं करायचं, कीं तुला येथेंच बंदिखान्यांत ठेवायचं, ह्याचा निकाल तुझ्यावरच आहे. तूं सर्व खरी हकीकत सांगून खरे अपराधी स पडवून–निदान सांगून दिलेस, तर तुला आम्ही थोड्या खंडणीवर परत पाठवूं. नाहीं तर हे अधिकरणिक अमात्य राक्षस..."

" वाहवा ! अमात्य राक्षस न्यायाधीश !" पर्वतेश्वर विकटपणें हंसून म्हणतो, " एकून आपल्या या मगधदेशांत अपराध्यालाच न्ययाधीश नेमीत असतात म्हणायचं ! अहो, या दुष्टानं आपण होऊन मला पत्रं पाठविलीं कीं, अमुक दिवशीं अशा अशा प्रकारानं मी राजकुलाचा घात करणार आहें, त्याच सुमाराला अगदीं थोडें सैन्य घेऊन ( फार आणलंत तर विनाकारण वाटेंतल्या लोकांना संशय येईल असं लिहिलं होतं बरं त्या पत्रांत यानं!) येऊन पाटलिपुत्राला एकदम वेढा द्या. मी पूर्णपणें अनुकूल आहें. तेव्हां आपण कसलीही शंका घेऊं नका; असं यानं मला लिहिलं. आणि मी आपला माणूस पाठवून कदाचित् कांहीं चौकशी करीन तर मला लिहितो, ' माझ्या पत्रांचीं उत्तरं माझीं पत्रं घेऊन येणाराबरोबरच पाठवा. आपल्या माणसाबरोबर पाठवूं नका. न जाणों तीं कोणाच्या हातांत जातील आणि काय होईल याचा नेम नाहीं. अमात्य राक्षस फार प्रामाणिक. तो असला विश्वासघात-अधमपणा करील अशी मला कधीं शंका आली नाहीं; पण मी गाढव म्हणूनच असं झालं. शंका आली नाहीं म्हणजे काय ! यायला पाहिजे होती. पण माझं दुर्दैव ओढवलं. चंद्रगुप्ता, आतां तूं राजा होणार; ' पण संभाळ. हा दुष्ट नीच असाच तुझासुद्धां एखादे दिवशीं घात करील.... "

भागुरायण व चंद्रगुप्त अगदीं आश्चर्यचकित झाल्याप्रमाणें होऊन राक्षसाकडे पाहूं लागले. जणूं काय त्यांस ही सगळी हकीकत अगदींच नवीन होती आणि तीही अक्षरशः खोटी वाटत होती. चंद्रगुप्त अगदीं स्तब्ध बसला होता. राक्षसही कांहीं वेळ स्तब्धच होता. इतक्यांत काय त्याच्या मनांत आलें आणि तो एकदम उठून उभा राहिला व म्हणतो, " पर्वतेश्वरा, तूं शुद्धीवर आहेस काय ? कीं शत्रूच्या हातीं सांपडल्यापासून तूं अगदीं भ्रमिष्ट झाला आहेस ? कुठें आहेत काढ तीं पत्रं. "

" हीं घे ! अधमा, नीचा, तीं पत्रं मीं ठेवलीं नसतील असं तुला वाटलं काय ? बघा हो बघा हीं सगळीं पत्रं. त्यांच्यावरल्या या नीचाच्या मुद्रा बघा. आणखी एका पत्रांत स्वामिघाताचं सगळं कारस्थान अगदीं इत्थंभूत लिहिलं आहे, तेंही वाचा. त्याच्याखालीं त्याची स्वतःचीं मुद्रा पहा. राक्षसा, अजून तरी आतां खोटं बोलून तें न्यायासन विटाळूं नकोस. खालीं उतर. अरे नीचा, तुझी न्यायासनावर बसण्याची योग्यता काय ? आतां मला जर कोणी विचारील कीं, त्याच्या योग्यतेचं नांव सांगा, तर मी तें एकच सांगेन– स्मशानांतला वधस्तंभ किंवा शूल. "

राक्षस अत्यंत संतापला. त्यास हें काय गौडबंगाल आहे तें समजेना !

# प्रकरण ३३ वें.

## न्यायाधीश कीं अपराधी ?

पर्वतेश्वराचें हें भाषण चाललें असतां राक्षसाच्या अंगाचा तिळपापड झाला आणि तो लाल होऊन त्याच्याकडे पाहूं लागला. केवळ संतापामुळें त्याच्या तोंडून शब्द निघेना. चंद्रगुप्त आणि भागुरायण दोघेही अर्थपूर्ण दृष्टीनें एकमेकांकडे पाहत होते. थोडा वेळ गेल्यावर अमात्य राक्षसाची इतका वेळ संतापानें बंद झालेली वाचा फुटली व तो एकदम म्हणतो, " असत्य ! असत्य ! " परंतु तितक्यांत त्यास असें वाटलें कीं, अशा प्रसंगीं आपण आपला संताप बाहेर दिसूं देणें हें ब्राह्मणपणाचें काम नव्हे. संताप गिळून शांतपणानें बोलूनच खरा प्रकार बाहेर काढला पाहिजे. असा विचार करून तो मोठ्या कष्टानें आपला संताप गिळून म्हणतो, "पर्वतेश्वरा, मीं जर अशीं पत्रें तुला लिहिलीं नाहींतच, तर तूं तीं माझ्या अंगावर भराभर फेंकून काय होणार ! पर्वतेश्वरा, तूं आपल्या निर्बलत्वामुळें शत्रूच्या हातीं सांपडलास म्हणून तुझी बुद्धि भ्रांत झाली असेल, किंवा माझ्या नांवानें तुला कोणीं तरी फसविलें असेल. तेव्हां आपण फसलों याबद्दल खेद होत असतां विनाकारण भळभळतींच कुंभांडें माझ्यावर घेऊं नकोस. जे कोणी नीच लोक तुला फितुर झाले असतील त्यांचीं नांवें भराभर सांगून मोकळा हो म्हणजे तुला खंडणीवारी परत जाऊं देऊं. मग त्या फितुरांचाच काय तो विचार करतां येईल. नाहींपेक्षां या नंदांच्या राज्यांतून तूं धडपणें परत जाशील असें समजूं नकोस. ज्या गोष्टी जशा घडल्या असतील, त्या तशा सांगून तूं आपला मोकळा हो. "

राक्षसाचें तें भाषण ऐकून तर पर्वतेश्वर फारच चिडला. या नीचानें आपणास फसवूनच्या फसवून पुनः आतां आपला न्याय करण्यासाठीं आपणच न्यायासनावर बसून आपल्यास उपरोधिक भाषणें बोलतो आहे. आतां याच्या प्रश्नास उत्तर देण्यापेक्षां एकवार चंद्रगुप्त व भागुरायण यांच्याकडे वळून आपल्यास काय सांगावयाचें, बोलावयाचें तें बोलून सांगून टाकावें आणि पुढें अगदीं मौन धरावें असा त्यानें विचार केला व तो एकदम त्या दोघांकडे वळून म्हणतो, "अहो, जे अपराधी असतील त्यांनाच न्यायासनावर बसवून मोठेपणा द्यावयाचा, आणि त्यांच्या कारस्थानाला बळी पडलेल्या लोकांचा त्यांच्याकडून उपमर्द करावयाचा, त्यांचा छळ करावयाचा, असा या नंदाच्या राज्यांतला प्रघात आहे काय ? अमात्य राक्षस म्हणजे नंदांचा अत्यंत स्वामिनिष्ठ सेवक, अशी सगळ्या त्रिभुवनभर कीर्ति झालेली. आपली एकवार अशी कीर्ति झाली, म्हणजे आपल्याला वाटेल त्या तऱ्हेनें वागायला जणूं काय मोकळीकच झाली, अशी या असल्या नीचांची चालच असते. कांहीं

कारण नसतां मला आपण होऊन पत्रें पाठवून मगधावर स्वारी करण्याचं यानें आमंत्रण दिलें. ' राजा धननंद अगदीं मूर्ख आहे. त्याचं राज्यांत मुळींच लक्ष्य नाहीं, शिवाय तो एका वृपलीच्या नादीं लागला आहे. त्याला असाच वहकूं दिला, तर मगध देशाची नीट अवस्था नाहीं. आपण स्वारी कराल, तर हीच संधि आहे. मी आंतून इतकी व्यवस्था केली आहे कीं, अमुक दिवशीं अमुक वेळेला त्याचा त्याच्या मुलाबाळांसकट पुरा नाश व्हावा; तेव्हां त्याच प्रसंगाला आपण येथें येऊन उभे राहिलां, कीं कार्यभाग होईल. कुराजकापेक्षां अराजक बरें; परंतु आपल्यासारखे राजे अगदीं संनिध असतां कुराजक तरी कां राहूं द्यावं आणि अजारक तरी कां करून घ्यावें ? ' अशा प्रकारचीं पत्रें यानें मला एकामागून एक अशीं पाठविलीं. नंदांचा घात केला आणि माझाही घात करून राज्य आपल्याच ताब्यांत घ्यावें अशी महत्त्वाकांक्षा या अधमाला आहे कीं काय कोण जाणे ! चंद्रगुप्ता, तूं मोठा पराक्रम करून मला धरलेंस. तेव्हां खरोखर तूं आतां या राज्याचा स्वामी झालास; पण तुझें स्वामित्व कायम रहावें, अशी जर तुझी इच्छा असली, तर या अधमाला आधीं यमलोकीं पाठवून दे. नाहींपेक्षां हा तुझाही केव्हां घात करील याचा अगदीं नेम नाहीं हें पक्कें समज. ज्या नीचानें इतके दिवस स्वामिनिष्ठेचें विलक्षण सोंग दाखवून शेवटीं त्याच आपल्या स्वामीचीं पाळेंमुळें खणून टाकण्याचा भयंकर प्रकार केला, तो कोणावर खरी निष्ठा ठेवणार आहे ? मी तुझ्या स्वाधीन झालों आहें, तेव्हां आतां माझ्या बोलण्याची कांहीं किंमत तुम्हांला वाटणार नाहीं हें साहजिक आहे; पण या नीचाच्या फुसलावणीला मी भुललों, तसं तुम्हीं भुलूं नये, म्हणून एवढी कळकळीनं विनंति करतों आहें. याउपर मी अधिक कांहींच बोलत नाहीं. न्याय करून मला वधस्तंभावर नेऊन माझा शिरच्छेद करा, मला सुळीं द्या किंवा आणखी कांहीं तरी क्रूर प्रकार निवडून काढून तशा प्रकारें मला मृत्यु येऊं द्या; पण आतां या अधमाचीं उपराधिक भाषणें मला ऐकायला नकोत. आतां याउपर मी तोंडून एक अक्षर उच्चारणार नाहीं. बोललों हेंच फार झालें. आतां माझा न्याय करा कीं अन्याय करा. जेथें चोर, लबाड, घातकी न्यायाधीश बसतात, तेथें न्याय कसा होणार हें उघडच दिसतं आहे. ”

इतकें बोलून पर्वतेश्वरानें आपल्या जवळचीं सर्व पत्रें चंद्रगुप्त व भागुरायण यांचेकडे फेंकलीं. तीं त्यांनीं घेऊन अत्यंत आश्चर्यचकित अशा मुद्रेनें समग्र वाचलीं. आणि त्या आश्चर्यानें अगदीं स्तब्ध झाल्यामुळेंच काय, ते दोघेही अगदीं स्वस्थपणें पर्वतेश्वराकडे व राक्षसाकडे आळीपाळीनें पहात राहिले. अशा प्रसंगीं जणूं काय, काय करावें हेंच त्यांस समजेना. वस्तुतः पहातां आतां राक्षस काय करतो, हेंच त्यांस पहावयाचें होतें; किंबहुना तें पहाण्याकरितांच तर हा सर्व प्रकार त्यांनीं घडवून आणला होता. आपण मधेंच कांहीं बोलल्यानें राक्षसास विनाकारण संशय येईल, आणि त्या संशयापासून त्यास जरी कांहीं फायदा झाला नाहीं, तरी शेवटीं जें कांहीं आपणास साधावयाचें आहे, तें साधण्याचा संभव कमी होणार आहे, हें ते जाणून होते.

इकडे राक्षसास कांहीं सुचेनासें झालें. आपल्यावर पर्वतेश्वर कुभांड घालतो आहे हें त्यास धडधडीत दिसलें; परंतु त्या पत्रांच्या खालीं मुद्रा पाहिल्या, तर त्या आपल्याच असल्याबद्दल त्याची खात्री झाली. पर्वतेश्वरानें लबाडी केली म्हणावी, तर त्याला आपली मुद्रा कशी मिळाली, हें त्यास मोठें गूढ पडलें. आपला मुद्राधारक पर्वतेश्वरास

अनुकूल झाला असेल हें त्यास मुळींच संभवनीय वाटेना. पर्वतेश्वराच्या राज्यांत ज्याप्रमाणें आपण आपले हेर, चार ठेवून बातम्या आणतों, त्याप्रमाणें त्यानेंही आपले हेर मगध देशांत ठेवून येथील बातम्या काढण्याचा धंदा सुरू केला होता काय ? जर असेल तर आपली पुरी फजिती. कारण आपण आपल्यास मोठे मुत्सद्दी म्हणवीत आलों. सगळ्या पुष्पपुरींत कोठें काय चाललें आहे त्याची बातमी आपणास असावयाची असा प्रकार असून, प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांदेखत आपल्या स्वामीचा व त्याच्या कुलाचा नाश होतो, आणि पर्वतेश्वरासारखा शत्रु आपल्या नगराला वेढा देण्यापर्यंत येतो, याचा अर्थ काय ? आपण असे कसे आंधळे बनलों ? एवढ्यानेंच संपत नाहीं. तो शत्रु दुसऱ्याकडूनच पकडला गेला. आणि तशा पकडल्या स्थितींत तो आपल्या माथीं सर्व दोष घालतो, आपल्या मुद्रेनें अंकित अशीं पत्रें पुराव्याकरितां दाखल करितो, हें एकंदर इंद्रजाल आहे तरी काय ? अंधार, राक्षसाच्या डोळ्यांपुढें निवळ अंधार दिसला. त्यास कांहींच समजेना. आपल्या मुद्रेनें अंकित अशीं पत्रें पुढें आणिलीं आहेत ता आपलीं नाहींत, आपल्याला त्या पत्रांविषयीं कांहीं सुद्धां माहिती नाहीं, असें आपण नुसतें म्हटलें, तर कोण खरें म्हणेल ? तीं पत्रें आपण लिहिलीं नाहींत असें सिद्ध करण्याला आपण पुरावा काय देणार ? आतां आपण या कचाट्यांतून सुटणार तरी कसे ? पर्वतेश्वराचें म्हणणें सर्व लोकांच्या कानीं गेलें, तर ते आपल्याबद्दल काय म्हणतील ? आपल्या आजपर्यंतच्या कीर्तीला केवढा डाग लागेल ! आजपर्यंत अत्यंत स्वामिनिष्ठ म्हणून मिळालेलें नांव कोणीकडे गेलें ? एक कीं दोन ? हजारों विचार त्या विचाऱ्याच्या मनांत येऊं लागले. शेवटीं त्या सर्व विचारांस दूर सारून व तशा चमत्कारिक संकटांत मन शांत करून तो चंद्रगुप्ताकडे व भागुरायणाकडे वळून म्हणतो, "कुमारा, ज्या अर्थी हा पर्वतेश्वर मलाच या प्रकरणांत गुंतवतो आहे, आणखी मींच त्याला या पुष्पपुरीवर चाल करून येण्याविषयीं पत्रें लिहून विनंति केल्याचें सिद्ध करतो आहे, त्या अर्थी त्याच्याबरोबर मलाही आरोपी म्हणून तुम्हीं माझा न्याय करविला पाहिजे. पर्वतेश्वर म्हणतो तेंच खरें. मीं आता न्यायासनावर बसणें म्हणजे न्यायासन विटाळणेंच होय. तुम्ही याच्यापासून पुष्पपुरीचें संरक्षण केलें; अर्थातच लोक तुम्हाला, आपले सर्वांचे त्राते म्हणून मान देणार. कुमारा, तूं आतां मगधाच्या सिंहासनावर बसलास, तरी ते तुला राजा मानण्यास हरकत घेणार नाहींत; हें सर्व ठीक आहे; परंतु पर्वतेश्वराबरोबर माझाही आतां न्याय करविणें तुम्हांला जरूर आहे. त्याप्रमाणें कोणाही चतुर माणसास न्यायाधीश नेमून माझ्यावर आरोप ठेवा. न्याय करा. त्या न्यायाप्रमाणें मला काय शिक्षा भोगावी लागेल ती भोगायला मी अगदीं तयार आहें. आजपर्यंत मीं हजारों लोकांचे न्याय करून त्यांना देहांतापर्यंतच्या शिक्षा दिल्या. माझ्यावर स्वामिघाताचा, स्वामिकुलघाताचा आणि म्लेंच्छांचा आश्रय करून मोठेपणा पावणाऱ्या पर्वतेश्वराच्या स्वाधीन स्वराज्य करण्याचा, असे तीन आरोप ठेवा. जर माझें दैव अनुकूल असेल, तर माझी या लांछनापासून मुक्तता होईल, नाहीं तर आपण जगण्याला योग्यच नाहीं असें समजून मीं आपल्या शरीरापासून आपल्या आत्म्याला मुक्त करीन. चला, मला या घटकेस कारागृहांत घेऊन चला."

इतकें बोलून राक्षस न्यायासनावरून खालीं उतरला आणि पर्वतेश्वरापासून कांहीं

अंतरावर जाऊन उभा राहिला. इतक्या वेळची त्याची क्षुब्धवृत्ति आतां अगदीं शांत झाली. आतां तो केवळ धैर्याच्या मूर्तीप्रमाणें दिसूं लागला. चंद्रगुप्त व भागुरायण यांस वाटत होतें कीं, पर्वतेश्वरानें त्याचें नांव घेत-ल्याबरोबर तो धावरून जाऊन, "आपल्यास यांतून सोडवा; पर्वतेश्वर सांगतो हें सर्व खोटें आहे," असें म्हणून आपल्या विनवण्या करील किंवा कांहीं त्रागा करून अद्वातद्वा बोलूं लागेल. पण तोच शांतपणें, "मलाही न्यायासनासमोर नेऊन माझा न्याय करा," म्हणून उभा राहील असें त्यांस वाटलें नव्हतें; परंतु आतां पहातात तों तो अगदीं धीरानें, वाटेल तें होऊं द्या, मी तें सोसण्यास तयार आहें, असें म्हणण्याची चर्या करून त्यांचे पुढें उभा राहिला. नंदांचा घात झाला, त्या वेळीं क्षुब्ध झालेली जनता जरी राक्षसाच्या विरुद्ध कितीही बोलूं लागली, तरी थोडीशी स्थिरता येतांक्षणींच राक्षसाची मित्रमंडळी त्याच्यावरील वृथारोप दूर सारून पुनः आपल्याविरुद्ध उठ-ण्यास कमी करणार नाहींत. आणि जनतेचें मत पुनः बदलण्याचा संभव आहे, हें चाणक्य पक्कें जाणून होता. क्षुब्ध जनता आणि क्षुब्ध सागर हीं दोनही अगदीं समान. शांत स्थितींत ज्याला आपल्या माथ्यावर घेतील, त्यालाच क्षुब्ध स्थितींत रसातळास नेऊन पोंचवितील किंवा उलट स्थिति करून तडी-सही नेतील. तेव्हां राक्षसावर प्रसिद्धपणें आरोप ठेवून त्याची चौकशी करण्याचें त्यांना मुळींच इष्ट नव्हतें. चाणक्याचा हेतु आतां एकच उरला होता. तो हा कीं, अमात्य राक्षसाला चंद्रगुप्ताचें साचिव्य देऊन त्याचे-कडून ग्रीक यवनांचा पार धुव्वा उडवून द्याव-याचा. तक्षशिला नगरींत असतांना ग्रीक लोकांचा आर्यांवर काय जुलम होत होता, याचा अनुभव विष्णुशर्मा ऊर्फ चाणक्ययास पूर्णपणें आला होता, म्हणून त्याचा त्या लोकांवर राग. पुढें तो पाटलिपुत्रांत आल्या-वर त्याचा मागील प्रकरणांतून सांगितल्या-प्रमाणें अपमान होऊन त्यानें नंदांचा सूड उगविण्याची प्रतिज्ञा केली आणि राक्षसा-सारख्या अमात्यधुरंधरालाही चकवून ती पार पाडली. परंतु हें सर्व किती वेळ गुप्त राहणार! राक्षसानें म्हटल्याप्रमाणें जर सर्व लोकांसमक्ष अधिकरणिक नेमून चौकशी केली तर कोठेंना कोठें तरी भांडवल बाहेर पडून सर्वच स्फोट व्हावयाचा. एवढ्याकरितां असा प्रसंग न आणणें हेंच चाणक्यास व त्याच्या पक्षास इष्ट होतें. लोकांचीं मनें क्षुब्ध आहेत, तोंवरच राक्षसाला कांहीं तरी शिक्षा करून मगधाच्या बाहेर घालविणें शक्य होतें; परंतु चाणक्यास तें दोन कारणांस्तव इष्ट नव्हतें. एक राक्षस मगधाच्या बाहेर गेल्यास चंद्र-गुप्ताचा द्वेष करूं लागून त्याच्याविरुद्ध कोठें तरी एखाद्या राजाला उठवून पुनः मगधावर स्वारी करण्यास कमी करणार नाहीं. नंदांच्या वंशाचे ठिकाणीं त्याची अत्यंत दृढ भक्ति. तो नंदवंश समूळ नष्ट झाला, तेव्हां आतां तो नष्ट करणाऱ्याचा दीर्घद्वेष करून त्याचा नाश करावा, हीच आपली इतिकर्तव्यता असें तो समजणार, आणि ती संपादण्यांत आपली बुद्धिमत्ता खर्च करणार. तेव्हां राक्षसाला घालवून देण्यांत कांहीं फायदा नव्हता. उलट तोटा होता. राक्षसाला शिक्षा न करितां आपल्या बाजूस वळवून घेण्यास दुसरें कारण हें होय कीं, चंद्रगुप्तास त्याच्यासारखा सचिव अवश्य पाहिजे होता. भागुरायण सचिव होण्याच्या योग्यतेचा माणूस नव्हे. तो चांगला शिपाई, मुत्सद्दी नव्हे. आपण चंद्रगुप्ताचें सा-चिव्य करून त्याला मदत करावी हें चाणक्यास नको होतें. त्याला आतां पुनः आपल्या आश्र-मांत जाऊन तपश्चर्या करीत बसण्याची इच्छा

झाली होती; परंतु चंद्रगुप्तास हातीं धरल्यासारखें त्याचा राज्यशकट सुयंत्रित चालू करून त्याचे हातून लवकरच ग्रीक लोकांचा समाचार घेववावयाचा. राक्षसानें एकवार त्याला नंदांच्या जागीं मानून त्याची प्रामाणिकपणें सेवा करण्याचें कबूल केलें—नव्हे शपथ घेतली—म्हणजे सर्वच कार्यभाग साध्य झाला. नंदांस आतां कोणी शत्रुच राहिला नाहीं असें वाटून तो जसा निश्चिंत राहिला, आणि आपल्यास त्याला ठकवून आपलें कार्य साधतां आलें, तसें पुढें कधींही त्याचेकडून होणार नाहीं. कारण या वेळीं त्यास चांगली अद्दल घडली आहे. चंद्रगुप्ताला सचिव राक्षसच पाहिजे. त्यानें चंद्रगुप्तास नंदवंशाचा अंकुर आणि मगधाचा राजा असें एकवार मानून त्याचा आपण सचिव असें म्हटलें मात्र पाहिजे. तें त्याच्याकडून आपण म्हणविलें, म्हणजे आपलें कार्य झालें, मग चंद्रगुप्ताचा राज्यशकट सुयंत्रित चालण्यास कांहींही विघ्न राहिलें नाहीं, असा चाणक्याचा विचार होता; परंतु राक्षसास चंद्रगुप्ताचा पक्ष घेण्याला लावणें फार फार दुर्घट होतें. आतांपर्यंत जें काय झालें तें कांहींच नव्हे. राक्षसाचा शब्द फिरविणें म्हणजे पृथ्वीच्या गतीला दुसरेंच वळण देणें होय. तें जितकें दुर्घट-नव्हे, अगदीं अशक्य-तितकेंच राक्षसास चंद्रगुप्ताच्या पक्षास आणणें अशक्य होतें; परंतु चाणक्याचें नेहमींचें म्हणणें असें होतें कीं, आपल्यास कांहींही अशक्य नाहीं. किंबहुना असें जें काय अशक्य असेल तें आपण साधलें तरच आपल्या नीतिनैपुण्याचें चीज असा सगळा विचार करून त्यानें आपल्या मनांत पुढील कांहीं रचना केली होती. राक्षसावर कांहीं तरी काहूर आणून त्या काहुरामुळें त्याच्याकडून आपल्याला जें काय पाहिजे तें करवून घेणें शक्य नव्हतें, हें चाणक्य जाणून होता यामुळें पर्वतेश्वरास फितूर होऊन त्याचे हातून नंदांचा राक्षसानें नाश करविला, हा आळ राक्षसावर आणला व त्यांतून आपणास सुटण्यास मार्ग नाहीं असें त्याला भासविणें हें एक लहानसें साधन होय. त्या साधनानें पूर्ण कार्यभाग होणार नाहीं हेंही चाणक्यास पक्कें ठाऊक होतें. राक्षसाचें मन जिंकण्यास आणखी निराळेंच साधन साधावयास पाहिजे होतें. चाणक्य त्या साधनाची घटका करीत होता. त्यानें राक्षसास न्यायासनावर बसवून त्याजवर पुढें येणारें संकट त्याचे नजरेस आणून ठेवावें, ही युक्ति चंद्रगुप्ताकडून करविली, तेव्हां चंद्रगुप्ताचें आणि राक्षसाचें भाषण झालें, तें असें होतें: चंद्रगुप्ताला चाणक्यानें कित्येक प्रश्न सुचवून ठेविले होते. त्यांचीं उत्तरें चाणक्यास हवीं होतीं. यामुळें चंद्रगुप्तानें त्यास म्हटलें:—

"अमात्य राक्षसा, पर्वतेश्वर काय बडबड करतो आहे हें आपण ऐकलेंच; आम्हींही ऐकलें; परंतु आपल्यासारख्या स्वामिनिष्ठ व नंदवंशपक्षपाती पुरुषश्रेष्ठासंबंधानें हें याचें म्हणणें खरें असेल हें आम्हांला शक्यच वाटत नाहीं. तेव्हां तो कांहीं जरी बोलला, तरी आपण त्याचा विषाद मानून जणूं काय आम्हीं तें सगळें खरेंच समजतों असें धरूं नका. पर्वतेश्वर बोलून चालून मगधदेश गिळंकृत करायला टपलेला ? त्याला आपण जाऊन मिळाल, हें आम्हांला जागेपणीं तर काय, पण स्वप्नांतसुद्धां खरें वाटणार नाहीं. तेव्हां खरा फितूर कोण आणि हीं आपल्या मुद्रेनें अंकित अशीं पत्रें कोणीं बनविलीं, याचा आपण तपास लावला पाहिजे."

"कुमारा, तुझ्या मनातून कांहीं वाटो; परंतु बाहेरून तरी तूं माझ्या हातून असलें अधम कृत्य होणार नाहीं. असें म्हणतोस, ही मोठीच गोष्ट म्हणायाची. परंतु तुमच्यासारख्यांच्या मनाची अशी नुसती खात्री काय उपयोग ?

माझ्या मुद्रेचीं पत्रं याच्याजवळ सांपडलीं एवढंच लोकापवादाला पुरे आहे. तो लोकापवाद पूर्णपणें आणि उघडपणें माझ्यावरून नाहींसा झाला पाहिजे. तो उघडपणें चौकशी करून काढून टाकण्याची तजवीज कराल तर तुमचा माझ्यावर विश्वास आहे असं मी म्हणेन."

भागुरायण मध्येंच म्हणाला, "अमात्या, या गोष्टीची उघड चौकशी करण्याच्या भानगडींत आपण पडलों, तर सर्व कांहीं तिरपगडं होईल. त्यापेक्षां हें चमत्कारिक प्रकरण असंच आंतल्या आंत दाबून, पर्वतेश्वरापासून खंडणी घेऊन त्याला त्याच्या राज्यांत पाठवूं आणि या कुमार चंद्रगुप्ताला सिंहासनावर बसवून आपण मगधाचं राज्य पूर्ववत् चालवूं. तूं सचिव आणि मी सेनापति. ......"

"छे. छे. छे. छे." राक्षस एकदम ओरडून म्हणतो, "भागुरायणा, या नंदवंशपक्षपाती राक्षसाजवळ असली भलतीच गोष्ट काढूं नकोस. नंदांचा घात करवून त्यांचं सिंहासन बळकावणाऱ्या वृषलाचं साचिव्य करायला मला सांगतोस, त्या तुझी जिव्हा शतशः कां विदीर्ण होत नाहीं! नीचांनो, तुमचं सगळं कपटनाटक मला समजलं नाहीं काय? अरेरे! पण तें फार उशीरानं समजलं, म्हणूनच तुम्हाला अशा प्रकारची भाषणं करण्याची संधि सांपडली. नाहीं तर.... पण मी आतां तें बोलून उपयोग काय?"

---

# प्रकरण ३४ वें.

## आणखी एक शकल.

राक्षसाचें तें बोलणें ऐकून भागुरायण क्षणभर अगदीं मुकाट्यानें बसला. या वेळीं आपण यास काय बोलावें हेंच त्यास सुचेना. परंतु आपण आतां उगीच बसलों, तर आपल्यावर हा सर्वच अपराध लादील, तें बरें नव्हे, असें मनांत येऊन तो राक्षसास म्हणतो, "कां बरं? बोलून कां उपयोग नाहीं? जें जें काय आपल्या मनांत आलं असेल तें तें अगदीं स्वच्छपणें बोला. मनांत ठेवूं नका. मनांत ठेवून तरी काय उपयोग?"

"भागुरायणा, तूं नंदांच्या सेनेचा अधिपति, तो तूंच जर त्यांच्यावर उलटून एखाद्या वृषलाला गादीवर बसविण्यासाठीं धडपड करूं लागलास, तर तुला तरी काय म्हणायचं आहे? मीच अंध झालों. मगध देशास आतां बाह्य शत्रु तर कोणी नाहीं, एक महाराजांची चित्तवृत्ति ताळ्यावर आणण्यापलीकडे आपल्याला कांहीं काम उरलं नाहीं, असं समजून मी स्वस्थ बसलों, तेव्हां मला झाली

हीं शिक्षा योग्यच झाली म्हणायची दुसरं काय ? तुम्ही राजघातकी, विश्वासघातकी आणि आणखी कित्येक प्रकारचे घातकी. तुमच्यासमोर मी उभं रहाणं आणि तुमच्या मुखाकडे पहाणं म्हणजे देखील मोठं पातक करणं आहे. मग तुमच्याशीं भाषण करणं तर लांबच राहिलं. तुम्ही आतां शहाणे असाल, तर माझा सर्व लोकांसमक्ष न्याय कराल. त्या न्यायांत जर मी अपराधी ठरलों–तुम्ही न्याय करणार तेव्हां तसा मी ठरायचाच–तर जें वाटेल तें मला शासन द्या. नाहींपेक्षां मी तरी आतां चतुष्पथावर जाऊन जनतेपुढें झालेल्या प्रकाराचं मोठ्यानं उद्घोषण करीन. ''

" अमात्या, " भागुरायण त्याला लागलींच म्हणतो, " तुझा न्याय करणार आम्ही कोण ? तूंच सर्वांचा न्याय करीत आलास; परंतु माझी तुला एवढीच विनंति आहे कीं, तूं आतां त्या तसल्या न्यायाच्या वगैरे भानगडींत पडूं नकोस. जनता ही मोठी लहरी आहे. केव्हां कोणत्या गोष्टीकडे तिची लहर फिरेल आणि कोणत्या नाहीं याचा काय नेम ? "

" भागुरायणा, तेंच तेंच, तेंच तेंच चर्वितचर्वण करण्यांत अर्थ काय ? जनता कशी आहे, तें जितकं तुला, तितकंच मलाही पण ठाऊक आहे. आतां तूं अधिकारारूढ आहेस. तुला जें काय करायचं असेल तें कर; पण मला माझ्या स्वतःच्यासंबंधानं जें काय करावंसं वाटतं त्याच्या आड येऊं नको. माझी इच्छा अशी कीं, मजवर या पर्वतेश्वरानं आणलेल्या आरोपांचं निरसन व्हावं किंवा ते खरे ठरले, तर काय ती शिक्षा व्हावी. एकंदरींत मला तुमचे उपकार नकोत. माझी अब्रू राखण्याकरितां तुम्ही कांहींसुद्धां लपवालपवी करण्याच्या भानगडींत पडूं नका. आतां मी अधिक कांहीं बोलत नाहीं. नंदांचा मी कट्टा सेवक. मी त्या पर्वतेश्वराला आणवून त्याच्या हातीं सगळ्या राज्याचीं सूत्रं देवविण्याचं तर लांबच राहिलं, परंतु केव्हां अशी गोष्ट माझ्या मनांत सुद्धां येणार नाहीं. आणखी तर काय सांगूं ? ज्या कोणाला हें तुमचं सगळ्यांचं कुभांड खरं वाटेल, ते फार तर मला त्याबद्दल काय शासन करायचं असेल तें करतील; परंतु हें प्रकरण आंतल्या आंत दाबून तुमच्या सांगण्याप्रमाणें मी आतां चंद्रगुप्ताचं साचिव्य करीन, ही गोष्ट तुम्ही स्वप्नस्वप्नांतरीं सुद्धां मनांत आणूं नका. आणखी कितीदां हेंच मी तुम्हाला सांगूं ? "

राक्षस हें सर्व अत्यंत उद्वेगानें बोलत होता. भागुरायण आणि चंद्रगुप्त तें सर्व मुकाट्यानें ऐकून घेत होते. अशा स्थितींत एक दूत येऊन भागुरायणाच्या कानांत कांहीं गुणगुणला. तेव्हां भागुरायण एकदम त्या दूतास म्हणतो, " काय म्हणतोस ? राजगृहाच्या मुखाजवळ गुप्तगर्ता खणण्यासाठीं आपल्या घरांतून मार्ग देऊन राजघातास मदत करणारा इसम सांपडला ? तो कोण ? चंदनदास ? वा ! चंदनदास तर अमात्यांचा फार मोठा स्नेही ! आणि त्यानं त्या कामीं मदत केली असं होईल तरी कसं ? कधींच होणार नाहीं. चंदनदास राजघाताला कारण होईल हें संभवनीयच नाहीं. "

" पण त्यानें स्वतः सर्व कबूलजबाब दिला आहे, त्यांत असं स्पष्ट म्हटलं आहे कीं, अमात्याच्या पत्रावरून आपण हें सर्व केलं. अमात्याचे आपण मित्र, तेव्हां आपल्याला त्याला नाहीं म्हणवेना. " हें संभाषण अमात्याच्या देखतच झालें, आणि तें मोठ्यानें झालें हें सांगावयास नकोच. अमात्यानें तें ऐकलें आणि त्याला अतिशय संताप आला. चंदनदास आपला मित्र तो अशा राजघाताच्या कामीं कधींसुद्धां मदत करणार नाहीं,

अशी त्याची खात्री होती; परंतु आतां त्याच्या मनाची अशी स्थिति झाली होती कीं, कोणीं कांहींही सांगितलें असतें, तरी तें तें त्याला खरें वाटलें असतें. यामुळें, न जाणों, जसे अनेक लोक या नीचांना अनुकूल झाले, तसा तोही झाला असेल, नाहीं म्हणून तरी कशावरून ? परंतु चंदनदासही जर त्या प्रसंगीं या कारस्थानी ब्राह्मणाला खरोखर कबूल झाला असेल, तर सगळें जगच त्याला अनुकूल झालें, आणि नंदांचा विनाशकाल आला असें म्हणावयास हरकत नाहीं. असे अनेक विचार त्याच्या मनांत चालले; परंतु तो स्वतः त्या वेळीं भागुरायणाच्या बोलण्यावर एक अक्षरही बोलला नाहीं. त्यानें मौनच धरलें. बोलून उपयोग काय, असा त्यानें विचार केला.

इकडे त्या हेराचें व भागुरायणाचें आणखी भाषण चाललेंच होतें.

बराच वेळ झाला. पर्वतेश्वराचा न्याय तसाच राहिला. शेवटीं त्यास तेथून परत नेऊन नेमलेल्या स्थलीं ठेवावें असें ठरलें आणि चंद्रगुप्तानें त्याप्रमाणें आपल्या परिचारकांस आज्ञा केली. त्यांनीं पर्वतेश्वरास तेथून नेलें. नंतर अमात्यास भागुरायणानें म्हटलें, "अमात्यराज, आपली चित्तवृत्ति या वेळीं अतिशय क्षुब्ध झाली आहे. तेव्हां सध्यां मी आपल्यास कांहींच बोलत नाहीं. एकंदर स्थिति काय आहे ही आपल्याला मीं सांगितली आहे. आपण आतां वाटेल तिकडे जा. आणि झाल्या गोष्टींचा विचार करा. मीं आपल्यास विनंति केली आहे ही खरोखर वावगी नाहीं; परंतु आपल्या विचारास येईल तेव्हां खरी."

राक्षसानें भागुरायणाचें तें भाषण ऐकून एकवार अत्यंत तिरस्कारानें त्याच्याकडे पाहिलें. अधिकउणें कांहींएक भाषण केलें नाहीं. या मनुष्याशीं आपण आतां भाषण करणेंसुद्धां पातक आहे असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें. आपल्या अंधपणाचा फायदा घेऊन यांनीं केवढें भयंकर कारस्थान रचलें आणि आपण त्यांच्या त्या जाळ्यांत सांपडलों, याबद्दल त्याला अतोनात वाईट वाटलें. पण बिचारा करतो काय ? त्या न्यायगृहांतून बाहेर पडल्यानंतर त्याला आतां आपण कोठें जावें हें सुचेना. प्रतीहारीच्या मित्राच्या घरीं असतां त्यानें आपल्या बायकामुलांचा समाचार घेण्याबद्दल—अर्थात् त्यांस आपल्या घरीं आणून ठेवण्याबद्दल—चंदनदासास सांगून पाठविलें होतें. आणि चंदनदासानें 'त्याप्रमाणें करतों' म्हणून उत्तरही पाठविलें होतें; परंतु चंदनदास स्वतः भेटण्यास मुळींच आला नाहीं, हें एक राक्षसास आश्चर्य वाटतच होतें; परंतु तें आश्चर्य आतां अगदीं नाहींसें झालें. चंदनदासानें राजघातास जर मदत केली असली, तर तो आपल्याला कोणत्या तोंडानें भेटणार ? चंदनदासासारखा अहिंसाधर्मी गृहस्थ जेव्हां राजकुलाचा अशा प्रकारें घात घडवून आणण्यास उद्युक्त झाला, तेव्हां आतां काय म्हणावें ? पण आतां आपण कोठें जावें ? त्या राजघाती चंदनदासाचें दर्शनही घेणें त्यास वाईट वाटलें. आपलीं बायकामुलें त्याच्या घरीं आहेत, त्यांस आपण आणवून पुष्पपुरी सोडून चालतें व्हावें. नंदराजा सर्वार्थसिद्धि अद्यापि तपोवनांत तपश्चर्या करीत असेल, तर त्याला भेटून त्याच्या साहाय्यानें कोणा तरी इतर राजाचें साहाय्य मिळवून आपण पुनः या पुष्पपुरीला ससैन्य येऊं आणि चंद्रगुप्ताची व त्याच्या साहाय्यकारी चाणक्याची आणि भागुरायणाची चांगली फजिती उडवून सर्वार्थसिद्धीला राज्यावर बसवूं, असा त्यानें विचार केला. आपल्याला पकडून कारागृहांत ठेवण्याचें, किंवा न्यायासनापुढें उभें करून

लोकांसमक्ष आपला न्याय करण्याचें धाडस ही त्र्यां करणार नाहीं, हें त्यास पक्कें वाटून चुकलें होतें. आपल्यासंबंधानें लोकांचे मन कलुषित करून आपली दुष्कीर्ति करावयाची आणि अशा तऱ्हेनें आपल्याला लोकांच्या द्वेषाला पात्र करावयाचें, एवढाच या अधमांचा हेतु. तो हेतु साध्य करण्याकरितां ते काय वाटेल तें करतील. एवढ्याकरितां आपण आतां येथें राहणें श्रेयस्कर होणार नाहीं. परंतु आपण निघून जाण्यापूर्वी आपल्या बायकामुलांची व्यवस्था काय लावावी ? चंदनदासासारख्या नीच मनुष्याच्या हातीं आतां तीं ठेवून उपयोग नाहींत. तीं तो केव्हांच आपल्या शत्रूच्या हातीं देईल आणि आपल्या बायकापोरांना त्यांनीं एकवार आपल्या स्वाधीन करून घेतलें, म्हणजे मग काय विचारता ? आपण त्यांच्याविरुद्ध जाऊं नये म्हणून मंडळी ओलीस ठेवण्याप्रमाणेंच होणार. अशा स्थितींत 'आपण आतां काय करावें ?' असा विचार करीत बिचारा राक्षस लोकसंचाराच्या मार्गापासून दूरदूर अशा मार्गांनीं चालला होता. तो पुष्पपुरींच्या नदीकांठच्या एका निर्जन अरण्यांत शिरला. प्रतीहारीच्या मित्राच्या घरीं जाण्यास या रानांतूनही एक मार्ग होता, तोच त्याला या वेळीं बरा वाटला. तो थोडासा पुढें गेला, तों एका मोठ्या थोरल्या वटवृक्षाचे खालीं कोणी तरी, "हा मित्रा चंदनदासा ! राक्षसाची आज्ञा पाळण्याकरितां म्हणून तूं जें केलेंस, तें शेवटीं तुझ्या वधाला कारण झालेंना ? आणि तें तुला कळून आल्यावरही तुला सुटण्याला मार्ग असतांही, त्याचा अवलंब न करतां वधाला तयार झाला आहेस ! शाबास मित्रा, या वेळीं तुझा वध झाला असेल आणखी तुझी बायकोही सती गेली असेल, तर आतां मी तरी या जगांत राहूं कशाला ! तूं मित्रोत्तमांतला मित्रोत्तम, त्या तुझ्यावांचून या जगांत मला काय करायचं आहे ? हा आतां फांस लावून घेऊन मी तुझ्या मागोमाग येतोंच........... "

राक्षसाच्या कानीं ते शब्द पडले आणि तो दचकलाच. या वेळीं या निर्जन अरण्यांत येऊन चंदनदासाच्या वधाबद्दल शोक करून त्याच्यासाठीं आपला प्राण देणारा हा त्याचा मित्र कोण ? आणि चंदनदासानें जें केलें तें राक्षसाच्या आज्ञेनें केलें म्हणून त्याचा वध करवितात, याचा अर्थ काय ? काय, चंदनदासाला कोणीं माझा निरोप म्हणून सांगून फसवलें ? हें आहे तरी काय ? हें विलक्षण गूढ उकलावें कसें ? ह्या आत्महत्या करणाऱ्या गृहस्थाला आधीं एका बाजूस बोलावून घेऊन त्याच्यापाशीं काय ती चौकशी करूं आणि मग त्याच्या मनाची शांति करून पुढें काय होईल तें पाहूं. असा विचार करून तो त्या गृहस्थाजवळ गेला आणि मोठ्यानें म्हणतो, "अरे, आपल्या मित्राचा वध होता, म्हणून आपली हत्या करुन घेणारा असा तूं कोण आहेस ?"

"काहो महाराज, माझी कां चौकशी करतां ? मला प्रतिबंध करण्याचं तुमच्या मनांत असेल, तर त्या भानगडींत तुम्ही मुळींच पडूं नका समजलांत ? माझ्या मित्राच्या पश्चात् मला एक क्षणभरसुद्धां राहूं नये असं वाटतं आहे, तर मला त्याप्रमाणें जाऊं द्या."

"होय बाबा, मी तुझ्या आड येत नाहीं; पण तूं ज्याचं नांव घेतो आहेस तो माझाही मित्र आहे. त्याचा वध होतो आहे हें ऐकून मलाही फार दुःख झालं आहे; पण तो वध कोणाच्या आज्ञनं आणखी कां होतो आहे, हें मला सांगशील, तर मी कांहीं तरी इलाज करीन, नाहीं तर तुझ्याबरोबर मित्राच्या भेटीला येईन."

" काय, चंदनदास तुमचाही मित्र आहे? असेल तर तो आपल्याला आतां अंतरला म्हणून समजा. दुसरं काय? त्याचा त्या दुष्टांनीं वध केला. राजघाताच्या कामीं अमात्य राक्षसाला ज्यांनीं ज्यांनीं मदत केली, त्या सर्वांचा वध होणार आहे. तें त्रिकूट—चाणक्य, चंद्रगुप्त आणि भागुरायण—आतां त्या कारस्थानांत गुंतलेल्या सर्वांना भडाभड शासन करणार.... "

" अरे गृहस्था, तें सर्व खरं; परंतु चंदनदासावर त्यांनीं आरोप तरी काय ठेवला ? "

"आरोप ! आरोप दुसरा काय ! राजा धनानंदाची स्वारी राजगृहाच्या द्वारावरील तोरणाखालीं आली कीं खंदकांत पडावी म्हणून राक्षसाच्या आज्ञेनं त्यानं आपल्या घरांतून गुप्तपणानं भुयार करण्यास मार्ग देऊन खंदक खणविला किंवा खणण्याला मदत केली हाच आरोप. आणखी राक्षसाच्या पत्रावरूनच त्यानं ती व्यवस्था केली हें खचित. राक्षसानंच त्याला लिहून पाठवलं, ' तूं असं कर. माझे लोक खंदक खणायला तुझ्या घरांतून प्रारंभ करतील, तर त्यांना मदत कर. ' राक्षसाच्या ठिकाणीं ज्याची अतोनात भक्ति, तेव्हां त्यानं त्याप्रमाणें कबूल केलं. पण आतां त्याचा वध होतो आहे ! "

" काय म्हणतोस ? राक्षसानं त्याला पत्र लिहिलं होतं तुझ्या घरांतून भुयार पोंखरून राजाद्वाराजवळ खंदक करूं दे म्हणून ! अरे, या चांडाळांनीं अशीं पत्रं—खोटीं पत्रं—लिहून कितीकांना तरी फसवलं ! अरेरे चंदनदासा, तूं या राक्षसाला विचारालां तरी यायचं होतंस ! अशी कारस्थानाची गोष्ट करायची तो राक्षस पत्रोपत्रीं करील काय ! काय ही अंधता ! कोण हा अंधकार ! मघाशीं हें मीं ऐकलं तेव्हां मला चंदनदासाचा राग आला. परंतु आतां तो फसला गेला असं वाटून त्याची उलटी कींव येते. बरं मग ? पुढें ? "

"पुढें काय ? राजघात झाल्यबारोबर जिकडे तिकडे जेव्हां हाहाकार उडाला, तेव्हांच चंदनदास घाबरला. राक्षसाला शोधूं लागला, तर तो कोठेंही दिसेना. दोन तीन दिवसांनीं त्याला राक्षसाचा निरोप आला, कीं, माझ्या मुलांमाणसांना आपल्या घरीं घेऊन जा. त्याप्रमाणें त्यानं केलं मात्र, तों चंद्रगुप्ताचा त्याच्या पाठीमागं त्रास सुरू झाला कीं, तूं राक्षसाचीं मुलंमाणसं आमच्या स्वाधीन कर, म्हणजे तुला सोडून देतों. तुझ्यावर कांहीं आरोप येऊं देत नाहीं. नाहीं तर तुझा वध करवितों. चंदनदासानं तें कबूल केलं नाहीं. उलट, अमात्याची बायको आणि मुलगा यांना कोणीकडे लपवून ठेविलं आहे, आणि माझा वध करा पाहिजे तर, परंतु मी कांहीं तुम्हाला ती मंडळी कोठें आहे तें सांगत नाहीं, असं चंद्रगुप्ताला चंदनदासानं स्पष्ट उत्तर दिलं. तो दुष्ट कोठली क्षमा करायला ? त्यानं त्याचा वध करावा अशी आज्ञा केली. आणि आतां त्याला वधस्तंभाकडे नेलं आहे. बहुतकरून त्याचा वध झाला असेल किंवा इतक्यांत होईल. महाराज, आतां मला माझ्या मित्राच्या मागोमाग जाऊं द्या. " तें ऐकून राक्षस अगदीं स्तब्धपणें उभा राहिला. मात्र त्यानें त्या आत्महत्या करणाऱ्या मनुष्याचा दंड घट्ट धरला होता. त्यास कांहीं सुचेना. मध्येंच त्यानें त्या मनुष्यास विचारलें, 'तुझं नांव काय? '

त्यानं उत्तर दिलें, " शकटदास. " तेव्हां राक्षस पुनः त्यास म्हणतो, " शकटदासजी, चंदनदासानं राक्षसाची बायको व मुलगा कोठें ठेविली आहेस याची तुम्हाला कांहीं माहिती आहे ? तुम्ही त्याचे मित्र म्हणून विचारतों. "

" नाहीं. मी त्याचा मित्र खरा; परंतु अशा गुप्त बातम्या एकाच्या तोंडून दुसऱ्या-

च्या तोंडीं जातात म्हणून त्यानं मलाही सांगितलं नाहीं. आणि खरोखर मला जर ठाऊक असतं, तर मी केव्हांच चंद्रगुप्ताला सांगून देऊन त्याच्याकडून चंदनदासाचो सुटका करून घेतली असतो. राक्षसानं त्याला अशा गोत्यांत घालून तो स्वतः कोणीकडे गेला आहे त्याचा पत्ता नाहीं. जो आपला जीव बचावण्यासाठीं आपल्या मित्राचा खुशाल वध होऊं देतो, त्या मित्राच्या ठिकाणीं निष्ठा तरी कशाला ठेवावी ? पण चंदनदास तसा नाहीं."

तें मर्मभेदी बोलणें ऐकून राक्षसास फार वाईट वाटलें आणि तो कांहीं वेळ स्तब्ध बसून म्हणतो, " मित्रा, तूं व्यर्थ हत्या करून घेऊं नको. मला वधस्थानीं घेऊन चल. मी तुझ्या मित्राला सोडवतों. अमात्य राक्षस–ज्या दुर्दैव्याच्या बायकामुलांप्रीत्यर्थ चंदनदास आपले प्राण देतो आहे, तो राक्षस मीच !"

तें ऐकतांच शकटदासानें अत्यंत आश्चर्य दाखविलें.

---

# प्रकरण ३५ वें.

## प्रतिज्ञाभंग कीं मित्रवध ?

शकटदासानें अत्यंत आश्चर्यच काय, परंतु अविश्वासही दाखविला. " महाराजांचा व त्यांच्या कुलाचा विध्वंस करण्याचा यत्न केला तो साध्य झाला, परंतु पुढचा सर्व प्रकार अगदींच आपल्या अपेक्षेबाहेर झालेला पाहून, राक्षसास पुष्पपुरींत मुळीं रहाणेंच शक्य नाहीं, तेव्हां आपण सांगतां हें मला संभवनीय दिसतच नाहीं. " असें शकटदासानें राक्षसास बोलून दाखविलें; तेव्हां आपण राक्षसच अशी त्याची खात्री करून देण्यास राक्षसास किती तरी आयास पडले ! शेवटीं, " आपण खरोखरीच राक्षस असाल, तर मी येतों आणि आपल्याला चंदनदासाकडे घेऊन चलतों. तो अजून जिवंत असला तर ठीकच आहे. आपल्याला स्वतःला चंद्रगुप्ताच्या स्वाधीन करून घेऊन आणखी बायकामुलांनाही त्याच्या स्वाधीन करून घेऊन त्याला सोडवा. नाहींपेक्षां माझ्या मित्राप्रमाणेंच मीही निर्वाणप्राप्ति करून घेईन. माझ्या मित्रावांचून मला आतां अधिक वेळ रहावतच नाहीं. भगवान् अर्हंता, मला व त्याला दोघांनाही निर्वाणप्राप्ति करून देईल यांत संशय नाहीं. "

शकटदासानें राक्षसास याप्रमाणें म्हटल्यानंतर राक्षस त्याच्या मागोमाग चालला, तो गंगानदीच्या कांठीं श्मशानांत खरोखरीच चंदनदासाला सर्व वध्य चिन्हांनीं युक्त असा करून आणून उभा केला होता, तेथें आला. त्यास रक्तवस्त्रें नेसविलीं होतीं, रक्तपुष्पांच्या माला त्याच्या अंगावर घातल्या होत्या, आणि

त्याचें सर्वांग कुंकुमादि रक्त चूर्णांनीं लिप्त करून टाकिलें होतें. त्याची पत्नी व त्याचा एक दहा वर्षांचा बालक हींही त्या वेळीं तेथें आलीं होतीं. त्याची पत्नी त्याच्याबरोबर सती जावयाचें म्हणून आली होती आणि पुत्र तिच्या अंगाला बिलगून आईला व बापाला तुम्हीं असा वेश कां घेतला आहे, तुम्ही कुठें चाललां आहां, असें मोठ्या दीनवाणीनें विचारीत होता. कांहीं केल्या तो रडावयाचा राहीना. तो देखावा पाहून राक्षस अत्यंत गहिंवरला. आपला मित्र आपल्यासाठीं फुकट मृत्यु पावतो आहे इतकेंच नव्हे, तर त्याची बायको सती जाते आहे आणि एक शब्द बोलून आपली सुटका करून घेण्याचें आपल्या स्वाधीन असतां चंदनदास तेवढें बोलत नाहीं. राक्षस तें पाहून पुढें जाऊन त्या चांडालांना कांहीं बोलणार, तों त्या चांडालांपैकीं एक चंदनदासास म्हणतो:—

" श्रेष्ठिन्, आपण व्यर्थ आपला प्राण कां घालवितां ? राक्षसाचीं बायकामुलं कोठें आहेत तें सांगून टाकाना ! महाराज चंद्रगुप्त फार दयाळू आहेत, ते त्या बायकामुलांच्या केंसासही धक्का लागूं देणार नाहींत. फक्त राक्षसाला आपल्या ताब्यांत ठेवण्यासाठीं ही मंडळी त्यांना पाहिजे आहे. "

" चांडालहो ! " चंदनदास म्हणाला: " राक्षसानं आपलं कुटुंब माझ्या स्वाधीन केलं. तेव्हां मी जिवंत आहें तापर्यंत तर मी त्यांस दुसऱ्या कोणाच्या स्वाधीन करणार नाहीं. इतकी मित्रनिष्ठा आणि वचननिष्ठा नाहीं, तर जिवंत राहून तरी काय करायचं आहे ? वारा येईल तशी पाठ फिरवून उदरंभरण करणारे पृथ्वीच्या पाठीवर काय थोडे आहेत ? "

राक्षसानें तें ऐकलें, त्यामुळें तर त्यास फारच वाईट वाटलें. आपल्या मित्राची आपल्या ठिकाणीं इतकी निष्ठा असून आपण आज विनाकारण त्याच्या नाशास कारण होत होतों. त्याचा मित्र अकस्मात् आपल्यास दिसला आणि त्यानें आपणास हा एकंदर काय प्रसंग चालला आहे तें सांगितलें म्हणून बरें झालें. असें वाटून त्यानें एक उसासा टाकला व एकदम पुढें होऊन त्या चांडालांस म्हटलें, " अरे चांडालहो, ज्याच्या मुलांमाणसांसाठीं तुम्ही या निरागस श्रेष्ठीचा वध करतां आहां, तोच हा राक्षस तुमच्यापुढें उभा आहे, तर त्याला ताबडतोब सोडून देऊन त्याच्याऐवजीं तुम्हांला वाटलं तर माझा वध करा. त्या दुष्ट चाणक्याच्या आणि चंद्रगुप्ताच्या कारस्थानांत जसं सगळं जग सांपडलं, तसा हाही सांपडला, तर त्याला सोडा. त्याचा कोणत्याही बाबतींत कोणताही अपराध नाहीं. "

तें ऐकून चांडाल राक्षसाकडे पाहूं लागले. चंदनदासाची पत्नीही आश्चर्यचकित, परंतु आशापूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागली. आणि चंदनदासही हा एकाएकीं येथें कसा आला बोवा, असें दाखविणारी मुद्रा करून पाहूं लागला. तो आश्चर्याचा क्षण गेल्याबरोबर चांडाल राक्षसास म्हणतात, " आर्यश्रेष्ठा, आम्हाला चंद्रगुप्तमहाराजांची आज्ञा आहे ती एवढीच कीं, जर या श्रेष्ठीनें अमात्यांच्या कुटुंबाची मंडळी कोठें आहेत ती जागा दाखवितों म्हणून ती मंडळी कोठें दाखविली, तर याला सोडून द्या. तेव्हां तो तेवढें करीपर्यंत आम्हांला त्याला सोडतां येणार नाहीं. अमात्य राक्षस आले व आमच्या स्वाधीन झाले तरी चंदनदास शेटजींना सोडा, अशी आम्हाला आज्ञा नाहीं. तेव्हां आम्हीं काय करावं ! अरे ए श्रेष्ठिन्, तुला आपला जीव नकोसा झाला असला तर आमचा नाइलाज आहे; पण तूं अजूनही आर्यश्रेष्ठांची

पत्नी आणि मुलगा कोठें आहेत तें सांगून दिलंस, तर आपल्या कुटुंबांत जाऊन अगदीं सुखांत राहशील, तर तें करून टाकीनास ? ”

चंदनदासानें त्याच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं. तो एकदम अमात्य राक्षसास म्हणतो, “ अमात्यराज, आपण माझे मित्र, तेव्हां आपण जें काय सांगाल तें कधीं वावगं नसायचं, असं समजून मीं आपलं पत्र येतांच माझ्या घरांतून भुयार खणायला अनुमोदन दिलं. आपण हा काय विचार केला आहे हें विचारायला सुद्धां आलों नाहीं. वास्तविक विचाराला यायला पाहिजे होतं; परंतु मीं अंधपणा केला, त्याचं प्रायश्चित्त मी आतां भोगतों आहें. तर मला सोडवण्याच्या भानगडांत आपण पडूं नका. आपण जवळ या. आपलं कुटुंब कोठें आहे त्याबद्दलची माहिती आपल्या कानांत सांगतों, ती आपण ऐकून घ्या आणि त्यांना घेऊन जा कसे. आपण इथं राहिलां तर आपल्यावरही काय प्रसंग ओढवेल याचा नेम नाहीं. आपला सर्वस्वीं नाश करावा या हेतूनं हा सर्व प्रकार झालेला आहे. मीं आपल्याकडे येऊन विचारलं असतं म्हणजे आपल्याला जागृत केल्यासारखंही झालं असतं; परंतु मी अंध, मी मूढ, भलत्याच विचारांत पडून आपल्याला न कळवितां न विचारतां त्यांना खुशाल परवानगी देऊन त्यांच्या भयंकर पाशांत सांपडून राजवंशघाताला मदत केली. या माझ्या कृत्याबद्दल मला शिक्षा ही झालीच पाहिजे. तर अमात्यराज, कृपा करून मला हें प्रायश्चित्त—देहांतप्रायश्चित्त भोगूं द्या. ”

अमात्यानें तें त्याचें बोलणें ऐकल्याबरोबर त्यास मोठें आश्चर्य वाटलें हें सांगायलाच नकोच; परंतु तसें आश्चर्य करीत बसण्याची ती वेळ नव्हती. त्या वेळीं आपल्या मित्रास सोडविणें जरूर होतें. तेव्हां तो चंदनदासास म्हणाला, “चंदनदासा, तें कसंही जरी असलं, तरी तूं आतां आपल्या जीवावर उदार होऊं नकोस. मी तुला सांगतों त्याप्रमाणें कर. माझी पत्नी कोठें आहे तें सांग. मी तुला त्या जबाबदारींतून सोडवितों. मी प्रत्यक्ष सांपडलों आहें. मला जर चंद्रगुप्त कांहीं शिक्षा करूं इच्छित नाहीं, तर माझ्या बायकोला व मुलाला घेऊन त्याला काय करायंचं आहे ? चांडालहो, सोडा. सोडा त्याला. मी तुम्हाला सांगतों माझीं बायकामुलं कोठें आहेत तें ! मग तर झालं ? ”

“ अमात्यराज ” चांडालांनीं त्यास उत्तर दिलें, “ आम्ही केलेल्या आज्ञेचे दास. चंद्रगुप्तमहाराजांचा हुकूम झाला याला सोडा म्हणून, तर आम्ही सोडून देऊं, नाहीं तर आम्ही कसं करणार ? ”

“ चंद्रगुप्त कोठें आहे ? मी त्याला विज्ञप्ति करतों आणखी याला सोडून देण्याची आज्ञा आणतों. मग तर तुमचं कांहीं म्हणणं नाहीं ? ”

“ मग आमचं काय म्हणणं असणार, अमात्यराज ? ”

“ अरे कसला मी अमात्यराज ? माझ्या या अंधत्वामुळं मी तुमच्याही पलीकडला झालों. कैलासनाथ ! काय हे प्रसंग मजवर !”

आतां आपण पुढें काय करावें हेंच राक्षसास समजेना. अगदीं सगळीकडून तो नडल्याप्रमाणें झाला. आपल्या मित्राचा प्राण वांचविण्याला आपल्या हातून जें काय होईल तें केलें पाहिजे. असें आहे तर आतां आपण चंद्रगुप्तास गांठून “ मी आहें, मला काय करायचं असेल तें कर, ” असें म्हणावें आणि चंदनदासास सोडण्याविषयीं विनवावें. याच्यापलीकडे आपल्याला दुसरा कांहीं उपायच राहिला नाहीं, असें त्यास स्पष्ट दिसलें. तेव्हां त्यानें पुनः त्या चांडालांस म्हटलें, “ भल्या गृहस्थांनो, आतां एवढें तरी करा कीं, मी व हा शकटदास दोघे चंद्रगुप्त

करून जाऊन परत येईपर्यंत याला छळूं नका. मी एका घटकेच्या आंत याला सोडण्याची परवानगी आणतों. "

असें म्हणून तो शकटदासाकडे वळून म्हणतो, " चला, आपल्याला वचन दिल्याप्रमाणें आपल्या या मित्राचे व त्याच्या पत्नीचेही प्राण वांचविण्यासाठीं आपण चंद्रगुप्ताकडे जाऊं. "

" अमात्यराज, ' चंद्रगुप्तमहाराजांकडे ' असें कां म्हणत नाहीं ? त्यांना महाराज म्हटल्याखेरीज ते आपल्या विज्ञप्तीला मान देतील काय ? "

शकटदासाचें हें बोलणें ऐकतांच राक्षस जरा संतप्त झाला व तशाच नेत्रांनीं शकटदासाकडे पाहून म्हणतो, " काय ! चंद्रगुप्ताला—त्या राजघातकी नरपशूला महाराज संज्ञा मी आपल्या तोंडानें लावावी म्हणतोस?"

" हं. हं. काय आपलें भाषण हें ! ते राज्यारूढ झाले, यामुळें आपल्याला फार वाईट वाटत असेल; पण बोलून दाखवून उपयोग काय ? आपला कार्यभाग अशा बोलण्यानें घडून येईल, कीं बिघडून जाईल?"

" काय वाटेल तें होवो; पण मी या तोंडानें त्या नीचाला ' महाराज ' म्हणणार नाहीं. "

" तर मग चंदनदासाला खुशाल सुळीं जाऊं देईन असें कां म्हणाना ? "

" तें कां ? असें कां म्हणूं ? मी जर त्याच्या पुढें जाऊन उभा राहणार, तर चंदनदासाला काय म्हणून तो सुळीं देईल ? येथून पुढें असाच न्याय होणार वाटतें ? " राक्षस हें बोलतांना अत्यंत संतप्त झालेला दिसला.

तेव्हां शकटदास त्याला हळूच म्हणतो, " अमात्यराज, आपला हा संताप अगदीं अस्थानीं आहे. अशा संतापांत आपण चंद्रगुप्तमहाराजांकडे जाणें म्हणजे आपला कदाचित् अधिकच नाश होण्याचा संभव आहे. त्यापेक्षां चंदनदासाचें काय होतें आहे तें होऊंद्या, आणखी मीही पण आपल्या मित्राच्या मागोमाग जातों. "

चंदनदासाच्या वधाची गोष्ट काढली कीं, राक्षसाचा सर्व संताप विलयाला जाई. त्याला आपल्यासाठीं मृत्यु येत आहे, आणि तो मोठ्या औत्सुक्यानें तो पत्करीत आहे, हें आठवल्याबरोबर त्याला कसेंचेंच होई. शेवटीं तो काय होईल तें होवो. आपण एकदां जाऊन चंद्रगुप्तास विज्ञप्ति करूंच, असा विचार ठरवून निघणार, तोंच " चंद्रगुप्तमहाराजांचा जयजयकार असो ! " असा भालदारांचा पुकारा ऐकूं आला आणि चंद्रगुप्तमहाराज त्याच्याजवळ उभा राहिला. त्यास पाहतांक्षणींच राक्षसाच्या कपाळाला आंठ्या चढल्या व त्यानें त्याच्याकडून आपलें तोंड फिरविलें. चंद्रगुप्तानें तें जणूं काय पाहिलेंच नाहीं असें केलें व एकदम त्या चांडालांकडे वळून म्हणतो, " कायरे, अद्यापि ह्या राजघातकाला तुम्हीं सुळीं दिलें नाहीं ? तुम्हाला काय म्हणावें ? आतां आधीं माझ्या देखत तें काम करून टाका. अशा भयंकर अपराध्याला अशीच जबर शिक्षा पाहिजे. " चंद्रगुप्ताचें भाषण होतें न होतें तों चांडालांपैकीं एक म्हणाला, " महाराज, आम्ही आपलें कर्तव्य करण्याच्या विचारांत होतों, इतक्यांत हे अमात्यराज येथें आले आणि त्यांनीं, 'चंदनदासाला सोडून देण्याविषयीं मी महाराजांची आज्ञा घेऊन येतों, तोंवर याचा वध करूं नका ' अशी आम्हांला आज्ञा केली. "

" कोणी ? अमात्यराक्षसांनीं ? ठीक ठीक ! ते इथें आहेत काय ! "

" होय, चंद्रगुप्ता, हा मी इथें आहें, " राक्षस एकदम पुढें होऊन म्हणाला,

" माझी पत्नी आणि मुलगा तुझ्या स्वाधीन पाहिजेत, तर मी तुला देतों आणखी मी स्वतःही तुझ्या स्वाधीन होतों, आणखी काय पाहिजे ? "

" अमात्यराज, राजशत्रूला अनुकूल होऊन राजघाताला कारण झालेल्या मनुष्याला क्षमा करून सोडून द्यावं म्हणतां ! हा व्यापार करणारा वाणिक् अनेक वेळां म्लेच्छांकडे व्यापाराला जातो. अर्थात् हा पर्वतेश्वराला मिलाफी झाला आणि त्याच्या साहाय्याकरितां यानं आपल्या घरांतून भुयार खणून राजद्वारापुढील तोरणाखालीं खंदक करविला. इतकं सगळं करून पुनः म्हणतो काय कीं, अमात्य राक्षसानं हें सर्व मजकडून करविलं. ज्याप्रमाणें पर्वतेश्वर आपलं नांव घेतो, त्याचप्रमाणें हाही आपलंच नांव घेतो. तेव्हां हा पर्वतेश्वरानं पक्का मथविलेला, पढविलेला असला पाहिजे, याबद्दल कांहीं शंका आहे काय ? आपण या कारस्थानांत असाल असं आपल्याला तर कांहीं वाटत नाहीं बोआ. तें तर मघाशींच मीं आपल्याला सांगितलं. असा प्रकार असून याला कसा बरं जिवंत सोडावा ? त्यांतून आपल्याही कुटुंबाला यानं बरं वाईट कांहीं केलं असावं. याच्या ताब्यांत तीं होतीं, तेव्हां आपण म्लेच्छांला अनुकूल होतां असं दाखविण्यासाठीं त्या म्लेच्छाधिपतीच्या ताब्यांत दिलीं असावीं, असाही आम्हाला संशय येऊन आम्ही त्यांना आमच्या स्वाधीन कर असं म्हणतों आहों. "

" छे. छे. छे. चंद्रगुप्ता, चंदनदासाच्या अंगीं यांपैकीं कांहींसुद्धां संभवत नाहीं; त्याबद्दल मी अगदीं वाटेल तसा जामीन राहीन. ज्याप्रमाणें माझ्या मुद्रेचीं पत्रं लिहून पर्वतेश्वराला कोणीं फसविलं, त्याप्रमाणें हा बिचारा चंदनदासही फसला, यांत शंका नाहीं. आपण त्याला सोडावं अशी माझी विज्ञप्ति आहे. "

" अमात्यराज, ही आपली विज्ञप्ति कां ? आज्ञप्तिच मीं समजेन. पण... " चंद्रगुप्त तेवढेंच बोलून थांबला, तेव्हां भागुरायण पुढें म्हणतोः—

" पण आपण आपला पक्षाभिमान सोडावा आणि आतां ह्या राज्यशकटाची धुरी पूर्वीप्रमाणें आपल्या अंगावर घ्यावी. "

" भागुरायणा, जें मीं एकवार बोललों, तें पुनः पुनः काय बोलावं ? मीं आणि तुमच्यासारख्या राजघातक्यांना येऊन मिळेन अशी तुझी समजूत आहे काय ? माझी प्रतिज्ञा काय झाली आहे तुला ठाऊक आहेना ? तिचा भंग कधींही होणार नाहीं. " भागुरायण तें ऐकून लागलींच म्हणतोः—

" मग चंदनदासाला मारण्याविषयींच्या आज्ञेचा तरी भंग कसा होईल ? "

" आणखी मग ? " शकटदास मध्येंच म्हणतो, " माझ्या मित्राचा प्राणघात तरी कसा थांबणार ? त्याची पत्नी अर्थातच त्याच्या शवाबरोबर सती जाईल आणि मी पुनः आपल्या त्या वटवृक्षाखालीं जाऊन फांस लावून घेऊन प्राणघात करून घेईन. मग इतका वेळ मला आणि त्या चंदनदासाच्या साध्वी पत्नीला तरी आपण कां आशा लाविली ? "

तें भाषण ऐकून राक्षस एकदम स्तब्ध झाला. पुढें काय बोलावें हेंच त्याला सुचेना.

---

# प्रकरण ३६ वें.

## राक्षसाचा निश्चय.

शकटदासाचें तें आपण राक्षसाच्या वर्मी लागल्याप्रमाणें झालें. चंदनदासास आपण सोडवूं असें म्हणून त्यानें त्यास वधस्थानीं आणलें होतें. माझीं बायकामुलें वांचविण्यासाठीं आपला जीव गमावूं नकोस असें सांगून आपण होऊन आपलीं बायकामुलें आपल्या शत्रूच्या स्वाधीन करूं, म्हणजे मग तर चंदनदासाला सोडतील, असें वाटून तो शकटदासास घेऊन आला होता; परंतु तेथें आल्यावर पहातो तों त्या योजनेचा कांहींच उपयोग दिसेना. चंदनदास कांहीं केल्या ऐकेना आणि भागुरायणादिकांचा तर रोख निराळाच दिसला. तेव्हां अशा स्थितींत आपण काय करावें हेंच त्याला सुचेना. या वेळीं जर आपण चंद्रगुप्ताला सिंहासनावर बसूं देऊन त्याला महाराज म्हणून त्याचें साचिव्य पत्करिलें, तरच चंदनदासाला हे सोडणार; नाहींपेक्षां हा आपला एकनिष्ठ मित्र—नव्हे भक्तच म्हणावयाचा-सुळीं जाणार, आणि तो सुळीं गेल्यामुळें त्याची पत्नीही सती जाणार आणि असला हा वध कोणासाठीं ? तर निव्वळ आपलीं बायकामुलें सुरक्षित रहावीं म्हणून झाला असें लोक म्हणणार ! असा वध आपण होऊं द्यावा काय ? होऊं द्यावा असें तर त्याच्या मनात येईना. कसें येणार ? परंतु तो वध टाळण्यास जो एक उपाय भागुरायण—चंद्रगुप्तादिकांनीं सुचविला तो ही त्यास अर्थातच मान्य होईना. आपली प्रतिज्ञा मोडून या नंदवंशघातकांची सेवा करूं लागेन तरच सर्व कांहीं स्थिरस्थावर होणार काय ? मित्रवध होऊं नये असें करावयाचें असेल, तर सहकुटुंब माझा वध करा असें म्हणून सुद्धां त्यांचा आत्मा शांत होत नाहीं. यांना मला आपला सेवक बनवावें अशी मोठी इच्छा काय ? मला पुनः सचिव बनवून काय उपयोग ? मी अंध, माझ्या डोळ्यांदेखत एवढाले विलक्षण व्यूह रचले जाऊन ते सिद्धीस गेले. मी जन्मांधाप्रमाणें केवळ अंधारांत राहिलों, त्या माझ्या साचिव्याची आतां काय मातब्बरी राहिली ? आतां मला लोकांत तरी काय मान राहिला आहे ? माझ्याच हातून हा सर्व नंदवंशाचा समूळ सशाख उत्खात झाला आहे, असें तर ज्याला त्याला पक्कें कळून चुकलें आहे. हा राजवंशाच्या उच्छेदाचा व्यूह राक्षसानेंच रचिला आणि आपल्यावर कोणाचा वहीम येऊं नये म्हणून, किंवा आपण घडवून आणलेला तो प्रयत्न होत असतां आपल्याच्यानें पहावणार नाहीं असें वाटूनच काय, तो आयत्या वेळीं ऐन जागेपासून निघून गेला, अशी ज्याची त्याची समजूत झाली आहे. तेव्हां आतां

अपकीर्ति ती काय व्हावयाची राहिली आहे! आपल्या नांवाला जो कलंक लागावयाचा तो लागलाच. आतां आपला जीव राखण्यासाठींच काय जें करावयाचें तें करावयाचें. आपल्या मित्राचा वध होतो आहे म्हणून या नीचांची सेवा पत्करावयाची आणि नंद-वंश–पक्षपात सोडावयाचा. हें कालत्रयीं तरी आपल्या हातून होईल काय? ज्यापेक्षां नंदवंशाचा इतका घात झाला आहे, एखाद्या खाटिकानें बकरीं चरचर कापावीं, तसेच सारे नंद यांनीं मारले. तेव्हां या निर्दयांना या बिचाऱ्या चंदनदासाची दया कसची येणार? ते यालाही मारल्याखेरीज राहणार नाहींत. परंतु तें टाळण्यास दुसरा कांहीं मार्गच राहिला नाहीं. तेव्हां भागुरायणादिक सांगतात त्याप्रमाणें कबूल केलें तरच हें एक संकट टळणार, नाहीं तर टळत नाहीं. परंतु नंदवंशाचा घात करणाऱ्या अधमाची सेवा करावयाची नाहीं ही आपली प्रतिज्ञा या चंदनदासाच्या वधानें निवारण करण्याकरितां मोडावी काय? एकीकडून मित्रवध आणि दुसरीकडून प्रतिज्ञाभंग, या दोहोंपैकीं काय पत्करावें? प्रतिज्ञेचा भंग करून घेऊन या नंदवंशघातक चांडाळांशीं सख्य करावें काय? त्यापेक्षा मित्रवध झाला म्हणून काय हरकत आहे? तो खुशाल होऊं द्यावा, परंतु या चांडाळांशीं सख्य नको. असा अनेक प्रकारें विचार करतां करता शेवटीं राक्षसानें पक्का निश्चय करून असें ठरविलें कीं, आपलें ब्रीद राखण्याकरितां चंदनदासाचा व त्याच्या पत्नीचा मृत्यु झाला तरीही हरकत नाहीं. परंतु आपण आपली प्रतिज्ञा भंग होऊं द्यावयाची नाहीं व त्यास सोडल्यामुळें एखादें संकट टळत असलें तरी तें अशा प्रकारें टाळणें केव्हांही इष्ट नाहीं. असा निश्चय करून राक्षस चंदनदासाकडे वळला व त्यास म्हणतो,

"तुझा मृत्यु टळावा म्हणून मीं आपल्या स्वतःवर वाटेल तें संकट ओढून घेतलं असतं; परंतु राजद्रोही, राजघाती अशा पुरुषांची संगति पत्करल्याखेरीज तुझ्यावरलें संकट टळत नाहीं, त्याला माझा इलाज नाहीं. तर आतां भगवान् कैलासनाथाचं चिंतन करून आलेला मृत्यु पत्कर. दुसरं कांहींच मला तुला सांगतां येत नाहीं. त्याला माझा इलाज नाहीं. न जाणून कां होईना, परंतु तूं या राजघातकी लोकांच्या पाशांत सांपडलास, आपल्या घरांतून भुयार खणायला अनुमति दिलीस, त्याबद्दल तुलाही थोडसं प्रायश्चित्त मिळत आहे असंच म्हणायचं."

राक्षसाचें हें बोलणें ऐकून चंद्रगुप्त व भागुरायण दोघेही आश्चर्यचकित झाले. आपल्या बायकामुलांसाठीं आपल्या मित्राचा प्राण जातो आहे हें पाहून राक्षसास खरोखर वाईट वाटेल आणि त्यामुळें तो आपण जें काय म्हणूं तें कबूल करील, असें जें त्यांस वाटत होतें, त्या वाटण्यास पूर्णपणें हरताळ लागला. आतां कोणत्याही प्रकारें राक्षस आपल्या बाजूस येऊन मिळणें शक्य नाहीं हें त्यांस स्पष्टपणें दिसून आलें. आर्य चाणक्यानें आतांपर्यंत राक्षसास आपल्या बाजूस वळवून घेण्यासाठीं अनेक प्रयत्न केले, परंतु त्यांपैकीं एकासही यश आलें नाहीं. तो आपल्यास येऊन मिळाला नाहीं, तर बाहेरदेशीं जाऊन कांहीं घोटाळे माजवील त्यापेक्षां, पुष्पपुरींतच त्यास अडकवून ठेवावें एवढाच मार्ग दिसतो. राक्षस जर बाहेर गेला तर त्यानें मगध देशाच्या शत्रूंस मिलाफी होऊन मगध देशावर चाल केलीच म्हणून समजावें. तो अनर्थ टाळावयाचा असेल, तर राक्षसास होतां होईल तो पुष्पपुरीच्या बाहेर जाऊं देतां उपयोगी नाहीं. पर्वतेश्वरास मिलाफी होऊन त्यानेंच हा नंदवंशाच्या घाताचा सगळा उपक्रम केला अशी

बातमी सर्व लोकांत पसरविणें जितकें सोपें, तितकें त्याचा लोकांत न्याय करून त्यास शिक्षा करणें सोपें नव्हे. अधिकरणिकापुढें काय गोष्टी बाहेर निघतील आणि काय नाहीं, याचा मुळींच नेम सांगवत नाहीं, हेंही चंद्रगुप्तादि मंडळी पूर्णपणें जाणून होती. चाणक्य तर राक्षसाची योग्यता पूर्णपणें जाणून होता, त्यानें एकंदर मागलें सर्व विसरून चंद्रगुप्तास मगधेश्वर असें मानण्याचें कबूल केलें म्हणजे तो कधींही बदलावयाचा नाहीं आणि आतां वाढलेल्या अक्कलीमुळें तो यापुढें गाफीलही रहावयाचा नाहीं. चाणक्यास स्वतःस यापुढें मगधांत राहण्याची मुळींच इच्छा नव्हती. आपण चंद्रगुप्तास गादीवर बसवून त्याचें साचिव्य करावें; ही त्याची महत्वाकांक्षाच नव्हे. त्याच्या इच्छा दोन. एक पाटलिपुत्रास येण्याच्यापूर्वी तक्षशिला नगरींत असतांना यवनांपासून आर्यांस झालेला त्रास त्याचे मनांत डांचत होता, तो नाहींसा करण्यासाठीं तक्षशिलेपर्यंत आर्यांचें राज्य नेऊन भिडवावें व तें कार्य नंदराजांकडून करवावें, अशा बुद्धीनें आपण आलों असतां नंदानें आपला अपमान केला, त्याबद्दल नंदवंशावर सूड उगवावयाचा. त्यांपैकीं एक तर सर्वथा पार पडलाच. दुसरा पार पडण्याचें राक्षसानें मनावर घेतल्यास सहज होण्याजोगें आहे. सचिवास लागणारे सर्व गुण राक्षसाचे अंगीं आहेत, हें चाणक्य पूर्णपणें जाणून होताच. आणि म्हणूनच राक्षसानें चंद्रगुप्ताचा पक्ष स्वीकारावा अशी त्यानें इच्छा धरली होती.

चाणक्य मोठा कृतनिश्चयी हें आतां वाचकांस सांगावयास नकोच. त्यानें राक्षसाचें मन वळविण्यासाठीं आपण त्याच्यापासून दूर राहून उपाय चालविले. भागुरायणास एक वेळ नुसतांच पाठवून खडा टाकून पाहविला. चंदनदासाचा वध आपल्यामुळें होतो आहे असें राक्षसास भासवून त्या उपायानें काय होतें तेंही करून पाहिलें. परंतु वर सांगितल्याप्रमाणें तेंही जुळेना.

राक्षस चंदनदासास मरूं देण्यासही सिद्ध झाला हें पाहतांच चंद्रगुप्त व भागुरायण आतां पुढें काय करावें अशा अर्थाची मुद्रा करून एकमेकांकडे पाहूं लागले. त्या त्यांच्या पहाण्याचा राक्षसास अर्थच समजेना. थोडा वेळ गेला, तेव्हां चंद्रगुप्तानें थांबण्याविषयीं चांडालांस खूण करून म्हटलें, " चांडालहो, तुम्ही आपलें नृशंस कार्य करूं नका. प्रत्यक्ष अमात्यराज जर येथें आहेत, तर त्यांच्या बायकांमुलांसाठीं या बिचाऱ्या श्रेष्ठीचा जीव आम्हीं घ्यावा, हें आम्हांलाच उचित दिसत नाहीं. निदान सध्यां तरी त्यास कारागृहांत ठेवा; किंबहुना सोडूनही द्या." इतकें त्या चांडालांस बोलून चंद्रगुप्त चंदनदासाकडे वळला व त्यास म्हणतो, " चंदनदासा, तूं आतां खुशाल जा. मात्र पाटलिपुत्र सोडून कोठें जाऊं नको. तुझी केव्हां जरूर लागेल याचा नेम नाहीं. तुला आम्ही पाचारण करूं तेव्हां येत जा."

इतकें बोलून राक्षसाकडे मुळींही न पाहतां चंद्रगुप्त भागुरायणास घेऊन तेथून निघून चालता झाला. राक्षसावर नजर ठेवणारे दुसरे लोक होतेच. चंद्रगुप्त गेल्यावर चांडालांनीं चंदनदासास सोडिलें. त्याबरोबर त्यानें राक्षसाजवळ येऊन त्याचे पाय घट्ट धरले, व तो त्यास म्हणाला, " आपण येथें आलां म्हणूनच माझी सुटका झाली. नाहीं तर मी आज निर्वाणपदीं खरोखर जात होतों. पुढें काय हाहाकार होणार याचें मला नांव सुद्धां ठाऊक नव्हतें. आणि मी असा मूर्ख कीं, आपण माझ्या घरांतून भुयार खणण्याची कां तजवीज केली आणि मला बोलावून आज्ञा देण्याच्याऐवजीं लेखी पत्र कां पाठविलें, हें

विचारण्यासही आपल्याकडे मी आलों नाहीं. कृपा करून आतां आपण माझे घरीं चला. अमात्यपत्नी आपल्याविषयीं फार काळजींत आहेत, त्यांसही तेथें आणतों. " राक्षसानें चंदनदासाचें तें बोलणें ऐकलें, तेव्हां त्यास कसेंसेंच वाटलें. त्या बोलण्यांत कांहींना कांहीं तरी लबाडी असावी असें स्पष्ट दिसलें. परंतु चंदनदासाचा व राक्षसाचा इतका स्नेह कीं, चंदनदास सुद्धां चाणक्यास मिळून त्यानें आपल्यास फसविलें असेल, हें त्यास संभवनीय वाटेना. आपण यास आतांच खरें खोटें विचारूं लागलों, तर तो कदाचित् जागृत होईल; त्यापेक्षां त्याचेबरोबर त्याचे घरीं जाऊन सहज बोलतां बोलतां खरें काय आहे तें काढून घेणें अधिक सोपें होईल, असा त्यानें विचार केला व त्याचेबरोबर जावयास निघाला.

राक्षसाचे मनांत आतां हें तर पक्केंच बिंबलें कीं, या दुष्टांनीं लोकांत आपली कितीही नाचक्की केली, तरी आपल्यास कारागृहांत टाकण्याचें किंवा आपला न्याय करून आपल्यास शिक्षा करण्याचें यांस धैर्य नाहीं. तेव्हां आपण येथेंच राहून खऱ्या खऱ्या काय काय गोष्टी झाल्या आणि कोणाकोणास फितूर करून यांनीं आपला डाव साधिला, त्याची माहिती मिळवावयाची. लोकांचे मनांत आपल्याविषयीं सध्यां फार वाईट ग्रह झाला आहे, तेव्हां आपण फारसें लोकांत जाऊं येऊं नये हें तो जाणून होता. शिवाय आपल्या सर्व हालचालींवर चाणक्याची नजर असणार हेंही पण तो जाणून होताच. परंतु आपण इतके अंध होऊन फसलों, तें एकंदर कारस्थान तरी काय काय झालें, हें जाणून घेण्याची त्यास अत्यंत उत्सुकता झाली असल्यामुळें त्यास पाटलिपुत्र सोडवेना. चंदनदासाचे घरीं गेल्यानंतर तेथेंच बसून आपण कांहीं तरी माहिती मिळवूं अशी त्यास फार आशा लागली, आणि त्याप्रमाणें चंदनदासाचे घरीं जातांच उपक्रम करण्याचें त्यानें मनांत योजिलें.

प्रथमतः त्यानें विचारास प्रश्न घेतला तो हा कीं, हा इतका प्रचंड व्यूह आपल्यास कांहीं सुद्धां न कळतां सिद्धीस गेला कसा? जर सर्व कांहीं फितुरीमुळेंच सिद्धीस गेलें, असें धरून चाललें, तर कोण कोण फितूर व्हावे लागतात? पर्वतेश्वरानें दाखविलेल्या पत्रांवर माझी मुद्रा तर खास आहे. अर्थात् माझा मुद्राधर हिरण्यगुप्त—ज्याला मी अतिशय विश्वासू म्हणून समजत होतों—तोच फुटला असावा. नाहीं तर माझी मुद्रा कोणाच्याही हातीं जाणें शक्यच नाहीं. प्रत्यक्ष हिरण्यगुप्त फुटला नसला, तर गाफीलपणामुळें त्यानें ती मुद्रा कोठें तरी टाकल्यामुळें दुसऱ्यास सांपडली असावी; परंतु व्यूह रचणारानें या मुद्रेकरितां प्रयत्नच केला असला पाहिजे. मुद्रा मिळविणें हें खोटीं पत्रें तयार करण्यास मुख्य साधन. आणि या खोट्या पत्रांवर तर या दुष्टांनीं पर्वतेश्वरास येथें आणण्याचें कार्य साधलें. तेव्हां हिरण्यगुप्ताच्या गाफीलपणामुळें कोठें तरी मुद्रा पडलेली सांपडून तिचा उपयोग झाला ही गोष्ट शक्य नव्हे. बनावट पत्रें करावयाचीं हा विचार होतांच मुद्रा मिळविण्यासाठीं त्या दुष्टांनीं यत्न केला असला पाहिजे. आणि तो यत्न म्हणजे हिरण्यगुप्तास फोडण्याचा किंवा दुसऱ्या कोणाकडून हिरण्यगुप्तापासून ती मुद्रा चोरविण्याचा. परंतु मुद्रा चोरीस गेलेली नसावी. कारण मला जेव्हां जेव्हां ती लागली, तेव्हां तेव्हां हिरण्यगुप्ताजवळ होतीच. निदान या दुष्टांच्या कामापुरती मात्र ती चोरली जात असावी. पण बहुतकरून ती हिरण्यगुप्तास फोडून त्याचेपासूनच तिचा पाहिजे त्या वेळीं उपयोग करून घेतला असला पाहिजे. अशा प्रकारें हिरण्य-

गुप्तासच जर फोडलें असेल, तर त्यांत बिलकुल नवल नाहीं. हिरण्यगुप्तास फोडला म्हणजे आपला एक डोळाच फोडला. मग आपण त्या कामीं अंध झालों, यांतही कांहीं नवल नाहीं. पण हिरण्यगुप्त कशानें फुटला असेल ? द्रव्याच्या आशेनें ? हें शक्य दिसत नाहीं. मग दुसऱ्या कशाच्या मोहांत तो सांपडला असेल ? स्त्रीमोहांत तर नव्हे ? पण स्त्रीमोह कोठला ?

हा प्रश्न उभा राहतांच राक्षस किंचित् तब्ध झाला. आणि कांहीं वेळानें एकदम टाळी वाजवून व दीर्घ सुस्कारा टाकून म्हणतो, " शाबास ! शत्रूंनो ! असेंच जर असेल तर तुमची खरोखरींच शाबास ! जिला त्या दुष्ट मुरेच्या महालांत आपली हेर म्हणून मीं जवळ केलें होतें, तिच्याचकडून तुम्हीं हिरण्यगुप्तास फोडलें असेल, तर तुम्हीं माझेंच शस्त्र माझ्याच उरांत भोंसकलेंत यांत अणुमात्र शंका नाहीं. इतकें पत्रांबद्दल झालें. परंतु राजघाताबद्दल काय ? "

राक्षसास हा आपला विचार करण्यास येथेंच सोडून आपण आतां चाणक्याकडे वळूं.

---

# प्रकरण ३७ वें.

## चाणक्याचा विचार.

मित्रवध होतो आहे, तो टाळण्यासाठीं तरी राक्षस आपल्या म्हणण्याप्रमाणें कबूल करील, आणि चंद्रगुप्ताला मगधाचा राजा मानून त्याचें साचिव्य करूं लागेल, अशी जी चाणक्याला आशा होती, ती आतां समूळ नष्ट झाली. याच्या सत्यनिष्ठेपुढें व नंदभक्तीपुढें आपल्या नीतिनैपुण्याचें किंवा कपटकौशल्याचें कांहीं चालत नाहीं असें स्पष्टपणें त्यास दिसून आलें, आणि आतां पुढें काय करावें, याचें त्यास मोठें गूढ पडलें. राक्षसास मोकळा ठेवितां उपयोगी नाहीं. तो मोकळा राहिल्यास कोणा तरी परराजाला जाऊन मिळून त्याच्या साहाय्यानें चंद्रगुप्ताचें उच्चाटन केल्याखेरीज कधीं राहणार नाहीं. आपण नऊ नंद मारल्यानें म्हणजे निर्नंद पृथ्वी केली असें नव्हे. चंद्रगुप्ताचें उच्चाटन करून मगधावर नंदांचें पुनः अधिष्ठान करावयाचें असा त्यानें विचार केल्यास कोणीना कोणी तरी नंद नामधारी कुमार किंवा वृद्ध पुरुष सांपडेल. आणि आतांपर्यंत झालेल्या पराजयानें विकापास गेलेला राक्षस तितकें सर्व करावयास कधीं चुकावयाचा नाहीं हें खचित. तेव्हां त्याला पुनः पूर्वस्थळीं आणण्यास काय करावें ? आतांपर्यंत उपाययोजना केली ती व्यर्थ गेली. " पर्वतेश्वर तुझीं पत्रें दाखवितो आणि आतांपर्यंत जो एकंदर प्रकार झाला, त्यावरून लोकांचा साहजिकच असा समज झालेला

आहे कीं, नंदांचा हा भयंकर उत्खात तूं केलास. परंतु हा समज दूर करणें अगदीं सोपें आहे. पर्वतेश्वरासच लुच्चा ठरवून, त्यानेंच आपल्या हेरांच्या द्वारें सर्व व्यवस्था बसविली आणि आतां आपल्या खऱ्या फितुरांचीं नांवें लपवून राक्षसासारख्या पापभीरु व नंदनिष्ठ अमात्याचें नांव घेतो. त्यांत तथ्यांश मुळींच नाहीं. चौकशीअंतीं खरे घरभेदे सांपडले आहेतच. त्यांस यथान्याय शिक्षा लवकरच होईल, असा उद्घोष सर्व नागरिकांत करविला असतां तुझ्यावरला लोकापवाद तेव्हांच जाईल. परंतु तूं आम्हाला अनुकूल झालास तरच हें सर्व करवितों. नाहींपेक्षां लोकापवाद अधिकाधिक होत जाईल अशी तजवीज करूं; किंबहुना तुझ्याबद्दल लोकविद्वेष अधिकाधिक वाढेल अशी व्यवस्था करूं, " असा धाकसुद्धां राक्षसास दाखविला. परंतु तो त्या धाकास मुळींच भीत नाहीं. तो आपलाच हट्ट धरून बसला आहे. आपल्या जीवावर प्रत्यक्ष संकट कांहीं आलें नाहीं, तरी आपल्यासाठीं आपल्या स्नेह्याच्या जीवावर कांहीं संकट आलें आहे आणि तें जर टाळावयाचें असेल, तर आपण या चंद्रगुप्ताचें साचिव्य पत्करणें एवढेंच एक साधन आहे, असें त्याला वाटवून्ही त्याची परीक्षा करून पाहिली; परंतु तो दाद देत नाहीं. मित्रवध झाला तरी हरकत नाहीं; परंतु आपण या नंदांच्या राजवंशाचा घात करणाऱ्या नीचाची सेवा करणार नाहीं किंवा त्यास मगधाचा राजा मानणार नाहीं असेंच तो म्हणतो. शाबास ! राक्षसा, शाबास ! तूं मोठा नीतिनिपुण नाहींस खरा, परंतु सत्यनिष्ठा आणि स्वामिनिष्ठा हीं दोन्ही तुझ्या ठिकाणीं पूर्णपणें दिसतात. तुझ्या देखत तुझा मित्र तुझ्यासाठीं मरणार आणि त्याची पत्नी सती जाणार अशी स्थिति असतांही तूं आपली स्वामिनिष्ठा सोडीत नाहींस. स्वामिघात करणाऱ्याची सेवाही पत्करीत नाहींस. दुसरा एखादा असता, तर केव्हांच स्वपक्ष सोडून अन्य पक्षाकडे गेला असता. परंतु तुझें तें ब्रीद नव्हे, हें जाणूनच तुला या चंद्रगुप्ताचा सचिव बनविण्याचा मीं हेतु धरला आहे. भागुरायणाला तुझ्या विरुद्ध फितविण्याला त्याची महत्त्वाकांक्षा जागृत केली. ' तूं आणि तो सारख्या पदवीचे असून राक्षसाला नंदानीं अत्यंत श्रेष्ठ मानावें आणि तुला विशेष मानूं नये, असें कां ? ' असें वारंवार म्हणून व सेनाधिपतीचें महत्व काय, हें त्याच्या मनांत बिंबवून भागुरायणास फितवितां आलें. आणि त्याच्या मनांत मत्सर उत्पन्न होऊन तो फितला ही. तेव्हां त्याच्यासारख्या माणसाला सचिव करून काय उपयोग ! त्याची तितकीच किंमत. सचिव राक्षसासच केलें पाहिजे. परंतु हें व्हावें कसें ? आतांपर्यंतच्या सर्व युक्त्या फसल्या. राक्षसाचा निश्चय ढळणें शक्य दिसत नाहीं. चंद्रगुप्त त्याच्या मतें अगदी हीन कुळांतला. त्यांतूनही नंदांचा असा घात करून सिंहासनावर बसलेला तेव्हां त्याची सेवा करावयाची, त्याला आपला स्वामी मानावयाचा, हें व्हावें कसें ? बरें राक्षसास वाटेल तें करूं दिलें, मोकळें सोडलें, तर कसें होणार ? तो काय करील ? तो स्वस्थ बसेल ? नाहीं बसणार. तो मलयकेतूकडे जाऊन मिळेल. मलयकेतु एकटा मगधावर चाल करून येणें शक्य नाहीं ! त्याला कोणाचें तरी मोठ्याचें साहाय्य घ्यावें लागणार. आज असें साहाय्य देणारा एकच आहे. तो यवनाचा क्षत्रप सलूक्षस निकत्तर होय. सलूक्षस निकत्तर आणि मलयकेतु यांचा संगम झाला, तरी आपल्याला भ्यावयाला पाहिजे असें नाहीं. परंतु राक्षसासारखा मंत्री त्यांना जाऊन मिळाला, तर सर्व प्रजाजन जरी नाहीं, तरी कांहीं लोक त्यांना मिळण्याचा संभव आहे. तेव्हां तेंही आपण

टाळलें पाहिजे. आमच्या मगधांतल्या मगधांत कोणत्याही प्रकारचा अंतःकलह असतां उपयोगी नाहीं. तो आपण या वेळीं टाळला पाहिजे. शिवाय जोंपर्यंत आपण आहोंत, तोंपर्यंत कोणाशींही झुंज करून आपल्याच बाजूला जय मिळवूं; परंतु आपण किती दिवस राहणार! चंद्रगुप्ताची सगळी राज्यव्यवस्था चांगल्या तऱ्हेनें लागण्यास अमात्य राक्षसच पाहिजे. पण तो युक्त्यांनीं बधत नाहीं. चंद्रगुप्तास मगधराज असें मान्य करण्याचें त्याच्या मनांत येण्याला आपण मोठी युक्ति केली कीं, त्याच्या परम मित्राला मृत्यूच्या तोंडीं देण्याचा घाट घातला. आणि तो जिवंत सुटावा असें वाटत असलें, तर तूं आम्हाला अनुकूल झालें पाहिजेस, एवढाच एक उपाय आहे, असें त्याला स्पष्ट सुचविलें; परंतु जो "मला स्वतःला सुळीं द्या, आपल्या बायकामुलांना सुळीं द्या, ताब्यांत घ्या" असें म्हणायला तयार झाला, तो काय आपल्या एका मित्राला सुळावरून खालीं उतरविण्यासाठीं आपल्या प्रतिज्ञेचा भंग करील? तें सर्व व्यर्थ. तसलीं आपलीं कारस्थानें अगदीं अस्थानीं होणार. आतां त्याला एकदां आपण स्वतःच एकांतांत भेटून त्याच्यापाशीं सर्व स्थिति उलगडून सांगून कांहीं वळलें तर पहावें. यापुढें इतर युक्त्या करण्यांत किंवा दिवस घालविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्याची माणसें फोडणें हें काम सोपें होतें. कोणी महत्त्वाकांक्षा व मत्सर हीं जागृत करून फोडतां आलीं, कोणी द्रव्यलोभानें फोडलीं, कोणी स्त्रीमोहानें फोडतां आलीं, कोणाच्या भोळेपणाचा फायदा करून घेतां आला. सारांश, इतर सर्व युक्त्या करून त्या त्या पदवीच्या व स्वभावाच्या माणसांचीं मानसिक व्यंगें शोधून काढून, त्यांवर योग्य औषधिप्रयोग करून आपलें कार्य साधलें. परंतु राक्षसास तसें मानसिक व्यंग कांहीं नाहीं. राक्षसाचीं माणसें फोडणें निराळें; फाजील आत्मविश्वासांत अगदीं निमग्न होऊन अंध झालेल्या राक्षसास फसविणें निराळें; आपल्या अंधत्वामुळें आपण फसलों आणि त्यामुळें हा भयंकर हाहाकार, ही विलक्षण राज्यक्रांति घडून आली. असें पाहून आतां जागा झालेल्या व डोळे उघडून पाहणाऱ्या राक्षसास वळविणें फार निराळें. साम, दाम, दंड, भेद, यांपैकीं दाम, दंड आणि भेद या त्रयीचा प्रयोग त्याच्यावर करून कांहींसुद्धां उपयोग नाहीं. तो आपल्या सामप्रयोगानेंच जर वळला तर वळणें शक्य. तो सामप्रयोग आपल्या स्वतःवांचून दुसऱ्या कोणासही साधणें शक्य नाहीं. तो करावयास स्वतःच आपण पुढें झालें पाहिजे. त्याच्या सत्यनिष्ठेपुढें आपली वक्रनीति अगदीं निरुपयोगी. त्याच्या सरलतेपुढें आपली कुटिलता अगदीं निर्बल. आपली कुटिलता कां बरें निर्बल? जेथें कौटिल्याचा उपयोग होईल तेथें कौटिल्य, जेथें सारल्याचें सामर्थ्य पाहिजे जेथें सारल्यच योजावयाचें. साध्याकडे दृष्टि देऊन चालावयाचें. साधनांकडे नाहीं. आज एक साधन तर उद्यां दुसरेंच. परवां तिसरेंच. जें साधन ज्या वेळीं योग्य, तेंच त्या वेळीं योजून काय करून घ्यावयाचें तें घ्यावें. हीच जर आपली नीति, तर या वेळीं त्या नीतीचा उपयोग कां करून घेऊं नये? राक्षसाची भेट आपण घेऊं त्याच्याजवळ अगदीं सरळपणाचा आव घालूं. त्याच्या मनांत नंदवंशाचा अभिमान आहे तो आपण अधिक जागृत करून त्याच्याचयोगानें आपलें कार्य करून घेऊं. मगधदेशावर परचक्राचें संकट येत आहे आणि तें या वेळीं निवारलें नाहीं, तर मगध देश रसातळास जातो; यवन त्याला पदाक्रांत करून टाकतात, सोडीत नाहींत असें त्याच्या मनांत वाटूं लागेल

अशाप्रकारचें भाषण करून, त्याच्या मनांतील देशभक्तीलाच उद्दीप्त करून आपलें कार्य करून घेऊं. कधीं सोडणार नाहीं. चाणक्य जी प्रतिज्ञा करील ती सिद्ध करून सोडल्याखेरीज कधींही राहणार नाहीं. चाणक्याची दृष्टि साध्यावर आहे; साधनांवर नाहीं. राक्षसाजवळ भिक्षा मागण्याची, त्याच्यापुढें आपल्या उत्तरीयाचा पल्लव पसरण्याची पाळी आली तरी हरकत नाहीं. आपणास आपल्या कार्याकडे पहावयाचें. चंद्रगुप्तास जर मगधाच्या सिंहासनावर सुप्रतिष्ठित करावयाचें, तर राक्षसाचें साहाय्य, राक्षसाचें आनुकूल्य पाहिजे. एकदां त्याचें आनुकूल्य झालें, एकदां त्यानें त्याचें साचिव्य पतकरिलें, कीं कार्य झालें; तो पुनः बदलावयाचा नाहीं........"

चाणक्याच्या मनांतील विचार इतक्या स्थितीला आले असतां एकदम त्याच्या मनांत आणखी एक नवा विचार आला. हा विचार येण्याबरोबर प्रथम त्याच्या चर्येवर एक प्रकारचा संतोष दिसूं लागला. विचार बरा आहे असें वाटूं लागलें. तो विचार हाः—आपण राक्षसाच्याजवळ बोलण्याचा प्रसंग न आणतां चंद्रगुप्तानेंच त्याला विनंति करावी. पण कशी? आपलें व त्याचें भांडण घडवावें. सडकून भांडण करावें. तें नाटकी भांडण अर्थातच राक्षसाच्या कानीं जाणार. तसें गेलें म्हणजे मग चंद्रगुप्तानें आपल्याबद्दल तिरस्कार दाखवून राक्षसास आपल्या पक्षास बोलवावें. नंदांस मारण्याची क्लृप्ति आपली नव्हे, किंवा भागुरायणाची नव्हे; चाणक्यानें ती आपणापासून शेवटपर्यंत लपवून ठेविली. तोंपर्यंत धनानंदास बद्ध करावें असें मात्र ठरलें होतें; परंतु आयत्या वेळीं कांहीं तरी घोटाळा करून, आपल्याला कांहींच सुगावा लागूं न देतां चाणक्यानें ता भयंकर राजघात करविला. तेव्हां आपल्याला त्याबद्दल दोष न देतां झाल्या गोष्टी विसरून जाव्या. अशा अर्थाचें भाषण केल्यानें राक्षस फसेल काय? कदाचित् फसेल. कदाचित् फसणार नाहीं; तें बरें नव्हे. 'तुला जर इतका पश्चात्ताप होतो, राजघाताची वार्ताही नव्हती, तर आतां राज्यलोभ—राजघातामुळें, भयंकर राजघातामुळें रिकाम्या झालेल्या या सिंहासनाचा लोभ—सोड. आम्ही कोणी तरी नंद आणूं. तपश्चर्येला गेलेला सर्वार्थसिद्धि नंदराजा वनांतूनही आम्ही आणूं आणि राज्यावर बसवून नंदवंश जागृत ठेवूं.' असें राक्षस निक्षून सांगेल. मग त्यावर चंद्रगुप्त उत्तर काय देणार? तें कांहीं नाहीं. कसलेंही कौटिल्य करून राक्षस फसणार नाहीं. त्याचें व्यंग फार तर स्वामिनिष्ठा आणि देशभक्ति—या दोन व्यंगांचाच फायदा घेऊन आपल्यास काय काय करावयाचें तें केलें पाहिजे. तें कसें करावें? आतां खोटीं पत्रें किंवा बातम्या आणून त्या राक्षसाच्या कानावर घालण्याची युक्ति व्यर्थ आहे. आतां आपणास निराळीच युक्ति काढावी लागणार, असें वाटून चाणक्य विचार करीत राहिला.

परंतु चाणक्यास अशा प्रकारचा विचार करीत बसण्याचें प्रयोजन फार वेळपर्यंत राहिलें नाहीं. जें होईल होईल असें वाटत होतें तें झालेंच. पर्वतेश्वराला पकडून आणून कारागृहांत ठेविल्याबद्दल त्याचा पुत्र मलयकेतु यास बातमी लागतांच तो अतिशय संतापला, हें उघड आहे. आणि त्याचा पहिला निश्चय अर्थातच मगध देशावर स्वारी करण्याचा होय; परंतु आपण एकट्यानें अशी स्वारी करून तींत आपणास यश येईल किंवा नाहीं याबद्दल त्याला लागलीच शंका आली. तेव्हां सहजच त्या वेळीं आपण दुसऱ्या कोणाचें तरी साहाय्य घेऊन मगध देशावर स्वारी करून सूड उगवूं, असेंही त्याचे मनांत आलें. मागें एकवार असें सांगितलेंच आहे कीं, पर्वतेश्वर

हा एक ग्रीक यवनांचा मांडलिक होता. तेव्हां या वेळीं आपल्या साम्राज्याधिपतीचें साहाय्य मिळविण्याची खटपट करण्यास मलयकेतूस मुळींच हरकत नव्हती. हें जाणून मलयकेतूनें अलिक्सुंदर बादशहाचा प्रतिनिधि जो सलूक्षस निकत्तर त्याजकडे पत्र पाठविलें व त्या पत्रांत नंदघातानें आणि त्या घाताचे वेळीं आपला पिता पर्वतेश्वर यास फसवून बद्ध करून नेल्याचें सर्व वृत्त लिहून पाठवून, अशा प्रसंगीं आपण ससैन्य येऊन आह्मांला साहाय्य करावें, म्हणजे त्या राजघातक्यांवर चांगलाच सूड उगवूं, असें विज्ञापिलें होतें.

सलूक्षस निकत्तराला तर असले प्रसंग फारच इष्ट होते. आपलें यावनी राज्य जितकें वाढेल तेवढें वाढवावें ही त्याची मोठी इच्छा. परंतु मगध देशावर राक्षस जोंपर्यंत जागृत आहे, तोंपर्यंत आपला प्रवेश तेथें होणार नाहीं, हें जाणून तो स्वस्थ होता.

ज्याप्रमाणें अलिक्सुंदराची महत्त्वाकांक्षा कीं सर्व ज्ञात जगत् आपण पादाक्रांत करावें, त्याचप्रमाणें सलूक्षस निकत्तराची महत्त्वाकांक्षा कीं, आपण आर्यावर्ताचें व गंगानदीच्या पलीकडील मगधादि देशांचीं राज्यें जिंकून ग्रीक यवनांचा अंमल सर्वत्र पसरावा. सर्व आर्य लोक आपले सामंत करावे. अलिक्सुंदरानें ज्या ज्या देशांस वांकविलें होतें, त्या त्या देशांवर यानेंही आपलें जूं बसविण्याचा यत्न करून त्यांत बरीच सिद्धि प्राप्त करून घेतली होती मात्र नंदांच्या राज्यावर हल्ला करण्यास तो कचरत होता. अलिक्सुंदरानें यत्न करून पाहिला होता, परंतु अनेक कारणांनीं त्यास जय मिळाला नाहीं. सलूक्षस निकत्तराचे मनांतून या बाबतींत अलिक्सुंदराच्या वर ताण करावयाची होती. त्याचे मनांत हें मगधाचें राज्य पालथें घालून पाटलिपुत्रांत आपली ग्रीक यवनांची राजधानी स्थापावयाची होती. ती आपली महत्त्वाकांक्षा तृप्त करून घेण्यास हा संधि फार चांगली आहे. पर्वतेश्वरास कैद करून ठेविल्याबद्दल मलयकेतु संतापला आहे, तो आपलें सर्व सैन्य घेऊन आपणांस मदत करतो आहे; तेव्हां आपलें ग्रीक, गांधार, कांबोज, पंजाब इत्यादि देशांतील सैन्य आणि हत्ती मिळून आपण मगधाधीश्वराचा पराभव खचित करूं शकूं, असें त्याच्या मनास वाटलें आणि त्या वाटण्याप्रमाणें त्यानें आपली कंबरही बांधली. मलयकेतूनें व त्यानें एकत्र बसून प्रथमतः खलबत केलें त्यांत प्रथम असा विचार निघाला कीं, आपण एकदम युद्धाला आरंभ करावा, कीं एकवार चंद्रगुप्ताला पत्र लिहून पर्वतेश्वराला बऱ्या बोलानें सोडून द्यावें, नाहीं तर 'आम्ही तुझें राज्य नष्ट करण्याला येतों' असें कळवावें. सलूक्षस निकत्तराचा विचार कीं, आपण एकदमच जाऊन हल्ला करावा म्हणजे सध्यांच्या धांदलीच्या व लोकांच्या असंतोषाच्या प्रसंगीं जय मिळण्याचा फार संभव आहे. मयलकेतूला असें वाटलें कीं, आपण एकदम हल्ला केल्यानें कदाचित् चिडविल्यासारखें झाल्याकारणानें ते एकदम पर्वतेश्वराच्या जीवास धोका करितील. तो धोका न पोंचतां बाप आपल्याकडे परत आला, म्हणजे आपल्याला वाटलें तर हवा तसा त्यांजवर हल्ला करावा.

निकत्तर म्हणाला, " मलयकेतु, तूं म्हणतोस तें खरं; परंतु सध्याची वेळ कांहीं वायां जाऊं देऊं नये. आपल्याकडून पत्र वगैरे गेलं, तर त्यांस जागें केल्याप्रमाणें होईल. आणि ते सर्व एकवटून आपल्याशीं झुंजायला येतील. "

" तें खरं; " मलयकेतु त्यास उलट म्हणाला, " परंतु आपण एकदम गेल्यामुळें माझ्या प्रिय पित्याचे प्राण त्यांनीं घेतले तर त्या आपल्या करण्याचा काय उपयोग ? सामोपचारानें जर त्यांनीं माझ्या ताताला परत

पाठविलें, तर त्यांच्याशीं विश्वासघात करून मगध देशावर स्वारी करायला काय अडचण आहे? आपलें कार्य साधायला हव्या त्या युक्त्या कराव्या ही नीतिच आहे."

अशा प्रकारें निकत्तर आणि मलयकेतु यांचा संवाद होऊन शेवटीं असें ठरलें कीं, मलयकेतूनें आपल्यातर्फे एक वकील मगधेश्वराकडे पाठवावा. त्यानें पर्वतेश्वरास परत पाठविण्याबद्दल बोलणें करावें आणि तें त्यांनीं नच ऐकलें, तर पुढें मगधावर चाल करून जावें. असें ठरून कांहीं यवनवीर बरोबर देऊन मलयकेतूनें शाकलायन नांवाचा एक ब्राह्मण पाठविला. मगधराजाच्या सभेंत दौत्यकर्म करून शिवाय मगधांतील लोकांच्या मनाची स्थिति कशी आहे हेंही समजावून घ्यावें आणि आपल्याला अनुकूल असे कोणी भेटतील काय, याचाही तपास करावा, असें शाकलायनास सांगून ठेविलें होतें.

शाकलायन सागलपुराहून निघाला तो कोठेंही वाजवीपेक्षां अधिक वेळ न थांबतां पुष्पपुराच्या वेशीपर्यंत आला. तेथें त्याचा एकदम आंत प्रवेश होईना. कोणीही नवखा माणूस पुष्पपुरींत येऊं लागल्यास अगर पुष्पपुरींतून जाऊं लागल्यास त्याला अडथळा करावा; त्याच्या हेतूबद्दल चंद्रगुप्त महाराजांपर्यंत वर्दी द्यावी आणि आंत येण्यास अगर बाहेर जाण्यास परवानगी मिळाली तर त्यास येऊं किंवा जाऊं द्यावें, असा सक्त हुकूम होता. शाकलायनाचें तर मगधराजाशींच काम होतें, तेव्हां त्याला आपलें काम काय आणि आपण कोठून आलों, तें सांगण्यास मुळींच हरकत नव्हती. त्यानें सर्व सांगितलें. ती वर्दी पोंचून त्यास आंत जाण्याबद्दल हुकूमही आला.

शाकलायनानें आंत जाऊन दौत्य कसें केलें व त्यामुळें दुसरें काय काय घडलें, तें पुढील प्रकरणीं वाचकांस कळेल.

# प्रकरण ३८ वें.

## संवाहक.

शाकलायन हा कांहीं कमी चतुर ब्राह्मण नव्हता. तो सलूक्षस व मलयकेतु यांचेकडून दौत्यकर्म करण्यासाठीं म्हणून आला होता, परंतु तेवढेंच काम करून जाण्याचा त्याचा विचार नव्हता. धनानंदासारख्या राजाला व त्याच्या कुलाला एकदम नष्ट करून सिंहासनावर आरूढ होणाऱ्या चंद्रगुप्ताबद्दल लोकमत काय आहे, हेंही आपण समजून घ्यावें आणि तें समजून आपल्याला वेळ मिळावा म्हणून आपण आपलें दौत्यकर्म कांहीं दिवस लांबवावें, असें त्यानें मनांत आणलें होतें. नुसतें जें कार्य आपण करण्यास आलों तेवढेंच करून गेलों तर आपल्यास वस्तुस्थिति कळण्याला कांहींच जागा

राहणार नाहीं. तुम्हांला काय वाटेल तें करा, असाच निरोप चंद्रगुप्त सांगणार, आणि तोच निरोप आपल्यास परत घेऊन जावें लागणार, हेंही पण शाकलायन जाणून होता. ज्यानें एवढा थोरला व्यूह रचून तो अगदीं विनचूकपणें पार पडला, तो कांहीं एकदम शरण जाईल, किंवा गरिबीचें उत्तर देईल, हें संभवनीय नव्हतें. तेव्हां अगदीं तडकाफडकी काम करावयाचें, म्हणजे आपलें कार्य करावयाचें आणि निघून जावयाचें एवढेंच; परंतु शाकलायनास तें कर्तव्य नव्हतें. त्याच्या मनांत वर सांगितल्याप्रमाणें विचार होता, यामुळें चंद्रगुप्ताची परवानगी घेऊन राजपुरुषांनीं त्यास त्याच्या परिवारासहित पाटलिपुत्रांत घेऊन, अशा राजाभ्यागताची राहण्याची व्यवस्था ज्या स्थानीं होत असे, त्या स्थानीं नेऊन पोंचविल्याबरोबर थोड्या वेळांतच शाकलायनानें चंद्रगुप्तास असें कळविलें कीं, "मला वाटेनें दगदग फार झाली, यामुळें फार शीण आला आहे. तेव्हां चार दिवस आपल्याला बसण्याउठण्याच्या खोलीबाहेरही येतां येणार नाहीं. यास्तव आल्याबरोबर राजसभेला येऊन महाराजांचें दर्शन घेऊन कार्यकथन होणार नाहीं, याबद्दल क्षमा असावी. प्रकृति बरी होतांच चरणापाशीं येऊन स्वामींचा निरोप निवेदन करीन."

हा निरोप येतांच चाणक्य त्याचा खरा अर्थ तेव्हांच समजला, आणि त्यानें या शाकलायनाबरोबर आलेल्या सर्व मंडळींवर चांगली नजर ठेवण्याबद्दल आपल्या हेरांस सक्त हुकूम सोडले; किंबहुना असेंच हुकूम सोडलें कीं, ही मंडळी सकाळपासून संध्याकाळपर्यंत काय करते आणि काय नाहीं, कोठें जाते, कोणाशीं बोलते, या सर्वांचें टिपण दरप्रहराला आपणाकडे यावें. मात्र आपल्यावर अशी नजर आहे त्यांच्यापैकीं कोणासही कळतां कामा नये.

इकडे शाकलायनानें प्रथमचा दिवस मुद्दाम अगदीं कांहीं न करितां किंबहुना राजानें आपल्या तैनातीस दिलेल्या लोकांपैकीं कोणाशीं न बोलतां काढला. तो खरोखरीच आपल्या खोलीच्याही बाहेर आला नाहीं. चाणक्यानें त्याचें कपट जाणलें आणि एक युक्ति केली. त्यानें एक संवाहक शाकलायनाकडे पाठविला, "हा आमचा संवाहक आपल्या कार्यांत फार कुशल आहे. अपल्यास अध्वश्रमामुळें जो शीण आला असेल तो याच्या कौशल्यानें पार निघून जाईल, आपण या शिणामुळें सर्व दिवसांत आपल्या खोलीच्या बाहेर पडलां नाहीं, हें ऐकून मुद्दाम हा माणूस पाठविला आहे. याचेकडून अवश्य सेवा घ्यावी." असा निरोपही पाठविला.

शाकलायनाकडे हा संवाहक येतांच त्यानें त्याच्याकडे एकवार पाहिलें. संवाहक फार चतुर असतात. तेव्हां यास आपल्या जवळ ठेविलें असतां हा आपलें सर्व काय चाललें आहे तें राजापाशीं जाऊन सांगेल, याकरितां अशा माणसास आपण जवळ ठेवूं नये, असें प्रथमतः त्याच्या मनांत आलें. पण लागलींच त्यास असेंही वाटलें कीं, या लोकांसारखे बोलके व गप्पाडेही कोणी नसतात, तेव्हां त्याच्याशीं आपण बोलून बोलून वस्तुस्थिति काय आहे ती काढूं शकूं. याला जरा चढवून दिलें कीं, याची जिव्हा काय वाटेल तें सांगूं लागेल. एवढ्याकरितां यास ठेवून घेऊन याचा उपयोग करून घ्यावा.

असा विचार करून त्यानें त्या संवाहकास आपल्याजवळ ठेवून घेतलें, इतकेंच नव्हे तर त्यापासून आपलें अंग चांगलें मळून घेण्याचा विचार करून त्यास संवाहनकर्म करण्यास सांगितलें. हेतु हा कीं, तो अंग चेपीत असतां सहज त्यास इकडचे प्रश्न विचारून आपल्याला पाहिजे ती माहिती त्याच्यापासून

काढून घ्यावयाचा. संवाहकही आपण आलों नाहीं तों आपल्यापासून सेवा घेण्याचें मनांत आणलें याबद्दल आनंद दर्शवून म्हणतो:—

"महाराज, माझी सेवा आपण घेणार हें पाहून मला असा आनंद झाला आहे कीं, कांहीं सांगतां येत नाहीं. आतां आपला शीण पार गेला म्हणून आपण समजा. माझी सेवा धनानंदमहाराज स्वतः घेत असत. मी अंग चेपायला बसलों म्हणजे मुरादेवीलासुद्धां चिडवीत कीं, तुझ्या हातांपेक्षां या संमर्दकाचे ( म्हणजे माझे ) हात किती तरी मऊ आहेत अन् असं त्यांनीं म्हटलं, कीं मुरादेवी ज्या संतापत तें कांहीं पुसूंच नका. मग महाराज हंसत. त्या मुराबाईनं बघा सगळ्यांचा आमचा घात केला. काय सांगावं आतां ? आणखी त्यांच्याच पायीं कांहीं महाराज बुडाले. अशी मोठी दुष्ट बाई होती बघा. तें जर आपल्याला सगळं सांगूं लागलों, तर सगळा दिवस पुरायचा नाहीं, पण आतां सांगून काय करायचं आहे ? सगळा घात झाला आणखी तीही मेली. आतां हें नवं राज्य झालं." असें बोलून त्या संवाहकानें सुस्कारा टाकला व तो शाकलायनाचे पाय चेपतां चेपतां अगदीं शोकग्रस्त झाल्याप्रमाणें होऊन स्वस्थ बसला. जणूं काय त्यास एकदम मागल्या सर्व गोष्टींची व सुखाची आठवण होऊन फार वाईट वाटलें. तेव्हां ही संधि फार चांगली आहे, आतां यांस आपण कांहीं कांहीं प्रश्न विचारून वस्तुस्थिति काय आहे, लोकांच्या मनाची स्थिति कशी आहे, सध्यांच्या राजाच्या उलट कोणकोणते लोक आहेत वगैरे माहिती याच्या तोंडून काढतां आली तर काढावी, असा विचार त्यानें केला. तो एकदम त्यास म्हणतो, "काय तुमचं नांव, संमर्दक ?"

"होय स्वामी, मला संमर्दक म्हणतात. आमचा हा संवाहकाचा धंदा पिढीजाद आहे."

"ठीक. ठीक. त्यामुळेंच तुमच्या हातांत एवढं मार्दव आहे तें. अजून पुरती पावघटका झाली नाहीं आपल्या संवाहनाला सुरू होऊन, तोंच मला किती तरी बरं वाटायला लागलं. वा ! राजगृहीं असावी तर अशीच गुणी मंडळी असावी. धनानंदमहाराजांची आपल्यावर फार मर्जी ना ? ते चांगले गुणज्ञ व मर्मज्ञ होते म्हणायचे !"

"म्हणायचे असं कां म्हणतां ? त्यांच्यासारखा गुणाची चीज करणारा दुसरा कोणी असणंच मला शक्य दिसत नाहीं."

"बरं पण, संमर्दका, इतका गुणग्राही राजा असून आणखी—त्याची हत्त्या भर चौकांत व्हावी, हें कसं घडलं ? लोक काय त्या वेळीं निजलेले होते ? आपल्या इथें काय असेल तें खरं, परंतु बाहेर तर सर्वांना असं वाटतं आहे कीं, लोकच धनानंदमहाराजांवर संतापले होते आणि म्हणून कार्यसाधु पुरुषांना चांगलं फावलं, दुसरं काय ?"

"महाराज, आपण अगदीं चुकतां. लोकांस अद्यापि त्या राजघाताबद्दल फार फार वाईट वाटत आहे. जो तो असं बोलतांना दिसतो कां, जर कोणी शास्ता आतां उत्पन्न झाला आणखी त्यानं या लोकांना चांगलं शासन केलं, तर पाहिजे आहे. लोकांना खरोखरच फार संताप आला आहे, परंतु ते काय करणार ? ज्याच्या हातीं सत्ता तो म्हणतो माझीच सत्ता. तशांपैकीं सगळा प्रकार झाला आहे. भगवान् ! तूं आहेस."

"एकूण लोक या प्रसंगीं अगदीं उलट आहेत ?"

"उलट म्हणजे, अगदीं उलट, आपण अचंबा कराल इतके उलट आहेत. पण सेना-

पति भागुरायण चंद्रगुप्ताच्या हातांत. तेव्हां काय उपयोग ? ”

“ उपयोग लोकांनीं करून घेण्याचं मनांत आणलं, तर दुसरीं कोणाचीं सैन्यं तुमच्यासारख्यांच्या मदतीस येणार नाहींत काय ? ”

“ दुसऱ्या कोणाचीं येणार ? आणि तीं आलीं तरी राज्यलोभानंच येणार कीं नाहीं ? अगदीं निरपेक्षबुद्धीनं कोण मदत करणार आहे ? ”

“ बाबारे, अगदीं निरपेक्षबुद्धीनं जरी कोणी आलं नाहीं, तरी आपल्याला पाहिजे तेवढी मदत घेऊन, मग त्यांस नमस्कार करावा. ”

“ हो. हा एक उपाय आहे खरा; परंतु कोण यायला बसलं आहे, आणखी मदत करायला बसलं आहे ? ”

“ तें खरें; पण कायरे संवाहका, तुमची जात मोठी चतुर. ‘ पक्ष्यांत काक आणखी माणसांत संवाहक ’ अशी म्हणच आहे, म्हणून तुला विचारतों; समज कीं, तुमच्या मगध देशच्या लोकांच्या बोलावण्यावरून नाहीं, पण आपण होऊनच कोणी तुम्हांला या नंदवंशघातकांच्या कचाट्यांतून सोडवायला आलं, तर तुह्मी मदत कराल काय ? ”

“ स्वामी, आम्ही गरीब लोक काय मदत करणार ? पण आमच्या लोकांना वळवील असा कोणी जर आपण गांठला, तर लोक वळण्याचा संभव आहे. लोक विचारे काय करतात ? त्यांचा नेहमीं गड्डरिकान्याय असतो. ”

“ संवाहका, तूं फारच चतुर दिसतोस. तूं आपल्या या संवाहनकर्मांतच नव्हे, तर राजनीतींतही मोठा कुशल दिसतोस. ”

“ कसचा, महाराज, मी चतुर ! मी तसा चतुर असतों, तर धनानंदमहाराजांचा आणखी त्यांच्या वंशाचा असा आकस्मिक घात कां होऊं दिला असता ? आपली आमची जात बोलकी फार, त्यावरून आपल्याला वाटतं झालं. ”

“ अहाहा ! तुझ्या या सुंदर संवाहनानं माझं अंग कसं मोकळं झालं. अगदीं शीरन् शीर मोकळी झाली. शाबास ! तुला हें पारितोषिक घे. ”

असें म्हणून शाकलायनानें त्यास एक सिंहमुखी सुवर्णवलय दिलें.

ते पाहतांच संवाहकाचे नेत्र विस्तृत झाले. त्यास मोठा आनंद झाला. आणि तोंडानें मात्र ‘ नको नको, ’ म्हणत त्यानें तें कडें आपल्या हातांत चढविलें. आपल्या देणगीनें या माणसास आनंद झाला हें पाहून शाकलायनासही फार समाधान झालेलें दिसलें.

नंतर तो पुनः संवाहकास म्हणतो, “ संवाहका, तुमच्या लोकांचा कैवार घेऊन परकी कोणी आल्यास त्याला ज्याची चांगली मदत होईल असा कोणी इथें आहे कारे लोकांत ? संकोच धरूं नकोस. तूं स्पष्टपणें मजजवळ बोल. तूं असं कांहीं मजजवळ बोलत होतास हें मी कानाच्या कोंपऱ्यालासुद्धां कळूं देणार नाहीं. आज तुमच्या मागधांच्या मनाची स्थिति तरी काय आहे, एवढंच मला कळायला पाहिजे आहे. ”

“ महाराज, कृपा करा. सध्यांच्या काळीं भिंतीला सुद्धां कान आहेत. कोण कोणाचा गुप्त हेर आहे हेंच सांगतां यायचं नाहीं. मला वाटतं पुष्पपुरींतला प्रत्येक माणूस हेर असून तो त्या दुष्ट ब्राह्मणाला - चाणक्याला सगळं जें काय कुठें घडलं असेल तें सांगत असतो. तेव्हां मला असलं कांहीं आपण विचारूं नका, आणखी मी आपल्याला कांहीं सांगत नाहीं. आपली जी काय सेवा आपण करायला सांगाल, ती करण्याचं माझं काम आहे. तें मी अहोरात्र करीन. ”

" पण संवाहका, ही तुझी सावधगिरी पाहून मला फारच संतोष झाला. त्याबद्दल याच जोडीचं दुसरं वलय घे. हें म्हणजे मी तुला विलोभन दाखवितों असं नाहीं. परंतु असूं दे• आमची ही तुझ्याजवळ आठवण. आणखी इकडे पहा, इथें तूं आणखी मी याखेरीज कोणी नाहीं. मग उगीच कां आडे-वेढे घेतोस ? आजूबाजूला कोणी असेल असं सुद्धां मनांत आणूं नकोस. आणखी काय सांगूं ?"

" काय सांगूं स्वामी, आतां सांगच म्हणतां, तर सांगतों. पण जर का मी असं कांहीं बोललों असं बाहेर गेलं, तर माझ्या प्राणावरच बेतेल हो. "

" अरे नाहीरे, मी त्याबद्दल काळजी घेईन. मग तर झालें ? "

" मग स्वामी, सांगतों ऐका. अमात्य राक्षसच तुम्हाला मिळाला, तर कांहीं उपयोग होईल. त्यांतलं कारण असं आहे; अमात्य आहे सरळ, तेव्हां त्याच्या डोळ्यांत धूळ टाकून या चाणक्यानं, भागुरायणानं आणखी त्या चंद्रगुप्तानं खोटींनाटीं पत्रं लिहून तुमच्या राजाला इथें बोलावलं. राक्षसाच्या नांवाचीं, पण सगळीं खोटीं पत्रं. राक्षसाला त्यांतलं कांहीं सुद्धां ठाऊक नाहीं. पर्वतेश्वरमहाराजांना अशा तऱ्हेनं फसवून आणून त्यांची फजिती केली. इकडे लोकांतही असंच उठवलं कीं, हें राक्षसाचं सगळं कारस्थान. यामुळें पर्वतेश्वराकडे आणखी, लोकांत दोहों पक्षीं राक्षसाची नाचक्की केली. आपण जर चतुरपणा कराल, तर आतां राक्षसाला आपल्या पक्षाला वळवून घ्या. लोकांच्या मनांत प्रथम जरी राक्षसाविषयीं फार फार द्वेष उत्पन्न झाला होता, तरी जों जों दिवस चालले आहेत, तों तों चाणक्यादिकांचीं कारस्थानं बाहेर पडत चाललीं आहेत, आणि यामुळें यांनींच तो सगळा भयंकर व्यूह रचून राक्षसावर विनाकारण कुभांड रचलं, असं पुष्कळांना वाटूं लागलं आहे. अर्थातच हळू हळू लोक राक्षसाला अनुकूल होताहेत. त्याला आपण वळवा म्हणजे आपल्याला कदाचित् यश येईल........"

संवाहकाचें हें अगदीं मोठ्या मुत्सद्यासारखें भाषण ऐकून शाकलायन किंचित् चपापला. ' हा खरोखर संवाहक नसून चाणक्यानं कोणी हेर तर पाठविला नसेल आपला एकंदर काय खटाटोप आहे तो पहाण्याला ? ' असें त्याच्या एकदम मनांत आलें व त्याला कांहीं तरी युक्ति करावयाची, याला आतां आपल्या नजरेआड होऊंच द्यावयाचें नाहीं, आणि याच्या हालचालींवर आपल्या माणसाकडून कडक दृष्टि ठेवावयाची, असा त्यानें निश्चय केला. नंतर त्यास म्हणतो, " तूं म्हणतोस तें मला अगदीं बरोबर दिसतं. परंतु राक्षसाला भेटावं कसं ? बोलावं कुठें ? "

" त्यांत हो काय अडचण आहे ? राक्षस अजून पुष्पपुरींतच आहे आणि चाणक्याची आपल्यावर नजर आहे हें पक्कं जाणून राहून तो वाटेल तिकडे जातो येतो. तेव्हां आपण त्यांना भेटा म्हणजे सर्व कांहीं ठीक होईल. त्यांची व आपली भेट करून देण्याचं पाहिजे तर माझ्याकडे लागलं. "

शाकलायन कांहीं वेळ स्तब्ध बसला. नंतर पुनः म्हणतो, " ठीक. ठीक. तूं त्याची माझी भेट करून दे. मग मी पाहतों काय होतं आणि काय होत नाहीं तें. "

संवाहकानें, " ठीक. ठीक. त्यांची आपली भेट करून देण्याची हमी माझ्याकडे लागली," असें म्हटलें.

आपण जें दौत्य करण्यास आलों आहों, त्यांत आपल्याला तशी सिद्धि कांहींच मिळणार नाहीं; हे लोक पर्वतेश्वरास मुख्या मतानें

सोडून देणार नाहींत, कांहीं तरी भयंकर खंडणी मागतील. आणि तेवढेंच निमित्त घेऊन सलूक्षस निकत्तर मलयकेतूस घेऊन मगधावर हल्ला करील, हें शाकलायनास स्पष्टपणें दिसत होतें तेव्हां अशा स्थितींत जर आपण कांहीं भेद करून ठेवून अंतःकलह पेटवून ठेवला, तरच आपल्या पक्षाला सिद्धि मिळण्याचा संभव. नाहींपेक्षां अपजय येण्याचीच विशेष भीति. तेव्हां आपण राक्षसाच्यासंबंधाचा हा काय प्रकार आहे त्याची चौकशी करून त्यास भेटूनही पहावें, असा शाकलायनानें विचार केला. प्राचीन काळीं संवाहक हे फार खटाटोपी लोक असत आणि त्यांचा प्रवेशही वाटेल तिकडे असल्याकारणानें त्यांस सर्व ठिकाणच्या बातम्या वगैरे कळण्याचा विशेष संभव असे.

वर सांगितल्याप्रमाणें संवाहकाचें व शाकलायनाचें संभाषण झाल्यानंतर आणखीही अनेक गोष्टींसंबंधानें शाकलायनानें त्यांच्याशीं बोलणें काढलें. संवाहक मोठा बोलभांड. त्यानें अगदीं सर्व प्रकारच्या भाषणांत आपलीच छाप टेवून दिली. शिवाय " आपल्याला या चाणक्यचंद्रगुप्तादिकांचें करणें मुळींसुद्धां आवडत नाहीं. आपली प्रवृत्ति भगवान् बुद्धाच्या अहिंसाधर्माकडे आहे. पुनरपि नंदवंश सिंहासनावर येण्याची आशा अगदीं नाहीं असें वाटलें, तर आपण बुद्धभिक्षु होणार. सुरादेवीची दासी वृंदमाला ही तर झालीच. तिनें नुकताच जोग घेतला. तिचेंच अनुकरण आपण करावें असें आपल्या मनाला वाटतें आहे, " असें त्यानें शाकलायनास आपण होऊनच सांगितलें.

शाकलायनानें संवाहकास रजा दिली. मात्र तूं आमच्या या घरांतून सध्यां बाहेर जाऊं नको. मला तुझी लागलीच जरूरी लागेल. तुझ्या साहाय्यानें आम्हांला जय मिळाला, तर तुझें कल्याण होईल, वगैरे सांगून त्याची आपल्या येथेंच राहण्याची व्यवस्था केली.

नंतर शाकलायनानें राक्षसाची भेट कशी घ्यावी यावद्दल विचार केला. आपल्या या जागीं राक्षसास आणणें सर्वथा अनिष्ट. आपण होऊन त्याच्या जागीं जावें तरी अनिष्टच. तेव्हां अशा स्थितींत काय करावें ? ह्याचा त्याला मोठा विचार येऊन पडला. शिवाय मयलकेतु व सलूक्षस निकत्तर यांनीं तर अतिशय तांतडीनें सर्व काम संपवून येण्यावद्दल आपल्याला बजाविलेलें, तेव्हां विनाकारण दिरंगाई करून अधिकउणे दिवसही लावतां येत नाहींत. आणि मार्गांत झालेल्या दगदगीमुळें आपण आजारी झालों ही सबब तरी किती दिवस चालणार ? तेव्हां तेंही अगदीं उपयोगी नाहीं. अर्थातच आतां जें काय होणार असेल, तें एकदां तडकाफडकीच करून टाकावें. संवाहकाच्या मदतीनें आपण कांहीं तरी वेष पालटून त्या छद्मवेषांत राक्षसास भेटून काय बोलवयाचें तें बोलून येऊं.

असा विचार करून शाकलायनानें पुनः संवाहकास बोलाविलें आणि आपला विचार सांगितला. संवाहकास तो पसंत पडला. त्यानें संवाहकाचाच वेष घेणें फार सोपें असें सुचविलें. हा वेष घेणें शाकलायनास प्रथमतः कसेंसेंच वाटलें. आपण जातीनें अगदीं कट्टे ब्राह्मण असून संवाहकाच्या वेषानें कोठेंही जाणें अगदीं गैर असें त्यास वाटलें; परंतु राजकीय प्रकरणांत घुसलें म्हणजे मग सर्व प्रकारचे बंध, सर्व प्रकारचे संकोच दूर सारायला पाहिजेत, त्याप्रमाणेंच या प्रसंगीं आपण वागलें पाहिजे. असा विचार करून शाकलायनानें संवाहकाच्या म्हणण्यास रुकार देऊन लागलींच वेष पालटण्याची तयारीही केली. इतर कोणाच्या मनांत कांहीं शंका येऊं

नये म्हणून संवाहकानें आपल्यापैकीं एक दुसरा संवाहक बोलावून आणला. त्याला शाकलायनाच्या बिन्हाडीं बसविलें. त्याचा पोषाख शाकलायनानें घातला, आणि दोघांस दोघे संवाहक त्या घराच्या बाहेर पडले. ते, राक्षस ज्या ठिकाणीं रहात होता, तेथें गेले.

संवाहकरूपानें गेलेल्या शाकलायनाची व राक्षसाची भेट झाली आणि त्यांचें जें भाषण झालें तें फार मौजेचें होतें.

राक्षसाची खरी किंमत त्यावरून दिसली.

---

# प्रकरण १९ वें.

## राक्षस आणि शाकलायन.

राक्षसानें अद्यापि पाटलिपुत्र सोडलें नव्हतें. इतकेंच नव्हे, तर तो धैर्यानें पुनः आपल्या मुलांमाणसांस घेऊन आपल्या मूळच्या घरांत जाऊन राहिला होता. चंदनदासास जेव्हां चंद्रगुप्तानें सोडून दिलें, तेव्हांच राक्षस पूर्णपणें समजला कीं, आपल्यास उघडपणें मारण्याची यांची छाती नाहीं, आणि अन्य प्रकारेंही आपल्यास उपद्रव करण्याचा यांचा मानस नाहीं, किंवा यांना शक्य नाहीं. आपल्याविषयीं यांनीं लोकमत वाईट केलें आहे; परंतु लोकमत हें लक्ष्मीप्रमाणें किंवा अस्तास जाणाऱ्या सूर्यानें रंजत मेघाप्रमाणें क्षणिक आहे. आपण जर असेच नेटानें राहिलों तर त्याचा तरी काय नेम? लोक आपल्या बाजूस वळतील, आणि अखेरीस आपण नंदाच्या वंशाची पुनश्च प्रतिष्ठा करूं शकूं. तें कसेंही असलें, तरी निदान एवढी गोष्ट खरी कीं, आपण येथून पळून गेल्यानें यांनीं लोकांचें मनांत भरवून दिलेला आपल्याविषयींचा संशय अगदीं कायम व्हावयाचा.

असा सगळा विचार करून राक्षस आपल्या मूळच्या घरीं येऊन राहिला होता. मात्र आतां आपल्यासभोंवतीं कोण लोक आहेत, आणि कसे आहेत, याचा विचार करून, त्यांना पूर्णपणें जाणून त्यानें आपला व्यवहार चालविला होता. हिरण्यगुप्त आतां त्याच्या परिवारांत नव्हता. राक्षसाची फार इच्छा होती कीं, त्यास गांठून एकदां त्याच्यापासून खरी खरी हकीकत समजून घ्यावी; परंतु तो पार कोणीकडच्या कोणीकडेच निघून गेला होता; किंवा त्यास लावून दिलें होतें. आपण जय्यत उभे असतां आपल्या नांवानें अनेक कारभार व्हावे, आपल्या विश्वासांतलीं माणसें आपल्या विरुद्ध उठावीं, त्यांनीं राजवंश उच्छिन्न करावा आणि त्यांतलें आपल्यास कांहींसुद्धां कळूं नये, यापेक्षां अधिक लाजिरवाणी गोष्ट ती कोणती? असें राक्षसाच्या मनांत वारंवार येऊन तो जळफळे; परंतु नुसतें जळफळून उपयोग काय? कांहीं

तरी हातून झालें पाहिजे. म्हणून त्यानें असा विचार केला कीं, आपण घरींच राहून काय होईल तें पहावें. राक्षसाचें घर जवळ जवळ आलें, तेव्हां संमर्दक शाकलायनास म्हणतो, " महाराज, एक महत्वाची विनंति आपल्याला करायची आहे. ती ही कीं, मला चाणक्यानं किंवा चंद्रगुप्तानं आपल्याकडे पाठविलं आहे, असं राक्षसाजवळ बोलूं नका. असं बोललांत, तर सर्व फसेल. चाणक्यानं पाठविलं असं राक्षसाला कळलं कीं, त्याला शंका येणार कीं, मीं लबाडीनं त्याच्याकडे आपल्याला आणलं. तेव्हां तसं कांहीं आपण बोलला नाहीं, म्हणजे सर्व कांहीं ठीक जुळेल. " शाकलायनास तें संवाहकाचें म्हणणें सयुक्तिक दिसलें व त्यानें त्यासंबंधानें न बोलण्याचें कबूल केलें.

संवाहक व संवाहकरूपी शाकलायन राक्षसाचे घरीं गेले, तेव्हां अर्थातच प्रथमतः त्यांना राक्षसापर्यंत दाद लावण्यास पंचाईत पडली. कारण कोणीही नवखा माणूस आल्यास त्याची आधीं पूरतापास झाल्याखेरीज त्याला आपल्यापर्यंत आणूं नये, अशी राक्षसानें सक्त ताकीद दिली होती; परंतु राक्षसाकडे जेव्हां, " आपल्या दर्शनासाठीं दोन संवाहक आले आहेत, 'फार महत्वाचें काम आहे, तरी दर्शन व्हावें,' अशी त्यांची विज्ञप्ति आहे, " अशी वर्दी आली, तेव्हां राक्षसानें क्षणमात्र विचार केला. नंतर तो किंचित् हंसला आणि ' त्यांस घेऊन ये ' असें त्यानें आपल्या प्रतीहारीस सांगितलें.

प्रतीहारीनें त्या दोघांस आंत आणल्याबरोबर एकवार राक्षसानें त्यांजकडे पाहिलें आणि आधीं जी कांहीं शंका मनांत आली होती, ती बरोबर आहे असें पाहतांच आपण मान हलवितों, त्याप्रमाणें मान हलवून तो त्या दोघांस म्हणतो, " आपण खरोखरीच संवाहक असतां, तर मी आपल्याला या बसा, म्हणून मान देणें जरा गैरशिस्त दिसलं असतं, परंतु आपण तसे नाहीं. हा वेष घेऊन कांहीं हेतूनं मजकडे आलां आहां हें मी समजलों आहें. एवढ्याकरितां या बसा, म्हणतों. बसा, आणि काय काम असेल तें सांगा. माझ्या हातून होण्याजोगें काम आतां कांहीं नाहींच. परंतु ज्याअर्थीं कांहीं हेतु धरूनच तुम्ही मजकडे आलां आहां, त्याअर्थीं तुमचं ऐकून घेतलंच पाहिजे. "

राक्षसाचें हें बोलणें ऐकून दोघेही संवाहक एकमेकांकडे पाहूं लागले. यानें आपला छद्मवेष ओळखला याबद्दल शाकलायनास आश्चर्य वाटलें; परंतु त्याविषयीं अधिक कांहींएक न बोलतां तो राक्षसास म्हणाला, " आपण ओळखाल यांत नवल काय ? कोणाचंही छद्म ओळखणं आणि त्यावर तोंड देणं हें तर आपलं ब्रीद. असो. मीही आतां अधिकउणं बोलत नाहीं. उघडपणें आपल्याकडे येणं थोडं धोक्याचं असं वाटून मी या आमच्या संवाहकाच्या साहाय्यानं आपल्या दर्शनाला आलों. मी कोण हें सांगण्यापूर्वी या स्थानांत बोलायला कांहीं हरकत नाहीं असं आश्वासन मिळालं पाहिजे. "

तेव्हां राक्षस त्यास म्हणतो, " अगदीं विस्रब्धपणें बोला. आपण कोणत्या देशांतून येणं केलं ? आणखी कां ? आपण संवाहक नसून कोणी तरी राजपुरुष आहां. "

" अमात्यश्रेष्ठ, होय. मी राजपुरुष आहें खरा. आणि स्वामिकार्यासाठींच आलों आहें. "

" तें काय कार्य ? आणि आपला स्वामी कोण ? आपण अगदीं विश्वस्तपणें बोलावं. "

" होय. आतां मी विश्वस्तपणें बोलणारच. मी पर्वतेश्वराचा पुत्र जो मलयकेतु त्याच्या आणि—नव्हे, त्याच्याचकडून आलों आहें. "

आपणापासून हा कांहीं लपवून ठेवतो आहे हें राक्षसानें जाणलें; परंतु तसें न दाखवितां तो म्हणाला, " त्याच्याकडून मजकडे आलां ? शाकलायन नांवाचे कोणी मंत्रिवर त्यांच्याकडून

इकडे आल्याची वार्ता माझ्या चारांनीं मला सांगितली खरी. काय, त्याच्या पित्याला फसवून इथें आणून बंदींत घालण्याला मीच कारण हें पाहून मलयकेतूला कांहीं संताप आला नाहीं ? कीं त्यानें मला पकडून नेण्यासाठीं आपल्याला इकडे पाठविलं आहे ? "

" छे. छे. अमात्यराज, असं आपण बोलूं नका. मलयकेतूचा आपल्यावर राग आहे हें खरं व तो असणं अगदीं साहजिक; परंतु मी इथें आल्यापासून जी एकंदर माहिती मला मिळाली आहे, तिजवरून, पर्वतेश्वरमहाराजांना पकडण्यात व त्यांना इथें बोलावून आणण्यांत आपला मुळींसुद्धा संबंध नाहीं, हें मला कळून आलं आणि म्हणूनच मी आपल्याकडे आलों आहें. "

" तें आपल्याला कसं कळलं ? पाटलिपुत्रांत तर सर्वांचा समज असा आहे कीं, मींच राजकुलाचा घात करविला आणि म्लेच्छअधिपतीला मगधाचं राज्य देण्याकरितां मींच सर्व व्यवस्था करून इथें बोलावलं होतं; परंतु चाणक्याच्या व चंद्रगुप्ताच्या जागरूकत्वानं तें सर्व पारडं फिरून पर्वतेश्वराला बंदींत पडावं लागलं. तुम्हांला निराळं सांगणारा कोण भेटला ? "

" अमात्यराज, असं सांगणारा एकचसा काय, अनेक आहेत. आपल्या हातून असलं कृत्य कधीं होणार नाहीं, असं समजणारे अनेक लोक आज पाटलिपुत्रांत आहेत, त्यांची आपल्याठिकाणीं अद्यापि दृढ श्रद्धा आहे. "

" वा ! एकूण अजूनही कांहीं विचारी लोक मगधांत आहेत ! ठीक. ठीक. बरं मग ? "

"आपला कांहीं संबंध नसतां आपल्याविषयीं विनाकारण या लोकांनीं जो अपवाद उत्पन्न केला आहे, त्याबद्दल आपल्याला राग आला असलाच पाहिजे आणि आपण तो अपवाद घालविण्याविषयीं उद्योग करण्याला उत्सुक असालच, असं जाणून मी आपल्याकडे आलों आहें. "

" मनांत असणं, आणि हातून होणं यांत किती अंतर असतं, आपण जाणत असालच ? "

" तें म्हणणं साधारण जनांचं. आपल्यासारख्या असाधारणांना काय शक्य नाहीं ? "

" मी कसला असाधारण ? मी साधरणांतला साधारण. झाला हा प्रकारच त्याजबद्दलचा पुरावा देईल. बरं पण, आपण इकडे कां आलां, कांहीं अजून कळलं नाहीं. हरकत नसल्यास तें ऐकावं अशी इच्छा आहे. "

" मी मलयकेतूकडून चंद्रगुप्ताला संदेश घेऊन आलों आहें. तो संदेश असा कीं, एक तर आपल्या पित्याला तावडतोब सोडून देऊन एक कोटि होन खंडणी द्यावी. नाहींपेक्षां युद्धाला सिद्ध व्हावं. "

" काय म्हणतां ! हा निरोप मलयकेतूनं चंद्रगुप्ताला पाठविला आहे ? "

" होय. त्यानंच पाठविला आहे आणि तो चंद्रगुप्ताला पोंचविण्याकरितां मला दूत म्हणून पाठविलं आहे. कां बरं ? आपल्याला आश्चर्य कां वाटतं ! "

" शलभानं दीपज्योतीवर झेंप टाकली म्हणजे आश्चर्य कोणाला वाटणार नाहीं ? "

" मलयकेतूला शलभाची उपमा देतां, परंतु तो तसा अविचारी नाहीं. "

" जर तो अविचारी नसता, तर एकट्याच्या जोरावर चंद्रगुप्ताला असा संदेश त्यानं पाठविला नसता. त्याला कोणाची तरी दुसऱ्या बळाढ्याची मदत असली तरच कांहीं होणं शक्य ! "

" अशी मदत हवी आहे, म्हणून तर आपल्याकडे आलों आहें. आपली मदत

मिळाली, तर सर्व कार्य यथासांग होणार आहे. ”

“ माझ्याकडे येऊन माझी मदत ती काय होणार ? ” राक्षसानें त्यास विचारलें.

“ सर्व कांहीं होणार ! इतका लोकापवाद आपल्या विरुद्ध असला, तरी आपण जें करूं शकाल तें दुसऱ्या कोणाच्यानें होणार आहे ?”

“ बरं, हें ठीक झालं; परंतु मलयकेतूच्या मागें आणखी कोण आहे ? ”

“आणखी कोण असणार ? ” शाकलायन आश्चर्यानें राक्षसाकडे पहात म्हणाला.

“ इकडे पहा. आपण जर विश्वस्तपणें बोलण्यासाठीं आलों म्हणतां, तर खरोखर तसं बोला. मलयकेतूला दुसऱ्या कोणा तरी राजाचं साहाय्य असल्याखेरीज त्यानं मगधावर चाल करून येण्याचं मनांत आणणं शक्यच नाहीं, आणि ज्याच्या साहाय्यानं हें शक्य, तो एक म्लेच्छ क्षत्रप सलूक्षसच होय. बोला. त्यानंच साहाय्य करण्याचं कबूल केलं आहेना ? ”

यासंबंधानें आणखी आढेवेढे घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें जाणून शाकलायनानें म्हटलें “ होय. आपण म्हणतां तीच गोष्ट खरी. सलूक्षसाचं त्याला पूर्ण साहाय्य आहे. जसं सलूक्षसाचं त्याला बाहेरून साहाय्य आहे, तसंच आपलं या वेळीं आंतून असावं, एवढीच माझी आपल्याला विनंति आहे. आज मित्तास आपल्याला फार लोक अनुकूल नाहींत हें खरं, परंतु लौकरच होतील, अशी एकंदर लोकमताची स्थिति दिसते आहे. पहा, आपण साहाय्य केल्यास आपलं कार्य होईल चाणक्यावर व चंद्रगुप्तावर सूड उगवलासं होईल. त्यांचा पराभव झाल्यानं मलयकेतूलाही आपल्या बापाबद्दल सूड उगवल्याचं समाधान मिळेल...... ”

“ आणखी, यवन क्षत्रप सलूक्षस निकत्तर याला काय फायदा होईल ? ” राक्षसानें कपाळास आंठ्या घालून डोकें चोळून शाकलायनाकडे चमत्कारिक तऱ्हेनें पहात विचारलें. तो प्रश्न विचारतांना त्याचा आवाजही कांहीं चमत्कारिक झाला होता. शाकलायनानें तें राक्षसाचें भाषण व्याजभाषण होय, हें तेव्हांच जाणलें आणि कांहीं वेळ तो स्तब्धच बसला.

तेव्हां राक्षस पुनः त्यास म्हणतो, “ कायहो, तुम्ही अगदींच कांहीं बोलत नाहीं ? सलूक्षस निकत्तर मलयकेतूला इतकं साहाय्य करतो, त्यांत खरोखर त्याचा कांहीं तरी हेतु असेल कीं नाहीं ? त्याचा काय फायदा ? ”

“ त्याचा फायदा काय ? कांहीं नाहीं. केवळ मैत्रीखातर तो साहाय्य करणार. ”

तें ऐकून राक्षस हंसला. आणि शाकलायनाकडे पाहून म्हणतो, “ आपल्याला मलयकेतु आणि सलूक्षस दोघांनींही निवडून दौत्यकर्माकरितां इकडे पाठविलं आहे, तेव्हां आपण मंत्रिवर असलांच पाहिजे हें उघड आहे. अर्थातच सलूक्षसाचा कांहीं हेतु नाहीं हें आपल्याला तरी कसं खरं वाटतं ? नसेलच वाटत. तेव्हां तें बोलणं व्यर्थ आहे सलूक्षस हा मोठा महत्त्वाकांक्षी आहे. त्याच्या मनांतून मगधदेश जिंकून घ्यावयाचा आहे, हें अगदी उघड आहे. तेव्हां तो तुम्हांला मदत करायला तयार झाला, यांत नवल काय ? ”

“ बरं, तसंही असलं तरी काय झालं ?” शाकलायन एकदम म्हणाला.

“ काय झालं ? पुष्कळच झालं. काय झालं नाहीं ? असं विचारा. ” राक्षसानें त्यास कठोरपणें उत्तर दिलें आणि तो त्याच्याकडे कठोर दृष्टीनें पाहूं लागला. राक्षस पुढें त्यास म्हणतो, “ अहो, या यवनांच्या मनातून सगळा आर्यावर्त आणि सगळें

आर्यांचीं राज्यं आपल्या ताब्यांत घ्यावीं असं आहे, हें आपण विसरतां काय ? त्याखेरीज त्यांनीं पर्वतेश्वराला एक वेळ जिंकून पुनः आपला मांडलिक म्हणून राज्य करूं दिलं काय ? त्याखेरीज पर्वतेश्वराकडे आपले यवन व म्लेच्छ सैनिक ठेवले काय ? त्या लोकांचं सामंतत्व पत्करण्यांत पर्वतेश्वराला काय हित वाटलं असेल तें असो. माझ्या दृष्टीनं तर तें अगदीं इष्ट नव्हे."

"कां बरं इष्ट नव्हे ? आपल्या हातून जर व्यवस्था..."

"शांतं पापं !–अहो काय बोलतां हें ! आपल्या हातून व्यवस्था होत नसेल तर आपल्या बरोबरीच्या सजातीयांची मदत घ्यावी; परंतु परक्यांना—त्यांतून अलिक्सुंदरानं ठेवलेल्या क्षत्रपांना—मदतीला बोलावून तुम्ही आपल्या शत्रूंचं निर्दलन करूं पाहणार ! "

"त्याखेरीज दुसरी गति कोणती ?" शाकलायनानें विचारलें.

"दुसरी गति स्वस्थ बसण्याची ! म्हणे दुसरी गति कोणती ?"

"मग एकूण आपलं साहाय्य आम्हांला मिळण्याचा संभव नाहीं ?"

"नाहींच नाहीं ! या दुष्टांनीं राजकुलाचा घात करून माझ्या नांवाला कलंक लावला, याबद्दल सूड उगवावा अशी मला उत्कट इच्छा आहे; परंतु ती तृप्त करून घेण्याकरितां मी या सलूक्षस निकत्तराचं साहाय्य कधीं सुद्धां मागणार नाहीं. आणखी त्यानं देतों म्हटलं तरी मी घेणार नाहीं. शिव ! शिव ! अशी बुद्धि होणं म्हणजेच मोठं नष्टचर्य ओढवलं म्हणून समजा."

"पण क्षत्रपाच्या मनांत कांहींसुद्धां वाईट हेतु नाहीं. केवळ मलयकेतूच्या पित्याचा जो अपमान झाला आहे, त्याबद्दल सूड उगवायला त्याला मदत करावी, इतकाच त्याचा हेतु आहे. त्याला त्याबद्दल कांहीं नको."

"मंत्रिवरा, आपल्याला राजप्रकरणांत कांहीं समजत नाहीं असं म्हणणं म्हणजे मोठंच धाष्ट्य होय. तेव्हां तसं मी म्हणत नाहीं. तसं मला वाटतही नाहीं. आपल्याला सर्व समजतं; परंतु आपण त्यांचे सेवक यामुळें आपल्याला त्यांत कांहीं विशेष वाटत नाहीं. सगळा आर्यावर्त सलूक्षसानं पादाक्रांत केला तरी आपल्याला त्यांत कांहीं वाटणार नाहीं. पण माझ्या मनाची अजून तशी स्थिति झाली नाहीं. मगध देशावर यवनांचं राज्य व्हावं, किंवा यवनांच्या सामंतत्वांत आनंद मानणाऱ्या पर्वतेश्वराचं राज्य व्हावं, असं मला वाटत नाहीं. तसं घडवून आणण्याला मी मदत करणार नाहीं. मलयकेतूच्या बापाचा आणखी सलूक्षसाचा दोघांचाही मगधावर फार दिवस डोळा आहे, हें काय मला माहीत नाहीं ? माहीत आहेच. तेव्हां मगध देश घेण्यांत त्यांना मी मदत कसा करीन ! "

"तर मग काय, या राजघातक्यांच्या हातीं मगधराज्य रहावं हें आपल्याला बरं वाटतं ?"

"बरं कसं वाटणार ? पण यवनांच्या किंवा जे यवनांचे सेवक बनले आहेत, त्यांच्या हातीं जाण्यापेक्षां तें बरं, एवढंच वाटतं."

"अमात्यराज, आपण असं बोलाल अशी मला कल्पना नव्हती. मला वाटलं होतं आपल्याजवळ गोष्ट काढण्याचा अवकाश, कीं आपण मोठ्या आनंदानं आमच्या साहाय्याला याल; परंतु आपल्या बोलण्यावरून आपले विचार अगदींच वेगळे दिसतात."

"अगदींच वेगळे दिसतात असं कां म्हणतां ? माझ्या विचारांप्रमाणेंच आपलेही विचार असावे; पण आपण यवनसेवा पतकरिली आहे, त्याला इलाज नाहीं. बाकी हें

आर्यावर्त आणखी हा मगध देश यवनांच्या ताब्यांत जावा, असं आपल्याला सुद्धां कधीं वाटूं नये. ”

“ होय; पण अशा तऱ्हेनं नंदवंशाचा उच्छेद करणाऱ्यांच्या हातीं ता असावा, असं तरी नंदवंशाच्या एकनिष्ठ सेवकाला कसं वाटावं ! ”

“ राक्षस हा जसा नंदवंशाचा सेवक तसा तो मगधदेशाचाही सेवक आहे. नंदवंशाचा उच्छेद झाला म्हणून मगधाचाही उच्छेद करून घ्यावा असं त्याला वाटत नाहीं. ”

“ मलयकेतूनं मगधदेश जिंकला म्हणून त्या देशाचा उच्छेद झाला असं कां म्हणतां ? मयलकेतु तरी आर्यच ना ? ”

“ आर्य खरा, पण तो यवनांच्या सेवेंत भूषण मानणारा आर्य आणि पुनः यवनांच्या क्षत्रपाकडून साहाय्य घेऊन मगध देश जिंकणार ! ”

“ म्हणून काय मगध देश यवनांच्या ताब्यांत जाईल काय ? ”

“ यांत काय संशय ? जो शिकारीला मदत करील तो त्याचा भाग घेतल्याखेरीज राहील काय ? सगळ्याच शिकारीवर त्यानं झडप घातली नाहीं म्हणजे निभावलं समजा; पण सलूक्षस सगळी शिकार मागितल्याखेरीज राहणार नाहीं. अलिक्सुंदरापासून त्याचा डोळा मगधावर आहे. मगध देश घेण्यापुरता तो मलयकेतूला जवळ करील; परंतु तें कार्य झाल्यावर त्याला दूर फेंकून त्याच्याच उरावर बसणार नाहीं कशावरून ? शाकलायना, अलिक्सुंदराला या देशांत रहायचं नव्हतं, यामुळें त्यानं पर्वतेश्वराचा पराजय करून त्याला आपला मांडलिक म्हणून त्याचंच राज्य त्याला दिलं; पण हा सलूक्षस इथेंच राहणार. त्याला स्वतः चक्रवर्ति बनण्याची इच्छा आहे. त्याची महत्वाकांक्षा जबर आहे. राजा धननंद जर असा खुशाली रंगेली करणारा नसता, तर त्याच्याकडून या सलूक्षसाला केव्हांच पंचजनाच्या आणि काश्मिराच्या पार घालवून देऊन जिकडे तिकडे मगधसाम्राज्य केलं असतं. ”

शाकलायन त्यावर म्हणाला, “ मग अजून तरी तें कां शक्य नाहीं ? मलयकेतूनं सलूक्षसाच्या साहाय्यानं मगध देशाचं राज्य घ्यावं, आणि मग त्याच्यावरच उठून त्याला हांकून द्यावं. ”

तें ऐकून राक्षस मोठ्यानें हंसला व म्हणतो. “ आपण मुद्दाम परीक्षा पहाण्याकरितांच हे असले प्रश्न विचारतां वाटतं मला ? अहो, जो सलूक्षस इतक्या निकरानं सर्व गोष्टी घडवून आणायला पहातो आहे, तो मग पर्वतेश्वराचेन् मलयकेतूचे प्रपितामह आले तरी ऐकेल काय ? त्यानं त्या दोघांचंही राज्यावरून उच्चाटन केलं नाहीं म्हणजे मोठं काम झालं असं समजा. ”

“ मला वाटतं, या आपल्या वादांत कांहींच अर्थ नाहीं, हा तितकाच सोडूं. मला सध्यां एवढं सांगा कीं, मलयकेतु सलूक्षसासमेत इथें आला, तर पुष्पपुरींतले लोक या चाणक्याच्या व चंद्रगुप्ताच्या विरुद्ध उठून त्यांचा उच्छेद करायला उद्युक्त होतील, असं करायला तुमची मदत होईल कीं नाहीं ? ”

“ नाहीं होणार ! हा राक्षस चाणक्य, चंद्रगुप्त, भागुरायण यांचा कितीही विद्वेष करीत असला, तरी त्या म्लेच्छांच्या हातीं मगध देश देण्याला तो कधीं मदत करणार नाहीं. दोघांच्या आपआपसांतल्या भांडणांत तिसरा चोर शिरून दोघांनाही त्यानं नागवावं हें सर्वथा अनिष्ट. मी कांहीं करीन तर त्याच्या अगदीं उलट करीन. माझ्याकडून झाल्यास मी त्यांना मदतच करीन, नाहीं तर स्वस्थ बसेन; पण म्लेच्छाधिपति पर्वतेश्वर किंवा यवनक्षत्रप सलू-

क्षस निरुत्तर या दोघांच्या हातांत हा मगधदेश जाऊं देणार नाहीं. पुन्हां या आपल्या आर्यजिव्हेनें मला आपल्या देशाशीं विरोध करतोस का, म्हणून विचारूं नका. ज्या स्थानापासून आलां त्या स्थानीं जा. या यवनांची ही कुऱ्हाड एक केंसभरसुद्धां या मगधवृक्षाच्या बुंध्यांत शिरूं देतां उपयोगी नाहीं. ती शिरूं दिली कीं तिनें समूळ वृक्ष छेदलाच म्हणून समजा. जा."

शाकलायन तें ऐकून आश्चर्यचकित झाला. पुढें आणखी कांहीं बोलण्याचें त्याला धैर्य होईना, म्हणून थोड्याच वेळांत आपल्या सोबत्यास बरोबर घेऊन तो तेथून निघून गेला.

---

# प्रकरण ४० वें.

## चाणक्यानें हात टेंकले !

चाणक्य आपल्या पर्णकुटिकेंत सिद्धार्थकाशीं बोलत बसला होता. सिद्धार्थकानें त्यास नुकतीच कांहीं तरी विशेष बातमी सांगितली होती आणि ती ऐकून त्यास थोडेंसें आश्चर्य वाटलें असावें असें त्याच्या चर्येवरून दिसत होतें. तो बराच वेळ स्वस्थ बसला आणि नंतर एकदम म्हणतोः—

" सिद्धार्थका, संवाहकाच्या वेषानें तूं गेला होतास, हें राक्षसानें ओळखलें नाहीं अशी तुझी खात्री आहे का ? "

" अगदीं खात्री ! अमात्याला तशी शंका घेण्याला कारण सांपडूं नये म्हणून मीं त्याच्या घरांत शिरण्यापूर्वीच शाकलायनाला असं सांगून ठेविलं होतं कीं, मला चंद्रगुप्तानं आपल्याकडे पाठविलं असं अगदीं बोलूं नकोस. त्याप्रमाणें शाकलायन कांहीं सुद्धां बोलला नाहीं. मीं तर अगदीं मुखस्तंभासारखा बसून त्या दोघांचं बोलणं ऐकून घेत होतों. मनांत विचार केला कीं उगीच एखादा शब्द बोललों आणि कदाचित् राक्षसानं ओळखलं, म्हणजे काय राहिलं ! शिवाय, राक्षस आपल्याविषयीं संशय घेतो कीं काय ही भीति मला क्षणोक्षणीं अधिकाधिक वाटत होती. राक्षस आपल्याकडे केव्हां तरी संशययुक्त दृष्टीनें पहातो आहे कीं काय, हें पाहण्याकडे माझं एकसारखं लक्ष होतं. मीं आपल्या डोळ्यांच्या कोंपऱ्यांतून त्याच्यावर एकसारखी दृष्टि ठेविली होती, यामुळें माझी पक्की खात्री झाली कीं, याला आपलं सत्य स्वरूप समजलेलं नाहीं. मी कोणी तरी शाकलायनाचाच सेवक. त्याच्याबरोबर छद्मवेषानं आलों आहें असं त्याला वाटलं असेलच; पण मी कोण हें कांहीं त्याला कळलं नाहीं खास ! कसं समजणार ? राक्षस कांहीं आपल्यासारखा कुटिलनीतिविशारद नाहीं. त्याला आपल्या सर्व प्रकारच्या कौटिल्याची मुळींच माहिती नाहीं; अर्थात् तो शाकलायनाशीं भाषण करण्यांत अगदीं दंग होऊन गेला होता. "

सिद्धार्थकाचें भाषण सुरू झाल्यापासून एक क्षण दोन क्षणच चाणक्याचें त्याच्याकडे लक्ष्य असेल नसेल. शाकटायनाचें व राक्षसाचें जें बोलणें झालें, तें राक्षसाला आपल्याबद्दल कोणत्याही प्रकारचा संशय न येऊनच झालें इतकें खात्रीपूर्वक समजल्याबरोबर त्याच्या मनांत निराळ्याच प्रकारचे विचार येऊं लागले. मग सिद्धार्थकाच्या बोलण्याकडे त्याचें चित्त राहिलें नाहीं. ते विचार चालतां चालतां शेवटीं येथपर्यंत मजल आली, कीं त्या विचारांच्या भरांत चाणक्य एकदम उठून उभा राहिला आणि जणूं काय राक्षस आपल्यापुढें उभा आहे अशाच रीतीनें मोठ्यानें ह्मणतो, " शाबास, राक्षसा ! तुझ्यासारख्यापुढें माझ्या कौटिल्याचं कांहीं चालायचं नाहीं हीच गोष्ट खरी. तुझ्या स्थितींत मी असतों, ज्या स्थितीला मीं तुला आणून सोडलं आहे त्या स्थितीला तूं मला आणून सोडलं असतंस तर मीं जाऊन मलयकेतूला मिळून मगधाचं राज्य यवनांच्या ताब्यांत देण्याला कमी केलं नसतं. काय वाटेल तें करून माझ्या छळकांचा समूळ नाश करून टाकल्याखेरीज मला चैनच पडलं नसतं. या यवनांचा पूर्ण नाश व्हावा, त्यांना या आर्यावर्ताच्या—पंजजनाच्या—पार घालवून यावं हा माझा मुख्य हेतु; आणि तो हेतु धरून मी मगधांत आलों असतां धननंदानें माझा अपमान केला, ह्मणून जशी आधीं त्याच्याच वंशवृक्षाचा समूल सशाख उत्खात करण्याची प्रतिज्ञा केली आणि ती पार पाडण्याकरितां कांहीं सुद्धां करायचं ठेवलं नाहीं; ब्राह्मण असतां वाटेल तसं नृशंस कर्म करून ती प्रतिज्ञा पार पाडली, तसंच करून, शेवटीं नाइलाज ह्मणून यवनांचेंही साहाय्य घेऊन मीं तुझा उत्खात केला असता. मगध यवनांच्या ताब्यांत जातो याचं त्या वेळीं तरी निदान कांहीं सुद्धां मनांत आणलं नसतं; परंतु, राक्षसा, तुझी नंदांच्याठिकाणीं आणि मगधावर खरी भक्ति, त्या भक्तीनं तूं मला जिंकलंस. कांहीं हरकत नाहीं, कुटिल युक्तीनं कांहीं जमत नाहीं, तर मी आतां सरळपणानं तुझ्याकडे येईन आणि तुला विनवून तूं चंद्रगुप्ताचा सचिव होशील असं करीन. त्याला सचिव पाहिजे तो तुझ्याचसारखा एकनिष्ठ पाहिजे, भागुरायणासारखा क्षणांत मन बदलणार सचिव काय उपयोगी ? "

चाणक्य हें सर्व बोलत असतां सिद्धार्थक जवळच बसला आहे हें खरोखर तो विसरूनच गेला असवा. नाहीं तर अशा प्रकारें तो बोलता कीं नाहीं कोण जाणे ! चाणक्याचें तें बोलणें ऐकून तो क्षपणक किंचित् स्तब्ध बसला; परंतु त्याच्या मनांत जें बोलावयाचें आलें होतें तें बोलल्याखेरीज त्याला राहवेना, यामुळें तो चाणक्यास ह्मणतो, " आर्या, राक्षसालाच चंद्रगुप्ताचा सचिव करण्यांत एवढा तुमचा काय बरं हेतु ? खरं म्हटलं तर त्याच्यासारखा अंध सचिव कोणीच नाहीं. आपण एवढा थोरला प्रचंड व्यूह त्याच्या डोळ्यांपुढें रचला, परंतु त्याला समजला नाहीं. आणखी हा साचिव्य करणार तें कसं ? आपण एवढे नीतिनिपुण असतां चंद्रगुप्ताला दुसरा सचिव पाहून आणण्याची आवश्यकता काय ? माझ्या दृष्टीनं तर राक्षसाइतका साचिव्याला अयोग्य दुसरा माणूसच नाहीं. "

चाणक्य तो सिद्धार्थकाचा प्रश्न ऐकून किंचित् हंसला व त्यास प्रत्युत्तर करतो, " सिद्धार्थका, तुझ्या कांहीं लक्षांत येत नाहीं, बाबा ! अरे, मीं चंद्रगुप्ताला राज्य मिळवून देण्याची आणि नंदांचा उत्खात करण्याची प्रतिज्ञा केली होती, ती आतां पुरी झाली. आतां तें राज्य चिरस्थायी होईपर्यंत का मी त्याच्यापाशीं राहाणार ? छे. छे. हीच प्रतिज्ञा पुरी करण्यासाठीं ब्राह्मणाला सर्वथैव

अनुचित अशीं कित्येक नृशंश कृत्यं केली, त्यांचं पाप धुऊन जाण्याला हिमाचलाच्या कंदरांत बसून घनघोर तपश्चर्या करीन, तरच कांहीं तें धुऊन जाण्याची आशा; नाहीं तर पुनः, या भवपाशांत सांपडून पुनः पुनः अशींच नृशंस कृत्यं करीत राहीन. छे. छे. झालं इतकं अगदीं पुरे. सिद्धार्थका, तूंच पहा; माझ्या हातून काय पातकं व्हायचीं राहिलीं आहेत ? राजहत्या झाली, बालहत्या झाली, स्त्रीहत्या झाली, असत्य आचरण, असत्य भाषण हीं तर किती झालीं, याचा नेम नाहीं ! हें असंच करीत राहून चंद्रगुप्ताचं साचिव्य करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. शिवाय, बाबारे, राज्य मिळवून देईपर्यंत आपण केलेल्या राजाकडून आपल्याला जो मान मिळतो, तो पुढें टिकत नाहीं. ज्य नृशंस कृत्यांनीं आपण त्याचं हित केलं आणि पूर्वीच्यांचा घात केला, तींच नृशंस कृत्यं पुनः करून हा आपला आणि आपल्या वंशाचा घात कशावरून करणार नाहीं, असं त्याच्या मनांत यावचंच. तेव्हां, असं मनांत येऊन त्यानं आपला द्वेष करण्याला आरंभ करण्यापत्राच आपण आपलं इथून प्रयाण करावं तें चांगलं. सिद्धार्थका, मी खरोखर अगदीं निरिच्छ आहें. मला तर एका कपर्दिकेची सुद्धां अपेक्षा नाहीं. माझ्या अपमानचं परिमार्जन करून घेण्यापुरती माझी प्रतिज्ञा होती ती मीं पार पाडली. आतां एवढाच इच्छा आहे कीं, माझ्या देखत या यवनांचं पारिपत्य व्हावं आणि तें होण्याचा आयताच प्रसंग आला आहे. राक्षसानं दुही माजविण्याचा प्रयत्न केला नाहीं, म्हणजे तें झालंच म्हणून समज. त्यांत राक्षसाचा इतका निश्चय असल्यावर आणखी काय पाहिजे ? सिद्धार्थका, राक्षसाची खरी भक्ति मगध देशावर आणि नंदराजांवर. ती चंद्रगुप्ताच्या ठिकाणीं ठेवतों असं एकवार त्यानं आपल्या जिव्हेनं म्हटलं, म्हणजे मी सुटलों. तो यवनांना कधींसुद्धां पुढें येऊं देणार नाहीं...... ”

यावर सिद्धार्थक चाणक्यास मध्येंच म्हणतो, “ इतका आपल्याला पश्चात्ताप होतो आहे, तर आपण भगवान् बुद्धाचाच मार्ग कां स्वीकारीत नाहीं ? भगवान् वसुभूति आपल्याला मोठ्या आनंदानं दीक्षा देऊन विहारांत ठेवतील. वृंदमालेनं त्यांच्यापासून दीक्षा घेतली आणि ती आतां सुमतिकेच्या पाठीस लागली आहे कीं, ‘ माझ्याप्रमाणें तूंही जोग घे, त्याखेरीज केलेल्या पातकापासून तुझी सुटका हाणार नाहीं. ’ आपणही तसं कराल, तर नृपकुलघाताला उद्युक्त झालेले आपण सगळेच निर्वाणप्राप्ति करून घेऊं. भगवान् वसुभूति आपल्याला एकदां असा उपदेश करणार आहेत. ” सिद्धार्थकाचें बोलणें ऐकून चाणक्य नुसता हंसला.

वर दिलेल्या हकीकतीवरून शाकलायनाकडे जाऊन त्याला संवाहकाचा वेष देऊन राक्षसाकडे घेऊन जाणारा संवाहक कोण हें वाचकांच्या लक्ष्यांत आलें असेलच. शाकलायन मलयकेतूकडून ‘ धर्षणपत्रिका ’ घेऊन आला आहे, तेव्हां तो साहजिकच आपल्याला एखादा अंतःकलह सांपडून आंतून कांहीं पोखरून ठेवण्यास सांपडतें कीं काय तें पहाणार. तेव्हां त्याला तशाच तऱ्हेनें फसवावें असें अर्थातच चाणक्यानें धोरण बांधलें. शिवाय परशत्रु मगधावर येऊं लागला, प्रत्यक्ष पर्वतेश्वराला पकडलें आहे, तेव्हां त्याला सोडविण्यासाठीं व त्याचा जो अपमान झाला त्याचें परिमार्जन करण्यासाठीं मलयकेतु यवनांचें साहाय्य घेऊन मगधावर आला, तर राक्षस आपला व चंद्रगुप्ताचा सूड उगविण्यासाठीं त्यांना अनुकूल होऊन मगध देश जिंकण्यांत साहाय्य देईल कीं काय, हेंही चाणक्यास पहावयाचेंच

होतें. तेव्हां अध्वश्रमामुळें दोन दिवस विश्रांति घेऊन मग मलयकेतूकडून आणलेला संदेश घेऊन येतों, असा शाकलायनाचा निरोप येतांच चाणक्यानें आपला पुढचा व्यूह रचला. सिद्धार्थकाला संवाहकाच्या वेषानें शाकलायनाकडे पाठविलें व राक्षसाच्याबद्दल लोकांचें मत फिरत आहे असें त्यास समजावून देऊन राक्षसाकडे जाण्याविषयीं व त्याचें साहाय्य मागण्याविषयीं त्याजकडून सुचविलें. शाकलायनानें त्याप्रमाणें केलें व त्याचें आणि राक्षसाचें जें भाषण झालें तें ऐकून सिद्धार्थकानें चाणक्याकडे येऊन इत्थंभूत निवेदन केलें. चाणक्यानें ती सर्व हकीकत ऐकली, तेव्हां त्यास फार समाधान वाटलें. राक्षसाची देशनिष्ठा आणि स्वामिनिष्ठा किती विलक्षण होती याची अद्यापि चाणक्यास कल्पना नव्हती. ती आता पूर्णपणें होऊन, " काय वाटेल तो उपाय करायचा, कुटिलतेनें होत नाहीं तर सरलतेनें आपला इष्ट कार्यभाग साधूं, पण साधूंच साधूं आणि नंतर हिमाचलाच्या कंदरांत खुशाल तपश्चर्या करण्याला जाऊं, " असा त्यानें निश्चय केला. आतां सरलतेखेरीज दुसरा मार्गच नव्हता.

सिद्धार्थकाचें व चाणक्याचें भाषण झाल्यानंतर थोड्याच वेळांत चाणक्यानें सिद्धार्थकास निरोप दिला आणि आपण आपलें तप्त मस्तक शांत करण्याकरितां हिरण्वती नदीच्या तीरावर तो निघून गेला. जोंपर्यंत एखादी गोष्ट करावी, करावी, ती झाली पाहिजे, असें वाटत असतें, तोंपर्यंत मनुष्याला किती तरी हुरूप असतो ! ती एकदां आपल्या प्रयत्नांनीं घडली, म्हणजे ती जर चांगली नसली, तींत जर कांहीं मनाला खाण्याजोगें असलें, तर तिच्यापासून नेहमीं मनाला त्रास होत असतो. आपण केलें हें बरें नव्हे, असें आपलेंच मन आपल्याला सांगूं लागतें. कांहीं कारणांनीं जरीं तेंच करणें त्या प्रसंगीं बरें होतें असें वाटलें, तरी त्यापासून होणारा संतोष अनुभवीत रहावें असें चित्तास वाटत नाहीं. तो संतोष, तो आनंद, आपण अनुभवूं नये असें वाटूं लागतें. जे मनस्वी आहेत, त्यांची ही स्थिति होत नाहीं असें नाहीं; परंतु ते ती बाहेर दाखवीत नाहींत. आपल्याला होणारा पश्चात्ताप जगाच्या निदर्शनास आणूं नये अशाविषयीं त्यांचा नेहमीं प्रयत्न असतो. हा प्रयत्न इतरांचे बाबतींत जरी सिद्धीस गेला, इतरांपासून आपल्या मनाची वस्तुस्थिति जरी त्यांना चोरून ठेवतां आली, तरी आपल्या स्वतःच्या मनास होणारा पश्चात्ताप स्वतःपासून कसा लपवून ठेवणार ? जोंपर्यंत अशीं मनस्वी माणसें दुसऱ्यांच्या संगतींत असतात, तोंपर्यंत तीं तो पश्चाताप दूर ठेवूं शकतात; परंतु नेहमींच त्यांस तो दूर ठेवतां येतो असें नाहीं. एखादाना एखादा तरी प्रसंग असा येतो कीं, त्या वेळीं तो पश्चात्ताप किंवा ती अनुतप्त मनःस्थिति एकदम बाहेर पडून दुसऱ्याच्या निदर्शनास येते. वर वर्णन केलेला प्रसंग यांपैकींच होता. चाणक्यास अलीकडे आपण केलेल्या कृत्यांचा पश्चात्ताप होत असे. आपण जीं कृत्यें केलीं किंवा करविलीं तीं बरीं नव्हेत. आपला अपमान झाला म्हणून संतापून आपण नंदवंशाचा समूळ उच्छेद केला. त्यांत राजहत्त्या झाली, बालहत्या झाली आणि शेवटीं स्त्रीहत्याही झाली. ही गोष्ट त्या ब्रह्मनिष्ठ व तपेनिष्ठ ब्राह्मणाच्या मनास खरोखर खाऊं लागली. चंद्रगुप्तास आपण गवळीवाड्यांतून काढून आणून राज्यपदावर बसविलें व त्याच्या हातून आतां दिग्विजय करवून सर्व भारतवर्ष पादाक्रांत करावयाचें हा आपला हेतु; परंतु तो सफळ होईपयत आपण येथेंच राहून त्याचें कौतुक पहात बसणें त्यास बरें वाटेना. आपण जेथें एवढा

थोरला नरमेध घडविला,तेथेंच आणखी कांहीं काळ रहाणें हें त्याला कसेंसेंच वाटूं लागलें. राक्षसाचे गळ्यांत हें साचिव्य बांधून मोकळें व्हावें, असें त्यास वाटूं लागण्यास हें एक मोठें कारण होतें, असें म्हणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. सिद्धार्थकाचें व चाणक्याचें भाषण होईपर्यंत चाणक्याचा पश्चात्ताप कोणांसही कळून आला नव्हता. परंतु वर दिलेल्या भाषणाचे प्रसंगीं तो आकस्मिकपणें बाहेर पडून सिद्धार्थकास कळला. मनांत विचार अति झाले, आणि ते गोंधळ करूं लागले, म्हणजे ते न पचलेल्या अन्नाप्रमाणें एकदम ओकून बाहेर यावयाचेच. आपण एकटे नाहीं, याचें भान न राहून चाणक्यानें आपले सर्व विचार ओकून टाकले आणि ते ओकून टाकल्यावर मग आपण क्षीणबुद्धि होत चाललों असें त्याला वाटूं लागून तसें झाल्याबद्दल वाईट वाटूं लागलें. मनुष्याचें मन म्हणजे एक चमत्कारिक गुंतागुंतीचें यंत्र आहे. त्यांतलीं कोणतीं चक्रें केव्हां फिरूं लागतील, आणि काय घोंटाळा करतील याचा नेमच नाहीं. असे सर्व विचार मनांत येऊन आपण आतां येथें फार दिवस राहूं नये, असें चाणक्याला आतां अधिकाधिकच वाटूं लागलें.

हिरण्वतीच्या तीरीं या प्रकारचे विचार करीत तो बराच वेळ बसला. राक्षसाकडे जाऊन स्पष्टपणें त्यास विनंति करून चंद्रगुप्ताचा सचिव तूं हो, म्हणजे नंदांचें राज्य आणि मगधदेश हीं स्वतंत्र राहतील; नाहींपेक्षां काय प्रसंग ओढवेल याचा नेम नाहीं, असें त्यास सांगावें. आपण मगध सोडून हिमाचलांत गिरिकंदरीं तपश्चर्या करण्यास जाणार असेंही सांगावें, असा त्याच्या मनांत विचार चालला होता. “ तुम्हां परकीयांना मी कोणत्याही प्रकारानें साहाय्य करणार नाहीं, मगधदेशांत यवनांचा पाय शिरकविण्याला मी मुळींच कारण होणार नाहीं, ” असें राक्षसानें दिलेलें उत्तर ऐकून चाणक्याचे मनांत त्याच्याविषयीं फारच आदर उत्पन्न झाला. परकीयांना एकवार आंत घेतलें म्हणजे त्यांना पुनः बाहेर घालवून लावणें महाकठिण कर्म असतें. तें साध्य होणें जवळ जवळ अशक्यच. कौटिल्यानें कदाचित् तें साध्य होण्याचा संभव असतो; परंतु कौटिल्य एक तर सर्वांनाच साधणें अशक्य, आणि सर्वकाळ साधणें त्याहून अशक्य. राक्षसानें इतक्या जोरानें शाकलायनास नकार दिला, यांतच त्याचा खरा मोठेपणा दिसून आला. त्याला कुटिलनीति ठाऊक नाहीं. त्याची नीति सरळ, यामुळेंच आपल्या कुटिलनीतीला तो बळी पडला. तो दृढविश्वासानें गेला. राजसचिवानें अहोरात्र जागरूकता ठेवावयाची ती त्यानें ठेविली नाहीं. आपल्या सभोंवतालच्या व हाताखालच्या लोकांशीं जितक्या सौम्यपणें वागावयाचें, तितक्या सौम्यपणानें तो वागला नाहीं, एवढाच त्याचा दोष; परंतु हे दोष या नव्या अनुभवानें जातील. जो मुख्य गुण पाहिजे-परम निष्ठा-स्वामीच्या व स्वदेशाच्या ठिकाणीं परम निष्ठा-तो गुण त्याचे अंगीं पूर्णपणें आहे. भागुरायणाचे अंगीं तो नाहीं. जसा भागुरायण आपल्या कुटिलनीतीच्या भाषणांनीं वदलला, तसा राक्षस वदलणारा नव्हे. तेव्हां राक्षसानेंच सचिव होण्याबद्दल आपण यत्न केला पाहिजे. आपण त्याच्याकडे जाऊं, त्याला नानाप्रकारांनीं आळवूं आणि शेवटीं त्याच्या तोंडून ‘ होय ’ असें उत्तर घेऊं, तेव्हांच त्याच्या तेथून उठूं, इतकी धमक आपल्याला आहे. तो वश होऊन त्यानें व भागुरायणानें राज्यरथाची धुरा स्कंधावर घेतली कीं, सर्व व्यवस्थित झालें. चंद्रगुप्त तसा चांगला निपुण आहे. एकदां सुयंत्रित-

पणें राज्यरथ चालूं लागला कीं, तो दिग्विजय खचित करील. आपण तपश्चर्येला बसूं तथपर्यंत त्याच्या दिग्विजयाचा जयजयकार ऐकूं आला कीं आपलें कार्य झालें. आपलें अवतारकृत्यच संपलें. असा अनेक प्रकारानीं विचार करून चाणक्य आपल्या पर्णकुटिकेंत गेला. नंतर तेथून चंद्रगुप्ताच्या प्रासादांत गेला. तेथें दोघांचें बराच वेळ बोलणें होऊन चाणक्य एका शिष्याला बरोबर घेऊन राक्षसाच्या मंदिराकडे गेला.

# प्रकरण ४१ वें.

## राक्षस व चाणक्य.

राक्षस आपल्या घरीं संचित बसला होता. आपली इतकी अनवस्था कशामुळें झाली याचा विचार नेहमींप्रमाणें त्याच्या मनांत चालला होता. आपण इतके अंध कसे झालों? आपण पाटलिपुत्रांत हयात असतां, अशा प्रकारानें एकाएकीं एवढा थोरला भयंकर प्राणनाश, राजकुलाचा प्राणनाश करण्याचा व्यूह आपल्या नकळत आपल्या लोकांना फोडून घडवून आणणारा पुरुष काय बुद्धीचा असावा! आणि त्याच्या मानानें आपण किती दुर्बळ, असा विचार राहून राहून राक्षसाच्या मनांत येत होता. ज्या दिवशीं राजा धनानंद मुरादेवीच्या मंदिरांत गेला त्याच दिवशीं नंदकुळाचें नष्टचर्य ओढवलें. कुमार सुमाल्यास यौवराज्याभिषेक झाला, त्या दिवशीं सर्वांबरोबर त्या दुष्ट मुरेला बंधमुक्त केलें, हीच मूळ मोठी थोरली चूक झाली; परंतु त्याच्या हातीं काय होतें, कीं जें केलें असतां ती चुकी त्यास टाळतां आली असती? ती मुरा असा कांहीं प्रकार करण्याला उद्युक्त होईल हें कोणाच्या स्वप्नींही नव्हतें. असो; झालें तें झालें; परंतु आतां पुढें काय? आज इतकीं वर्षे ज्या यवनांना आणि म्लेच्छांना दूर ठेविलें, ज्यांचा पाय मगध देशांत शिरकूं दिला नाहीं, त्यांना आतां ही आयतीच संधि मिळणार काय? पर्वतेश्वराला खोटीं लबाडीचीं पत्रें लिहून तो थोडे लोक बरोबर घेऊन येईल अशा तऱ्हेनें फसवून त्याला पकडणें निराळें, आणि आपल्या बापास असें विश्वासघातानें नेलें, तव्हां त्या नेणाराचें पुरें पारिपत्य करण्यासाठीं उतावीळ झालेला मलयकेतु सलूक्षस निकत्तराच्या साहाय्यानें मगधावर स्वारी करण्यास आला असतां त्याला परत पळवून लावणें निराळें. आज मगधांत तें करण्याला सैन्य नाहीं असें नाहीं. सैन्य हवें तितकें आहे; परंतु एकट्या भागुरायणाच्या हातून सध्यांच्या चमत्कारिक स्थितींत नीट व्यवस्था होईल कीं नाहीं याचीच शंका आहे. राक्षसाच्या हातीं आतां कांहीं सत्ता नव्हती. गवत उपटून किंवा

शेवाळ खरडून टाकावें त्याप्रमाणें त्याला चाणक्यानें राज्यव्यवस्थेंतून काढून टाकलें होतें. परंतु मगधावर संकट येणार हा विचार पुढें उभा राहतांच त्याचें अंतःकरण तिळतिळ तुटूं लागलें. काय करावें हें तें त्याला सुचेना. चंद्रगुप्ताला मगधाचा राजा मान्य करून त्याला साहाय्य करावें हें तर त्याच्या मनांतही येईना. यवनांच्या साहाय्यानें मगध जिंकूं पाहणाऱ्या मलयकेतूला साहाय्य करणें म्हणजे आपल्या हातानें यवनांच्या जाभाडांत मगधदेश देणें होय, तें तर कालत्रयीं होणें नाहीं. अशा स्थितींत स्वस्थ बसणेंच काय तें त्याच्या हातीं.

नानाविध विचार त्याच्या मनांत चालले होते; परंतु त्याच्यासारख्यास स्वस्थ बसण्याचा विचार कसा रुचणार ? तो अत्यंत अस्वस्थचित्त असा बसला होता. इतक्यांत कोणी आपल्या भेटीस आले आहेत अशी वर्दी प्रतीहारीनें आणून पोंचविली. कोण आहे ? असा प्रश्न विचारतां, कोणी ब्राह्मण व त्याजबरोबर एक बटु, असें उत्तर आलें. राक्षसानें क्षणमात्र विचार केला. कोण ब्राह्मण असावा याबद्दल त्याचा तर्क चालेना. कोणी अतिथि अभ्यागत असेल असें वाटून त्यानें त्यास आंत आणण्याची आज्ञा केली. प्रतीहारीनें ब्राह्मणास आंत आणून पोंचविलें. राक्षसानें उत्थापन देऊन ब्राह्मणास एक उच्चासन दाखविलें. त्यावर ब्राह्मणाच्या शिष्यानें त्याचें हरिणाजिन आंथरलें. ब्राह्मण बसला. त्यानें शिष्यास बाहेरचे बाजूस उभें राहण्याची खूण केली. शिष्य गेला. ब्राह्मण अत्यंत तेजस्वी दिसला. चाणक्याचें स्वरूपवर्णन राक्षसानें ऐकिलें होतें, यामुळें तो तर हा नव्हे,, असा प्रश्न क्षणमात्र त्याच्या मनांत आला; परंतु चाणक्य आपल्याकडे कशाला येणार ! असें मनांत येऊन तो विचार त्यानें मनांतून तेव्हांच काढून लाविला. ब्राह्मण आसनावर बसला असें पाहतांच राक्षसानें पुनः त्याचें अभिवंदन करून नम्रपणें म्हटलें, " ब्राह्मणश्रेष्ठा, आपली कोणती सेवा मीं केल्यानें आपला संतोष होणार आहे ! कोणत्या कार्यासाठीं या राक्षसाच्या घरीं आपण पदरज टाकिले ? "

तें ऐकून ब्राह्मण एकदम म्हणतो, " अमात्यश्रेष्ठा,...... "

परंतु राक्षसानें त्यास मध्येंच थांबवून म्हटलें, " ब्रह्मन्, मी आतां अमात्य नाहीं. या पुष्पपुरींत गेल्या कांहीं दिवसांत काय हाहाकार झाला, तो आपल्या कानीं आलाच असेल. तेव्हां आतां मला अमात्य कां म्हणतां ? "

" कां बरं ? तो हाहाकार झाला, म्हणून तुझ्या अमात्यत्वाला काय बाध आला ? तूं पुष्पपुरीच्या सिंहासनाचा अमात्य. शिवाय अमात्य या पदवीला जी योग्यता लागते ती तुझ्या अंगीं कायमच आहे, तर तूं अमात्य कां नाहींस ! निदान मला तरी तूं अमात्यच आहेस. आणखी मी तुला अमात्यच म्हणणार ! "

इतकें बोलून ब्राह्मण किंचित् थांबला. अगदीं अस्खलित व आज्ञा करण्यालाच जिचा नेहमीं उपयोग होत असावा अशा प्रकारची ती वाणी कानीं पडतांच राक्षस किंचित् स्तब्ध झाला. ब्राह्मण पुढें म्हणतोः—

" अमात्यश्रेष्ठ, मी कुटिल अशी माझी ख्याति आहे. लोक मला ' कौटिल्य ' य नांवानं संबोधूं लागल्याचंही माझ्या कानीं आलं आहे. जें कुटिलतेनंच साध्य, तें कुटिलतेनं साधायचं. जें सरळपणानं साधेल तें सरळपणानं साधायचं, ही माझी नीति. तुला आपल्या बाजूला वळवायला सरळपणाखेरीज दुसरं साधन नाहीं. हें मगधाचं राज्य तुझ्यावांचून चालायचं नाहीं. त्याच्या धुरेला तुझ्याचसारखा पुरुषपुंगव पाहिजे. हें जाणून

मी सरळपणानं तुझ्याशीं बोलायला आलो आहें. ”

बोलणारा माणूस कोण याबद्दल आतां राक्षसाला शंका राहिली नाहीं. ती खात्री होतांच तडाक्यासरसें उठून उभें राहावें आणि यास घालवून द्यावें; राजकुलाचा व आपला सर्वस्वी नाश करणारा माणूस आपल्यापुढें आला असतां त्याच्याशीं एक शब्द बोलूं नये, त्याला तसा परतवावा असा त्याचा पहिला विचार; परंतु आपल्या येथें आलेल्या अभ्यागताला अशा प्रकारें वागविणें बरें नव्हे, असें लागलींच त्याच्या दाक्षिण्यपूर्ण मनाला वाटून तो कांहींच न बोलतां त्या ब्राह्मणाकडे पहात राहिला.

आपल्या पहिल्या बोलण्याचा परिणाम वर झाला असें पाहून तो ब्राह्मण पुढें म्हणतो, “ अमात्यश्रेष्ठा, तुझ्याजवळ सरळपणा, तर मीही अगदीं सरळपणानंच बोलायला आलों आहें. नंदांनीं माझा अपमान केला, म्हणून मीं त्यांचा समूळ उत्खात केला. त्यांच्या ठिकाणीं तुझी परमनिष्ठा; परंतु आतां तूं आपली ती सर्व निष्ठा चंद्रगुप्ताला अर्पण कर, तो तिचं खरोखर उत्तम चीज करील......... ”

ब्राह्मणाचें तें भाषण ऐकून राक्षसानें कपाळाला आंठ्या घातल्या. हा ब्राह्मण कोण याबद्दल त्याला शंका राहिली नव्हतीच. तो एकदम त्याला म्हणाला, “ काय, राजवंशाचा घात करून त्या व्याधपुत्राला राज्यावर बसविणारा चाणक्य तोच तूं ? अथवा माझ्या घरीं येऊन इतक्या उद्धतपणानं माझ्याशीं असं बोलण्याचं धाष्ट्र्य करणारा दुसरा कोण असणार ? नेहमीं कुटिलतेनं वागणाऱ्या माणसानं प्रसंगीं सरलतेचा आव घालणं हा एक कुटिल नीतिचाच प्रकार होय. माझ्या सरळपणाची एवढी प्रशंसा कां करतोस ? माझ्या अंधपणाचीं फळं मला मिळालीं हें माझ्या तोंडावर सांगण्यासाठींच तूं माझ्या मंदिरांत आलास काय ! ठीक ठीक; पण माझी अंधता इतक्या सुस्पष्टपणानं अनुभवास आली असून, मला अंतःकरणपूर्वक पुनः अमात्यत्व द्यायला तूं येशील, असं मानण्या इतका अंध मी नाहीं. तूं कां आला आहेस तें मी समजतों. माझ्या डोळ्यांत कोणकोणत्या प्रकारांनीं धूळ टाकून मला तूं अंध केलंस, तें आपल्या तोंडानं सांगून मला फजित करण्याकरितां आला आहेस. बरोबर आहे. मींच जर तसा आपला फजितवाडा करून घेतला आहे, तर तूं तरी त्याचं माझ्या तोंडावर वर्णन करून मला लाजवायला कां येणार नाहींस ? पण चाणक्या, तूं आपल्या तोंडानं माझ्या अंधपणाचं वर्णन करून मला लाजविलेला पहाण्यानं तुला जें समाधान होईल, त्याच्यापेक्षां मीच आपल्या तोंडानं तें वर्णन करतों, म्हणजे त्याच्याहीपेक्षां तुला अधिक समाधान होईल. ऐक. मुरादेवीच्या महालांत जिला मी आपली हेर बनवायला गेलों, तिलाच तूं माझ्या मंदिरांत आपली हेर बनविलीस, तिच्याचकडून माझा हिरण्यगुप्त— नव्हे माझा एक डोळाच—फोडलास, आणखी त्याच्याचकडून...... ”

राक्षस आणखीही असेंच बोलणार, तों चाणक्यानें त्यास मध्येंच थांबवून म्हटलें, “ अमात्या, या सर्व गोष्टींचा उच्चार करून विनाकारण आपल्याला कां उद्वेग करून घेतोस मी खरोखर यासाठीं आलों नाहीं. ”

“ तर मग कशासाठीं आपण एवढे श्रम घेतले ? ”

“ तूं चंद्रगुप्ताचा अमात्य होऊन राज्यशकट आपल्या स्वाधीन करून घ्यावास आणि मगधदेशाची पूर्वीप्रमाणें किंबहुना अधिक व्यवस्था करावीस म्हणून ! ”

" तर मग जी गोष्ट कालत्रयींही घडायची नाहीं, तीच घडविण्यासाठीं आपण आलां ! "

" कां बरं ? कालत्रयीं ही गोष्ट कां घडायची नाहीं ? "

" राक्षसीच्या हिरण्यगुप्ताला फोडणं आणि राक्षसाला स्वतःला फोडणं या दोन गोष्टी अगदीं भिन्न आहेत. "

" तें मी जाणून आहें; पण मगधाचं राज्य यवनांच्या हातीं जाऊं नये असं आपल्याला वाटतं आहे. आणि यवन तर स्वारी करायला सिद्ध झाले आहेत. "

" हल्लीं ज्यांच्या हातांत तें आहे, ते त्याची काळजी घेण्याला चांगले समर्थ आहेत. "

" ते समर्थ आहेत कीं नाहींत तें राहो; पण तुझ्या साहाय्याची त्यांना अपेक्षा आहे. म्हणूनच मी तुझ्याकडे आलों आहें. "

" नंदांखेरीज कोणाचीही सेवा करायची नाहीं, अशी माझी प्रतिज्ञा आहे. "

" मगधदेशाची–पाटलिपुत्राचीही नाहीं सेवा करणार ? "

" कदाचित् नाहीं करणार ! यवनांस मिळेन ! त्याचा काय नेम ? "

" ती गोष्ट आपल्या हातून कालत्रयीं होणार नाहीं, अशी आमची खात्री झाली आहे. तेव्हां आपल्या अशा बोलण्यानं कोण फसेल ? "

" ही आपली एवढी खात्री कशामुळें झाली ? मोठंच कारण असलं पाहिजे. "

" कारण ? आपलं स्वतःचंच भाषण आणखी दुसरं कारण काय पाहिजे ? "

" माझं स्वतःचं भाषण ? मी कधीं असं कोणांजवळ बोलायला गेलों ? "

" शाकलायनाजवळ. "

" काय ? शाकलायनाजवळ माझं काय बोलणं झालं, तें त्यानं तुम्हाला सांगितलं ? आपल्याकडे येऊन त्यानं माझं व त्याचं झालेलं बोलणंही आपल्याला सांगितलं ? "

" तेंच कशाला सांगायला हवा ? "

" तर मग आपले हेर माझ्या अंतरंगापर्यंत आहेत म्हणायचे ! आतां विश्वास तरी कोणाचा धरावा ! माझ्या भोंवतालचे सगळे फितूर झाले अं ? वा ! चाणक्या, तुझी खरी खरी करामत यांत शंका नाहीं ! "

" तुझ्या घरचा कोणी नाहीं. उगीच कोणाचा संशय धरूं नको. शाकलायनाच्या बरोबर आलेला संवाहक माझ्याच माणसांपैकीं होता. त्यानं सर्व मला सांगितलं. आतां पुढें काय करणं असेल तें कर. "

तें ऐकल्याबरोबर राक्षस अगदींच स्तब्ध झाला. शाकलायनाच्या बरोबर असलेला संवाहक चाणक्याचाच हेर होता, आणि हें शाकलायनाला समजलें नाहीं ! वाहवा ! वाहवा ! या चाणक्यानें आपले हेर पाठविण्याची आतां कमाल केली. अशा तऱ्हेचे उद्गार राक्षसानें आपल्या मनांतल्या मनांत काढले. नंतर मोठ्यानें चाणक्यास म्हणतोः–

" शाकलायनालाही फसविण्यासाठींच मीं तसं म्हटलं नाहीं म्हणून कशावरून ? "

"नाहीं म्हणून, आपल्या प्रश्नाला दुसरं उत्तर काय ? तें कसंही असो; परंतु अमात्यश्रेष्ठा, तूं आतां झालं तें सर्व विसरून चंद्रगुप्ताचं साचिव्य स्वीकार. नंदांच्या वेळीं जो तुझा अधिकार होता. त्यांत आणि तुझ्या आतांच्या अधिकारांत कांहींसुद्धां फरक होणार नाहीं. कुटिलनीति सदासर्वदा उपयोगी पडते असं नाहीं. तुझ्याविषयीं लोकमत कलुषित झालं आहे तें तेव्हांच नीट होईल. तें नीट करायला वेळ लागायचा नाहीं. तुला ठाऊकच आहे कीं, लोकमत आणि गड्डरिकान्याय हीं दोनही सारखींच आहेत. तुझ्यासंबंधानं कोणालाही वैषम्य नाहीं. माझा राग नंदांवर.

माझ्या अपमानाचं परिमार्जन करून घेण्याला त्यांच्या वंशाचा उत्खात मला करायचा होता तो मीं केला. आतां मला या राज्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. आपल्या हातीं तें घेतलं असं तूं म्हणालास, कीं मी हिमाचलाच्या कोणत्या तरी कंदरांत गेलोंच म्हणून समज. मात्र माझी आणखी एक इच्छा आहे. ती ही कीं, या यवनांना गांधाराच्या पलीकडे हांकून दे. चंद्रगुप्त चांगला शूर आहे. त्याला तुझं साहाय्य असलं, कीं तें साध्य झालंच म्हणून समज. तूं तक्षशिलेंत त्यांच्या अंमलाखालीं कधीं नव्हतास. नाहीं तर तुला त्याचा गरीबगुरीब लोकांवर कसा जुलूम होतो आहे हें तेव्हांच समजून आलं असतं...... "

चाणक्य शेवटीं शेवटीं त्याच्याशीं अशा सलगीनें व कळकळीनें बोलूं लागला कीं, जणूं काय राक्षसानें चंद्रगुप्ताचें साचिव्य पतकरिलेंच. परंतु राक्षस त्याला मध्येंच म्हणाला, " चाणक्या, माझ्या स्वामींच्या कुलाचा घात करणाराशीं वस्तुतः मीं एक शब्दासुद्धां बोलूं नये. तो इतका वेळ मी बोललों याबद्दलच मला पश्चात्ताप होतो आहे. जोंपर्यंत तुम्ही यवनांपासून मगधाचं संरक्षण करीत आहां, तोंपर्यंत मी कांहीं तुमच्या आड येणार नाहीं. तुम्हांला कोणत्याही तऱ्हेचं विघ्न करणार नाहीं, एवढं तुम्ही खास समजा. तुम्हाला मी सचिव व्हावयाला पाहिजे असं वाटतं तें एवढ्याच-करितां कीं नाहीं ? मी यवनांशीं संगनमत करून तुमचा पाडाव करणार नाहीं, किंवा इकडला घरभेदेपणा करणार नाहीं. आधीं आतां माझ्या हातांत कांहीं नाहींच ह्मणा. तेव्हां माझं हें आश्वासन म्हणजे उगीच आहे; पण तुम्ही तीनतीनदां म्हणतां म्हणून मी तें देतों.बाकी माझी काय आहे आतां किंमत ? "

" अमात्या, असं ह्मणूं नकोस. मीं तुला फसवलं, आणि तूं आपल्या अधिक विश्वस्तपणानं फसलास, म्हणून मी तुझी किंमत जाणत नाहीं, असं समजूं नकोस. तुझी खरी योग्यता मी जाणतों म्हणूनच मीं तुला एकदां भागुरायणाकडून घिनवून पाहिलं. मग चंदनदासाला खोटंच मारायला काढून, तेकडून मित्रस्नेहामुळं त्याच्या जिवासाठीं म्हणून तूं वळलास तर पहावं, म्हणून तो यत्न करून पाहिला. त्याचाही उपयोग होत नाहीं, असं पाहिलं तेव्हां तुझा विचार शत्रूला मिळावं असा आहे कीं काय, हें पाहण्यासाठीं सिद्धार्थकाला संवाहकाचा वेष देऊन त्याच्याकडून शाकलायनाला फसवन तो तुझ्याकडे येईल असं करून तिकडून त्याही बाबतींत तुझी परीक्षा पाहिली; आणि मगधाविषयीं प्रीति व यवनांचा द्वेष तुझ्या ठिकाणीं पूर्णपणें वास करीत आहेत असं जाणून मी स्वतः तुला विनंति करायला आलों. यावरून तुझ्या साहाय्याची योग्यता आम्ही खरोखर किती समजतों हें पहा. मग काय ? माझ्या विनंतीप्रमाणें चंद्रगुप्ताचं साचिव्य स्वीकारणारना ? "

" चाणक्या, मीं एकवार सांगितलं कीं, हा राक्षस नंदांखरीज कोणाचीही सेवा करणार नाहीं. मग आपण कां मला आग्रह करितां ? माझ्या प्रतिज्ञेपेक्षां दुसरं मला कांहींही प्रिय नाहीं. "

" ही तरी प्रतिज्ञा दृढ धरून बसणारना ? कोणी नंद सिंहासनावर बसला तर त्याचं साचिव्य तरी तूं पतकरशीलना ? "

" प्रतिज्ञा अगदीं दृढ. कोणी जरी नंद सांपडला तरी त्याची सेवा मी करीन. चाणक्या, तूं कुटिल नीतींत निपुण; पण मीं तुझ्या कौटिल्याची यत्किंचित् भीति न धरतां सांगतों कीं, मला नंदवंशाचा लहानसा अंकुर जरी कुठें दिसला, तरी मी कायावाचामनानें त्याचं संरक्षण करीन. त्याच्यासाठीं हरप्रयत्न करीन, आणि तुझ्या चंद्र-

गुप्ताचा उच्छेद करून या सिंहासनावर त्याला बसवून मग त्याचं साचिव्य करीन. ”

राक्षसाचें भाषण ऐकून चाणक्य हंसला. तें पाहून राक्षसास किंचित् वाईट वाटलें व तो एकदम चाणक्यास म्हणतो, “ चाणक्या, तूं खुशाल हंस. मी बोलतों या गोष्टी तुला अगदीं अशक्य वाटून तूं हंसतो आहेस......”

“ छे. छे. छे. ” चाणक्य त्याजवर राक्षसास म्हणाला, “ तूं म्हणतोस त्या गोष्टी सर्वथैव शक्य आहेत म्हणून मी हंसतों आहें; अशक्य आहेत असं वाटून नाहीं हंसत. ”

“ हें भाषण म्हणजे तरी माझा परिहासच नव्हे काय ? कारण, आज या घटकेला माझं बोलणं निव्वळ शशशृंगाचं धनुष्य धारण करणारा व आकाशपुष्पाचा तुरा करून हिंडणारा वंध्यापुत्र भेटला म्हटल्याप्रमाणेंच अशक्य आहे, हें माझं मलाच दिसतं आहे, मग तुम्हांला दिसेल यांत नवल काय ? ”

“ पण आम्हांला तें तसं दिसत नाहीं म्हणतों. पाहिजे तर कसं तें सिद्ध करून देतों. ”

तें ऐकून राक्षस खिन्नवदन होऊन चाणक्याकडे नुसता पहात राहिला. तेव्हां चाणक्य त्यास म्हणतो, “ अमात्या, आतां एकच गोष्ट मी आपल्याला विचारतों. नंदवंशवृक्षाचा अंकुर जर दिसला, तर त्याचा पक्ष धरून त्याला या सिंहासनावर बसवून त्याचं साचिव्य पतकरायचं, हा तरी आपला निश्चय कायम काय ? या निश्चयांत बिलकूल अंतर पडणार नाहींना ”

“ नाहीं. नाहीं. नाहीं. त्रिवार नाहीं म्हणून सांगतों. काय करतां पुढें ? ”

“ काय करणार ! नंदाचा अंकुर तुझ्यापुढें आणून उभा करून, चंद्रगुप्ताचा स्वीकार करीत नाहींस तर याचा तरी कर असं सांगतों, दुसरं काय ? पण त्याच्या आधीं हें पहा. काय आहे ? रक्षाबंधन ना ? ”

राक्षस त रक्षाबंधन पाहून एकदम चपापला व म्हणाला, “ होय. हें रक्षाबंधन नंदांच्या घरांतलंच आहे. हें सिंहासनावर असणाऱ्या राजाला पहिला पुत्र होतांच त्याच्या मणिबंधावर बांधण्याची चाल आहे. बरं पण या रक्षाबंधनाचं काय ? ”

चाणक्य म्हणाला, “ आतां सांगतों. शारद्वता, आंत ये पाहूं. ” चाणक्याचा शिष्य शारद्वत बाहेर उभा होता तो आंत आला. त्यास चाणक्यानें राक्षसापुढें उभें केलें आणि उजवा हात पसरावयास सांगून म्हटलें, “ राक्षसा, हा पहा, या मुलाच्या हातावरलं ” चिन्हं पहा. तुला सामुद्रिक चिन्हं चांगलीं समजतात म्हणून दाखवितों. हीं सर्व चिन्हं चक्रवर्तित्वाचीं आहेतना ? ”

“ होय, आहेत ! ” इतकें बोलून राक्षस अगदीं गोंधळून गेला. पुढें काय होणार हें त्यास कळेना.

“ राक्षसा, तूंच विचार कर. जो खरा राजबीज नव्हे; त्याच्या हातावर अशीं चिन्हं असूं शकतील काय ? नसणारच ! ”

राक्षस कांहीं बोलला नाहीं.

तेव्हां चाणक्य पुढें म्हणतो, “ राक्षसा, आतां कां प्रतिज्ञेप्रमाणें करीत नाहींस ! हा तुझ्यापुढें उभा केलेला मुलगा नंदवंशाचा अंकुर आहे, त्याच्या जन्मकालीं याच्या मणिबंधावर रक्षाबंधन बांधलं होतं. याचे ग्रह उत्कृष्ट असून एका अनिष्ट ग्रहाच्या दशेमुळें याला जन्माचीं पहिलीं बारा वर्षे दारिद्र्यांत काढावीं लागलीं. याची आई व्याधराजाची कन्या. भागुरायणानं व्याधराजाला जिंकून राजा धनानंदाला ती अर्पण केली. धनानंदानं तिच्याशीं गांधर्वविवाह केला. त्यापासून हा पुत्र झाला. ग्रहदशेमुळें तूं

त्याच्या जन्माविषयीं संशय घेऊन त्याला अरण्यांत नेऊन मारून टाकायला सांगितलंस;परंतु त्याला पुढें चक्रवर्तित्व देणाऱ्या ग्रहांच्या बलानें त्या मारेकऱ्यांच्या अंतःकरणांत दया उपजून ाचे प्राण वांचला. त्यांनीं याला हिमाचलाच्या एका पठारावर सोडलं. तो कर्मधर्मसंयोगानं एका गवळ्याला सांपडला. गवळ्यानं त्याला बारा तेरा वर्षं पाळल्यावर तो माझ्या दृष्टीस पडला. तेव्हां त्याचीं राजचिन्हं पाहून क्षत्रिय कुमाराला योग्य असं शिक्षण देण्याकरितां मीं त्या गवळ्यापासून त्याला मागून घेतलं. तो आतां माझ्याचजवळ असतो. याचा तरी तूं आतां आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें स्वीकार कर. ”

राक्षस तें सर्व ऐकून अगदीं गोंधळून गेला. त्याला हें सारें काय आहे हें कांहींच समजेना. तो अगदीं स्तब्ध बसला तेव्हां चाणक्य पुनः त्याला म्हणतो, “ अमात्या, आतां कां बोलत नाहींस ? मीं सांगितलं हें तुला खोटं वाटतं काय ? कीं हें सर्व खरं वाटतं, परंतु प्रतिज्ञा मागें घ्यावीशी वाटते ? ”

“ चाणक्या, या मुलाचीं चिन्हं तर सगळींच राजचिन्हं दिसतात. हा चक्रवर्ति होईल अशा रेषाही आहेत. रक्षाबंधन नंदांचंच खरं. परंतु त्या....... ”

“ आतां परंतु काय ? ”

“ हा धनानंदाचा मुलगा कशावरून ? तो वनांत मारण्यासाठीं पाठविलेला मुलगा हा कशावरून ? ”

“ ज्यानं बारा वर्षं याचं संगोपन केलं तो गवळी आहे. आज पाटलिपुत्रांत आहे. पाहिजे तर त्याला बोलावतों; पण प्रतिज्ञेप्रमाणें आतां याचा स्वीकार करण्याला मागं घेऊं नको. आपल्या वचनाला जाग. ”

राक्षसानें कांहीं वेळ विचार केला. नंतर म्हणतो, “ चाणक्या, ज्या मुरेनं प्रत्यक्ष आपल्या पतीचा घात केला, तिच्या पुत्राचा स्वीकार करणं मला कसंसंच वाटतं; तथापि त्याच्याखेरीज आतां नंदांचा अंकुर कुठें नाहींच, म्हणून मी याचा स्वीकार करतों; पण मी असा बलहीन; मी याला हातीं धरून काय करूं शकणार ? ”

“ मगधाच्या राज्यावर बसवूं शकणार. ”

“ तो कसा ? ” राक्षस खेदानें हंसून विचारतो. त्याला ती एकंदर थट्टाच वाटत होती कीं काय कोण जाणे !

“ कोणाच्या तरी साहाय्यानं, ” चाणक्यानें प्रत्युत्तर केलें.

“ या वेळीं मला साहाय्य कोण होणार ? ही पुढची गोष्ट आहे. ”

“ पुढची कां आजची गोष्ट आहे. मी आपलं पूर्ण साहाय्य देतों. ”

“ कां, चंद्रगुप्ताचं व आपलं भांडण झालं कीं काय ? त्याला आपण सोडून देणार ? ”

“ छे. छे. तसं कांहीं एक नाहीं. याला आणि त्याला दोघांनाही पाटलिपुत्राच्या सिंहासनावर बसवूं; मग तर तुझी हरकत नाहीं ! ”

“ म्हणजे ? ”

“ म्हणजे काय ? हा चंद्रगुप्तच आहे ! ”

# उपसंहार.

चाणक्यानें चंद्रगुप्तास सुद्रामच शिष्याचा वेष देऊन आपल्यावरोबर आणलें होतें व शिष्याची म्हणून जी त्यानें हकीकत सांगितली ती सर्व चंद्रगुप्ताचीच होय, हें सर्व राक्षसास सांगितलें. राक्षस अत्यंत आश्चर्यचकित झाला व शेवटीं कबूल केल्याप्रमाणें त्यानें "नंदांकुर" जो चंद्रगुप्त त्याचें साचिव्य पतकरिलें. राक्षसास पुनः सचिव नेमल्यानें भागुरायणाची थोडीशी नाराजी झाली; परंतु चाणक्यानें त्याची लवकरच समजूत घातली. राक्षस आणि चाणक्य एक झाल्यावर काय विचारतां? सलूक्षस आणि मलयकेतु दोघे आपलीं सैन्यें घेऊन येण्याच्या आधींच त्यांनीं आपली एक प्रचंड सेना तयार केली, तींत ६,००,००० पायदळ, ३०,००० घोडेस्वार आणि ९,००० हत्ती होते. अशी प्रचंड सेना आणि चंद्रगुप्तासारखा तरुण महत्त्वाकांक्षी वीर तिचा मुख्य, मग काय विचारतां? पहिल्या धडक्यासच सलूक्षस व मलयकेतु यांच्या सैन्याची त्यांनीं दाणादाण उडविली आणि सुमारें वर्ष दीड वर्षाच्या आंतच सलूक्षसास काश्मीरच्या पलीकडे घालविलें. शेवटीं सलूक्षसानें चंद्रगुप्ताशीं तह करून सिंधुनदाच्या पश्चिमेकडला सर्व मुलूख सोडून दिला, त्यांत गांधार देश सोडला आणि आपली एक मुलगी चंद्रगुप्तास दिली व आपला मेगास्थेनीज नांवाचा एक वकील चंद्रगुप्ताकडे ठेविला. पर्वतेश्वरास सोडून देण्यांत आलें. तो चंद्रगुप्ताचा मांडलिक झाला. राक्षसानें साचिव्य पतकरून सलूक्षसाचे एक दोन पराभव झाल्यावर थोडेच दिवसांत चाणक्य आपल्या हिमाचलाश्रमांत जाऊन तपश्चर्या करीत बसला. चंद्रगुप्तानें तेथले आपले सर्व सोबती पाटलिपुत्रास आणून त्यांस सैन्यांत अधिकार दिले. राजकुलांतील सर्व गोधनावर आपल्या गोपजनकास नेमिलें. सापत्नमातांस चंद्रगुप्तानें फार आदरानें वागविलें. आपल्या आईनें आपल्यासाठीं इतकीं विलक्षण साहसें केलीं म्हणून चंद्रगुप्त आपणास "मौर्य" ( मुरेचा पुत्र तो मौर्य ) असें म्हणवूं लागला. त्यानें नंद हें नांव सोडून दिलें; पण राक्षस त्यास नंदच समजे. वृंदमाला व तिच्या नादानें सुमतिका दोघीही बौद्ध जोगिणी झाल्या. वसुभूतीच्या पश्चात् सिद्धार्थक विहाराधिपति होऊन त्यानें आपल्या विहाराचा विस्तार फार वाढविला, व त्यामुळें बौद्धपंथाचें प्राबल्य बरेंच वाढत चाललें.